श्री सखाराम नेमचंद जैन ग्रंथमाला.

श्रीमदसगमहाकविविरचित—

# वर्धमानचरित्र.

अनुवादकः—जिनदास पार्श्वनाथ फडकुले.

प्रकाशकः—रावजी सखाराम दोशी.

वीरनिर्वाण संवत् २४५७.

मार्च, सन् १९३१.

प्रथमावृत्ति.

किंमत ४ रुपये.

# विषयानुक्रमणिका.


| अ.नं. | विषय. | पृष्ठ संख्या. |
|---|---|---|
| १ | मंगलाचरण..... ... ... | १ |
| २ | पूर्वदेशाचें वर्णन.... ... ... | ३ |
| ३ | श्वेतातपत्रानगरीचें वर्णन.... ... ... | ५ |
| ४ | नंदिवर्धन राजाचें वर्णन... ... ... | ९ |
| ५ | वीरवती राणीचें वर्णन... ... ... | ११ |
| ६ | नंदन राजपुत्राचें वर्णन... ... ... | १२ |
| ७ | नंदिवर्धनास वैराग्य होतें... ... ... | २२ |
| ८ | नंदन राजपुत्रास राज्यार्पण... ... ... | २५ |
| ९ | उद्यान वर्णन... - ... ... | २८ |
| १० | प्रौष्ठिल मुनींच्या दर्शनासाठी राजाचें प्रयाण... ... | ३२ |
| ११ | नंद राजाच्या पूर्वभवांचें मुनिकृत वर्णन... ... | ३६ |
| १२ | अमितकीर्ति मुनींचा सिंहाला उपदेश व त्याचें पूर्वभव वर्णन ... | ३८ |
| १३ | आदिनाथ स्वामीबरोबर मरीचि दीक्षा घेतो.... ... | ४३ |
| १४ | मरीचीचें भववर्णन... .. .... | ४५ |
| १५ | विश्वभूति राजास वैराग्य होतें. तो विश्वनंदि पुत्रास युवराज पदवी देतो व आपल्या विशाखभूति भावास राज्य देऊन दीक्षा घेतो... | ५७ |
| १६ | बगीचाविषयीं विश्वनंदी व विशाखनंदी यांचा कलह... ... | ५९ |
| १७ | विश्वनंदी व विशाखभूति दीक्षा घेतात... ... | ६९ |
| १८ | विश्वनंदी मुनि निदानानें महाशुक्र स्वर्गांत उत्पन्न होतात. ... | ७२ |
| १९ | अश्वग्रीव विद्याधराचा जन्म व त्याचा अर्धचक्रवर्तिपणा... ... | ८१ |
| २० | पोदनपुरनगर वर्णन... ... ... | ८३ |
| २१ | प्रजापति राजाचें वर्णन... ... ... | ८५ |
| २२ | विजय व त्रिपृष्टराजपुत्राचें वर्णन. ... .. | ८७ |
| २३ | सिंहवध वर्णन. .. ... . . | ९१ |
| २४ | विद्याधरदूतानें सांगितलेली हकीकत ... ... | ९४ |
| २५ | त्रिपृष्ट,राजपुत्राचें स्वयंप्रभेगीं लग्न ... ... | १०१ |
| २६ | अश्वग्रीवाच्या सभेंत क्षुब्ध झालेल्या विद्याधर राजांचें वर्णन ... | १०५ |
| २७ | हरिश्मश्रु प्रधानाचा अश्वग्रीव राजास उपदेश व राजाचें उद्धत भाषण. | १२१ |
| २८ | प्रजापति राजाचें मंत्रिगणासह खलबत ... ... | १२२ |
| २९ | सुश्रुत मंत्र्याचें सामोपायवर्णन . . ... | १२३ |
| ३० | विजयबलभद्रानें सामोपायाचें खंडन केलें... ... | १२७ |

| अ नं. | विषय | पृ. संख्या. |
|---|---|---|
| ३१ | सैन्यप्रयाण वर्णन. .. ... ... | १३६ |
| ३२ | त्रिपृष्टाकडे दूत येऊन भाषण करितो. .. ... | १४५ |
| ३३ | बलभद्राचें त्यास उत्तर.... ... ... | १४७ |
| ३४ | पुन. दूताचें भाषण .. ... .. | १५१ |
| ३५ | युद्ध वर्णन.. ... .. | १६२ |
| ३६ | त्रिपृष्ट व अश्वग्रीव याचे युद्ध ... ... | १७६ |
| ३७ | त्रिपृष्टाच्या ऐश्वर्याचें वर्णन. ... | १८४ |
| ३८ | प्रजापति राजाचे वैराग्य व दीक्षाग्रहण | १८९ |
| ३९ | त्रिपृष्टाचा मृत्यु व विजय बलदेवाचें मुक्तिगमन ... | २०० |
| ४० | नरक दु ख वर्णन... ... | २०४ |
| ४१ | अमितकीर्ति मुनीचा सिंहास धर्मोपदेश . ... | २७७ |
| ४२ | सुव्रत मुनीचा कनकध्वजराजास धर्मोपदेश | २२६ |
| ४३ | राजा दीक्षा घेतो व सहस्रार स्वर्गांत देव होतो ... | २३० |
| ४४ | हरिषेण राजा श्रुतसागर मुनी पासून श्रावकांची व्रतें ग्रहण करितो . | २३७ |
| ४५ | सूर्यास्त व चंद्रोदय वर्णन... ... | २३९ |
| ४६ | प्रियमित्रचक्रवर्तीचें व त्याच्या ऐश्वर्याचें वर्णन .. ... | २५४ |
| ४७ | क्षेमंकर जिनेश्वराचा चक्रवर्तीस सप्ततत्वाचा सविस्तर उपदेश . | २६३ |
| ४८ | नंदन राजा दीक्षा घेऊन सोळा भावनाचे चिंतन करितो. .. | ३२० |
| ४९ | कुंडपुराचें वर्णन . . . | ३३३ |
| ५० | सिद्धार्थ नृपति वर्णन .. . . | ३३७ |
| ५१ | देवतागमन व त्रिशला देवीस सोळा स्वप्नें पडली | ३४० |
| ५२ | स्वप्न फल वर्णन. .. . | ३४२ |
| ५३ | महावीर जन्म व त्याचा मेरू पर्वतावर इंद्र अभिषेक करितो . | ३४७ |
| ५४ | महावीर स्वामी सर्पाच्या मस्तकावर उभे राहातात .. | ३५६ |
| ५५ | महावीर स्वामी दीक्षा घेतात व रुद्र त्यांना उपसर्ग करितो .. | ३५७ |
| ५६ | महावीर स्वामीस केवल ज्ञानाची प्राप्ति .. .. | ३६१ |
| ५७ | समवसरण वर्णन... . | ३६३ |
| ५८ | गौतम ब्राह्मण दीक्षा घेतो... .... .. | ३७४ |
| ५९ | महावीर स्वामीची इंद्र स्तुति करितो ... | ३७५ |
| ६० | महावीर स्वामीस मोक्ष प्राप्ति. .. . . | ३८३ |
| ६१ | कवि प्रशस्ति .. ... | ३८५ |

# प्रस्तावना.

## काव्य कशास ह्मणतात ?

श्री महावीरस्वामींचें सविस्तर चरित्र महाकवि असग यांनीं संस्कृत भाषेंत काव्यरूपानें लिहिलें आहे. हें त्यांचें काव्य उच्च दर्जाचें आहे. जैन कवींनीं आपल्या काव्यांत उत्कृष्ट नायकांचेंच वर्णन केलें आहे. म्हणून त्यांनीं आपल्या प्रतिभाशाली वाणीचा दुरुपयोग केला नाहीं असें ह्मणण्यास हरकत नाहीं. जैनाचार्यांच्या हृदयांत लोकांना मोक्षमार्गांत तत्पर करण्याचा उद्देश होता. व तो त्यांनीं उच्चाचरणाच्या नायकाचें वर्णन करून पार पाडिला आहे.

हीनवृत्तीच्या नायकांचें लक्ष परमार्थाकडे वळण्याचें नसतें. व अशा नायकांचें वर्णन करण्यानें आपण जनतेला उच्चमार्गाकडे नेऊं शकणार नाहीं हें जैनाचार्यांना पूर्णपणें माहित होतें.

सरस्वती अर्थात् वाणी ही एक अपूर्व कल्पलता आहे म्हणून तिची वाढ करावयाची असेल तर तिला आदर्शनायक जे तीर्थंकरादिक सत्पुरुष एतत्स्वरूपी कल्पवृक्षावरच चढवावयास पाहिजे.

अधमनायकरूपी विषवृक्षावर तिची वाढ करणारे कवि आपल्याला पुण्योदयानें प्राप्त झालेल्या प्रतिभा गुणयुक्तवाणीचा दुरुपयोग करितात असें ह्मणावयास कांहीं हरकत वाटत नाहीं. आपल्या वाणीचा दुरुपयोग करणारे कवि हे स्वतःला व जनतेला ही उच्चमार्गापासून—मोक्षमार्गापासून भ्रष्ट करितात असें समजावें.

जैनाचार्यांनीं असला अशुभ मार्ग स्वतः स्वीकारिला नाहीं व जनतेलाही त्या मार्गाकडे त्यांनीं खेचलें नाहीं. ही फार आनंदाची गोष्ट आहे.

भगवत् जिनसेन आचार्यांनीं कवि व कविता कोणास ह्मणावें याचें फार मार्मिक उत्तर दिलें आहे. तें याप्रमाणें:—

त एव कवयो लोके त एव च विचक्षणाः ॥
येषां धर्मकथांगत्वं भारती प्रतिपद्यते ॥ ६२ ॥
धर्मानुबंधिनी या स्यात्कविता सैव शस्यते ॥
शेषा पापास्रवायैव सुप्रयुक्तापि जायते ॥ ६३ ॥
केचिन्मिथ्यादृशः काव्यं ग्रथ्नन्ति श्रुतिपेशलम् ॥
तत्त्वधर्मानुबंधित्वान्न सतां प्रीणनक्षमम ॥ ६४ ॥

अर्थ—ज्यांची वाणी धर्ममार्गाला वृद्धिंगत करण्यास कारण होते तेच या जगांत कवि होत, आणि तेच चतुर समजावेत. जी रत्नत्रय धर्माला अनुसरलेली आहे त्याच कवितेला कविता म्हणणें शोभतें. धर्माला न अनुसरणारी कविता जरी शब्दार्थांनीं मनोहर असली तरी ती पापोत्पत्तीलाच कारण होते. म्हणून ती कविता प्रशंसेस पात्र होत नाहीं कित्येक मिथ्यादृष्टी कवि कानाला मधुर लागणारें काव्य करितात पण तें अधर्म—पाप उत्पन्न करणारें असल्यामुळें सज्जनांच्या हृदयाला सन्तुष्ट करण्यास समर्थ नसतें.

कुकवींच्या काव्यांत धर्माला गौण ठेऊन अर्थ व काम पुरुषार्थांसच प्राधान्य दिलेलें आढळतें यास्तव अशा काव्यापासून लोकांना मोक्ष प्राप्तीचा उपाय सांपडत नाहीं. ऐहिक उन्नति करून घेणें एवढेंच मनुष्यानें आपलें ध्येय मानूं नये. ऐहिक उन्नति ही पारमार्थिक उन्नतीला साधनीभूत मानूनच तिची प्राप्ति करून घ्यावी. जसें धान्य पेरणें याचा उद्देश कडबा मिळावा हा नसून धान्य मिळावें हा असतो तसेंच कडब्याप्रमाणें असलेली ऐहिक उन्नति ही केवळ पारमार्थिक आत्मोन्नतीचें फक्त साधन आहे. ती ध्येय नव्हे.

यास्तव आपल्याला आत्मोन्नतिरूपी ध्येय प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर तें कुकाव्यापासून प्राप्त होणें शक्य नाहीं. धर्ममार्गदर्शक काव्याच्याच आश्रयानें जनतेला ऐहिक उन्नतीचें उपाय सांपडतात.

जरी जैन काव्यांत इतर लोकांच्या काव्याप्रमाणें शृंगार रसाचें व युद्धादिकांचें वर्णन आढळून येतें तथापि त्यालाच त्यांनीं प्राधान्य दिलें नाहीं हें ध्यानांत ठेवावें. ज्याप्रमाणें भोजनाच्या पदार्थांत भात, भाकरी, चपात्या वगैरे क्षुधा दूर करणाऱ्या पदार्थांचेंच प्रामुख्य असतें, चटण्या कोशिंबिरी यांचें नसतें. चटण्या वगैरे पदार्थ केवळ अन्नाला चव येण्यासाठीं असतात. क्षुधा दूर करणेच्या कामीं त्यांचा उपयोग होत नाहीं; तसें शृंगारादिक रसांचा उपयोग आचार्यांनीं आपल्या काव्यांत धर्मकथेला मधुरता यावी म्हणूनच केलेला आहे.

अर्थ पुरुषार्थ व काम पुरुषार्थ यांचें वर्णन प्रसंगोपात्त जैन कवि करितात पण धर्म पुरुषार्थाला मुख्यता आहे ही गोष्ट ते विसरत नाहींत हें खास. अर्थ व काम हे दोन पुरुषार्थ धर्मापासूनच प्राप्त होतात, हें दाखविण्यासाठींच या दोन पुरुषार्थांचें वर्णन जैन कवि करित असतात. उपर्युक्त दोन पुरुषार्थांनाच मुख्यता दिल्यावर विकथा व धर्मकथा यांत अंतर तें काय राहाणार ?

प्रस्तुत महावीर चरित्र अर्थात् वर्द्धमान चरित्र हें काव्य असग कवींनीं आपलें बुद्धिचातुर्य खर्चे करून अतिशय रसाळ असें रचिलें आहे. संस्कृतज्ञ विद्वानांना हें काव्य वाचून आनंद वाटल्याशिवाय राहणार नाहीं अशी आमची खात्री आहे.

## महावीर स्वामींचें श्रेष्ठत्व.

महावीर स्वामींच्या चरित्रांतील प्रसंग सर्वच चित्ताकर्षक आहेत व या प्रसंगांचें वर्णन करणारा असग कवि ही तितकाच कुशल असल्यामुळें या काव्यामध्यें अपूर्व सरसता उत्पन्न झाली आहे. जसें स्वाभाविक सौंदर्य असून पुनः तें खुलवण्याची सर्व सामग्री ही भरपूर असली म्हणजे तें जसें जनतेला अतिशय मुग्ध बनवितें तसाच प्रकार या काव्यामध्यें ही घडून आला आहे असें आम्हास वाटतें.

श्री महावीर स्वामींचें महत्त्व वर्णन करणें हें आमच्या सारख्या अत्यंत अल्पज्ञान्याला अगदींच अशक्य आहे भगवान् वीरप्रभूचे गुण व सामर्थ्य वर्णन करण्यास चार ज्ञानाचे धारक असे गौतमादि गणधरही स्वतःला असमर्थ समजत असत.

तथापि पूर्वाचार्यांनीं लिहून ठेविलेल्या ग्रंथाच्या आधारें त्यांच्या चरित्रांतील प्रसंगांचें वर्णन मी करितो असें असग कवींनीं म्हटलें आहे. यास्तव आम्ही ही त्यांच्या चरित्राच्या महत्त्वाच्या भागाचें संक्षेपानें वर्णन करण्याचा प्रयत्न करितो. श्री समन्तभद्राचार्य स्वयंभू स्तोत्रांत एके ठिकाणीं असें म्हणतातः—

तथापि ते मुनींद्रस्य यतो नामापि कीर्तितम् ॥
पुनाति पुण्यकीर्तेर्नस्ततो ब्रूयाम किंचन ॥

हे प्रभो ! तुझें संपूर्ण चरित्र सांगणें फारच कठिण आहे म्हणून आम्ही फक्त तुझें नाम मात्र कथन करितो. कारण तुझा नामोच्चार करण्यानें ही आमचीं पातकें नष्ट होऊन आम्हाला पवित्रपणा प्राप्त होईल. या आचार्यांच्या उक्तीला अनुसरूनच येथें थोडासा विचार करूं.

नोदभास्यन्यदि ध्वान्तविच्छिदस्त्वद्वचोंऽशवः ॥
तमस्यन्धे जगत्कृत्स्नमपतिष्यदिदं ध्रुवम् ॥५९॥ म. पु प. १

आम्हाला असें वाटतें कीं, भगवान् वीर प्रभु या जगांत अवतरले नसते तर आज जैन धर्माचें अस्तित्वच राहिलें नसतें. याचें कारण असें आहे कीं, श्री पार्श्वनाथ तीर्थंकर मोक्षाला गेल्यानंतर अधर्माची चोहोंकडे अतिशय वाढ झाली. जगात सर्वत्र हिंसेला धर्म मानण्यांत येऊं लागलें त्यामुळें यज्ञादिक पाप कार्यांची प्रवृत्ति अतिशय वाढली होती. अशा वेळीं अहिंसाधर्माचें खरें स्वरूप जगाला दाखविणाऱ्या असामान्य प्रभावशाली व्यक्तीची फारच आवश्यकता होती. सर्व विचारी लोक धर्माचें खरें स्वरूप काय आहे या विषयीं विचार करीत होते. त्यांना योग्य मार्गदर्शक एवढेंच नव्हे तर त्यांना त्या योग्य मार्गानें नेणारा [illegible]

पुढें तो मार्ग अव्याहत चालू करण्याचें सामर्थ्य बाळगणारा महात्मा पाहिजे होता. तो श्री पार्श्वनाथ स्वामी मोक्षास गेल्यानंतर १७८ वर्षांनीं जन्मास आला व त्यानें अनेक मतांच्या कोलाहलांत ऐकूं न येणाऱ्या मागसलेल्या जैन धर्माला वेगानें पुढें आणिलें. म्हणून आज जैनधर्माचें या भारतवर्षांत नांव ऐकू येत आहे.

सर्व तीर्थंकर शक्ति, गुण वगैरे बाबतींत समान आहेत पण इतर तीर्थंकरांच्या वेळीं व महावीर स्वामींच्या वेळीं परिस्थिती वेगळी वेगळी होती. इतर तीर्थंकराच्या वेळीं अनेक कुमतांचा प्रसार झाला नव्हता तो यावेळीं झाला होता. यास्तव अनेक कुमतांच्या तीव्र गलबल्यांत नामशेष झालेल्या जैनधर्मानें पुनः आपली पूर्णपणें ऊर्जितावस्था प्राप्त करून घेतली. याला महावीरस्वामीच संपूर्णपणें कारण झालेले आहेत.

आदि भगवंताच्या पुत्राला—भरतचक्रवर्तीला एकेवेळीं सोळा दुःस्वप्नें पडलीं होतीं. त्या स्वप्नांचीं फलें त्यानें आदिनाथस्वामीस विचारिलीं. त्या स्वप्नापैकीं पहिलें स्वप्नाचा उल्लेख भगवज्जिनसेनाचार्यांनीं याप्रमाणें केला आहे:—

> दृष्टाः स्वप्ने मृगाधीशा ये त्रयोविंशतिप्रमाः ॥
> निःसपत्नां विहृत्येमां क्ष्मां क्ष्माभृत्कूटमाश्रिताः ॥ ६३ ॥
> तत्फलं सन्मतिं मुक्त्वा शेषतीर्थकरोदये ।
> दुर्नयानामनुद्भूतिख्यापनं लक्ष्यतां स्फुटम् ॥ ६४ ॥
> पुनरेकाकिनः सिंहपोतस्यान्वक्मृगेक्षणात् ॥
> भवेयुः सन्मतेस्तीर्थे सानुषंगाः कुलिंगिनः ॥ ६५ ॥
>
> ( महापुराण पर्व ४१ वें. )

अर्थात्—हे भरता ! तूं पहिल्या स्वप्नांत सर्व पृथ्वीवर शत्रुरहित होऊन ज्यांनीं विहार केला व नंतर पर्वताच्या शिखराचा आश्रय केला असे २३ सिंह पाहिलेस. त्याचें फल हें आहे कीं, महावीर स्वामीस सोडून बाकीच्या तीर्थंकरांच्या वेळीं इतर कुमतांची उत्पत्ति होणार नाहीं. पुढें दुसऱ्या स्वप्नांत तूं एका सिंहाच्या बच्चाच्या मागें हरिण जात असलेले पाहिलास त्याचें हें फळ आहे कीं, महावीर स्वामीच्या वेळीं परिग्रहधारी कुमतांचा प्रसार होईल.

या उल्लेखावरून महावीरस्वामीच्या वेळीं कशी परिस्थिति होती हें वाचकांच्या ध्यानांत येईलच.

धर्मपरीक्षा ग्रंथांत अमितगति आचार्यांनींही असा उल्लेख केला आहे:—

पाखंडाः समये तुर्ये बीजरूपेण ये स्थिताः ॥
प्ररुह्य विस्तरं प्राप्ताः कलिकालेऽत्रनात्रिमे ॥ ७२ ॥ सर्ग ८१

जीं कुमतें चतुर्थकालांत फक्त बीजरूपाचीं होतीं तीं कलिकालांत वीरभगवंताचे वेळीं अंकुर फुटून वृक्षाप्रमाणें फोपावलीं.

अशा प्राचीन ग्रंथांच्या उल्लेखावरून इतर तीर्थकरांचे वेळीं व महावीर स्वामीचे वेळीं कशी परिस्थिति होती हें चांगलें व्यक्त होतें.

श्री महावीर स्वामींनीं अहिंसा धर्माचा पुष्कळ प्रसार केला. त्यांच्या उपदेशाची व त्यांनीं प्रतिपादिलेल्या जैन धर्माची छाप हिंदुधर्मावर ही पडली, यामुळें हिंदुधर्मांत यज्ञ-यागादिक बंद पडले असें लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांनींहि बडोदे येथें दिलेल्या व्याख्यानांत स्पष्ट कबूल केलें आहे. त्यांच्या व्याख्यानाचा कांहीं अंश आम्ही येथें संक्षेपानें लिहितो:—

" मीमांसक मुक्तीकरितां यज्ञयाग करीत. कालिदासानें सुद्धा मेघदूतामध्यें नदीचें पाणी यज्ञपशूंच्या वधानें लाल झाल्याचें वर्णन केलें आहे. पशुवधानें मोक्ष प्राप्ति होत नाहीं असें गाजवून जर कोणी दयेचा ध्वज प्रथम उभारला असेल तर तो मान जैनांचाच आहे. ब्राम्हणधर्म व जैनधर्म यांच्या मधील तंट्याचें कारण हिंसाच होय. वैष्णवांच्या यज्ञांत पिष्टपशूचा बलि होतो तो जैन धर्माचाच परिणाम होय. जगांत अहिंसा तत्वाचा प्रसार करण्यांत महावीर स्वामींनी जी दृढता दाखविली ती अवतारी पुरुषाखेरीज दुसऱ्यांना दाखवितां येण्यासारखी नाहीं. मी जैनधर्माचें नुसतें महत्त्व सांगूं इच्छित नाहीं. परंतु जैनधर्माचा हिंदुधर्मावर पुष्कळ परिणाम झाला हें मला सांगितलें पाहिजे. "

केवलज्ञान झाल्यावर महावीर स्वामींनीं अनेक देशांत विहार करून सर्वत्र जैन धर्माचें उज्ज्वल स्वरूप लोकांना दाखविलें. कोटयवधि लोकांनीं जैनधर्म धारण करून आपलें कल्याण करून घेतलें. प्रभूच्या वेळीं श्रेणिक नांवाचा प्रसिद्ध राजा होऊन गेला. हा इतिहासांत बिंबिसार या नांवानें प्रसिद्ध आहे. यानें पूर्वीं बौद्ध धर्माचा स्वीकार केला होता. परंतु पुढें श्री महावीर स्वामीच्या समवसरणांत त्यांच्या उपदेशानें तो जैनधर्मांत प्रवीण झाला. त्यानें आपल्या मगध देशांत सर्वत्र जिनधर्माचा प्रसार करण्याचा यशस्वी प्रयत्न केला. या श्रेणिकाला महावीर स्वामीच्या सन्निध शुभ परिणामामुळें तीर्थंकर प्रकृतीचा बंध पडला. त्यामुळें तो पुढें उत्सर्पिणीच्या तिसऱ्या कालांत या भरतवर्षांत पहिला तीर्थंकर होऊन जैन धर्माचा प्रसार करणार आहे. याविषयीं हरिवंश पुराणांत जो उल्लेख आहे तो याप्रमाणें:—

तत्र तीर्थकरः कुर्वन्प्रत्यहं धर्मदेशनं ॥
सेवितः श्रेणिकेनास्य न हि तृप्तिस्त्रिवर्गजा ॥ १४६ ॥
गौतमं च समासाद्य तदा तदुपदेशतः ॥
सर्वानुयोगमार्गेषु प्रवीणः स नृपोऽभवत ॥ १४७ ॥
ततो जिनगृहैस्तुंगै राज्ञा राजगृहं पुरम् ॥
कृतमन्तर्बहिर्व्याप्तमजस्रमहिमोत्सवैः ॥ १४८ ॥
कृतः सामंतसंघातैर्महामंत्रिपुरोहितैः ॥
प्रजाभिर्जिनगेहाढया मगधो विषयोऽखिलः ॥ १४९ ॥
पुरेषु ग्रामघोषेषु पर्वताग्रेष्वदृश्यत ॥
नदीतटवनांतेषु तदा जिनगृहावली ॥ १५० ॥ हरिवंश पु. सर्ग २ रा.
धर्मेणायोजयद्वीरो विरहन् विभवान्वितः ॥
यथैव भगवान्पूर्वं वृषभो भव्यवत्सलः ॥ ७ ॥
द्योतमाने जिनादित्ये केवलोद्योतभास्वरे ॥
क्व लीना इति न ज्ञातास्तीर्थखद्योतसंपदः ॥ हरिवंश पु. सर्ग ३ रा.

श्रेणिक राजा, त्याचें मंत्रिमंडळ व पुरोहित आणि प्रजा यांच्या प्रयत्नानें सर्व मगध देशांत जिनमंदिरांची रचना झाली. मोठीं शहरें, खेडेगावें, पर्वततट, नदीचे किनारे या सर्व ठिकाणीं जिनमंदिरें बांधली गेलीं. या रीतीनें सर्व मगधदेश जैन धर्ममय बनला होता. याच प्रमणें इतर देशांतही भगवंतांनीं विहार करून लोकांना जैनधर्मी बनविलें. जसें पूर्वी आदिनाथ स्वामीनीं सर्वांना जैन केले होतें. तसेंच महावीर स्वामीनींही केले. केवळ ज्ञानरूपी प्रकाशानें जेव्हां महावीर स्वामीरूपी सूर्य तळपत होता तेव्हां कुमतरूपी काजवे कोठें लपून बसले होते हें समजलें देखिल नाहीं! याप्रमाणें प्रयत्न केल्यामुळें महावीरस्वामींचा धर्म आज ही या हिंदुस्थानांत टिकून राहिला आहे.

महावीरस्वामींचें अंतःकरण जन्मल्यापासूनच वैराग्ययुक्त होतें. म्हणून त्यांनीं राज्याचा स्वीकार केला नाहीं व लग्नही करून घेतलें नाहीं. ते कुमार ब्रम्हचारी होते.

अर्थिभ्यस्तृणवद्विचिंत्य सकलां कश्चिच्छ्रियं दत्तवान् ॥
पापां तामवितर्पिणीं विगणयन्नादात्परं त्यक्तवान् ॥
प्रागेवाकुशलां विमृश्य सुभगोऽप्यन्यो न पर्यग्रहीत्—
देते ते विदितोत्तरोत्तरवराः सर्वोत्तमास्त्यागिनः ॥ १०२ ॥

आत्मानुशासन.

जगांत उत्तम माणसांचे तीन प्रकार सांगितले आहेत. पहिल्या प्रकारचीं माणसें पंचेंद्रियांच्या विषयांस तृणाप्रमाणें मानून संपत्ति याचकांना देऊन टाकितात. दुसऱ्या प्रकारचीं माणसें लक्ष्मी पाप उत्पन्न करणारी आहे व तिचा उपभोग किती जरी घेतला तरीही ती लोभ वाढविणारी आहे आणि संतोषाचा नाश करणारी आहे असें समजून ती दुसऱ्याला देत नाहींत, पण तिचा त्याग करून मुनि होतात. तिसऱ्या प्रकारचीं माणसें लक्ष्मीचा संबंध होण्याच्या पूर्वीच घर सोडून वीतराग तपस्वी बनतात. महावीर स्वामी हे तिसऱ्या प्रकारचे होते म्हणून त्यांनीं आजन्म ब्रम्हचर्य पाळिलें व राज्य स्वीकारिलें नाहीं.

संपत्ति न मिळतांही मनुष्याच्या मनांत शेंकडों प्रकारचीं मनोराज्यें उत्पन्न होतात व विषयलालसा सुटत नाहीं. मी असें करीन, तसें करीन, मी असा उद्योग करीन, अशी संपत्ति मिळवीन अशा मानसिक भावना नेहमीं मनांत उद्भवत असतात. परंतु महावीर स्वामींना अतुल वैभव मिळालें होतें; स्वर्गाचा राजा इंद्रही त्यांचा नोकर बनला होता; तरीही ते अतुल वैभवाला लाथ मारून आत्मिकसुखामध्यें निमग्न झाले, ही किती तरी मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. अशी उत्कृष्ट त्याग बुद्धि धारण करून जे परमविरक्त बनले; ज्यांनीं मिथ्यांधकारांत चाचपडत असलेल्या भव्यांना रत्नत्रयात्मक प्रकाशांत आणून मुक्तीचा मार्ग दाखविला त्या धीर वीर परमात्म्याला आमचा वारंवार नमस्कार असो.

अशी उत्कृष्ट त्यागबुद्धि मनांत बाणल्यामुळें ते शरीरापासून पूर्ण विरक्त झाले होते म्हणून त्यांना रुद्रादिका सारख्या व्यक्तींनीं केलेल्या उपसर्गाचें कांहींच भय वाटलें नाहीं. त्यांच्या आत्मध्यानांतील स्थिरतेला रुद्रादिक भ्रष्ट करूं शकले नाहींत. असो. याप्रमाणें प्रभूच्या चरित्रांतील मुख्य गोष्टींचें आह्मी वर्णन केलें आहे. यांच्या चरित्रांतील कांहीं प्रसंगांचें आह्मी 'श्री महावीर चरित्रांवर तौलनिक पद्धतीनें विचार' या लेखांत वर्णन केलें आहे. तो लेखही या प्रस्तावनेच्या पुढें जोडला आहे.

आतां प्रस्तुत चरित्राचे कर्ते श्री असग कवि याविषयीं थोडक्यांत माहिती देऊन ही प्रस्तावना आम्ही संपवितों.

### श्री असग महाकवि.

या महाकवीनें प्रस्तुत महावीरचरित्र आणि शांतिनाथचरित्र असे दोन ग्रंथ लिहिले आहेत. आणखी यानें आठ ग्रंथ लिहिले आहेत असें स्वतः त्यानें प्रशस्ति श्लोकांत सांगितलें आहे. संपत् नांवाच्या श्राविकेनें हें महावीरचरित्र रचण्यास कवीला सांगितल्यावरून त्यानें हें सुंदर चरित्र भावकीर्ति मुनीश्वराच्या सन्निध राहून रचिलें आहे. या काव्याची रचना त्यानें शके संव. ९१० मध्यें केली आहे. अर्थात विक्रम संवत् १०४५ मध्यें याची रचना झाली हें सिद्ध होतें.

कांजीवरं, तंजावर, कांची या प्रदेशांना चोलदेश ह्मणतात तेथें श्रीनाथराजाच्या राज्यांत विरला नगरीमध्यें यानें विद्याध्ययन केलें व त्या ठिकाणीं त्यानें आठ ग्रंथ रचिले असा याच काव्याच्या प्रशस्ति श्लोकांत त्यानें स्वतःचा उल्लेख केला आहे.

महावीर चरित्र रचल्यानंतर या कवीनें शांतिपुराण हा ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथाच्या प्रशस्तीमध्यें त्यानें आपल्या मातापितरांचा व गुरूचा उल्लेख केला आहे. असग कवीच्या पित्याचें पटुमति असें नांव होतें हा पटुमति मुनिभक्त होता. मुनीश्वराच्या चरणरजानें याचें मस्तक पवित्र झालें होतें. याचा स्वभाव अतिशय शांत होता. व हा निर्मळ सम्यक्त्वाचा धारक होता. अन्नदान देणें, देवपूजन करणें, दशलक्षण वगैरे पर्वांचे उपवास करणें इत्यादि धार्मिक कार्यामध्यें यानें आपलें शरीर क्षीण करून पुष्कळ पुण्यसंचय केला होता. कवीच्या मातेचें 'वैरेति' असें नांव होतें. हीही पतीप्रमाणें निर्मळ सम्यक्त्वधारक व सत्पात्रांना दान देणारी होती.

कवीच्या गुरुचे नागनंद्याचार्य असें नांव होतें. हे व्याकरण शास्त्र व जैनागम यांत अतिशय निपुण होते. या कवीचा जिनप्पा नांवाचा मित्र होता. तो मोठा विद्वान असून काव्य व पुराण यांची त्याला उत्तम माहिती होती. त्याच्या आग्रहानें कवीनें शांतिपुराण हा ग्रंथ लिहिला आहे.

या ग्रंथाच्या प्रशस्तींत शेवटच्या श्लोकांत कवीनें मी आधीं महावीरचरित्र लिहिलें व नंतर शांतिपुराण हा ग्रंथ लिहिला असें ह्मटलें आहे. शांतिपुराणाची प्रशस्ति वाचकांना उपयुक्त होईल ह्मणून आह्मी तिचा येथें उल्लेख करितोः—

मुनिचरणरजोभिः सर्वदा भूतधात्र्यां प्रणतिसमयलग्नैः पावनीभूतमूर्धा ।
उपशम इव मूर्तः शुद्धसम्यक्त्वयुक्तः पटुमतिरिति नाम्ना विश्रुतः श्रावकोऽभूत् १
तनुमतितनुतां यः सर्वपर्वोपवासैस्तनुमनुपमधीः स्म प्रापयन्संचिनोति ॥
सततमपि विभूतिं भूयसीमन्नदानप्रभृतिभिरुरु पुण्यं कुंदशुभ्रं यशश्च ॥ २ ॥
भक्तिं परामविरतं समपक्षपातामातन्वती मुनिनिकायचतुष्टयेऽपि ॥
वैरेतिरित्यनुपमा भुवि तस्य भार्या सम्यक्त्वशुद्धिरिव मूर्तिमती पराभूत् ॥ ३ ॥
पुत्रस्तयोरसग इत्यवदातकीर्त्योरासीन्मनीषिनिवहप्रमुखस्य शिष्यः ।
चन्द्रांशुशुभ्रयशसो भुवि नागनंद्याचार्यस्य शब्दसमयार्णवपारगस्य ॥ ४ ॥
तस्याभवद्भव्यजनस्य सेव्यः सखा जिनापो जिनधर्मसक्तः ।
ख्यातोऽपि शौर्यात्परलोकभीरुर्द्विजातिनाथोऽपि विपक्षपातः ॥ ५ ॥
व्याख्यानशीलत्वमवेक्ष्य तस्य श्रद्धां पुराणेषु च पुण्यबुद्धेः
कवित्वहीनोऽपि गुरौ निबंधे तस्मिन्नहासीदसगः प्रबंधम् ॥ ६ ॥

चरितं विरचय्य सन्मतीयं सदलंकारविचित्रवृत्तबंधं ॥
स पुराणमिदं व्यधत्त शांतेरसगः साधुजनप्रमोहशान्त्यै ॥

## समकालीन कवि.

या कवीच्या समकालीन कवि श्री हरिचंद्र, वीरनंदि, अमितगति, वादीभसिंह वगैरे आहेत. कारण या महावीरचरित्रांत जीवंधरचंपू, चंद्रप्रभचरित, सुभाषितरत्नसंदोह वगैरे ग्रंथांतील श्लोकाप्रमाणें समानार्थक श्लोक आलेले आहेत. ते आम्ही प्रस्तुत ग्रंथांत टिप्पणी रूपानें दिले आहेत. अमितगति आचार्य विक्रमाच्या अकराव्या शतकांत होऊन गेले व असगकवीनें ही प्रस्तुत काव्य विक्रम संवत् १०४५ मध्यें लिहिलें आहे. वीरनंदि यांचाही काल जवळ जवळ तोच आहे.

## विषय वर्णन.

प्रस्तुतचरित्र कवीनें अनेक वृत्तें, अलंकार व रस यांनीं उत्तम सजविलें आहे. वर्णन शैली सुंदर व चित्ताकर्षक आहे. जागो जागीं यांत उत्तम नीतिवचनेंहि आलेलीं आहेत. सातव्या व आठव्या सर्गांत राजनीतीचें अर्थात साम, दाम, दंड व भेद या चार उपायांचें चांगलें वर्णन आहे. दुसरा, दहावा व अकरावा सर्ग यांत वैराग्यरसाचें सुंदर वर्णन आहे. पंधराव्या सर्गांत प्रियमित्र चक्रवर्तीला क्षेमंकर जिनांनीं गृहस्थ व श्रावक यांच्या धर्माचा उपदेश करून सप्ततत्त्वांचें स्वरूप सांगितलें आहे. त्याचें कवीनें विस्तृत वर्णन २०० श्लोकांत केलें आहे.

अठराव्या सर्गांत इंद्रानें महावीर स्वामींची स्तुति केली ती ही कवीनें फार उत्तमरीतीनें वर्णिली आहे. त्या स्तुतीचें मराठी भाषांतर आम्ही आर्यावृत्तांत करून या ग्रंथाच्या प्रारंभीं जोडलें आहे.

महावीर स्वामीचा जीव प्रथम पुरूरवा नांवाचा भिल्ल होता. त्या भवापासून तीर्थंकरावस्था प्राप्त झाली त्या भवापर्यंत ३७ भवांचें यांत सविस्तर वर्णन आलें आहे.

## चित्र परिचय.

या ग्रंथांत सुंदर रंगेत पांच चित्रें दिलीं आहेत. अमितकीर्ति मुनि सिंहाला उपदेश देत आहेत हें पहिलें चित्र आहे. इंद्राणी मायावी बालकाला ठेऊन वीर बालकाला घेऊन इंद्राच्या स्वाधीन करीत आहे हें दुसरें चित्र. संगमक नांवाच्या देवानें सर्पाचा वेष घेऊन वीर प्रभूला भिवविण्याचा प्रयत्न केला पण प्रभू त्याच्याशीं निर्भयपणें क्रीडा करीत आहेत हें तिसरें चित्र. प्रभू दीक्षा घेण्यासाठीं वनांत जाऊन वस्त्रालंकार अंगावरून उतरीत आहेत हें चौथें चित्र व प्रभु ध्यानस्थ असतां त्यास रुद्रानें उपसर्ग केला हें पांचवें चित्र. याप्रमाणें या ग्रंथांत चित्रें दिलीं आहेत. आरंभीं पूज्य आचार्य शांतिसागर महाराज यांचा तीन रंगी फोटो दिला आहे.

इंद्राणी प्रसूति गृहांत जाऊन जिनमातेला मायामयी झोप आणते व जिन बालकाला घेऊन इंद्राच्या स्वाधीन करिते असें वर्णन महापुराण, धर्मशर्माभ्युदय काव्य, चंद्रप्रभचरित्र इत्यादिकामध्यें आलें आहे. त्यास अनुसरून येथील दुसरें चित्र आहे. पण प्रस्तुत ग्रंथांत इंद्रानें प्रसूतिगृहांत जाऊन जिनबालकाला घेतलें असें वर्णन आहे.

## भाषांतरकाराचें वक्तव्य.

हें काव्य संस्कृत भाषेंत ज्याचा थोडासा प्रवेश झाला आहे अशा विद्यार्थ्यांना शिकविण्यास योग्य आहे. यापासून त्यांचें संस्कृत भाषेचें ज्ञान तर वाढेलच पण ज्या वीरप्रभूच्या तीर्थांत आपण आहोत त्यांचें चरित्र किती उत्तम होतें याची ही माहिती होईल. विशारद परीक्षेच्या अभ्यासक्रमांत मुंबई प्रांतिकसभेच्या परीक्षालयानें, दि. जैन महासभेनें व दि. जैन परिषदेनें आपआपल्या परीक्षालयांच्या अभ्यासक्रमांत हें काव्य प्रविष्ट करावें अशी त्यांना सविनय विनंती आहे.

प्रस्तुत चरित्राचें भाषांतर आज पर्यंत मराठी भाषेंत मूलग्रंथासहित प्रसिद्ध केलेलें नव्हतें म्हणून आम्ही या ग्रंथाची संस्कृत प्रति मिळऊन हें केलेलें आहे. श्रीमान् पं. खूबचंदजी शास्त्री यांनीं या ग्रंथाचे हिंदी भाषांतर पंधरा सोळा वर्षांपूर्वी प्रसिद्ध केलें आहे.

श्री पूज्य ब्र देवचंदजी यांनीं कारंजाहून आपल्या स्नेहीमंडलाकडून लिहऊन संस्कृत ग्रंथ माझ्याकडे पाठऊन दिला होता, तो समग्र वाचून भाषांतर करण्याची तीव्र इच्छा मला उत्पन्न झाली. व हें मी भाषांतर केलें आहे.

या विषयीं मी ब्रह्मचारिजींचा व त्यांच्या स्नेहीमंडलाचा अत्यंत आभारी आहे.

कारंज्याहून पाठविलेल्या प्रतींत पांचव्या सर्गांतील प्रारंभाचे ३१ श्लोक नव्हते. श्री लोकनाथ शास्त्री मूडबिद्री यांनीं ते श्लोक पाठविले या बद्दल त्यांचाही मी फार आभारी आहे.

श्री धर्मवीर रावजी सखाराम दोशी यांनीं हा समग्र ग्रंथ प्रसिद्ध केला याबद्दल त्यांचा मी फार आभारी आहे. हे जिनवाणीचे अनन्यभक्त आहेत मराठी भाषेंचे जे जैन ग्रंथ सध्यां स्वाध्यायासाठीं लोकांना वाचावयास सुलभपणें मिळतात ते सर्व बहुतेक यांनींच छापऊन प्रसिद्ध केले आहेत. दि. जैनसमाजामध्यें पुष्कळ श्रीमान् गृहस्थ आहेत त्यांनीं जिनवाणी प्रकाशनाच्या कार्यीं लक्ष देऊन जैनधर्माची प्रभावना करावी अशी त्यांस विनंती आहे. अल्पबुद्धीला अनुसरून मी या ग्रंथाचें भाषांतर केलें असल्यामुळें यांत बरेच दोष राहण्याचा संभव आहे वाचक गणांनीं याबद्दल क्षमा करावी.

ता. २४–२–३१<br>वीरसंवत् २४५७.<br>फाल्गुन व. ७ मंगळवार.

आपला नम्र,<br>**जिनदास पार्श्वनाथ फडकुले**

# श्रीमहावीर चरित्रावर तौलनिक पद्धतीनें विचार.

भगवान् श्रीमहावीराच्या उज्ज्वल चरित्राला श्वेतांबर ग्रंथकारांनीं कलंकित केलें आहे. दिगंबराचार्यांनीं जें यांचें चरित्र लिहिलें आहे तें विशुद्ध आहे. पुण्यपुरुषांचें चरित्र जसें असावयास पाहिजे तसेंच हें आहे. महान् पुरुषाचें चरित्र हें नेहमीं उज्ज्वलच असतें. परंतु श्वेतांबराचार्यप्रणीत महावीरचरित्रामध्यें तशी उज्ज्वलता आढळून येत नाहीं.

दिगंबराचार्यप्रणीत महावीरचरित्र वाचलें असतां, महावीरस्वामींची उत्तरोत्तर प्रगति कशी होत गेली हें आढळून येईल व दि० जैनसिद्धांताची अविरुद्धताहि त्यापासून वाचकांना सिद्ध झालेली आढळून येईल.

श्री महावीरस्वामी हे शेवटचे तीर्थंकर आहेत हें दिगंबर व श्वेतांबर या उभयतांना मान्य आहे. महावीर हे धर्मवीर होते, यांनीं आपल्या उपदेशानें जैनधर्माला आलेली उतरती कळा नाहीशीं करून जैनधर्माची उज्ज्वलता व उत्तमता लोकांना दाखवून दिली व सर्वत्र या धर्माची संस्थापना केली.

जेव्हां जेव्हां उत्तम आचारांचा नाश होतो व मिथ्याधर्मांची भरभराट होऊन त्यामुळें जैनधर्माला हीनस्थिति प्राप्त होत असते तेव्हां तेव्हां तीर्थंकर उत्पन्न होऊन ते जैनधर्माचा उद्धार करितात असें जैनशास्त्रांत सांगितलें आहे.

> आचाराणां विघातेन कुदृष्टीनां च संपदा ॥
> धर्मं ग्लानि परिप्राप्तमुच्छ्रयन्ते जिनोत्तमाः ॥ २०६ ॥

रविषेणाचार्यकृत पद्मपुराण पर्व ५ वें.

भगवद्गीतेंतही—

> यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
> अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥

असें ह्मटलें आहे. अर्थात् जेव्हां जेव्हां धर्माला ग्लानि येते व अधर्माचा सर्वत्र प्रसार होतो तेव्हां तेव्हां मी अवतार घेऊन धर्माचा प्रसार करितों असें कृष्णानें अर्जुनाला सांगितलें आहे. परंतु ही हिंदूंची अवतारकल्पना जैनांना मान्य नाही. आत्मा एकदां पूर्ण शुद्ध बनल्यावर त्याला पुनः देह धारण करतां येत नाही. देह, हा आत्म्याचा अशुद्धपणा जोपर्यंत आहे तोपर्यंत, नष्ट होत नहीं. व अशुद्धपणा असेल तर ईश्वरत्व कसें असूं शकेल ?

जैनशास्त्रांत आत्म्याच्या उन्नतीचें साधन—रत्नत्रय सम्यग्दर्शन सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र हें सांगितलें आहे. या साधनांचा ज्या आत्म्यांनीं आश्रय करून त्यांची पूर्ण प्राप्ति करून

घेतली आहे ते परमात्मा बनतात. सोने जसें खाणीत अशुद्ध असते व वर काढल्या नंतर भट्टीत घालणे वगैरे उपायानी ते पूर्ण शुद्ध बनतें तसे आत्मा संसारावस्थेत अशुद्ध असतो व रत्नत्रयरूपी अग्नीच्या उष्णतेने त्याचा अशुद्धपणा नष्ट होऊन त्याच्या शुद्धतेचा पूर्ण विकास होतो.

जैनधर्मामध्यें त्रेसष्ट पुण्यपुरुष होऊन गेले आहेत. त्यात तीर्थंकर हे सर्वांत श्रेष्ठ असे मानले जातात. मोक्षमार्गाचें स्वरूप माहीत नसल्यामुळें या संसाररूपी वनामध्यें दुःखरूपी अग्नीमध्ये हे जीव होरपळत आहेत. या अतिदीन प्राण्याचा उद्धार करीन अशा रीतीचा परोपकार करण्याचा विचार सतत ज्यांच्या अंतःकरणात घोळत असल्यामुळें या विचाराला पोषक अशा षोडशकारण भावनाचें चिंतन करून जे अतिशय श्रेष्ठ अशा अवस्थेला—शतेंद्रवंद्य अशा अवस्थेला पोहोचतात त्यास तीर्थंकर ह्मणतात

अशा अत्युच्च विचारानी त्याना जो पुण्यबंध होतो तसला उत्कृष्ट पुण्यबंध कोणासही होत नही ह्मणून त्याची उत्कृष्टता सर्व जग आपली मान नम्र करून मान्य करतें. या उत्कृष्ट पुण्यबंधास तीर्थंकर कर्म असें नाव आहे. या कर्माच्या उदयानें तीर्थंकर भव्याना मोक्षमार्गाचा उपदेश करीत असतात व जैनधर्माची हीनावस्था नष्ट करून तो पूर्ण वाढीस नेतात

अशा रीतीची कामगिरी महावीर तीर्थंकरांनी केली असल्यामुळें आज भारतवर्षांत जैनधर्माचें अस्तित्व दिसून येत आहे. महावीर स्वामीस मोक्ष प्राप्त होऊन २४५६ वर्षें पूर्ण झाली. व आतां २४५७ वे वर्ष सुरूं झालें आहे. भगवान महावीर स्वामींचे चरित्र दिगंबर व श्वेतांबर आचार्यांनी आपल्या ग्रंथांत लिहून ठेविलें आहे पण दोघाच्या चरित्रवर्णनात महदंतर आहे. दिगंबराचार्यांनीं लिहिलेल्या चरित्रामध्यें जसा निर्दोषपणा आढळून येतो तसा श्वेतांबराचार्यांनी लिहिलेल्या चरित्रामध्ये आह्माला आढळला नाही, असें मोठ्या कष्टानें ह्मणावें लागतें. जैनधर्माच्या सिद्धांताशी यानी प्रतिपादिलेल्या चरित्राचा मेळ बसत नही. दिगंबरी महावीरचरित्राशीं श्वेतांबरी महावीर चरित्राची तुलना करण्याचा उद्देश आमचा हा आहे कीं सत्य कोणते हें आमच्या धर्मबंधूना चागले समजावें. द्वेषभावनेला बळी पडून आह्मी समालोचना करीत नही. जेथे द्वेषभावना असते त्या ठिकाणीं वस्तुस्थितीचा विपर्यास होण्याचा फार संभव असतो.

महावीर चरित्रातील समग्र विवेचनाचें परीक्षण न करिता ज्या गोष्टी सिद्धांतविरुद्ध वाटतात तेवढ्याच गोष्टीचा उल्लेख करून आह्मी त्यांचें परीक्षण करूं.

श्री गुणभद्र आचार्यांनीं उत्तरपुराणात श्रीमहावीर स्वामींचे चरित्र वर्णिले आहे. याचप्रमाणें असगकवी, सकलकीर्ति वगैरे दिगंबर आचार्यांनीही यांचें चरित्र लिहिले आहे. या सर्व चरित्रामध्यें एकवाक्यता आह्मास आढळून आली आहे. श्वेतांबर आचार्य हेमचंद्र यानी

' त्रिषष्टिलक्षणपुरुष—चरित्रम् ' या ग्रंथामध्यें शेवटीं महावीर स्वामीचें व तत्कालीन श्रेणिकादिक राजांचेंही चरित्र लिहिलें आहे. आपणास फक्त आज महावीर स्वामींच्या चरित्रविषयीं विचार करावयाचा आहे.

## [ मरीचिभव वर्णन ]

महावीर स्वामी हे, जेव्हा पहिले तीर्थंकर आदिनाथ स्वामी उत्पन्न झाले होते त्यावेळीं मरीचि या नावानें आदिनाथ स्वामीचे नातु होउन उत्पन्न झाले होते. या भावांत त्यांनी आदिनाथ महाराजा बरोबर दीक्षा घेऊन तपश्चरण करण्यास सुरवात केली. परंतु लौकरच भ्रष्ट होऊन पारिव्राजक वेष धारण करून यानीं सांख्य मताची स्थापना केली. यांचा कपिल नांवाचा शिष्य होता, त्याला यांनीं सांख्य मतामध्यें प्रवीण करून सोडलें त्यामुळें सांख्यमताला ' कापिलमत, असें ही नांव आहे. आदिनाथ स्वामीच्या वेळी जे इतर राजे भ्रष्ट झाले होते त्यानीही अशीच निरनिराळी मतें वनविली आहेत. शुक्र व बृहस्पति या राजांनी 'चार्वाकदर्शनाची' रचना केली. कच्छ व महा-कच्छ या राजानी तापसीय मत स्थापिलें. अशा रीतीनें अनेक कुमतांची स्थापना त्यावेळी झाली. याविषयी दिगंबर आचार्य व श्वेतांबर दोघेहि सम्मत आहेत.

विधाय दर्शनं सांख्यं कुमारेण मरीचिना ॥
व्याख्यातं निजशिष्यस्य कपिलस्य पटीयसा ॥ ५६ ॥

धर्मपरीक्षा परिच्छेद १८ वा

आदिनाथ स्वामींना केवलज्ञान झाल्यावर त्यांचा सद्धर्मोपदेश यांना ऐकावयास मिळाला तथापि त्यानी गाढ मिथ्यात्वाचा उदय झाल्यामुळें आपल्या मताचा परित्याग केला नाही. आदि-नाथ स्वामी जसें जैन धर्माचे संस्थापक आहेत तसाच मीही सांख्यमताचा संस्थापक आहे ह्मणून त्याला अतिशय अनंतानुबंधि मान कषाय उत्पन्न झाला. या कषायानें दीर्घसंसारी व्हावे लागलें. श्वेतांबरांच्या महावीर चरित्रात या मानोदयाने नीचगोत्राचा बंध पडला असा उल्लेख आहे तो या प्रमाणें:—

एवं जातिमदं कुर्वन् भुजावास्फोटयन्मुहुः ॥
नीचगोत्राभिधं कर्म मरीचिः समुपार्जयत् ॥ ५९ ॥

भरतानें आपल्या वंशांत पुढें कोणी तीर्थंकर होणार काय असा प्रश्न आदिनाथ स्वामीस विचारला तेव्हां त्यानी मरीचि हा शेवटचा महावीर तीर्थंकर होणार आहे असें सांगितलें. तें ऐकून मरीचीला अतिशय जातिगर्व उत्पन्न झाला. व या नीचगोत्राच्या उदयानें महावीर तीर्थं-कराच्या भवांत हा मरीचि नीचकुलांत जन्मला असें श्वेताम्बर महावीरचरित्रात उल्लेखिलें आहे. याचा आह्मी पुढें विचार करणार आहोत.

## त्रिपृष्टभवाचा विचार.

मरीचीला गाढ मिथ्यात्वोदयानें संसारात पुष्कळ फिरावे लागले. पुढें कांही पुण्योदयानें या भारत वर्षातील पोदनपुरामध्यें प्रजापति राजाला जयावती व मृगावती या दोन स्त्रिया होत्या. त्यापैकी मृगावतीच्या पोटी हा 'त्रिपृष्ट' नावाचा पहिला नारायण होउन जन्मला असा दिगंबरी महावीर चरित्रांत उल्लेख आहे. याविषयीं श्वेताम्बराचार्य हेमचंद्रकृत महावीर चरित्रात अशी हकीकत आहेः—

या भरतक्षेत्रांत पोदनपुरामध्यें 'रिपुप्रतिशत्रु' या नांवाचा राजा राज्य करीत होता. त्याला भद्रा नांवाची राणी होती. तिला या राजापासून अचल नांवाचा मुलगा झाला. हा बलभद्र होता. तदनंतर याच राणीला राजापासून मृगावती नावाची मुलगी झाली. ही तरुण झाल्यावर एके दिवशी आपल्या बापाला नमस्कार करण्या करितां राजसभेत गेली. राजाला तिला पाहून कामविकार उत्पन्न झाला व त्याने तिला आपल्या माडीवर बसऊन घेतले व हिच्याशीं आपण आपलें लग्न करून घ्यावें असा विचार केला. नंतर तिला अंत पुरामध्ये जा ह्मणून सांगितलें.

पुढें एके दिवशी शहरांतील पुढारी लोकाना बोलाऊन राजानें विचारिलें कीं, राजाच्या वाड्यात जें रत्न उत्पन्न झालेलें असतें ते कोणाचे समजावें ? पुढाऱ्यांना त्याच्या अंतरंगांतला अभिप्राय न समजल्यामुळें ते ह्मणाले की, त्याच्यावर राजाची मालकी असते. राजानें तीन वेळां विचारलें व तीन्ही वेळा पुढाऱ्यांनी तसेंच उत्तर दिलें तदनंतर राजानें मृगावतीला लग्ना करितां अंत पुरांतून राजसभेंत आणविलें. सर्व पुढाऱ्यांना या कृत्यामुळें लज्जा वाटली व ते आपल्या घरीं निघून गेले. इकडे राजानें मृगावतीशी गांधर्व विधीने विवाह केला. भद्रा राणीला राजाच्या या अयोग्य कृत्यानें फार चीड—लज्जा उत्पन्न झाल्यामुळें ती अचल नांवाच्या आपल्या मुलाला बरोबर घेऊन दक्षिण दिशेकडे निघून गेली. तेथे 'माहेश्वरी' नावाचे नगर अचलाने स्थापन करून आईला त्या ठिकाणीं स्थापन केलें. मृगावतीशी लग्न केल्यामुळे लोक राजाला 'प्रजापति' अशा नांवानें संबोधूं लागले.

**तत्पितापि स्वप्रजायाः पतित्वेनाखिलैर्जनैः ॥**
**प्रजापतिरिति प्रोचे बलीयः कर्म नाम हि ॥ ११७ ॥**

हेमचन्द्रकृत महावीर चरित्र पर्व १० वे सर्ग १ ला.

अर्थात्—हा रिपुप्रतिशत्रु राजा स्वत:च्या मुलीचाच नवरा बनल्यामुळें याचें प्रजापति असें नांव पडलें.

येथे या हकीकतीवर असा विचार करावयाचा कीं, त्रिपृष्ट हा पहिला नारायण अर्थात् त्रिखंडाधीश अर्धचक्रवर्ती होता हें दोघांसही—श्वेतांबर व दिगंबर याना मान्य आहे. नउ नारायणांना त्रेसष्टशलाका पुण्यपुरुषामध्यें हे उभयतां अंतर्भूत करितात. असें असता अशा

पुण्यपुरुषाची उत्पत्ति अशा रीतीनें मानणें हें श्वेतांवर ग्रंथकाराला उचित होणार नाहीं. हीन लोकाची उत्पत्ति अशा रीतीची मानणें योग्य होईल परंतु असल्या सम्राटासारख्या पुरुषांची उत्पत्ति अशा रीतीची मानणें हा अवर्णवाद आहे. राजाचें प्रजापति असें दुसरें नांव असेल. परंतु नांवाचा असा विपरीत अर्थ कांही तरी अयोग्य संबंध जुळवून करणें हें योग्य नव्हे. प्रजा या शब्दाचा अर्थ रयत असा प्रसिद्ध आहे.

तिच्यावर राजाचें स्वामित्व असतें ह्मणून त्याला प्रजापति असें दुसरें नांव पडलेलें असतें. पति शब्दाचा अर्थ नवरा असाच करावयाचा असेल तर भूपति ह्मणजे पृथ्वीचा नवरा, नरपति ह्मणजे मनुष्यांचा—पुरुषांचा नवरा असे अर्थ करावे लागतील. भगवान् आदिनाथ स्वामींनाही प्रजापति असें नांव स्वयंभू स्तोत्रांत आहे.

'प्रजापतिर्यः प्रथमं जिजीविषूः शशास कृष्यादिषु कर्मसु प्रजाः ॥' यावरून प्रजापति हें नांव रयतेचा मालक अशा अर्थी वापरणें योग्य आहे. अथवा प्रजापति हें नांव आहे त्याचा अर्थ करण्याची कांहीं जरूरत नाहीं. ज्या कुलांत नारायण, प्रतिनारायण, बलभद्र, चक्रवर्ती व तीर्थंकर उत्पन्न होतात त्या कुलाचीं शुद्धि व आचार हे उत्कृष्ट असतात. तेथें असले अनाचार असत नाहीत. शिवाय शलाकापुरुषांची साक्षात् उत्पत्ति तर केव्हांहि अशी निकृष्ट मानणें योग्य होणार नाही.

त्रिपृष्ठ नारायण त्रिखंडाधीश झाल्यावर पुष्कळ आरंभ परिग्रहामध्यें लुब्ध झाला त्यायोगें त्याला नरकगतीचा बंध पडला. नरकामध्यें पुष्कळ दुःख भोगून तो या भूतलावर सिंह होऊन जन्मला. तेथेंही पुष्कळ पापें करून प्रथम नरकांत जाऊन जन्मला. तेथील आयुष्य संपल्यावर या भूतलावर पुनः तो सिंह होऊन जन्मला. अमितकीर्ति मुनीश्वराच्या उपदेशानें त्याला पूर्वजन्माचें स्मरण होऊन त्याचा क्रूरपणा नष्ट झाला व त्यानें सम्यग्दर्शनपूर्वक व्रत ग्रहण केलें. येथून त्याची क्रमानें उन्नति होत गेली व हा सिंह दहाव्या जन्मीं श्री महावीर स्वामी होऊन जन्मला, अशी संक्षेपानें दिगंबराचार्यांच्या महावीर चरित्रात हकीकत आहे. परंतु श्वेतांवरकृत महावीर चरित्रांत त्रिपृष्ठ बहु आरंभ व परिग्रहानें नरकाला गेला व तेथून निघून अनेक भव धारण करून तो प्रियमित्र चक्रवर्ती झाला व नंतर नंदराजा होऊन यानंतरच्या पुढच्या भवांत महावीर स्वामी होऊन जन्मला. अशी संक्षिप्त हकीकत आहे.

## महावीर स्वामींचें वर्णन.

आतां आपण महावीर स्वामी कोठें जन्मले वगैरे विशेष महत्वाच्या हकीकतीकडे वळू.

दिगम्बरमतामध्यें महावीर स्वामी कुंडलपुराधिपति सिद्धार्थ राजाच्या राणीच्या गर्भात अर्थात् त्रिशला देवीच्या गर्भांत सोळा स्वप्नानंतर आषाढ शुद्ध षष्ठीचे दिवशीं

आले अशी सरळ हकीकत आहे. परंतु श्वेतांबरांनी याच्या विषयी मोठी विचित्र हकीकत लिहिली आहे, ती प्रमाणें:—

या जंबूद्वीपामध्यें भरतक्षेत्रात ब्राह्मणकुंडग्राम नावाचें शहर आहे. तेथें ऋषभदत्त नांवाचा कौडाल गोत्रातील ब्राम्हण राहात असे. त्याच्या स्त्रीचें नाव ' देवानंदा ' असें होतें ही जालंधरवंशात उत्पन्न झालेली होती. आषाढ शुक्ल षष्ठीचे दिवशी रात्री ही सुखानें निजली असतां हिला चौदा स्वप्नें दिसली व नंदराजाचा जीव हिच्या गर्भांत आला. प्रातःकाळी हिने हीं चौदा स्वप्नें आपल्या पतीला सांगितली. तेव्हा त्याने चार वेदाचा ज्ञाता व परमधार्मिक असा पुत्र तुला होणार असे सांगितलें. प्रभु गर्भात असल्यामुळे या उभयताच्या घरात कल्पवृक्ष आल्याप्रमाणें मोठी संपत्ति वाढली. देवानंदेच्या गर्भांत प्रभु वास करून ८२ व्यासष्टी दिवस झाले होते त्यावेळी सौधर्मेन्द्राचे आसन कंपित झालें अवधिज्ञानानें इन्द्रानें जाणलें कीं प्रभु देवानंदेच्या गर्भांत आले. तेव्हा त्यानें सिंहासनावरून उठून प्रभूला नमस्कार केला व याप्रमाणे विचार केला.—' त्रैलोक्यप्रभु तीर्थंकर हे कधी नीच कुलामध्यें, दीनाच्या घरी व भिक्षुकाच्या घरीं जन्मत नसतात. मोती जसे शिंपल्यात जन्मतात, तसे इक्ष्वाकुवंश, हरिवंश वगैरे उच्च क्षत्रियांच्या कुलामध्यें पुरुषसिंह तीर्थंकर जन्मत असतात परंतु नीचकुलामध्यें प्रभूचा जन्म झाला हें मात्र असंगत झालें, अथवा तीर्थंकर देखिल बांधलेलें कर्म अन्यथा करण्यास समर्थ होत नाहींत. मरीचीच्या भवात प्रभूंनी कुलमद धारण केला होता त्यावेळी त्यांना नीच गोत्राचा बंध झाला होता. त्याचा उदय यावेळी उपस्थित झाला आहे जरी ते नीचकुलामध्यें उत्पन्न झाले आहेत. तथापि आम्हाला तेथून काढून उच्चकुलामध्यें स्थापन करण्याचा नेहमी अधिकार आहे. तेव्हा महावंशीय राजा व राणी या भरत क्षेत्रात कोठें आहेत बरें ? " असा विचार इंद्र करीत असता त्याला याप्रमाणें आठवण झाली—" या भरतक्षेत्रात माझ्या नगराप्रमाणें सुंदर व पृथ्वीला अलंकारभूत असें क्षत्रियकुंडग्राम नावाचें शहर आहे. तेथें सिद्धार्थ राजा आपल्या त्रिशला राणीसह राज्य करीत आहे. यास्तव त्रिशला राणीच्या पोटात देवानंदेचा गर्भ आणून ठेविला पाहिजे " याप्रमाणें आठवण करून त्यानें नैगमेषी नावाच्या आपल्या सेनापतीस हे कार्य करण्याची आज्ञा दिली. या नैगमेषी सेनापतीनें इंद्राच्या आज्ञेप्रमाणें कार्य पार पाडलें. देवानंदा ब्राह्मणी झोपी गेली होती त्यावेळी तिनें आपल्या मुखांतून चौदा स्वप्नें बाहेर पडत असलेली पाहिली. तेव्हा ती घाबरून उठली व छाती बडवून घेऊ लागली व म्हणूं लागली कीं, माझा गर्भ कोणी तरी हरण केला आहे. "

इकडे आश्विन कृष्ण त्रयोदशीच्या दिवशीं हस्त नक्षत्रावर चंद्र आला असतां त्या देवानें तो गर्भ त्रिशला राणीच्या गर्भात गुप्त रीतीनें स्थापन केला.

राणीला त्यावेळी याप्रमाणे चौदा स्वप्नें पडली हत्ती बैल सिंह अभिषेक करीत

असलेली लक्ष्मी, पुष्पमाला, चंद्र, सूर्य, महाध्वज, पूर्ण कुंभ, समुद्र, सरोवर, विमान, रत्नपुंज व निर्धूम अग्नि या स्वप्नांचीं फलें इंद्रानें, राजानें, व तज्ज्ञ लोकांनीं राणीस सांगितल्यानें तिला फार आनंद झाला. या प्रमाणें श्वतांबरांच्या महावीर स्वामीची हकीकत आहे.

## ( गर्भापहरण )

आतां प्रभूचें गर्भापहरण होऊं शकतें किंवा नाहीं याचा विचार करूं. जेव्हां सम्यग्दर्शन जीवास प्राप्त होतें तेव्हां तो जीव अव्रती जरी असला तरी नारकावस्था, नपुंसकत्व, स्त्रीत्व, नीच कुलामध्यें जन्म घेणें, अल्पायुषी होणें, दरिद्रय अशा अवस्थेस प्राप्त होत नाहीं अर्थात् तो उच्च कुलामध्येंच उत्पन्न होतो, ऐश्वर्य संपन्न होतो, स्त्रीपणा, नपुंसकत्व अशा अवस्थेप्रत पोहोचत नाहीं. श्वेतांबर व दिगम्बर या उभयतांना प्रमाणभूत आचार्य समंतभद्र याविषयीं रत्नकरंड श्रावकाचारांत या प्रमाणें प्रतिपादन करितातः—

**सम्यग्दर्शनशुद्धा नारकतिर्यङ्नपुंमकस्त्रीत्वानि ॥**
**दुष्कुलविकृताल्पायुर्दरिद्रतां च व्रजंति नाप्यव्रतिकाः ॥**

महावीर तीर्थंकराचा जीव अनेक भवापासून सम्यग्दर्शन धारण करून व्रतें सुद्धां पाळीत होता. यास्तव या भवांत त्याचा नीच कुलांत जन्म होणें सिद्धांताविरुद्ध आहे. नीच कुलांत उत्पन्न झालेलीं माणसें फक्त श्रावकांचीं व्रतें धारण करूं शकतात. मुनिव्रतें धारण करूं शकत नाहींत ' देसे तदियकसाया तिरिया उज्जोवणीचतिरियं गदी ' पांचव्या गुणस्थानांत चार प्रत्याख्यानावरणी कषाय, तिर्यगायु, उद्योत, नीचगोत्र व तिर्यग्गति या आठ कर्मप्रकृतींची उदय-व्युच्छित्ति होते अर्थात् या गुणस्थानापर्यंतच यांचा उदय असूं शकतो. यास्तव भगवंताचा नीच कुलामध्यें जन्म होणें असंभवनीय आहे. जेव्हां जीव सम्यग्दृष्टी होतो तेव्हां पासून त्याच्या पूर्व बद्ध अशुभ कर्मांची असंख्यात पटीनें उत्तरोत्तर निर्जरा होत असते. दिगंबर व श्वेतांबर या उभ-यतांना मान्य असलेल्या श्रीमदुमास्वामी आचार्यांच्या तत्वार्थसूत्र ग्रंथांत "सम्यग्दृष्टिश्रावकविरतानं-तवियोजकदर्शनमोहक्षपकोपशमकक्षपकक्षीणमोहजिनाः क्रमशोऽसंख्येयगुणनिर्जराः" हें सूत्र नवव्या अध्यायांत शेवटीं सांगितलें आहे. यांत सम्यग्दृष्टीपासून केवलिजिनापर्यंत क्रमानें असंख्यात गुणी निर्जरा होते असें सांगितलें आहे. यामुळें भगवंताला मरीचीच्या भवांत जरी नीच गोत्राचा बंध कुलमदानें झाला होता तरी तो या तीर्थंकर अवस्थेंतही उदयरूपानें टिकून राहिला होता असें ह्मणणें हें सिद्धांताला सोडून आहे असें ग्रंथाधारें सिद्ध होतें. श्री गुणभद्र आचार्यांनीं महावीर स्वामीच्या जीवाला मागच्या भवांत तीर्थंकर नाम कर्मासह उच्च गोत्राचा ही बंध झाला होता असें स्पष्ट लिहिलें आहे. तें याप्रमाणें:—

भावयित्वा भवध्वंसितीर्थकृन्नामकारणं ॥
बद्ध्वा तीर्थकरं नाम सहोच्चैर्गोत्रकर्मणा ॥ २४५ ॥
जीवितांते समासाद्य सर्वामाराधनाविधिं ॥
पुष्पोत्तरविमानेऽभूदच्युतेंद्रःसुरोत्तमः ॥ २४६ ॥

उत्तरपुराण पर्व ७४ वें.

यास्तव भगवान महावीर उत्तम क्षत्रिय कुलांत जन्मलेल्या सिद्धार्थ व त्रिशला देवी यांच्या पोटींच जन्मले असें मानणेंच न्यायप्राप्त आहे. इतर कल्पना असंगत वाटते.

आता देवानंदा ब्राह्मणीच्या गर्भांत भगवंत आले व तेथें ते ८२ दिवस राहिले तथापि इंद्राला ही गोष्ट समजली नाही असें श्वेतांबर ह्मणतात यावरून भगवंताची चारच कल्याणिकें झाली, पहिलें गर्भकल्याणिक झाले नाही असेच मानावें लागेल व 'भरतक्षेत्रांत उत्पन्न झालेल्या चोवीस तीर्थंकरांचें पंच कल्याण होतच असतें ' या नियमास बाधा आली असें मानावे लागेल.

ज्यावेळी भगवान देवानंदेच्या गर्भी आले त्यावेळी इंद्राला ही गोष्ट अवधिज्ञानानें माहीत झाली होती किंवा नाहीं? जर त्याला ही गोष्ट माहीत झाली होती तर त्यानें कल्याणिक का केले नाही? हें जर महावीर जिनाचें कल्याणिक केलें नाही? तर इतर २३ जिनाचेंही हें कल्याणिक झालें नाही असें मानावें. असे मानलें तर तीर्थंकर प्रकृतीचा बंध मानणें व्यर्थ होईल. कदाचित् देवानंदेच्या उदरामध्यें भगवंतानी अवतरण केलें ही गोष्ट इंद्राला माहित नव्हती तर तो अज्ञानी होता असें मानावें लागेल. पुन. मोठी आश्चर्याची गोष्ट ही आहे की. त्याच इंद्राला ८२ दिवसानंतर ही गोष्ट कशी समजली ?

'व्यायशी दिवसानंतर देवानंदेच्या उदरातून महावीरस्वामीचा गर्भ काढून नैगमेषी नावाच्या देवानें त्रिशला राणीच्या पोटात स्थापन केला' या ठिकाणी असा प्रश्न उद्भवतो की, देवानंदेच्या गर्भांत भगवान महावीरानी का अवतरण केले. ? कदाचित् यावर तुह्मी असें उत्तर द्याल की आपल्या पूर्वोपार्जित कर्माच्या उदयानें तेथें अवतरण करावें लागलें. तर इंद्रानें त्या कर्माच्या उदयाचा निषेध कसा केला ? त्यानें आपल्या सामर्थ्यानें, असें म्हणाल तर हें योग्य नाही. कारण भगवान जिनेंद्रदेव अनंतानंत बलशाली आहेत व ते जगाचे स्वामी आहेत, तरीही ते कर्माची गति रोकूं शकत नाहीत तर फक्त एका स्वर्गाचा स्वामी असा इंद्र त्यांच्या कर्मांना विपरीत कसा करूं शकेल ? दुसरा विचार येथें असा ही उद्भवतो कीं, त्या नैगमेषी देवानें गर्भाचे अपहरण जन्ममार्गानें केलें का अन्य मार्गानें केलें. ?

जन्ममार्गानें केलें ह्मणाल तर जन्ममार्गानें बाहेर येणें यासच जन्म ह्मणतात तेव्हा याच वेळी जन्मकल्याणिकाचाही उत्सव मानावयास पाहिजे होता. पूर्वी आपण गर्भकल्याणिक

मानलें नाहीं व आतां जन्म कल्याणिक मानणार नाहीं तर दोन कल्याणिकांचा अभाव मानावा लागेल. मग बाकीचीं कल्याणिकें तरी कां मानावीत बरें ?

तसेंच हीं दोन कल्याणिकें मानली तर त्रिशलादेवीच्या उदरी महावीर स्वामी आले असतां, जशी गर्भ व जन्म हीं दोन कल्याणिकें मानिली आहेत तशीं देवानंदेच्या उदरी ते आले होते ह्मणून तेथें ही दोन कल्याणिकें मानावीत अशा रीतीनें महावीर जिनाचीं सात कल्याणिकें मानणें भाग पडेल.

मुख आदि अन्यद्वारें गर्भापहरण मानिलें तर अन्यमतामध्यें कर्णाची उत्पत्ति कानापासून, नासिकेय वगैरे ऋषींचा जन्म नाकापासून मानिला आहे. तो सर्व प्रकार तुह्माला सत्य मानावा लागेल.

तसेंच ज्यावेळीं वीरजिनाचा गर्भ त्रिशलेच्या पोटांत स्थापन केला गेला त्याच्या पूर्वी सहा महिने व नंतर नउ महिनेपर्यंत रत्नवृष्टि व छप्पनकुमारिका यांची सेवा शुश्रूषा हीं कृत्यें कोठें झालीं. ? सोळा स्वप्नें कोणीं पाहिलीं ? दोन्हीं ठिकाणी रत्नवृष्टि वगैरे झाली ह्मणाल तर दोन्ही कल्याणिकें दोन्ही जागीं झाली असें मानावे लागेल.

गर्भापहरण करतेवेळीं बालकाच्या नाळीचा नाश झाला असतां बालकाचाही नाश होतो, सर्व लोक याला गर्भपात ह्मणतात. आंब्याचें फळ तोडून तें दुसरीकडे लाविलें असतां जसें वाढत नहीं त्याच प्रमाणें नाळीचा नाश झाला असतां त्या बालकाची दुसऱ्याच्या उदरांत वाढ होऊ शकत नाहीं.

श्रीमहावीर स्वामी ऋषभदत्ताच्या वीर्यापासून उत्पन्न झाले असतां त्यांना सिद्धार्थपुत्र असें ह्मणणें योग्य नाही; असें ह्मणणें ह्मणजे महावीर स्वामी दोन बापापासून उत्पन्न झालेले आहेत असें मानावे लागेल व असें मानणें ह्मणजे मोठा अवर्णवाद आहे.

तसेंच आपल्या शास्त्रांत कोठें त्रिशलादेवीच्या गर्भांत आषाढ शुद्ध षष्ठीचे दिवशी वीर जिन अवतरून चैत्र शुद्ध नवमीचे दिवशी भगवंताचा जन्म झाला अर्थात् नउ महिने सात दिवस गर्भांत राहिले असा उल्लेख आहे. व कोठें कोठें भगवानाचें अपहरण दाखविलें अशा रीतीनें हीं शास्त्रें परस्परविरुद्ध विधानें करणारी आहेत. वास्तव गर्भापहरण मानण्यानें वीर परमदेवाच्या ठिकाणीं उलट अयोग्यपणा सिद्ध होतो ह्मणून गर्भापहरण मानूं नये.

त्रिशला देवीच्या गर्भांत प्रभु असतांना मातेला त्रास होईल ह्मणून त्यांनी हलनचलन करणें बंद ठेविलें; त्यामुळें मातेला माझा गर्भ कोणी हरण केला किंवा तो नष्ट झाला अथवा त्याचें कोणी स्तंभन केलें काय असा संशय आला व ती फार शोक करूं लागली व आर्तध्यान करूं लागली असें श्वेतांबर ग्रंथांत लिहिलें आहे.

परंतु येथें ज्या मातेला त्रैलोक्यनाथ गर्भांत आल्यामुळें कठिन अशा [illegible]

आली होती त्याच मातेला प्रभु गर्भातच आहेत—गर्भ नष्ट झाला नाही हें कसें समजलें नाहीं याचें आश्चर्य वाटतें.

प्रभूंचा विवाह समरवीर नावाच्या राजाच्या मुलीशी—यशोदेशीं झाला होता. व त्यांना तिच्यापासून एक प्रियदर्शना नांवाची मुलगी झाली होती व तिचा विवाह प्रभूंनीं जामाली नांवाच्या एका राजपुत्राशीं करून दिला होता. अशी हकीकत श्वेतांबराच्या वीर चरित्रांत सांगितली आहे. ती याप्रमाणें:—

पुण्येऽहनि महीनाथो जन्मोत्सवसमोत्सवम् ॥
विवाहं कारयामास महावीरयशोदयोः ॥ १५१ ॥
कालेन गच्छता भर्तुर्यशोदायामजायत ॥
नामतो रूपतश्चापि दुहिता प्रियदर्शना ॥ १५४ ॥
महाकुलो राजपुत्रो महर्द्धिर्नवयौवनः ॥
जामालिः परिणिनायोद्यौवनां प्रियदर्शनाम् ॥ १५५ ॥

( श्वेतांबर हेमचंद्राचार्यकृत महावीरपुराण पर्व १० सर्ग २ रा. )

प्रभूच्या वडील भावाचें नाव नंदिवर्धन व वहिणीचें नांव सुदर्शना असें होतें. तसेंच 'पउमचरिय' नांवाचा विमलाचार्यकृत एक प्राकृत ग्रंथ आहे त्यात उपर्युक्त गोष्टीचा मुळींच उल्लेख नाहीं. यावरूनही याचीं विधानें परस्परविरुद्ध अशी आहेत.

तीर्थंकराच्या मातेला तीर्थंकराशिवाय अन्य मुलगा होत नाही असें दिगंबर शास्त्रांत सांगितलें आहे. म्हणून तीर्थंकरांना कनिष्ठपणा नाही. महावीर स्वामींनीं विवाह केला नाहीं. जितशत्रूच्या मुलीचें यशोदा असें नाव होतें व तिचें महावीर स्वामीशीं आपण लग्न लाऊन द्यावें असा त्याचा मनोदय होता परंतु महावीर स्वामीनी ही गोष्ट कबूल केली नाहीं असें जिनसेन प्रणीत हरिवंश पुराणामध्यें लिहिलें आहे. वासुपूज्य, मल्लि नेमि, पार्श्व व वीर हे पांच तीर्थंकर वाल ब्रह्मचारी होते याबद्दल असा उल्लेख आहे—

वासुपूज्यस्तथा मल्लिर्नेमिः पार्श्वोऽथ सन्मतिः ॥
कुमाराः पंच निष्क्रांताः पृथिवीपतयः परे ॥

( दशभक्ति पृष्ठ २४७ )

महावीर स्वामीनीं दीक्षा घेतल्यावर १२ चातुर्मास निरनिराळया ठिकाणीं केले असा उल्लेख आहे. पहिला चातुर्मास त्यांनीं मोराक नावाच्या गावी केला परंतु तो पूर्ण न करतांच त्यांनीं पावसाळयातच अन्य ठिकाणी प्रस्थान केले " ग्रामं नाम्नास्थिकग्रामं ययौ प्रावृष्यपि प्रभुः " असा उल्लेख हेमचंद्र कृत महावीर चरित्रात आहे. परंतु दिगंबरांच्या महावीर चरित्रांत

प्रभूनीं कोठें चातुर्मास केल्याचा उल्लेख आलेला नाहीं. तीर्थकरांना चातुर्मास करण्याची जरूरत नसते कारण त्यांच्या विहारापासून कोणत्याही प्राण्याची विराधना होत नाहीं. त्यांना कधीं छेदोपस्थापना करावी लागत नाही; याचें कारण त्यांच्या हातून केव्हांही कोणताही अपराध घडत नसतो ह्मणून त्यांना प्रतिक्रमण करणें आलोचना करणें यांची जरूरत नसते. परिहारविशुद्धि चारित्र ज्याला प्राप्त झालें आहे असा मुनि जीवांनीं भरलेल्या प्रदेशांतून जरी विहार करूं लागला तथापि त्याच्या विहारानें त्या जीवांना कोणतीही पीडा होत नाहीं. याबद्दल असा उल्लेख आहे:—

परिहारर्द्धिसमेतः षड्जीवनिकायसंकुलं विहरन् ।
पयसीव पद्मपत्रं न लिप्यते पापनिवहेन ॥

अर्थात् ज्याप्रमाणें कमलाचें पान पाण्यामध्यें असूनही त्यापासून अलिप्त असतें. त्याप्रमाणें परिहारविशुद्धिचारित्र धारक मुनि जीवसमूहांत विहार करूनही पापापासून अलिप्तच राहतो. मुनि पिंछी जीवसंरक्षणाकरितां घेतात परंतु तीर्थंकरांना पिछी व कमंडलूचीही अवश्यकता राहत नाहीं. यावरून त्यांचें संयम दोषरहित असतें हें व्यक्त होतें. तीर्थंकरांना नेहमीं अभेदरूप सामायिक चरित्र असतें. या सर्व विवेचनावरून चातुर्मास करण्याची तीर्थंकरांना आवश्यकता नाहीं व दिगम्बर जैनाच्या ग्रंथांत तीर्थंकरांच्या चातुर्मासाचा उल्लेखही पण नाहीं.

महावीर स्वामीचा गोशाल नांवाचा एक शिष्य होता तो महावीर स्वामीप्रमाणें स्वतःलाही सर्वज्ञ ह्मणून घेऊं लागला. तेव्हां ती गोष्ट गौतमगणधरांनीं महावीर स्वामीस विचारली तेव्हां ते ह्मणाले कीं “ तो माझा शिष्य आहे. परंतु सध्या मिथ्यात्वी झाला आहे. व तो सर्वज्ञ नाहीं. ” हें महावीर स्वामीचें भाषण कर्णोपकर्णीं होऊन गोशालासही समजलें तेव्हां तो रागानें समवसरणांत येऊन महावीरस्वामीला ह्मणाला की, “ हे महावीरा ! मी तुझा शिष्य नाहीं. तूं, हा माझा शिष्य आहे असें लोकांस सांगतोस हें तूं खोटें भाषण करितोस. ” असें ह्मणून त्यानें महावीर स्वामीच्या अंगावर तेजोलेश्या सोडली. त्यायोगानें महावीरस्वामीच्या जवळ असलेल्या दोनतीन शिष्यावरही तिचा परिणाम होऊन ते मरण पावले व गोशालामध्यें स्वतः त्यानें सोडलेली तेजोलेश्या शिरून तोही सातवे दिवशीं मरण पावला. स्वामीवर त्या तेजोलेश्येचा परिणाम होऊन त्यांना रक्ताची परसाकड लागली व पित्तज्वर उत्पन्न झाला. त्यामुळें ते कृश होत चालले परंतु त्यांनीं औषध घेतले नाहीं. गोशालानें स्वामीला सांगितलें कीं या तेजोलेश्येच्या योगानें तूं सहा महिन्यानी मरण पावशील. तें ऐकून सिंह नांवाच्या शिष्यानें स्वामीला ह्मटलें की, “ महाराज आपण औषध घ्या, नाही तर गोशालानें ह्मटल्या प्रमाणें होईल ” ह्मणून तो रडूं लागला व औषध घेण्यासाठीं प्रभूला फार आग्रह करूं

लागला. त्याच्या आग्रहाला मान देऊन प्रभु त्याला ह्मणाले की, " रेवती नांवाच्या श्राविकेच्या घरीं महाळुंगाचा पक्वकटाह आहे तो घेऊन ये म्हणजे त्याने आरोग्य लाभ होईल. " तेव्हां त्याने तेथून तो आणिला व त्यानें प्रभूला आरोग्य लाभ झाला. या विषयीं श्वेतांबर ग्रंथामध्यें अशीं वचनें मिळतातः—

स्वामी तु रक्तातीसारपित्तज्वरवशात्कृशः ॥
गोशाललेश्यया जज्ञे चकार न तु भेषजम् ॥ ५४३ ॥
तं च श्रुत्वा स्वामिशिष्यः सिंहो नामानुरागवान् ॥
गत्वैकांते रुरोदोच्चैः क्व धैर्यं तादृशा गिरा ॥ ५४५ ॥
बीजपूरकटाहोऽस्ति यः पक्वो गृहहेतवे ॥
तं गृहीत्वा समागच्छ करिष्ये देन वो धृतिम् ॥ ५५१ ॥
सिंहोऽगादथ रेवतीगृहमुपादत्त प्रदत्तं तया,
कल्प्यं भेषजमाशु तत्र ववृषे स्वर्णं च हृष्टैः सुरैः ॥
सिंहानीतमुपास्य भेषजवरं तद्वर्धमानः प्रभुः,
सद्यः संघ—चकोरपार्वणशशी प्रापद्वपुःपाटवम् ॥ ५५३ ॥

हेमचन्द्रकृत महावीरचरित पर्व १० वा सर्ग ८ वा.

परंतु दिगंबरांच्या महावीरचरितामध्यें अशा रीतीची विधानें मुळींच नाहींत. तीर्थकरांच्या शरीरात व्याधि केव्हाही होत नसतो हें दिगंबर व श्वेतांबर यांना मान्य आहे. तथापि महावीर स्वामीला रक्ताची परसाकड लागली व पित्तज्वर झाला असें श्वेतांबरांनीं लिहिलें आहे ज्या हेमचंद्रानी असे लिहिलें आहे त्याच हेमचंद्रानी ' अभिधानचिंतामणि ' ग्रंथामध्यें तीर्थकराच्या शारीरिक गुणाचें वर्णन करितांना ' निरामयत्व ' हा गुण वर्णिला आहे. तो याप्रमाणे —

तेषां च देहोऽद्भुतरूपगंधो निरामयः स्वेदमलोज्झितश्च ।
श्वासोऽब्जगंधो रुधिरामिषं तु गोक्षीरधाराधवलं ह्यविस्रम् ॥

निरामयत्व ह्मणजे निरोगपणा परंतु महावीरस्वामीस रोग झाला असें ह्मणणें हें परस्पर विरुद्ध आहे. तसेंच समवसरणांत वैर, मारी मरण हें असत नाहीं ह्मणून त्यांनीं प्रतिपादिलें आहे. परंतु गोशालाच्या तेजोलेश्येनें तीन मुनि मरण पावले अशी परस्परविरुद्ध विधानें पुष्कळ आहेत. या सर्व विवेचनावरुन दिगंबर जैनाच्या शास्त्रात जे महावीर जिनाचें चरित्र सांगितलें आहे तेंच सत्य आहे. महावीर स्वामीनी महाळुंगाचें औषध खाल्लें यावरून ते आहार घेत होते

हें सिद्ध आहे. केवली कवलाहार घेतात असें श्वेतांबर ह्मणतात परंतु तें दिगंबरांना मान्य नाहीं, घातिकर्मांचा नाश झाल्या कारणानें अनंतज्ञान, अनंतदर्शन, अनंत सुख व अनंत शक्ति हे चार गुण प्राप्त होतात. हें उभयतांसही कबूल आहे. केवली आहार घेतात त्यांचे कारण शक्ति कमी होते ती भरून निघावी ह्मणून मानीत असाल तर अनंत शक्ति मानणें व्यर्थ आहे. तसेंच भुकेची वेदना मिटविण्यास्थव आहार घेत असतील तर अनंत सुख प्राप्त झालेलें व्यर्थच मानावे लागेल. भोज्य पदार्थांचा रस, गंध वगैरे जर इंद्रियद्वारें त्यांना समजत असतील तर त्यांना मतिज्ञानच मानावे लागेल. इत्यादि दोष कवलाहारामध्यें आहेत. म्हणून दिगंबरांनीं केवली कवलाहार घेत नाहींत असें मानिलें आहे.

या प्रमाणें श्वेतांबरांच्या महावीर चरित्राची संक्षिप्त समालोचना केली आहे.

---

## वीरमहिमा.

शार्दूलविक्रीडित.

झाले तेविस जे जिनेश जगतीं सामर्थ्य त्यांचें असे ॥
अंतातीत जिनेश वीर परि हा तैसा मला ना दिसे ॥
आला इंद्रमनांत संशय असा जन्माभिषेकोत्सवीं ॥
तेव्हां मेरुगिरी सकंप करुनी तो वीर त्या दाखवी ॥ १ ॥

मेरूचीं शिखरें जणूं जिनवरा वंदावया वाकलीं ! ॥
आनंदे पृथिवी तयास बघुनी नाचू जणूं लागली ! ॥
जाणून प्रभुची अचिंत्य अवधिज्ञानें महाशक्ति ती ॥
पश्चात्ताप करून देवपतिनें वीरास केली नती ॥ २ ॥

नाथा ! देह तुझा विशुद्ध अणुनीं निर्माण झाला असे ॥
देवा ! त्यांत विशुद्ध पूज्य सकला आत्मा तुझा कीं वसे ॥
क्षीरांभोनिधिच्या जलें स्नपन हें स्वच्छुद्धि हेतु नसे ॥
पांपाचा अमुच्या विनाश करण्या साहाय्य हें देतसे ॥ ३ ॥

भक्तीनें विनवून देवपतिनें आभूषणीं भूषित ॥
केलें नृत्य जिनापुढें सग तयें होऊनिया हर्षित ॥

ठेवी नंतर वर्धमान विभुची आख्या तशी वीर ही ॥
अर्पोनी पितरा तया सुरपती गेला सुखें स्वर्गृहीं ॥ ४ ॥
दोघा चारणऋद्धिधारक मुनीशांना मनीं जाहला ।
तत्वीं संशय तन्निरास करण्या वीरास भेटूं चला ॥
ऐसा चिंत्ति विचार ते करुनिया गेले महाभक्तिनें ॥
त्याच्या सन्निध तूर्ण संशय लया गेलाच तद्दर्शनें ॥ ५ ॥
हा श्रीमज्जिनराज 'सन्मति' अशा नामा तदा पावला ॥
गेलें तें मुनियुग्म मानुनि मनीं हर्ष स्वकीय स्थला ॥
होता वीरजिनेश जन्मसमयीं ज्ञानत्रयें भूषित ॥
याचें वास्तव नाम सन्मति असें भासे मला [२]सूचित ॥ ६ ॥
सौधर्मेंद्र सभेंत अन्यसमयीं देवामधे चालली ।
लोकीं कोण बलाढ्य संप्रति असे ऐशी कथा चांगली ॥
श्रीमद्वीर जिनाशिवाय दुसरा नाहीं बली भूतलीं ।
सांगे वासव त्यास यांत न असे मिथ्योक्तिची सावली ॥ ७ ॥
आला संगमकाख्य देव अमरावासाहुनी खालती ॥
जेथें अल्पवयीं जिनेश अपुल्या मित्रासवें खेळती ॥
तेथें तो भुजगस्वरूप धरुनी सर्वांस भी दावितां ॥
गेले सर्व कुमार शीघ्र पळुनी चित्तीं नुरे धीरता ॥ ८ ॥
श्रीवीरास परंतु पाहुनि तया भीती नसे वाटली ॥
पुष्पस्रक्[३]सम त्या गणून जिन तो घाली स्वतांच्या गळीं ॥
त्याच्या भीष्मफणावरी स्वचरणा ठेवून नृत्या करी ॥
प्रेमानें मृदु हस्त वीर फिरवी तैसें तदंगावरी ॥ ९ ॥
हर्षांभोनिधि[४]मग्न देव मग तो स्वीकारुनि स्वाकृती ॥
तत्पादांबुजयुग्म वंदुनि करी नानाविधा तत्स्तुति ॥
त्रैलोक्यांत तुझ्याशिवाय न दिसे नाथा दुजा विक्रमी ॥
मातें वास्तव ठेवितो तव जिना नामा 'महावीर' मी ॥ १० ॥
नामें उज्जयिनी असें नगर जें त्याच्या श्मशानीं जिन ॥
दीक्षेनंतर वीरनाथ अपुल्या ध्यानांत लावी मन ॥

---

१ नांव २ सु उचित–अतिशय योग्य ३ फुलाच्या माळेसारखा, ४ आनंदरूपी समुद्र.

आला रुद्र तिथें उमेसह तदा पाहून त्याला खलें ॥
केला घोर महोपसर्ग तरिही ध्यानाहूनी ना चळे ॥ ११ ॥
ज्वाला काढिति दुष्ट भूत वदनापासून भीतिप्रदा ॥
क्रोधें ओरडती सभावति तसें ते नाचती ही तदा ॥
क्रूर व्याघ्र फणींद्र सिंह पशु तो निर्मी स्वविद्याबलें ॥
निर्मी भिल्लचमूहि घोर असती जीच्या मुखांचीं बिळें ॥ १२ ॥
भांतीचे असले उपाय करूनी तद्धैर्य भंगावया ॥
केले यत्न अनेक ते जरि तयें व्यर्थत्व आलें तया ॥
धैर्याचा निधि वीरनाथ जिन तो राहे तसाचि स्थिर ॥
कांपे वृक्ष समीरणें ह्मणुनि कां कांपेल मेरूशिर ! ॥ १३ ॥
आश्चर्यान्वित हर्षपूर्ण हृदयीं होऊन रुद्रें तदा ॥
केलें नृत्य उमेस घेउनि सवें तैशी स्तुती पुण्यदा ॥
ठेवी तो विभुचें ' महा आतमहावीर ' स्वयं नाम ही ॥
वंदानी चरणद्वयास मग तो जाई स्वकीया गृहीं ॥ १४ ॥
होती चेटकभूपतप्रियसुता श्रीचंदना सुंदरा ॥
कामी एक नभश्वराधिप[2] तिला विद्याबलानें हरी ॥
पत्नीपासुनि पाउनी भय तयें ती सोडिली काननीं ॥
कौशांबी नगरांत भिल्लपतिने ती आणिली तेथुनी ॥ १५ ॥
तेथें श्रीवृषभादिदत्त धनिकें देऊन त्याला धन ॥
त्याच्या पासुनि घेउनी निजगृहीं ती ठेविली आणुन ॥
मानी तो स्वसुतेसमान तिजला त्याची तथापि प्रिया ॥
त्याच्याशीं सहवास मानुनि तिचा घेई तदा संशया ॥ १६ ॥
कांजी आणिक कोद्रवान्न परळामध्यें तिला देतसे ॥
क्रोधें बोलुनि हात पाय निगडें बांधून टाकीतसे ॥
ऐशा हीन परिस्थितीत दिन ती काढीतसे बालिका ॥
आली जी घडुनी हकीकत पुढें ती सांगतो वाचका ॥ १७ ॥
आहारार्थ जिनेश वीर नगरीं एके दिनीं पातले ॥
त्यांना पाहुनि चंदनामन तदा सानंद कीं जाहलें ॥

---

१ पार्वतीसह. २ विद्याधराचा राजा.

आहे अन्न विशुद्ध आपण उभे राहा असे बोलली ॥
त्यांचें स्वागत तें करीत असतां ती शृंखला भंगली ! ॥ १८ ॥
माला वस्त्र विभूषणादि झाली ती चंदना शोभली ॥
तें मृत्पात्र सुवर्णपात्र बनलें त्याची प्रभा फाकली ! ॥
झालें कोद्रव अन्न तत्समयिं तें शाल्यन्न कांजी तशी ! ॥
पावे दुःखमहूपना जिनविभो ! लीला तुझी ही अशी ! ॥ १९ ॥
आहार प्रभुला दिला गुणवती श्रीचंदनेनें यदा ॥
पंचाश्चर्य सुवृष्टि देवनिकरें केली प्रमोदप्रदा ॥
वीराचा महिमा असा गणधरें शास्त्रामधें वर्णिला ॥
तो मी सज्जन हो तुम्हांस सगळा संक्षिप्त सांगीतला ॥ २० ॥
श्रीवर्धमान सन्मति महति महावीर वीर हीं नामें ॥
अंतिम तीर्थंकराचीं होवोत तुम्हांस विपुलसुखधामें[1] ॥२१॥

---

## वीरगुणस्तवन

श्रीमद्वीर जिनेंद्रा ! तुझ्या गुणांचें करावया स्तवन ॥
इच्छितसे मन माझें परि हें ओझें कसें करूं वहन ॥ १ ॥
मम हृदयिं तुझ्या विषयीं झाली उत्पन्न विपुल भक्ति असे ॥
म्हणुनिच अल्पगुणस्तुति करावयाचा प्रयत्न करित असे ॥२
आवरण[2] क्रम विरहित बोध तुझा स्थिरहि जाणतो जगता ॥
ऐसा गुण अन्यत्र न संसृतिपतिता म्हणून तूं त्राता ॥ ३ ॥
शिवेच्या वाऱ्यानें कैलास गिरींद्र मेरु कंपित तूं ॥
कामा देहविहीना केलेस परास्त यांत नच किंतु ॥ ४ ॥
मेघविनिर्गत नीरा[3] मिळवुनि हो चातकास मोद जसा ॥
प्राशुनि तव वचनामृत होतो संतास मोद अमित तसा ॥ ५ ॥

---

१ पुष्कळ सुखांची स्थानें अर्थात् स्वर्गमोक्षादिक स्थानें.

२ ज्ञानावरण कर्मानें आणि क्रमानें रहित.

३ मेघापासून निघालेलें पाणी.

गुणमणिसागर असुनहि आहे अजलाशयत्व[1] तव ठायीं ॥
विमदन[2] असून असशी भव्यांना विपुल कामसुखदायी[3] ॥६॥
त्रैलोक्यनाथ असुनिहि परिग्रहांनीं विहीन आहेस ॥
वीरा ! विरुद्ध ऐसे सद्गुण करिती तुझ्या पदीं वास ॥ ७ ॥
चंद्राचे कर जैसे देउनि आनंद वर्षिती अमृत ।
तम दूर करुनि सारा सगळ्या करिती जगा प्रकाशयुत ।८।
तैसे वीरा ! तव गुण सज्जन हृदयास मुदित करितात ॥
अज्ञानतम निवारुनि अमृतपदप्राप्ति करून देतात ॥ ९ ॥
धैर्यें सागर जिंकुनि आकाशा जिंकलें महत्त्वगुणें ॥
उच्चपणें मेरूला सूर्यकरा जिंकिलें स्वतेजानें ॥ १० ॥
धृतिगुण[4] साहाय्यानें धरणीला जिंकिलें तुवां वीरा ! ॥
धारण करुनि प्रशमा परास्त केलेस चंद्रकरनिकरा ॥ ११ ॥
शुक्लध्यानबलानें वीरा ! जो रागभाव जिंकियला ॥
तो रक्तकमलकोमल तव पद युग्मास शरण जणु आला ।१२।
तव दिव्यध्वनि ऐकुनि भक्तजना होतसेच आल्हाद ॥
आनंदित कां न करी मयूरवृंदा नवाम्बुदनिनाद[5] ॥ १३ ॥
वीरा ! तव गुणधारक पापापासून होय नर मुक्त ॥
चंद्रप्रकाशसंयुत होइल आकाश काय तमयुक्त ॥ १४ ॥
अविनाशी दर्शन सुख बोध तसे शक्ति चार सद्गुण हे ॥
असती तुझ्याच ठायीं पात्र न या हरि हरादि जन पाहे ॥ १५ ॥
क्षीर समुद्राचें जल असतें पीयूषतुल्य मधुर जसें ॥
धारण करुं नच शकती तदितर[6] सागर सुनीर जगिं तैसें ।१६
नाथा ! तव चरणांचा आश्रय जे भव्य जीव घेतात ॥
केवल बोधासह ते अनंत सौख्यास खचित वरितात ॥ १७ ॥
जे नर गुणज्ञ असती स्वसुखेच्छेनें तुलाच ते भजती ॥
पुष्पित आम्रतरूला त्यागुनि अन्यत्र भृंग नच जाती ॥१८॥

---

१ अजलाशयत्व—पाण्याचा सांठा नसणें, अजडाशयत्व—मंदबुद्धि नसणें.
२ विमदन—कामविकाररहित. ३ कामसुखाला देणारा, पक्षांतरीं, इच्छित सुखाला देणारा.
४ क्षमागुण ५ नवीन मेघांची गर्जना. ६ क्षीरसमुद्राहून दुसरे.

भूषण वेषा वांचुनि शोभतसे तव शरीर वीर जिना ! ॥
सूर्येंदुतारकाविण चेतोहरता[1] न येइ कां गगना ॥ १९ ॥
विकसित नूतन कमला तसें निर्मल शशीस पाहून ॥
निवति न नेत्र जनांचे निवति जसें त्वन्मुखा विलोकून ॥ २० ॥
वंदन करीत असतां भव्यांच्या नम्र मस्तकावरती ॥
पुण्यांच्या धारासम तव पदनखकिरण[3] पंक्ति जणु दिसती ॥
तूं भवपतित जनाला उद्धाराया समर्थ आहेस ॥
रविवांचुनि कोण करी नभ निर्मल करुनि दूर तिमिरास ॥ २२ ॥
निःस्पृह होउनि भव्या वीरा ! उपदेश तूंच देतोस ॥
धरितां मनि न फलाशा करी जसा जलद नीरवृष्टीस ॥ २३ ॥
पूर्ण दयेनें भरलें तव मत लवहीन यांत दोष असे ॥
हिममय चंद्रामध्यें उष्णत्व निवास सांग करिल कसें ? ॥ २४ ॥
वीरा ! तव वचनामृत सादर होऊन कर्णपात्रानें ॥
जो नर पीतो तो नच पीडित होतो कधींहि तृष्णेनें ॥ २५ ॥
स्वाभाविक रक्त तुझे सुंदर निर्मल जिनेश्वरा ! चरण ॥
जिनदास नमितसे हा तद्भवदुःखा करोत हे हरण ॥ २६ ॥

---

१ सूर्य, चंद्र व नक्षत्रें यावांचून २ मनोहरपणा.
३ तुझ्या पायांच्या नखांच्या किरणांची पंक्ति, ४ संसार. ५ मेघ.

# महावीर चरित्र.

श्री परमपूज्य आचार्य शांतिसागर महाराज दिगंबर जैन साधु
सामायिक करीत आहेत.

[ C. S. P. ].

॥ ॐ नमः सिद्धेभ्यः ॥

श्रीअसगमहाकविविरचितं

# वर्द्धमानचरितम् ।

## ॥ मंगलाचरणं ॥

× श्रियं त्रिलोकीतिलकायमानामात्यंतिकीं ज्ञातसमस्ततत्त्वां ॥
उपागतं सन्मतिमुज्ज्वलोक्तिं वंदे जिनेंद्रं हतमोहतन्द्रम् ॥ १ ॥

१ जिनें जीवादिक संपूर्ण तत्त्वांना जाणिलें आहे व जी त्रैलोक्याला तिलकाप्रमाणे आहे अशा कधींही नाश न पावणाऱ्या अनंत लक्ष्मीला जे प्राप्त झाले आहेत त्या श्रीसन्मति जिनेश्वरास मी मन वचन व शरीर शुद्ध करून नमस्कार करितों. श्रीसन्मति जिनेश्वर निर्दोष असा हितकर उपदेश भव्यांना देतात. ते स्वतः मोहरूपी गुंगीनें रहित झालेले आहेत व भव्यांच्याही मोहरूपी गुंगीचा ते नाश करितात.

**भावार्थः**—लक्ष्मी दोन प्रकारची आहे. एक अंतरंग लक्ष्मी व दुसरी बाहिरंग लक्ष्मी. अनंत ज्ञान, अनंत शक्ति, अनंतसुख व अनंतदर्शन ही अंतरंग लक्ष्मी होय. आणि समवसरण, आठ महाप्रातिहार्ये यास बाहिरंग लक्ष्मी

×नास्तिकत्वपरिहारः शिष्टाचारप्रपालनम् ॥
पुण्यावाप्तिश्च निर्विघ्नं शास्त्रादावाप्तसंस्तवात् ॥

अर्थात् जे आस्तिक आहेत—जे स्वर्ग, नरक आदि परलोक व त्याची प्राप्ति करून देण्यास कारणभूत अशीं कर्मे व कर्मांनी रहित आत्मा व त्याचे अनंतज्ञानादिक गुण यांना मानतात—ते आपल्या कार्यांत विघ्न आणणाऱ्या अंतरायकर्माची विघ्न आणणारी शक्ति क्षीण व्हावी म्हणून कार्याच्या प्रारंभीं मंगलाचरण करीत असतात. जरी मंगलाचरण मन आणि शरीर याचें द्वाराही होतें अर्थात् मनात परमदेवाचें चिंतन केल्यानें व त्यास हात जोडून नमन केल्यानेंही होतें. तथापि पुढें उत्पन्न होणारे शिष्ट पुरुषानीं देखील मंगलाचरणाची परिपाटी चालू ठेवावी या हेतूनेंही मंगलाचरण करतात. या मंगलाचरणानें पुण्यप्राप्ति होते व कार्य निर्विघ्न समाप्त होतें म्हणून हें वर्द्धमान चारित्र रचण्याच्या प्रारभीं शिष्टाचाराचें पालन करणाऱ्या श्रीअसग महाकवींनीं श्रीमहावीर तीर्थंकरांच्या गुणाचे स्मरण करून कृतज्ञता प्रगट केली आहे.

ह्मणतात. अंतरंग लक्ष्मी ही आत्म्याचें स्वरूप असल्यामुळें तीच मुख्य होय व या अंतरंग श्रीमध्येंही अनंतज्ञानलक्ष्मी ही अधिक प्रधान आहे कारण या लक्ष्मीच्या द्वारें भगवान सन्मति ( वर्द्धमान ) जिनेश्वरांनी अनंत भव्यांचा उद्धार केला आहे. या ज्ञानलक्ष्मीच्या द्वारें प्रभूंनी संपूर्ण पदार्थांचें स्वरूप त्यांच्या भूत. भविष्यत्, वर्तमानकाली होणाऱ्या सर्व पर्यायांसह जाणलें आहे. ही दोन प्रकारची लक्ष्मी सर्वोत्कृष्ट असल्यामुळे त्रिलोकाला भूषणरूप झाली आहे. घातिकर्मांचा समूळ नाश झाल्यामुळें हिची वीरप्रभूंना कायमची प्राप्ति झाली आहे. प्रभूंच्या ठिकाणीं हितोपदेशकता आहे. त्यांनीं केलेला हितोपदेश कुमार्गापासून भव्यांना परावृत्त करून सन्मार्गांत—जैनधर्मात स्थिर करितो. भगवान मोहरहित होते म्हणून वीतरागत्व या गुणानेंही भूषित होते. अर्थात् सर्वज्ञपणा, हितोपदेशकपणा, व रागद्वेषरहित असणे या तीन गुणांनीं ते युक्त आहेत म्हणून परमदेव आहेत. यास्तव श्रीअसग महाकवीनीं ग्रंथ प्रारंभीं त्यांना वंदन केलें आहे. तसेंच याच प्रभूंचे या ग्रंथांत कविवर्यानें चरित्र वर्णिलें आहे म्हणून देखील स्तवनपुरःसर त्यांना वंदन करणें हें योग्य आहे. सध्यां याच प्रभूंचें तीर्थ चालू आहे.

दत्तार्घमप्यात्महितैरनर्घ्यं मुक्तिश्रियो मौक्तिकहारभूतं ॥
रत्नत्रयं नौमि परं पवित्रं तत्त्वैकपात्रं दुरितच्छिदस्त्रं ॥ २ ॥
सुदुस्तरानादिदुरंतदुःखग्राहावकीर्णोरुभवार्णवौघात् ॥
दक्षा समुद्धर्तुमशेषभव्यान् जयत्यजय्या जिनशासनश्रीः ॥ ३ ॥

२ मी त्या उत्कृष्ट व पवित्र अशा रत्नत्रयाला स्तवितो. हें रत्नत्रय पापांचा नाश करण्यास शस्त्रासारखें आहे व मोक्षरूपी लक्ष्मीच्या गळ्यांतील मोत्यांचा हार आहे. हे तत्वपात्र आहे व आत्महिताची इच्छा करणाऱ्या भव्यांनीं याची किंमत केलेली असूनही अमूल्य आहे. अर्थात् किंमत रहित आहे. येथे विरोधाभास आहे. त्याचा परिहार याप्रमाणेः—रत्नत्रय आत्महित करणाऱ्यांकडून दत्तार्घ आहे अर्थात् पूज्य आहे. व म्हणूनच तें अमूल्य आहे. या रत्नत्रयाचा आश्रय करणारे भव्यजीव मुक्तिलक्ष्मीच्या गळ्यांतले हार बनतात. अर्थात् त्यांना मोक्ष प्राप्त होतो. जसें दूध वगैरे पिण्यासाठीं पात्राची आवश्यकता असते तसें तत्त्वस्वरूपाचे पान करण्यासाठीं म्हणजे तें जाणण्यासाठीं हे रत्नत्रय पात्रासारखें आहे. जसें शत्रूचें छेदन शस्त्राच्या द्वारें करता येतें तसें कर्मरूपी शत्रूचें छेदन करण्यासाठीं हें रत्नत्रय एक अद्वितीय शस्त्र आहे. यास्तव या उत्कृष्ट रत्नत्रयास—सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र यांस मी स्तवितों.

३ हा संसाररूपी समुद्र तरून जाण्यास कठिण आहे व फार मोठा असल्यामुळें याचा पार—दुसरा किनारा दिसत नाहीं. यामध्यें दुःखरूपी मगर वगैरे क्रूर जलचर प्राणी भरलेले आहेत. अशा या समुद्राच्या प्रवाहापासून सर्व भव्यांना वर काढण्यास ही जिनशासन लक्ष्मी समर्थ आहे व हिला अन्य मिथ्यावादी जिंकू शकत नाहींत. यास्तव ही जिनशासनलक्ष्मी नेहमी विजयी असो.

**भावार्थः**—जिनागमाचा आश्रय केला असतां अनादिकालाचा जीवांच्या मागें लागलेला संसार नष्ट होतो व त्यांना मोक्षाची प्राप्ति होते. यास्तव हा जिनागम नेहमीं या त्रैलोक्यांत विजयी होवो. संसाराला समुद्राचें रूपक दिलें आहे. समुद्र तरून जाण्यास अशक्य असतो. संसारही जिनागमाशिवाय तरून जाता येत नाहीं. समुद्र मोठा असल्यामुळें त्याचा किनारा दिसत नाहीं. जिनागमाचा आश्रय न केला तर संसारसमुद्राच्या दुसऱ्या किनाऱ्याचें दर्शन होणें अशक्य आहे. समुद्रांत मगर, मासे वगैरे क्रूर जलचर असतात. संसार समुद्रांतही मानासिक, शारीरिक व आकास्मिक अशीं तीन प्रकारचीं दुःखे हेच मगर मत्स्यादि क्रूर जलचर जीव आहेत. अशा संसार समुद्रांतून भव्यांचा उद्धार जिनशासन लक्ष्मीच करिते म्हणून ती नेहमी जयवंत असो.

गणाधिपैरुक्तमुदारबोधैः क्व तत्पुराणं जडधीः क्व चाहम् ॥
मनोजवैर्वारिनिधिं खगेंद्रैः पारं गतं गच्छति किं मयूरः ॥ ४ ॥
तथापि पुण्यास्रवहेतुभूतमित्यात्मशक्त्या चरितं प्रवक्तुं ॥
श्रीवर्द्धमानस्य समुद्यतोऽहं फलार्थिनां नास्ति हि दुष्करेच्छा ॥५॥
नापेक्षतेऽर्थापचयं न कष्टं न वृत्तभंगं भुवि नापशब्दं ॥
मूढीकृतः सन्रसिकत्ववृत्त्या कविश्च वेश्यार्पितमानसश्च ॥ ६ ॥
द्वीपेऽथ जंबूद्रुमचारुचिन्हे श्रीभारतं क्षेत्रमपाच्यमस्ति ॥
जिनेंद्रधर्मामृतवृष्टिसेकैरसक्तमाल्हादितभव्यसस्यम् ॥ ७ ॥
तत्र स्वकान्त्या विजितान्यदेशो देशोऽस्ति पूर्वोपपदेन युक्तः ॥
दिवौकसोऽपि स्पृहयंति यत्र प्रसूतये स्वर्गकृतावताराः ॥ ८ ॥

४–५ उत्कृष्ट द्वादशांगश्रुतज्ञानाचे धारक अशा गौतमादि गणधरांनीं सांगितलेलें श्रीमहावीर जिनाचे पुराण कोणीकडे व मंदबुद्धीचा मी कोणीकडे ?

मनाप्रमाणें तीव्र वेगाला धारण करणारा पक्षिराज गरुड समुद्राच्या दुसऱ्या किनाऱ्याला जसा जातो तसा मोर जाऊं शकतो काय ? तथापि हें भगवंताचें चरित्र पुण्यकर्माच्या प्राप्तीला कारण आहे म्हणून यथाशक्ति या चरित्राचें वर्णन करण्यास मी (असग महाकवि) उद्युक्त झालों आहे. बरोबर आहे की, जो फलेच्छु आहे त्याच्या मनांत हें कार्य दुष्कर आहे, मला करतां येणार नाहीं असें वाटत नाहीं. फलप्राप्तिविषयीं तीव्र लालसा असल्यामुळे त्याचे प्रयत्न सतत चालू होतात व तो आपणास इष्ट असें फल प्राप्त करून घेतो.

६ ज्यानें आपलें मन वेश्येला अर्पण केलें आहे असा मनुष्य आपल्या धनाचा अपव्यय होत आहे इकडे लक्ष्य देत नाहीं. कष्टांची पर्वा बाळगीत नाहीं, अपकीर्ति झाली तरी तिकडे ध्यान देत नाहीं, व आपल्या ब्रह्मचर्याच्या नाशाची काळजी बाळगीत नाहीं. केवळ तिच्या रसिक आचरणानें तो मूढ बनलेला असतो. त्याप्रमाणें कवि देखील रसिकस्वभावानें मूढ झालेला असतो म्हणून तो अर्थाच्या हानीकडे पाहात नाहीं, छंदोभंगाकडे लक्ष्य देत नाहीं. अपशब्दांची पर्वा ठेवीत नाहीं व काव्यरचना करीत असतांना होणाऱ्या बुद्धीच्या क्लेशाकडे पाहात नाहीं. यास्तव व्यभिचारी मनुष्य व कवि बरोबरीचे आहेत.

**भावार्थः—**चरित्रवर्णन करीत असतां छंदोभंग, अपशब्द, योग्य विषय वर्णन न करणें या गोष्टी घडतील त्याबद्दल रसिकांनीं क्षमा करावी, तिकडे ध्यान देऊं नये, असा अभिप्राय कर्त्यानें व्यक्त केला आहे.

## कथाप्रारंभ

—०—

७ जंबूवृक्षाच्या सुंदर चिन्हानें चिन्हित झालेल्या या जंबूद्वीपाच्या दक्षिण भागांत वैभवपूर्ण असें भारत नांवाचें क्षेत्र आहे. या क्षेत्रांत जिनधर्मरूपी अमृताच्या वृष्टीनें भव्यजीवरूपी धान्य नेहमी प्रफुल्लित झालें आहे. जसें शेतात पाऊस पडण्यानें धान्यें टवटवीत दिसूं लागतात. तसें या भारत क्षेत्रांत जिनधर्मरुपी अमृताच्या वृष्टीनें भव्य जीवरूपी धान्यास फार आनंद होतो.

८ या भारत क्षेत्रांत आपल्या सौंदर्यानें इतर देशांना ज्यानें जिंकिलें आहे असा ‘ पूर्व देश ’ नांवाचा देश आहे. या देशांत जन्म घेण्यासाठीं देव देखील स्वर्गाहून खालीं येण्याची इच्छा करितात.

रत्नाकरैर्यःसमतीतसंख्यैरलंकृतो दान्तिवनैश्च रम्यैः ॥
अकृष्टपच्यान्यनवग्रहाणि क्षेत्रैश्च सस्यानि सदा वहद्भिः ॥ ९ ॥
पुंड्रेक्षुवाटैर्निचितोपशल्याः कुल्याजलैः पूरितशालिवप्राः ॥
तांबूलवल्लीपरिणद्धपूगद्रुमान्वितोद्यानैर्वनैश्च रम्याः ॥ १० ॥
अध्यासिता गोधनभूतिमद्भिः कुटुंबिभिः कुंभसहस्रधान्यैः ॥
ग्रामाः समग्रा निगमाश्च यत्र स्वनाथचिंतामणयो विभान्ति ॥११॥
( युग्मं )

जलोध्दृता बुध्यत कच्छिकानां तुलाघटीयंत्रविकीर्णकूलाः ॥
वहंति यत्रामृतसारसाम्यं नीलोत्पलैर्वासितमंबु नद्यः ॥ १२ ॥
सरोभिरुन्मीलितपद्मनेत्रैर्निरीक्ष्यमाणः कृपयाध्वखिन्नः ॥
आहूयते पातुमिवांबु यस्मिन्हंसस्वनैः पांथगणस्तृषार्त्तः ॥१३ ॥
तत्रास्ति पुण्यात्मकृताधिवासा पुरी सुराणां नगरीव रम्या ॥
श्वेतातपत्राकृतिनामधेया श्वेतातपत्रस्य सदा निवासा ॥१४॥
अभ्रंकषान्तर्गतनीलरश्मिस्वर्भानुसंमर्द्दनशंकयैव ॥
❀करैःसहस्रैःसहितोऽपि यस्याः प्राकारमारोहति नैव भानुः ॥१५॥

९ जो पूर्वदेश रत्नांच्या असंख्यात खाणींनी व जेथें पुष्कळ हत्ती आहेत अशा रमणीय वनांनीं शोभत आहे. न नांगरतां जेथे धान्य पिकतें व पाऊस कमी झाला असतांही ज्यांत पुष्कळ धान्य उत्पन्न होतें अशा शेतांनीं या देशाला नेहमीं शोभा प्राप्त झाली आहे. १०–११ या देशांतील गांवाच्या सीमेवर उसांचे पुष्कळ मळे आहेत व पाटाच्या पाण्यांनीं साळींचीं शेतें नेहमीं भरलेलीं असतात. या गांवांतील बगीचे ज्यांच्यावर नागवेली चढलेल्या आहेत अशा सुपारींच्या झाडांनीं युक्त असल्यामुळें गांवांना त्यामुळें फारच शोभा आली आहे. ११ या पूर्व देशांतील सर्व शहरें व गांवें या देशाच्या राजाला चिंतामणि रत्नाप्रमाणें इष्ट पदार्थांची प्राप्ति करून देतात. शहरांत व गांवांत राहणारे लोक गाई, धन, व इतर ऐश्वर्य यांनीं संपन्न असून त्यांच्या घरीं हजारो कुंभप्रमाण धान्य नेहमीं शिल्लक

❀तत्रास्ति राजनगरी जगति प्रसिद्धा यत्सालनीलमणिदीधितिरुद्धमार्ग ॥
राहुभ्रमेण विवशस्तरणिःसहस्रैः पादैर्युतोऽपि न हि लंघयति स्म सालं ॥ १३॥ इति नीर-
धरचपूकाव्ये प्रथमलंबे॥ समानार्थकश्लोक. ॥

राहात असे. १२ या देशांतील नद्या निळ्या कमळांच्या सुगंधानें सुगंधित झालेलें व अमृताच्या साराप्रमाणें अतिशय मधुर असें पाणी नेहमी धारण करीत असत. १३ या देशांत मार्गश्रमानें खिन्न झालेला, तहानेनें पीडिलेला, असा वाटसरांचा समुदाय आपल्या कमलरूपी नेत्रांनी पाहून सरोवरें हंसपक्षांच्या शब्दांनीं त्यांना दयार्द्र होऊन जणू पाणी पिण्यास बोलावीत आहेत. १४ या देशांत देवांच्या नगरीप्रमाणें सुंदर, पुण्यवान लोकांनी गजबजलेली, राजाचें निवासस्थान असलेली अशी श्वेतातपत्रा नांवाची राजधानी आहे. १५ मेघापर्यंत उंच गेलेल्या तटाला असलेल्या नीलमण्याच्या किरणांना जणु राहू समजून तो आपले मर्दन करील या भीतीनें सूर्य हजारो करांनी—हातांनीं अर्थात् किरणांनी युक्त असूनही या नगरीच्या तटावर चढत नाही.

भावार्थः—या नगराचा तट फारच उंच होता.

आभाति वाताहतघूर्णमाना क्रांतांबरा कादलपत्रनीला ॥
यदंबुखातस्य तरंगपक्तिः संचारिकाचाद्रिपरंपरेव ॥ १६ ॥
विराजिता द्वारघनप्रवेशविनिर्गमायासितलोकलक्षैः ॥
या गोपुरैरुच्छ्रितकूटकोटिक्षणध्वजीभूतसिताभ्रभंगैः ॥ १७ ॥
अधिष्ठिता कोटिसहस्ररत्नैः श्रुतान्वितैः श्रावकधर्मसक्तैः
विमुक्तमायैरमदैरुदारैः स्वदारसंतोषपरैर्वणिग्भिः ॥ १८ ॥
पूजाहितानर्घ्यविचित्ररत्नपूगप्रभाजालनिमग्नदेहा ॥
इंद्रायुधैः क्लृप्तपटावृतेव यत्राट्टमार्गे जनता विभाति ॥ १९ ॥
संरोपितेंदीवरकर्णपूरा कुड्यस्थनीलांशुकलापवासा ॥
कूटान्तरप्रान्तविलम्बमानशुभ्राभ्रमालाललितोत्तरीया ॥ २० ॥
आरूढकेकिव्रजबर्हकेशी विलोलहेमांबुजदामबाहुः ॥
समग्रचामीकरकुंभपीनस्तनांचिता चारुगवाक्षनेत्रा ॥ २१ ॥
अलंकृतद्वारमुखी समन्तादध्यासिताशांबुजिनीविताना ॥
मिथ्यादृशामप्यभिवीक्षणेच्छां जिनालयश्रीःप्रतनोति यस्यां ॥२२॥

१६ वायूच्या आघातानें उसळून जिनें आकाशाचे आक्रमण केलें आहे अशी, व केळीच्या पानाप्रमाणे निळसर असलेली या शहराच्या खंदकाची

पारावर्तेंद्रीवरकर्णपूरा इत्यादि पाठ. ॥

तरंगपंक्ति संचार करणाऱ्या नील पर्वताच्या पंक्तिप्रमाणें शोभते. १७या शहराला अनेक वेशी आहेत. यांच्या द्वारांत प्रवेश करतांना व तेथून बाहेर पडतांना फार गर्दी असल्यामुळें हजारो लोकांना फार अडचण भासत असे. या वेशींच्या अतिशय उच्च अशा अनेक शिखरांच्या अग्रभागावर क्षणपर्यंत पांढरे ढग विश्रांति घेण्याकरितां येऊन बसत असत तेव्हां ते पताकाप्रमाणें दिसत असत. अशा वेशींनीं या शहराची शोभा वाढली होती. १८-२२ या शहरांतील जिनमंदिरें मिथ्या दृष्टि लोकांच्या देखील मनांत पाहण्याची इच्छा उत्पन्न करीत असत. असे त्यांचें अनुपम सौंदर्य होतें. येथें श्रावकधर्मामध्यें आसक्त, शास्त्राभ्यासी, हजारो कोटि रत्नांचे स्वामी, निष्कपटी, गर्वरहित, उदार—दानशूर, स्वस्त्रीमध्येंच संतुष्ट असलेले असे श्रीमंत व्यापारी पूजनासाठीं येत असत. या जिनमंदिराच्या सज्जावर चढलेले श्रावकलोक पूजेसाठीं आणिलेल्या अमूल्य व नानाप्रकारच्या रत्नपुंजांच्या कांतिसमूहानें त्यांचे देह व्याप्त झाल्यामुळें इंद्रधनुष्यांनीं बनविलेल्या वस्त्रांनीं वेष्टिल्याप्रमाणें शोभतात. पारावत—अर्थात् कबूतरें व निळीं कमळे हींच जिचे कर्णफूल आहेत, भिंतीमध्यें बसविलेल्या नीलरत्नांचा किरणसमूहच जिचे वस्त्र आहे, शिखरांच्या अंतरालभागीं लोंबणारी पांढऱ्या मेघांची पंक्तिच जिचें पांघरण्याचें सुंदर वस्त्र आहे, वर बसलेल्या मोरांचे पंख हेच जिचे केश आहेत, हलणाऱ्या सुवर्णकमलांच्या माला ह्याच जिचे बाहु आहेत, जी पूर्ण सुवर्णकुंभरूपी कठिन स्तनांनीं शोभत आहे, सुंदर खिडक्या ह्याच जिचे रमणीय नेत्र आहेत, तोरणानें अलंकृत झालेला दरवाजा हाच जिचें मुख आहे अशी ही जिनालयांची शोभा एखाद्या सुंदर स्त्रीप्रमाणें शोभते. या जिनमंदिरांच्या वरच्या भागांत सर्व बाजूनें चांदवा लावलेला असून त्यांत कमलांच्या वेलींची वेलबुट्टी काढलेली आहे. असें अप्रतिम सौंदर्य यांचे असल्यामुळें मिथ्यात्वी लोकही यांची शोभा पाहण्यास येत असत.

यत्सौधकुड्येषु विलंबमानानितस्ततो नीलमहामयूखान् ॥
ग्रहीतुमायान्ति मुहुर्मयूर्यः कृष्णोरगास्वादनलोलचित्ताः ॥२३॥
विनिर्मलस्फाटिकरत्नभूमौ संक्रान्तनारीवदनानियत्र ॥
अभ्येति भृंगः कमलाभिलाषी भ्रान्तात्मनो नास्त्यथवा विवेकः२४
× यस्यां गृहालिंदकभागभाजां हरिन्मणीनां किरणप्ररोहैः ॥

---

× यस्यामनर्घ्यनृपमंदिरदेहलीषु, गारुत्मतंर्मृगगणा बहु वंचिता. प्राक् ॥
दृष्ट्वापि कोमलतृणानि न संचरन्ति स्त्रीमंदहासयवसानि चरन्ति तानि ॥ १७ ॥
इति जीवंधरचंपूकाव्ये प्रथमलंबे ॥

प्राग्वंचिता बालमृगाश्चरन्ति तच्छंकयानाग्रगतां च दूर्वां २५

❀ यत्रोल्लसत्कुंडलपद्मरागच्छायावतंसारुणितानर्नेदुः ॥

प्रसाद्यते किं कुपितेति कांता प्रियेण कामाकुलितो हि मूढः ।२६।

० यत्रांबराच्छस्फटिकाश्मवेश्मप्रोत्तुंगशृंगास्थितचारुरामाः ।

नभोगता ह्यप्सरसः किमेता इति क्षणं पश्यति पौरलोकः।२७।

यस्यां गवाक्षांतरसंप्रवेशात्संक्रान्तबालातपचक्रवाला ॥

विराजते कुंकुमचर्चितेव निकेतनाभ्यंतररत्नभूमिः ॥ २८ ॥

दृष्ट्वा स्फुटं स्फाटिकभित्तिभागे पुरः स्थितस्वप्रतिबिंबकानि ॥

विपक्षशंकाकुललोलचित्ताः क्रुध्यंति यत्र प्रमदाः प्रियेभ्यः ॥२९॥

२३ या शहरांतील राजवाड्याच्या भिंतीवर सर्वत्र लोंबणाऱ्या नीलरत्नां-च्या किरणांना कृष्ण सर्प समजून त्यांना खाण्याविषयीं ज्यांचें चित्त उत्सुक झालें आहे अशा मयूरी ( लांडोरी ) त्यांना पकडण्याविषयी वारंवार येतात. २४ स्वच्छ स्फटिकरत्नांच्या जमिनीत स्त्रियांची प्रतिबिंबित झालेलीं तोंडें पाहून हीं कमलें आहेत अशा समजुतीने भुंग्यांचा समुदाय त्यांच्याकडे धावत जातो. बरोबर च आहे की, ज्यांना भ्रान्ति उत्पन्न झाली आहे त्यांना विवेक कसा असू शकेल २५ जेथें घराच्या जोत्याला पांचरत्नें लाविली असल्यामुळें त्यांतून निघणाऱ्या किरणांकुरांनी प्रथमतः फसविले गेलेले हरिणाशिशु पुढें टाकलेली हरळी देखील पांचरत्नांच्या संशयानें खात नसत. २६ जेथें शोभणाऱ्या कुंडलांतील पद्मरागम-ण्यांच्या कांतीनें सुंदर व लालभडक दिसत आहे मुखचंद्र जिचा अशी स्त्री तिच्या पतीकडून ती रागावली आहे असें समजून प्रसन्न केली जाते व बरोबरच आहे कीं कामुक मनुष्य कामाकुल बनला ह्मणजे मूर्ख होतो. २७ आकाशा प्रमाणें स्वच्छ अशा स्फटिकमण्यांनीं बांधलेल्या घरांच्या उंच गच्चीवर उभा राहिलेल्या सुंदर

---

* प्रथिता विभाति नगरी गरीयसी धुरि यत्र रम्यसुदतीमुखाम्बुजम् ॥
कुरुविंदकुंडलविभाविभावितं प्रविलोक्य कोपमिव मन्यते जन ॥ २९ ॥
इति जीवंधरचम्पूकाव्ये षष्ठलम्बे ॥

० स्फुरत्तुषारांशुमरीचिजालैर्विनिन्हुताः स्फाटिकसौधपङ्क्तीः ॥
आरुह्य नार्यः क्षणदासु यत्र नभोगता देव्य इव व्यराजन् ॥ ४२ ॥
शिशुपालवधे तृतीयसर्गे ॥

स्त्रिया ह्या आकाशांत अप्सराच उभा राहिल्या आहेत काय असें समजून लोकां-कडून क्षणपर्यंत पाहिल्या जात असत २८ खिडकींतून प्रवेश करून घरांतील रत्न भूमीवर सूर्याचे कोमल किरणसमूह पडत असत व जमीनींशीं त्यांचे मिश्रण झाल्यामुळें ती रत्नभूमि त्यावेळीं केशरानें माखल्याप्रमाणें लालभडक दिसत असे. २९ स्फटिकाच्या भिंतीमध्यें आपल्यापुढें आपलेंच प्रतिबिंब पाहून तेथील स्त्रियां-च्या मनांत आपल्या सवतीविषयीं शंका उत्पन्न होत असे तेव्हां त्या आपल्या पतीवर रागावत असत.

**भावार्थः**—आपल्या प्रतिबिंबाला पाहून आपली सवतच येथें एकांतस्थानीं आली आहे असें स्त्रियांना वाटून त्या पतीवर क्रुद्ध होत असत.

प्रासादशृंगाणि समेत्य मेघा यस्यां मयूरा मदयंत्यकाले ॥
तच्चित्ररत्नांशुकलापमालासंपादिताखंडलचापखंडाः ॥ ३० ॥
विभांति यस्यां विशिखा जनानामितस्ततः संचरतामजस्रं ॥
अन्योन्यसंघट्टविशीर्णहारमुक्ताफलैस्ताराकितैकदेशाः ॥ ३१ ॥
सृजंति रात्रावपि यत्र वाप्यः स्फुरत्तटीरत्नमरीचिभाभिः ॥
दिनश्रियं कोककुटुंबिनीनां वियोगशोकापनिनीषयेव ॥ ३२ ॥
चंद्रोदये चंद्रमणिप्रणद्धसौधाग्रभूमिभ्रमनिर्गतानि ॥
आदाय तोयानि घनीकृतांगा यथार्थतां यत्र घनाः प्रयान्ति ॥३३॥
यस्यां निशीथे गृहदीर्घिकाणां भ्राम्यन्ति भृंगाःकुमुदोदरेषु ॥
चंद्रांशुभिर्जर्जरितांधकारलेशा इवामोदितदिङ्मुखेषु ॥ ३४ ॥
यस्यां गवाक्षांतरसंप्रविष्टां ज्योत्स्नां सुधाफेनसितां प्रदोषे ॥
दुग्धेच्छया स्वादयति प्रहृष्टो मार्जारपोतो मणिकुट्टमेषु ॥ ३५ ॥
सर्वर्तवोऽलंकृतसर्ववृक्षाः सदाधितिष्ठंति वनानि यस्यां ॥
लतागृहान्तर्गतदंपतीनां विलाससौंदर्यदिदृक्षयेव ॥ ३६ ॥
अथेश्वरो विश्वजनीनवृत्तिस्तस्याः पुरोऽभूत्पुरुहूतभूतिः ॥
प्राग्नंदिशब्दान्वितवर्धनाख्यो विख्यातवंशो रिपुवंशदावः ॥ ३७ ॥

तेथील राजवाड्यांच्या शिखरावर मेघ येऊन पावसाळा नसतांही मोरांना उन्मत्त करितात. व तेथें बसविलेल्या नाना प्रकारांच्या रत्नांच्या किरणसमूहांनी त्या मेघामध्यें पुष्कळ इंद्रधनुष्यें उत्पन्न होतात.

**तात्पर्यः**—इंद्रधनुष्यासहित मेघ दिसल्यामुळें मोर उन्मत्त बनून नृत्य करीत असत.

३१ या शहरांत रस्त्यांतून लोक नेहमीं फिरत असतांना एकमेकांच्या धक्क्यानें त्यांच्या गळ्यांतील हार तुटून मोत्यें रस्त्यावर विखरत असत त्यावेळीं ते रस्ते ज्यामध्यें नक्षत्रें उगवलीं आहेत अशा आकाशाच्या भागाप्रमाणें शोभत असत. ३२ चक्रवाकींच्या विरहापासून उत्पन्न झालेला शोक नाहींसा करण्याच्या इच्छेनें जणु काय येथील विहिरी रात्रीं देखिल तटाला लावलेल्या रत्नांच्या चमकणाऱ्या किरणसमूहांनीं दिवसांची शोभा उत्पन्न करितात. चक्रवाकपक्षाचें जोडपें रात्रीं वियुक्त होत असतें परंतु विहिरींच्या तटाला लावलेल्या रत्नांच्या प्रकाशानें रात्रीं देखील त्या जोडप्याला दिवसाचा भास झाल्यामुळें तें येथें कधीही वियुक्त होत नसे. ३३ चंद्राचा उदय झाला असतां चद्रकांतमण्यांनीं बांधलेल्या वाड्यांच्या गच्चीपासून पाणी पाझरून पन्हाळ्यांच्या वाटें बाहेर येत असतां तें घेऊन ज्यांचें शरीर मोठें बनलें आहे असे. मेघ 'घन' या नांवाला सार्थक करतात. घन या शब्दाचा पुष्ट असा अर्थ होतो मेघही पुष्ट असतात म्हणून त्यांचे घन हें नांव सार्थक झाले आहे. ३४ या शहरांत घरांतील विहिरीमध्यें ज्यांनीं दिशांचीं तोंडें सुगंधित केलीं आहेत अशा कमळांच्या मध्यभागांतून विहार करणारे भुंग्यांचे समुदाय अर्ध रात्रीं चंद्राच्या किरणांनीं जर्जर झालेले अंधाराचे तुकडे जणु इकडे तिकडे फिरतात असें भासू लागतात.

**तात्पर्य**—कमलावरून फिरणारे भुंगे अर्धरात्री फिरणाऱ्या अंधकाराच्या तुकड्या प्रमाणें लोकांना वाटत असत.

३५ रात्रींच्या प्रारंभीं चंद्राचे अमृताच्या फेसा प्रमाणें स्वच्छ असलेले किरण खिडक्यांच्या द्वारें रत्नखचित जमिनीवर पडलेले पाहून हें दूधच सांडलें आहे असें वाटून मांजराचे पिलें आनंदित होऊन त्यांना चाटीत असे. ३६ सर्व वृक्षांना सुशोभित करणारे असे सहाही ऋतु लतागृहांत क्रीडा करण्यासाठीं आलेल्या दंपतीचे सौंदर्य व विलास पाहण्याच्या इच्छेनें जणूं काय या शहरांतील बगीचांत नेहमीं निवास करीत आहेत. ३७ अशा या सुंदर शहरांत नंदिवर्धन या नांवाचा राजा राज्य करीत असे. हा प्रख्यात वंशांत उत्पन्न झाला होता व शत्रूरूपी वेळूचे वन जाळण्यास अग्निप्रमाणे होता. याचे

इंद्राप्रमाणें ऐश्वर्य होतें. व सर्वांचें कल्याण करण्याचा स्वभाव याच्या ठिकाणीं वास करीत असे.

प्रतापभानोरुदयाद्रिरिंदुःकलाकलापस्य समग्रकांतिः ॥
पुष्पोद्गमो यो विनयद्रुमस्य जातस्थितेरंबुधिरंबुजाक्षः ॥ ३८ ॥
यस्मिन्महात्मन्यमलस्वभावे नरेंद्रविद्या सकलाः प्रतिष्ठां ॥
अवाप्य रेजुर्घनरोधमुक्तेर्दिनव्यपाये नभसीव ताराः ॥ ३९ ॥
निसर्गशत्रूनपि योऽभ्युपेतानार्द्रांतरात्मा नृपतिर्बभार ॥
और्वानलस्य प्रविजृंभमाणान् ज्वालासमूहानिव वारिराशिः॥ ४०॥
यो वांछितानेकफलप्रसूतिं भूत्यै प्रजानां नयकल्पवृक्षं ॥
प्रज्ञांबुसेकेन निनाय वृद्धिं परोपकाराय सतां हि चेष्टा ॥ ४१ ॥
अलंकृताशेषमहीतलेन प्रोत्फुल्लकुंदद्युतिनापि यस्य ॥
तदद्भुतं शत्रुवधूमुखेन्दोर्मलीमसत्वं यशसा कृतं यत् ॥ ४२ ॥
तस्याथ कान्तेरधिदेवतेव वेलेव लावण्यमहार्णवस्य ॥
मूर्ता जयश्रीरिव पुष्पकेतोरासीत्प्रिया वीरवतीति नाम्ना ॥ ४३ ॥
※ विद्युल्लतेवाभिनवांबुवाहं चूतद्रुमं नूतनमंजरीव ॥
स्फुरत्प्रभेवामलपद्मरागं विभूषयामास तमायताक्षी ॥ ४४ ॥

३८ कमलाप्रमाणें सुंदर नेत्र ज्याचे आहेत असा हा नंदिवर्धन राजा पराक्रमरूपी सूर्याला उदयपर्वताप्रमाणें होता. पूर्ण कांतियुक्त चंद्र जसा सर्व कलांनीं युक्त असतो तसे हा सुंदर राजा सर्व कलाकौशल्यांनीं युक्त होता. विनयरूपी वृक्ष पल्लवित होण्यास वसंत ऋतुप्रमाणें होता. समुद्र जसा मर्यादेनें राहतो तसा हा स्वतः मर्यादा पाळून प्रजेला मर्यादेचें उल्लंघन करूं देत नसे. ३९ दिवस मावळला असतां व मेघांचें आवरणही नसतां स्वच्छ आकाशांत नक्षत्रें जशीं चमकतात तसे निर्मळ स्वभावी व महात्मा अशा या राजाच्या ठिकाणी सर्व राजविद्यांना

---

※ तस्य सत्यंधरस्यासीत्कान्ता कान्त्यधिदेवता ॥
वेला लावण्यपाथोधेर्विश्रुता विजयाख्यया ॥ २६ ॥
सौदामिनीव जलदं नवमंजरीव चूतद्रुमं कुसुमसंपदिवाद्यमासं ॥
ज्योत्स्नेव चंद्रमसमच्छविभेव सूर्यं तं भूमिपालकमभूषयदायताक्षी ॥ २७ ॥
जीवंधरचंपूकाव्ये प्रथमलम्बे ॥

राहावयास स्थान मिळाल्यामुळें त्या फार शोभू लागल्या. ४० पाण्याच्या विपुल संग्रहामुळें शीतल व ओला असलेला असा समुद्र जसें वडवा अग्नीच्या ज्वाला समूहांस आपल्या पोटांत राहावयास स्थान देतो तसें हा दयार्द्र राजा स्वभावतः वैर धारण करणाऱ्या राजांचें ते शरण आल्यामुळें रक्षण करितो. अर्थात् त्यांचें राज्य त्यांना परत देऊन त्यांच्यावर दया करितो. ४१ प्रजेला तिच्या अनेक इच्छित फलांची उत्पत्ति व्हावी म्हणून व तिचें ऐश्वर्य वाढावें म्हणून आपलें बुद्धिरूपी पाणी नीतिरूपी कल्पवृक्षाला घालून ह्या राजानें त्याला पुष्कळ वाढविलें. बरोबरच आहे कीं, सत्पुरुषांची सर्व कृत्यें लोककल्याणासाठीच असतात.

**भावार्थः**—या राजापासून प्रजेला सुख मिळून तिची संपत्ती वाढली.

४२ या राजाच्या कीर्तीची कान्ति विकसित झालेल्या कुंदपुष्पाप्रमाणे होती व तिनें या पृथ्वीमंडलाला फार सुशोभित केलें होतें. तथापि तिनें शत्रूंच्या स्त्रियांच्या मुखचंद्राला मळकट करून सोडलें हें मात्र आश्चर्याला उत्पन्न करणारें होतें.

४३–४४ या नंदिवर्धन राजाच्या पत्नीचें नांव वीरवती असें होतें. ही राणी कांतीची जणु मुख्य देवता होती. लावण्यरूपी समुद्राची जणु सीमा होती व कामदेवाची जणु मूर्तिमंत विजयलक्ष्मी होती. जसें विजेनें नवीन मेघाला शोभा येते, आम्रमंजरीनें [ मोहोरानें ] जसा आम्रवृक्ष सुंदर दिसतो, पसरणारी कांति जशी पद्मरागमण्याच्या सौंदर्यांत भर टाकते, तसें जिचे डोळे विशाल आहेत अशा या राणीनें राजाला स्वतःच्या योगानें अधिक शोभा आणिली होती.

तौ दंपती सर्वगुणाधिवासावन्योन्ययोग्यौ विधिवन्नियोज्य ॥
चिरेण नूनं विधिनापि दृष्टं सृष्टं फलं तत्प्रथमं कथंचित् ॥ ४५ ॥
प्रबुद्धपद्माकरसेव्यपादं जगत्प्रवीणं क्षितिपः स तस्यां ॥
उत्पादयामास सुतं यथार्कं प्राच्यां प्रतापानुगतं प्रभातः ॥ ४६ ॥
तज्जन्मकाले विमलं नभोऽभूद्दिग्भिः समं भूरपि सानुरागा ॥
स्वयं विमुक्तानि च बंधनानि मंदं ववौ गंधवहः सुगंधिः ॥ ४७ ॥
जिनेंद्रपूजां महतीं विधाय चक्रे नरेंद्रो दशमेऽन्हि सूनोः ॥
सर्वप्रजामानसनंदनत्वादर्थानुगां नंदन इत्यभिख्याम् ॥ ४८ ॥
बाल्येऽपि योऽभ्यस्तसमस्तविद्यो ज्याघातरेखांकितसत्प्रकोष्ठः ॥
वैधव्यदीक्षां रिपुसुंदरीणां प्रदातुमाचार्यपदं प्रपेदे ॥ ४९ ॥

पण्यांगनाजनकटाक्षशरैकलक्ष्यं ॥
कामस्य जीवनरसायनमप्यमूर्तेः ॥
उद्दामरागरससागरसाररत्नं ॥
लीलानिधिं तमथ यौवनमाससाद ॥५०॥
उद्भिद्यमाननवयौवनलब्धरंध्र- ॥
मप्यन्यभूमिपतिभिर्विजितं न जातु ॥
एकोप्यनेकविधचेष्टितमप्यलक्ष्य- ॥
मंतःस्थितं रिपुबलं स जिगाय धीरः ॥५१॥

४५ हे दोघे पतिपत्नी सर्व सद्गुणांचे माहेरघर होते व एकमेकांना अनुरूप होते. अर्थात् पति पत्नीला साजेसा होता व पत्नीही पतीला साजेशी होती. या दोघांची योजना विधिपूर्वक ब्रह्मदेवानेंही परस्परांशीं करून देऊन निश्चयानें कांहीं दिवसांनीं आपल्या या सृष्टीचे पहिलें फळ कसे तरी त्यानें पाहिलें.

**भावार्थः**—वीरमती राणीला कांहीं दिवसांनीं गर्भ राहून पहिला मुलगा झाला.

४६ प्रतापानें अनुसरलेल्या, जगाला जागृत करणाऱ्या, विकसित झालेल्या कमल-समूहाकडून ज्याचे किरण सेविले जातात अशा सूर्याला प्रातःकाल जसा पूर्व दिशेमध्यें उत्पन्न करितो तसें आनंदित झालेली लक्ष्मी आपल्या हातांनीं ज्याचे पाय चुरीत आहे अशा जगत्प्रकाशक व पराक्रमयुक्त पुत्राला या नंदिवर्धन राजानें आपल्या वीर-वती राणीमध्यें उत्पन्न केलें. ४७ जेव्हां राजाला मुलगा झाला तेव्हां आकाश स्वच्छ झाले, सर्व दिशासह पृथ्वी प्रेमयुक्त झाली—प्रसन्न—रमणीय दिसूं लागली. कैद्यांच्या बेड्या आपोआप गळून पडल्या व सुगंध वायु मंद मंद वाहूं लागला. ४८ राजानें दहाव्या दिवशीं जिनेश्वराची फार मोठी पूजा केली व मुलगा सर्व प्रजांच्या अंतःकरणाला आनंदित करणारा असल्यामुळें त्याचें 'नंदन' असें सार्थक नांव ठेविलें. ४९ या राजपुत्राने बाल्यावस्थेतच सर्व विद्यांचें अध्य-यन केलें. याचें दृढ मणगट धनुष्याच्या दोरीचा वारंवार आघात झाल्यामुळें घ-ट्यानें युक्त झाले होतें. अर्थात् धनुर्विद्येत यानें असाधारण प्रावीण्य मिळविलें होतें. शत्रूंच्या स्त्रियांना वैधव्यदीक्षा देण्यासाठीं याने आचार्य पदवी प्राप्त करून घेतली होती अर्थात् हजारों शत्रूंना यानें युद्धांत परलोकीं पाठविलें होतें. ५० शरीररहित अशाही मदनाला जीवनदान देण्यास रसायनासारखें असलेलें, वे-श्यांच्या कटाक्षरूप बाणांचें लक्ष्यस्थान असलेलें, उद्दाम श्रृंगाररसरूपी समुद्राचे

उत्कृष्ट रत्न व लीलांचा निधि असलेलें असें तारुण्य या राजकुमाराला प्राप्त झाले. ५१ उत्पन्न होणाऱ्या नवीन तारुण्याच्या द्वारें संधि प्राप्त करून घेऊन ज्यांनी मनांत प्रवेश केला आहे. ज्यांना अन्य राजे जिंकण्यास कधींही समर्थ झाले नाहींत, जे नानाविध अकार्ये करावयास लावितात अशा काम, क्रोध, मद, हर्ष व मान या बाहेर न दिसणाऱ्या सहा शत्रूंना निर्विकार मनाच्या धीर राजपुत्राने एकट्याने जिंकिले होते. कामादिक विकारांनी मोठमोठ्याचें फार अकल्याण केलें आहे. बाह्य शत्रूंना जिंकणें फार सोपें आहे. परंतु हे अंतरंग शत्रु अदृश्य असून फार बलवान आहेत. यांनी सर्व जगाला वश केलें आहे. अशा या शत्रूंना या नंदन राजपुत्राने जिंकलें होतें.

अन्येद्युरात्मसमवार्द्धितराजपुत्रै ॥
रन्यैश्च मूलतनयैःसहितो जगाम ॥
स क्रीडितुं पितुरवाप्य परामनुज्ञां ॥
क्रीडावनं कृतकभूधरराजितान्तं ॥ ५२ ॥
झंकारितेऽलिविरुतैर्मलयानिलेन ॥
प्रेंखालिते कुसुमसौरभवासितान्ते ॥
तस्मिन्वने सरसचारुफले विहृत्य ॥
संतृप्तमिंद्रियगणेन च तस्य तेषां ॥ ५३ ॥
तस्मिन्नशोकतरुचारुतले विकुंथा- ॥
वासीनमुच्चविमलस्फटिकाश्मपट्टे ॥
पुंजीकृतात्मयशसीव मुनिं जिताक्ष- ॥
मैक्षिष्ट शिष्टचरितं श्रुतसागराख्यं ॥ ५४ ॥
प्रागेव तं प्रमुदितः प्रणतोत्तमांग ॥
व्यालिंगितक्षितितलः प्रणनाम दूरात्
पश्चात्समेत्य निजहस्तसरोरुहाभ्याम् ॥
अभ्यर्च्य तस्य चरणावभवत्कृतार्थः ॥ ५५ ॥
संविश्य तं मुनिपतिं मुकुलीकृताग्र- ॥
हस्तांबुजो विदितसंसृतिफल्गुभावः ॥

उल्लंघ्य भीमभवसागरमीश ! जीवः ॥
सिद्धिं कथं व्रजति तत्कथयेत्यपृच्छत् ॥ ५६ ॥
पृष्टः स तेन मुनिरेवमुवाच वाचं ॥
यावन्ममायमिति चैष वृथा प्रयासः ॥
तावत्कृतान्तमुखमस्य हि तद्व्यपाया-॥
दात्मात्मभावमधिगम्य स याति सिद्धिम् ॥५७॥
तस्माद्विनिर्गतमसौ मुनिनूतनार्का- ॥
ज्ज्योतिः परं सकलवस्तुगतावभासं ॥
मिथ्यांधकारपरिभेदि समेत्य तत्त्वं ॥
पद्माकरः स्वसमये सहसा व्यबुद्ध ॥ ५८ ॥

५२ एके दिवशीं हा नंदन राजपुत्र आपल्या बरोबर वाढलेल्या इतर राजपुत्रांना व प्रधान वगैरेच्या पुत्रांना बरोबर घेऊन पित्याच्या आज्ञेनें ज्याचा प्रदेश कृत्रिमपर्वतानें शोभत आहे अशा बगीचांत क्रीडा करण्यासाठीं गेला. ५३ बगीचामध्ये भुंगे गुंजारव करीत होते. मलय पर्वताकडून वाहात येत असलेल्या वाऱ्यानें झाडें डुलत होतीं. फुलांच्या सुवासानें तो सर्व उद्यानप्रदेश भरून गेला होता. झाडें सरस व सुंदर फळांनीं लकडलेलीं होती अशा या बगीचांत विहार करण्यानें त्या राजपुत्राची व त्याच्या मित्रांचीं इंद्रियें तृप्त झालीं. ५४ बगीचांत अशोक वृक्षाच्या खालीं निर्जन्तुक अशा निर्मल स्फटिकाच्या शिलेवर जणु काय स्वतःच्या निर्मल यशःपुंजावर श्रुतसागर नांवाचे निरतिचार चारित्राचे धारक जितेंद्रिय मुनि बसले होते. ते राजपुत्राच्या दृष्टीस पडले. ५५ दृष्टीस पडल्यावरोबर दुरूनच नम्र झालेल्या मस्तकानें ज्यानें भूमीस स्पर्श केला आहे अशा या राजपुत्रानें आनंदित होऊन वंदन केलें. व नंतर जवळ येऊन आपल्या दोन हस्तकमलांनीं त्यानें त्यांचें पूजन करून स्वतःस कृतार्थ मानिलें. अर्थात् मुनिपूजन करण्यापासून त्याला फार आनंद वाटू लागला. ५६ ज्याला संसाराच्या निःसारपणाचें ज्ञान झालें आहे, ज्यानें आपले दोन हात कमलाच्या कळीसारखे केले आहेत अशा त्या नंदन राजपुत्रानें मुनीश्वराच्या जवळ वसून हे मुनिराज ! भयंकर संसारसमुद्राचें उल्लंघन करून हा जीव कोणत्या उपायानें मोक्षास जातो असा प्रश्न विचारला. ५७ याप्रमाणें विचारल्यावर मुनिराज म्हणाले

हे राजपुत्रा! जोपर्यंत पुत्र, मित्र, नायको वगैरे पदार्थ माझे आहेत असा व्यर्थ आग्रह जीव धारण करितो तोंपर्यंत याची मृत्युमुखांतून सुटका होत नाहीं. अर्थात् तोपर्यंतच याचें संसारांत परिभ्रमण होतें. व जेव्हां त्याची ही ममत्वबुद्धि नाहींशी होते तेव्हां त्याच्या स्वस्वरूपाचा त्याला लाभ होऊन मोक्षप्राप्ति होते. ५८ ज्या प्रमाणें अंधःकाराचा नाश करणारे, सर्व वस्तूंना प्रकाशित करणारे अशा बाल सूर्याच्या किरणांचा लाभ होऊन कमलसमूह प्रफुल्लित होतो त्याप्रमाणें मिथ्याश्रद्धान रूपी अंधाराचा नाश करणारे, सगळ्या जीवादिक वस्तूंचें स्वरूप स्पष्ट दाखऊन देणारे असे मुनिसूर्यापासून निघालेले तत्वज्ञानरूपी अपूर्व किरण प्राप्त करून घेऊन हे राजपुत्ररूपी कमल योग्यवेळीं प्रबुद्ध—विकासित झाले अर्थात् राजपुत्राला आत्मज्ञान झालें.

आरोपितव्रतगणाभरणाभिरामो ॥
भक्त्या मुनिं चिरमुपास्य नरेंद्रपुत्रः ॥
उत्थाय सादरमुपेत्य कृतप्रणामो ॥
गेहं ययौ मुनिगुणान्गणयन्गुणज्ञः ॥५९॥

लग्ने गुरौ शुभदिने वसुवृष्टिपूर्वं सामंतमंत्रितलवर्गगणेन सार्द्धं ॥
कृत्वाभिषेकमतुलं परया विभूत्या तस्मै दिदेश युवराजपदं नरेंद्रः॥६०॥

आगर्भवासदिवसात्प्रभृति स्वसेवा- ॥
संसक्तराजसुतकार्पटिकस्वमौलान् ॥
आत्मातिरिक्तविभवानकरोत्कुमारः ॥
क्लेशो हि कल्पतरुरेव सति प्रयुक्तः ॥६१॥

एकोप्यनेकविधरत्नकरान्गृहीत्वा ॥
राजात्मजः स विषयान्क्षितिपालदत्तान् ॥
रेजे भवव्यसनसंततिबीजहेतू- ॥
नन्यानसाधुविषयान्विषयान्विहाय ॥६२॥

विश्राणितं भुवि न केनचिदात्मनस्तत् ॥
यन्नास्ति वस्तु सकलार्थिजनस्य तेन ॥

मन्ये महाद्भुतमिदं यदविद्यमानं ॥
स्वस्याप्यदायि तदनेन भयं रिपुभ्यः ॥६३॥
सौंदर्ययौवननवोदयराजलक्ष्म्यः ॥
प्राप्यापि निर्मलमतिं मदहेतवोऽपि ॥
शेकुर्न तं मदयितुं क्षणमप्युदारं ॥
शुद्धात्मनां न तु विकारकरं हि किंचित्॥६४॥
अभ्यर्चयन् जिनगृहान्परया स भक्त्या ।
शृण्वन् जिनेंद्रचरितानि महामुनिभ्यः ॥
चिन्वन्व्रतानि विधिवन्नयति स्म कालं ॥
धर्मानुरागमतयो हि भवंति भव्याः ॥ ६५ ॥

या गुणज्ञ राजपुत्रानें या मुनिवर्याजवळ व्रतरूपी अलंकार धारण केले त्यामुळें तो फार मनोहर दिसूं लागला. बराच वेळ मुनिवर्यांची उपासना करून व उठून त्यांच्याजवळ जाऊन त्यानें पुनः नमस्कार केला व मुनीश्वरांच्या गुणांचा मनांत विचार करीत तो आपल्या घरीं गेला. ६० राजानें शुभलग्नीं, शुभदिनीं, श्रेष्ठ पुष्यनक्षत्र असतां शुभवारीं सरदार, मंत्री व इतर अधिकारी वर्ग यांच्यासह अतिशय थाटानें नंदनराजपुत्राचा अपूर्व अभिषेक करून त्याला युवराज पदवी दिली. ६१ गर्भांत आलेल्या दिवसापासून जे या राजपुत्राची सेवा करीत होते अशा राजपुत्रांना, खुषमस्कऱ्यांना व इतर मुख्य अधिकाऱ्यांना या राजपुत्रानें स्वतःपेक्षां अधिक वैभवशाली केलें. बरोबरच आहे कीं, सज्जनाविषयीं दुःख सहन करण्याचा प्रसंग आला तर तो कल्पवृक्षासारखा विपुल सुखालाच देणारा होतो. ६२ संसारदुःखांच्या परंपरेला कारण असलेल्या व दुर्जन ज्यांचें सेवन करितात अशा परस्त्री वगैरे अन्य भोग्य पदार्थांचा त्याग करून या युवराजानें इतर राजांनीं अर्पण केलेल्या अनेक भोग्य विषयांचा व खंडणीच्या स्वरूपानें दिलेल्या रत्नांचा स्वीकार केला त्यामुळें तो फार शोभूं लागला. ६३ या भूतलावर जी वस्तु आपल्याजवळ नसते ती वस्तु याचकवर्गांना आजपर्यंत कोणी दिली नाहीं व कोणाला देतां आली नाहीं. परंतु मला हे फार आश्चर्यकारक वाटतें कीं, या युवराजानें स्वतःजवळ नसलेली भीति नांवाची वस्तु शत्रुवर्गाला देऊन टाकली.

**भावार्थ**—आजपर्यंत जितके दानशूर लोक झाले त्यांनी आपल्याजवळ असलेली वस्तूच फक्त देऊन टाकली. कारण नसलेल्या वस्तूंचें दान देणें संभवत

नसतें. परंतु उपर्युक्त प्रकारानें नसलेल्या वस्तूंचें कसें दान संभवतें हें कविवर्यांनें चातुर्यानें दाखविले आहे. युवराजापासून त्याच्या शत्रूंना फार भीति वाटत असे हा अभिप्राय या श्लोकांत सांगितला आहे.

६४ गर्व वाढविण्यास कारण असलेलें सौंदर्य, तारुण्य, नवीन प्राप्त झालेली उन्नतावस्था व राज्यलक्ष्मी हे पदार्थ युवराजाजवळ मुबलक असूनही ते त्या महात्म्याला मदोन्मत्त करण्यास समर्थ झाले नाहीत. बरोबर आहे की, ज्यांचा आत्मा रागद्वेषादि विकारांनीं रहित असतो त्यांना बाह्य मोहक वस्तु विकार उत्पन्न करूं शकत नाहीं. ६५ हा युवराज उत्कृष्ट भक्तीनें जिनमंदिरांची पूजा करीत असे. महामुनीपासून तीर्थंकरांची चरित्रें श्रवण करीत असे. अनेक व्रतांचें योग्य विधीनें आचरण करीत असे. याप्रमाणें तो काल व्यतीत करीत असे. बरोबरच आहे की भव्य—धार्मिक लोकांची बुद्धि धर्मावर प्रेम करणारीच असते.

ऊढवान्स परिवृढो महात्मनां न रागतः पितुरुपरोधतो वशी ॥
निजश्रिया विजितसुरांगनाकृतिं प्रियंकरां मनसिशयैकवागुरां ।६६।
व्रतानि सम्यक्त्वपुरःसराणि पत्युःप्रसादात्समवाप्य सापि ॥
धर्मामृतं भूरि पपौ प्रियाणां सदानुकूला हि भवंति नार्यः ॥ ६७॥
परा संपत्कांतेर्विनयजलराशेर्विधुकला ॥
वयस्या लज्जाया जयकदलिका पुष्पधनुषः ॥
नतांगी तं वश्यं पतिमकृत सा साधुचरिता ॥
न किं वा संधत्ते भुवि गुणगणानामुपचयः ॥६८॥

* इत्यसगकविकृतौ श्रीवर्द्धमानचरिते महाकाव्ये नंदनसंभवो नाम प्रथमः सर्गः । *

६६ सत्पुरुषांचा नायक व जितेंद्रिय अशा या राजपुत्रानें पित्याच्या आग्रहानें प्रियंकरा नांवाच्या एका राजकन्येशीं लग्न लाविलें. लग्न करून घेण्यांत स्वतः त्याला तितकी उत्सुकता वाटत नव्हती. या प्रियंकरा राजकन्येनें आपल्या सौंदर्यानें व ऐश्वर्यानें देवांगनांना जिंकिले होतें. व ही कामदेवाच्या जाळ्याप्रमाणें होती. ६७ या प्रियंकरा युवराज्ञीनेंही युवराजाच्या कृपेनें सम्यक्त्वासहित व्रतें धारण केलीं. व त्याच्यापासून हिला पुष्कळ धर्मामृत प्यावयास मिळूं लागलें. बरोबर आहे कीं ज्या पतिव्रता स्त्रिया असतात त्या नेहमी पतीशीं अनुकूल असतात. ६८ ही प्रियंकरा कांतिचा उत्कृष्ट खजिना होती. विनयरूपी समुद्राला भरती आणण्यास चंद्राच्या कलेप्रमाणे होती. ही लज्जेची सखी व मदनाची जयपताका होती. पति-

व्रतच्या आचारानें युक्त अशा या नतांगीनें युवराजाला वश केलें. बरोबरच आहे कीं गुणसमूहांची उन्नति कोणतें कार्य करूं शकत नाहीं.

**तात्पर्य:**—ज्याच्या ठिकाणीं सर्व सद्गुण प्राप्त झाले आहेत त्याला सर्व वश होतात. प्रियंकरेला युवराज वश झाला कारण तिच्या ठिकाणी तसेंच उत्तम सद्गुण होते.

या प्रमाणें श्री असगकविकृत वर्धमानचारित महाकाव्यांतील नंदन राजपुत्राच्या उत्पत्तीचे वर्णन करणारा पहिला सर्ग समाप्त झाला. ॥ १ ॥

## द्वितीयः सर्गः ।

अथात्मजे विश्वगुणैकभाजने नरेश्वरो राज्यधुरां निधाय सः ॥
तुतोष निश्चिंततया प्रियासखः पितुः सुपुत्रो ह्यनुकूलवृत्तिः ॥१॥
कदाचिदुत्तुंगमृगेंद्रविष्टरे निविष्टमालोक्य तमीश्वरं विशां ॥
ननंद लोकः सकलः सराजकः सुखाय केषां न निरीक्षणं प्रभोः ॥२॥
असक्तमिच्छाधिकदानसंपदा मनोरथानर्थिजनस्य पूरयन् ॥
अवाप साम्यं सुमनोभिरन्वितो महीपतिर्जंगमकल्पभूरुहः ॥ ३ ॥
संतां प्रियः कांचनकूटकोटिषु ज्वलज्जपालोहितरत्नरश्मिभिः ॥
जिनालयान्पल्लवितांबरद्रुमानकारयद्धर्मधना हि साधवः ॥ ४ ॥
कपोलमूलस्तुतदानलोलुपद्विरेफमालासितवर्णचामरैः ॥
स पिप्रिये प्राभृतमत्तदंतिभिः प्रिया न केषां भुवि भूरिदानिनः ॥५॥
करान्गृहीत्वा परचक्रभूभृताममात्यमुख्यान्समुपागतान्स्वयं ॥
अनामयप्रश्नपुरःसरं विभुः स संबभाषे प्रभवो हि वत्सलाः ॥ ६ ॥
× चतुःपयोराशिपयोधरश्रियं नियम्य रक्षायतरश्मिना घनं ॥
उपस्नुतां सन्नयवत्सलालनैर्दुदोह गां रत्नपयांसि गोपकः ॥ ७ ॥

१ यानंतर संपूर्ण सद्गुणांना अद्वितीय आश्रय असलेल्या आपल्या नंदन नांवाच्या मुलावर नंदिवर्धन राजा सर्व राज्यभार टाकून आपण निश्चिंत होऊन आपल्या पत्नीसहित—वीरवती राणीसहित आनंदानें राहू लागला. बरोबरच आहे की, जो सुपुत्र असतो तो नेहमीं आपल्या पित्याला अनुकूलच असतो. अर्थात् आपल्या अनुकूल आचरणानें बापाच्या अंतःकरणाला आनंदित करीत असतो. २ कोणे एके वेळीं नंदिवर्धन राजाला उंच अशा सिंहासनावर बसलेला पाहून इतर राजगणासह सर्व प्रजाजनांना फार आनंद झाला. बरोबरच आहे कीं, आपल्या राजाचें दर्शन कोणाला सुखदायक होत नाहीं बरें ? ३ नेहमीं याचक जनांना त्यांच्या इच्छेपेक्षां अधिक संपत्ति देऊन त्यांच्या मनोरथांना तृप्त करणारा हा नंदिवर्धन राजा देवासारखे असलेल्या विद्वानांनीं वेष्टित होऊन चालत्या बोलत्या कल्पवृक्षाच्या तुलनेला पावला.

---

× पयोधरीभूतचतुःसमुद्रां जुगोप गोरूपधरामिवोर्वीम् ॥

रघुवंशकाव्ये द्वितीयसर्गे ।

**भावार्थ:**—कल्पवृक्ष देवांनीं वेष्टित असतो तसा हा राजा नेहमीं विद्वानांनीं वेढलेला होता. कल्पवृक्ष इच्छिलेला पदार्थच देतो पण हा राजा इच्छेपेक्षांही अधिक दान देत असे. कल्पवृक्ष स्थावर असतो व हा जंगम होता एवढेंच यामध्यें अंतर होतें.

४ सत्पुरुषांना प्रिय असलेल्या या राजानें अनेक जिनमंदिरें बांधविलीं होतीं. त्यांचीं शिखरें सोन्यानें बनविलेलीं असून त्यांत जास्वंदीच्या फुलाप्रमाणें लाल व चमकणारी पद्मरागरत्नें बसविलीं होतीं. त्यांच्या लाल भडक किरणांनीं तीं जिनमंदिरें आकाशांत लाल पानांनीं युक्त असे हे कल्पवृक्षच आहेत काय अशीं भासत असत. हीं जिनमंदिरें निर्माण करविण्यांत राजानें फार पैसे खर्च केले होते. बरोबरच आहे कीं, धार्मिक लोक धर्मालाच धन समजतात. धनाला धन समजत नाहींत. अर्थात् धनापेक्षां त्यांना धर्मच अधिक प्रिय असतो. ५ ज्यांच्या गंडस्थळाच्या मूलभागापासून मद वाहात असल्यामुळें ज्यांच्यावर भुंग्याचे थवे बसले आहेत व ज्यांच्या कानाजवळ पांढऱ्या चवऱ्या बांधलेल्या आहेत अशा नजराणा ह्मणून राजांनीं अर्पण केलेल्या हत्तींना पाहून या राजाला फार आनंद होत असे. बरोबरच आहे कीं, जे मोठे दानी आहेत ते कोणास वरें आवडत नाहींत. येथें दानी शद्वाचे दोन अर्थ आहेत. दानी ह्मणजे हत्ती. दान ह्मणजे मदजल तें ज्यांना आहे अर्थात ज्यांच्या गंडस्थळांतून मद वाहतो ते दानी होत. व दुसरा अर्थ दानी—दान देणारे. ६ स्वतः कर घेऊन आलेल्या परदेशी राजांच्या मुख्य प्रधान मंडळीस हा राजा कुशल प्रश्नपूर्वक मधुर भाषण करीत असे. त्यांना मर्मस्थळीं टोंचणारें भाषण बोलत नसे. बरोबरच आहे कीं, जे मोठे लोक असतात ते नेहमीं आपल्यापेक्षां लहान असलेल्यावर प्रीति करीत असतात. ७ चार समुद्र हेच जिचे स्तन आहेत, रक्षण करणें हीच कोणी लांब दोरी तिनें जिला बांधून जिचें नियमन केलें आहे, उत्तम नीतिरूपी वासराच्या लालन पालनानें जिला पान्हा फुटला आहे अशा या पृथ्वीरूपी गाईपासून या राजारूपी गवळ्यानें नाना प्रकारचीं रत्नेंरूपी दूध काढिलें. या श्लोकांतील गोपक या शद्वाचे दोन अर्थ आहेत. गो–पृथ्वी व गाय पक–पालन करणारा अर्थात् राजा व गवळी.

स पक्ष्मलाक्षं ललितभ्रु सस्मयं स्मिताभिरामाधरपल्लवं मिथः ॥
प्रियाननं नोपरराम वीक्षितुं मनोहरे वस्तुनि को न रज्यते ॥ ८ ॥
इति त्रिवर्गं मतिमानुपार्जयन् यथायथं प्राज्यसुखैकसाधनं ॥
अनेकसंख्यागनयन्स वत्सरान्विमत्सरः साधुषु नंदिवर्धनः ॥ ९ ॥
अथैकदा हर्म्यतले समुत्थिते स्थितः क्षितीशः प्रियया तया युतः ॥

नभःपयोधेरिव फेनमंडलं विचित्रकूटं धवलाभ्रमैक्षत ॥ १० ॥
सविस्मयं पश्यत एव तत्क्षणाददभ्रमभ्रं गगने व्यलीयत ॥
वपुर्वयोजीवितरूपसंपदामनित्यतां तस्य निदर्शयद्यथा ॥ ११ ॥
अभूत्तदाभ्रस्य विनाशविभ्रमाद्विरक्तचित्तो निजराज्यसंसदि ॥
क्षणार्द्धरम्या तरला बहुच्छला समस्तवस्तुस्थितिरित्वेत्य सः ॥१२॥
अचिंतयच्चैवमनात्मवस्तुषु प्रसक्तिमभ्येत्युपभोगतृष्णया ॥
दुरंतदुःखे भवखड्गपंजरे तयैव जंतुः सततं नियम्यते ॥ १३ ॥
इदं च पुंसां भवकोटिदुर्लभं नृजन्म जन्मांबुनिधौ निमज्जताम् ॥
सुदुर्लभा देशकुलादयस्तथा भवंति तेभ्यो धिषणा हितैषिणी ॥१४॥

८ राणीचे डोळे दाट पापण्यांनीं युक्त होते. व भुवया सुंदर होत्या. डोळे कटाक्ष-युक्त असल्यामुळें तिची मनांतील कामाकुलता व्यक्त होत होती. मंद हंसण्यानें कोंवळ्या पानाप्रमाणे लाल असे तिचे ओठ मोठे मनोहर दिसत होते. या सर्व सामग्रीनें युक्त असलेलें राणीचें तोंड एकांत ठिकाणीं वारंवार पाहून देखील राजाची तृप्ति होत नसे. बरोबरच आहे कीं, चित्ताकर्षक वस्तूमध्यें कोण बरें आसक्त होत नाहीं. ९ सांसारिक उत्तम सुखांचें साधन अशा धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांची यथायोग्य प्राप्ति करून घेऊन या बुद्धिमान व सत्पुरुषा-विषयीं मनांत मत्सरभाव न धरणाऱ्या राजानें पुष्कळ वर्षें आनंदांत घालविलीं. १० एके दिवशीं फार उंच अशा आपल्या वाड्याच्या गच्चीवर वीरवती राणीसह राजा बसला असतां त्याला आकाशरूपी समुद्राचा जणु हा फेसांचा समूहच असा नानाप्रकारच्या शिखरांनीं युक्त असलेला पांढरा मेघ दिसला. ११ राजा आश्चर्यचकित होऊन पाहात असतां तो मोठा मेघ लौकरच आकाशांत वितळून नाहींसा झाला. तो नाहींसा होत असतांना शरीर, तारुण्य, जगणें, सौंदर्य, व संपत्ती हे पदार्थ अनित्य आहेत असा जणू त्यानें उपदेश केला असे राजाला वाटलें. १२ त्या मेघाचा नाश झालेला पाहून सर्व वस्तूंची स्थिती थोडा वेळपर्यंत रमणीय दिसते परंतु त्यांचा नाश फार लौकर होतो. या वस्तूंची प्राप्ति करून घेताना जीवाला पुष्कळ त्रासही भोगावा लागतो असा विचार करून राजा आपल्या राज्यसंपत्तीविषयीं विरक्त झाला. १३ आत्म्यापासून वास्तविक भिन्न असलेल्या वस्तूमध्यें हा आत्मा उपभोग घेण्याच्या इच्छेनें आसक्त होतो. व त्यामुळेंच अत्यंत दुःख देणाऱ्या या संसाररूपी तरवारीच्या पिंजऱ्यामध्यें हा कायमचा अडकतो. १४ संसाररूपी समुद्रांत—जन्ममरणरूपी समुद्रांत बुडत असणाऱ्या या जीवांना कोट्यवधि जन्मांतही प्राप्त न होणारा असा मनुष्यजन्म

कदाचित् प्राप्त होतो. इतका तो दुर्लभ आहे. तो प्राप्त झाला तरी उत्तम देश, उत्तम कुल, सुंदर शरीर, आरोग्य, जिनधर्म यांची प्राप्ति होणें फार कठिण आहे. या सर्वांची प्राप्ति होण्यापेक्षांही आत्मकल्याण करणारी बुद्धि जीवाला प्राप्त होणें फार कठिण आहे.

**भावार्थः** – समुद्रामध्यें आपल्या हातांतून पडलेलें रत्न मिळणें जितकें कठिण आहे तितकेंच मनुष्यजन्म मिळणें कठिण आहे. मनुष्यजन्माची प्राप्ति झाली तरी योग्य—धर्माचरण करण्यास योग्य—अशा क्षेत्रांत जन्म होणे हे धनिकामध्यें उदार दानी मनुष्य मिळण्याप्रमाणे कठिण आहे. म्लेच्छ क्षेत्रांत उत्पत्ति झाली तर हा आत्मा चारित्र धारण करण्यास अयोग्य होतो. विद्वान् असून परोपकारिता असणें हें जसें दुर्लभ आहे. तसें उत्तम कुलांत जन्मणे दुर्लभ होय. नीच कुलांत जन्म झाल्यास संयमदीक्षा धारण करण्यास तो योग्य होत नाही. या प्रमाणे रत्नत्राय प्राप्त करून घेण्यास योग्य सामग्री उत्तरोत्तर दुर्लभ आहे. ही सर्व सामग्री मिळाली तरी आत्मकल्याण करणारी बुद्धि अर्थात् रत्नत्रयाची प्राप्ति होणे हे सर्व गुण प्राप्त झाले तरी कृतज्ञता गुण मिळणे जसे कठिण आहे. त्याप्रमाणे कठिण आहे. यास्तव जगांत रत्नत्रय प्राप्त होणें हें सर्वांत अतिशय कठिण आहे.

अनादिमिथ्यात्वगदातुरात्मने हितापि सद्दृष्टिसुधा न रोचते ॥
अनाप्ततत्वैकरुचिः स केवलं कृतांतरक्षोवदनं विगाहते ॥ १५ ॥

अदूरभव्यो विषयेषु निःस्पृहो विमुच्य सर्वं द्विविधं परिग्रहम् ॥
उपात्तरत्नत्रयभूरिभूषणो जिनेंद्रदीक्षां भजते विमुक्तये ॥ १६ ॥

इतीदमात्मैकहितं सुनिश्चितं ॥
ध्रुवं विजानन्नपि तृष्णया यया ॥
खलीकृतस्तामधुना क्षिपाम्यहं ॥
समूलमुन्मूल्य लतामिव द्विपः ॥ १७ ॥

इति प्रभुःप्रव्रजनाभिलाषुकस्ततेऽवतीर्योन्नतहर्म्यपृष्ठतः ॥
सभागृहे पूर्वनिविष्टविष्टरे क्षणं निविश्यैवमुवाच नंदनं ॥ १८ ॥

त्वमेव वत्स ! प्रतिपन्नवत्सलः पदे विभूतेरसि सर्वभूभुजां ॥
निजानुरक्तप्रकृतिर्दिनश्रियो नवोदयं भास्करमंतरेण कः ॥ १९ ॥

प्रजानुरागं सततं वितन्वतः समुन्नतिं मूलजनस्य कुर्वतः ॥
परेषु विश्वासमगच्छतः स्फुटं मयोपदेश्यं किमितस्तवापरं ॥ २० ॥

अतो निधाय त्वयि राज्यमूर्जितं विनिर्जिताराविदमन्यदुर्धरं ॥
तपोवनं पावनमभ्यपेक्षतस्तनूज ! मा गाः प्रतिकूलतां मम ॥ २१ ॥

१५ हा जीव अनादिकालापासून मिथ्यात्वरूपी रोगानें पीडित झाला असल्यामुळे सम्यग्दर्शनरूपी अमृत हितकारक असूनही याला आवडेनासें झालें आहे. श्रीजिनेश्वरांनीं सांगितलेल्या जीवादिक तत्वामध्यें हा आत्मा श्रद्धान ठेवित नाहीं याला इतर मिथ्यातत्वामध्यें श्रद्धान करणें आवडते. अर्थात् श्रीजिनानीं सांगितलेल्या आत्मस्वरूपांत श्रद्धान करणें सोडून या जीवाने संसारवर्धक कुतत्वामध्यें श्रद्धान केल्यामुळे याला यमरूपी राक्षसाच्या मुखांत नेहमीं प्रवेश करावा लागत आहे. अर्थात् याचें जन्म मरण सुटेनासें झालें आहे. १६ जो निकट भव्य आहे अर्थात् ज्याला थोडक्याच भवांनीं मोक्षप्राप्ति होणार आहे असा हा आत्मा स्त्री वगैरे भोग्य पदार्थाविषयीं पूर्ण निरिच्छ बनतो. दोन प्रकारच्या सर्व परिग्रहांचा—धनधान्यादि बाह्य व हास्य, रति वगैरे नउ नोकषाय, मिथ्यात्व आणि क्रोधादिक कषाय या अंतरंग परिग्रहांचा पूर्ण त्याग करितो. रत्नत्रयरूपी अलंकाराचा स्वीकार करितो व मोक्षलाभ व्हावा म्हणून जिनदीक्षा घेतो. १७ आत्महित कसें करून घ्यावें हें मला निश्चयानें माहित असूनही आत्महिताच्या कार्यांत तृष्णेनें अडथळा उत्पन्न केला आहे. यास्तव हत्ती जसा अडथळा उत्पन्न करणाऱ्या वेलीला समूळ उपटून टाकितो त्याप्रमाणें या तृष्णेला मी मूळापासून उपटून तिचा क्षय करीन. १८ या प्रमाणें राजाच्या अंतःकरणांत दीक्षा घेण्याची इच्छा झाली व तो राजवाड्याच्या गच्चीवरून खालीं उतरून सभागृहांत पूर्वींच ठेविलेल्या सिंहासनावर येऊन बसला व नंदन युवराजाला याप्रमाणें बोलला. १९ "हे वत्सा, तूं आश्रितावर प्रेम करणारा आहेस. व सर्व ऐश्वर्याचा आधार आहेस. जसें नवीन उगवलेल्या सूर्याशिवाय दुसरा कोणताही ग्रह दिवसलक्ष्मीला आपल्यावर अनुरक्त करू शकत नाहीं तसें तुझ्या शिवाय सर्व राजेलोकांना कोणीही आपल्यावर अनुरक्त करू शकत नाहीं. २० हे वत्सा, तूं प्रजेला नेहमीं स्वतःविषयीं अतिशय अनुरक्त करीत आहेस. व आपल्या प्रधान, सेना वगैरेची नेहमीं उन्नति करीत आहेस व शत्रूवर तिळमातही विश्वास ठेवीत नाहींस यास्तव मी तुला या गोष्टी विषयीं अधिक काय सांगू ? ते न सांगतांच योग्य रीतीनें वागत आहेस. २१ यास्तव ज्यानें शत्रूंना जिंकिलें आहे अशा तुजवर इतर वाहूं शकणार नाहींत असा हा राज्यभार मी ठेवीत आहे. हे वत्सा ! मला पवित्र अशा तपोवनास जाण्याची—जिनदीक्षा घेण्याची इच्छा झाली आहे. यास्तव तूं या गोष्टींत माझ्या प्रतिकूल होऊं नकोस

इतीरितां भूपतिना मुमुक्षुणा निशम्य वाचं वचने विचक्षणः ॥
क्षणं विचिन्त्यैवमुवाच नंदनः प्रणामपूर्वं प्रणतारिमंडलः ॥ २२ ॥

अनात्मनीनेति विचार्य धीमता नरेंद्रलक्ष्मीरियमुज्झ्यते त्वया ॥
असंमतां ते वद तात! तामहं कथं प्रपद्येऽद्य विरोधिनीं मम ॥२३॥
अवैषि किं त्वत्क्रमसेवया विना मुहूर्तमप्यासितुमक्षमं न मां ॥
स्वजन्महेतावरविंदबांधवे गतेऽपि किं तिष्ठति वासरः क्षणम् ॥२४॥
यथा पथि श्रेयसि वर्तते सुतस्तथा पिता शास्ति तमात्मवत्सलम् ॥
त्वयोपदिष्टो नरकांधकूपकप्रवेशमार्गोऽयमनर्गलः कथं ॥ २५ ॥
प्रणम्य याचेऽहममोघदायकं भवन्तमाशु प्रणतार्त्तिहारिणं ॥
त्वया समं निष्क्रमणं ममापरं न कार्यमार्येति सजोषमास्थितः॥२६॥
इति स्थितं निष्क्रमणैकनिश्चये सुतं विनिश्चित्य विपश्चितां वरः ॥
अवोचदेवं द्विजमौक्तिकावलीस्फुरत्प्रभाराजिविराजिताधरः ॥२७॥
त्वया विना राज्यमपेतनायकं कुलक्रमायातमिदं विनश्यति ॥
न विद्यते चेद्यदि गोत्रसंततिः किमात्मजेभ्यः स्पृहयन्ति साधवः॥२८॥
पितुर्वचो यद्यपि साध्वसाधु वा तदेव कृत्यं तनयस्य नापरं ॥
इति स्थितां नीतिमवेयुषोऽपि ते किमन्यथा संप्रति वर्तते मतिः॥२९॥
सुतं गृहीत्वा व्रजता तपोवनं कुलस्थितिस्तेन विनाशितेत्ययं ॥
जनापवादो मम पुत्र! जायते ततो गृहे तिष्ठ दिनानि कानिचित्॥३०॥
इतीरयित्वा तनयस्य मूर्धनि स्वयं पिता स्वं मुकुटं न्यविक्षत ॥
विचित्ररत्नस्फुरदार्चिषां चयैर्विनिर्मिताखंडलचापमंडलं ॥ ३१ ॥

२२ याप्रमाणें मुमुक्षु अशा या नंदिवर्धन राजाने केलेले भाषण ऐकून ज्यानें शत्रुमंडलाला नम्र केले आहे व जो बोलण्यांत निपुण आहे अशा नंदन युवराजानें क्षणपर्यंत विचार करून नमस्कारपूर्वक पुढें लिहिल्याप्रमाणें भाषण केलें. "अहो बाबा, ही राज्यलक्ष्मी आत्म्याचें हित करणारी नाहीं असें समजून आपण तिचा त्याग करण्यास उद्युक्त झालात. आपणास ती अयोग्य वाटत आहे. मग मलाही ती जर तशीच वाटत आहे तर तिचा मी आज कसा बरें स्वीकार करूं? सांगा. २४ आपल्या चरणसेवेशिवाय मी एक क्षणपर्यंत तरी राहूं शकेन असें आपणास वाटतें काय? आपल्या जन्माला कारण असलेला सूर्य अस्ताला गेला असतां दिवस त्याच्या मागें एक क्षणभर देखिल राहतो काय? २५ ज्या उपायानें मुलगा कल्याणमार्गांत प्रवृत्त होईल तोच उपाय पिता सांगत असतो. यास्तव

आपला आवडता मुलगा असलेल्या मला नरकरूपी अंधकूपांत टाकून देणारा हा अयोग्य मार्ग कसा सांगता ? २६ अहो बाबा. जे आपणास नमस्कार करितात त्यांचें आपण शीघ्र दुःख दूर करता. जे आपली याचना करितात त्यांना इच्छित पदार्थ देऊन आपण तृप्त करिता. यास्तव हे पूज्य पिताजी, मीही आपल्या बरोबर दीक्षाच घेणार. या शिवाय दुसरें काम मी करणार नाहीं". असे बोलून तो स्तब्ध बसला. २७ आपल्या मुलाचा आपणाबरोबर दीक्षा घेण्याचा दृढनिश्चय पाहून दंतमौक्तिक समूहापासून निघालेल्या कांतिसमूहानें ज्याचा ओठ शोभत आहे असा तो विद्वच्छ्रेष्ठ राजा पुढें लिहिल्याप्रमाणे बोलू लागला. २८ "हे वत्सा, वंशपरंपरेनें चालत आलेलें हें राज्य आज नायकरहित होऊन विनाश पावेल. वंशपरंपरा चालू ठेवणें अयोग्य असते तर सत्पुरुषांनीं पुत्रांची इच्छाच केली नसती. २९ बापाचें वचन अर्थात् आज्ञा योग्य असो अथवा अयोग्य असो मुलांनीं त्याचें पालन करणें हें त्यांचे कर्तव्य आहे. अशी नीति तुला माहीत आहे. असें असतांही या वेळीं तुझी बुद्धि अशी उलटी कशी झाली? बाळा! तपोवनाला जाणाऱ्या राजानें आपल्या मुलालाही आपल्या बरोबर नेलें व आपली कुलपरंपरा नष्ट करून टाकिली अशी अकीर्ती माझी चोहीकडे प्रसिद्ध होईल यास्तव कांही दिवसपर्यंत तूं घरामध्येंच राहून गृहस्थधर्माचें पालन कर. ३१ याप्रमाणें भाषण करून राजानें आपल्या मुलाच्या डोक्यावर आपला राजमुकुट ठेविला. त्यावेळीं मुकुटांत असलेल्या नानाप्रकारच्या रत्नांच्या कांतिसमूहानें आकाशामध्यें इंद्रधनुष्याची शोभा उत्पन्न झाली होती.

तथोत्तमांगस्थितहस्तकुड्मलानुवाच भूपानिति मंत्रिभिः समं ॥
यता मयायं भवतां महात्मनां करे करन्यास इवार्पितः सुतः॥३२॥
कलत्रमित्रास्थिरबंधुबांधवान्यथावदापृच्छ्य विनिर्ययौ गृहात् ॥
क्षणं तदाक्रंदरवानुसारिणीं श्रियं च दृष्टिं च पुरो निवेशयन्॥३३॥
नृपैः समं पंचशतैः स पंचमीं गतिं यियासुः पिहितास्रवांतिके॥
प्रपद्य दीक्षामनवद्यचेष्टितामचेष्टताशेषहतकर्मणां जये ॥ ३४ ॥
यते गुरौ श्रेयसि तद्वियोगजं विषादमासाद्य ततास नंदनः ॥
तथावगच्छन्नपि संसृतेःस्थितिं सतां वियोगे हि बुधोऽपि खिद्यते॥३५॥
अमात्यसामंतसनाभिसंहतिः पितुर्वियोगव्यथितं व्यनोदयत् ॥
कथाभिरन्यैरपि तं महीपतिं महीयसां को न सुखाय चेष्टते॥३६॥
उदाजहारेति सभा नमीश्वरं विषादमुन्मुच्य नरेंद्र ! संसृति ॥

प्रजाः ससाश्वासय नाथ! वर्जिताः शुचो वशः कापुरुषो न धीरधीः ३७
पुरेव सर्वः क्षितिपाल! वासरक्रियाकलापः क्रियतां यथेच्छया ॥
इति प्रभौ शोकवशे त्वयि स्थिते सचेतनाः के सुखमासते परे ।३८।
पतिं विशासित्यनुशिष्य सा सभा विसर्जिता तेन गृहानुपाययौ ॥
विषादमुन्मुच्य चकार नंदनः क्रियां यथोक्तां सकलार्थिनंदनः॥३९॥
अहोभिरल्पैरथ नूतनेश्वरो धियैव खेदेन विना गरीयसा ॥
गुणानुरक्तामकरोद्धरावधूं भयावनम्रामपि शत्रुसंहतिम् ॥ ४० ॥
तदद्भुतं नो तमुपेत्य भूभृतं चलापि लक्ष्मीस्त्वचलत्वमाप यत् ॥
इदं तु चित्रं सकले महीतले स्थिरापि कीर्तिर्भ्रमतीति सन्ततं ।४१।

३२ त्यावेळीं नमस्कार करण्यासाठीं आपले हात कमलाच्या कळीसारखे करून ज्यांनीं स्वमस्तकावर ठेविले आहेत अशा राजांना नंदिवर्धन राजानें मंत्र्यासह याप्रमाणे सांगितलेः—"हे नृप हो! आपण सज्जन आहात. आपल्या हातांत ही माझी पुत्ररूपी ठेव मी ठेऊन आज दीक्षा घेण्यासाठी जाणार आहे. करितां आपण या ठेवीचें चांगलें रक्षण करा." ३३ एक क्षणपर्यंत रडण्याच्या स्वराकडे वळलेल्या आपल्या बुद्धीला व दृष्टीला आपल्या ध्येयाकडे लाऊन मन दृढ करून राजानें पत्नी, मित्र, आपल्या वंशांतील भाऊ, चुलता वगैरे मंडळी आणि बांधव, सोयरे मंडळी यांची परवानगी घेऊन घराच्या बाहेर प्रयाण केलें. ३४ पचमगति मोक्षास जाण्याची इच्छा ज्यास आहे अशा या राजानें पांचशें अन्य राजासह पिहितास्रव मुनिजवळ दीक्षा घेतली व ज्ञानावरणादिक आठ कर्मांचा नाश करण्यासाठीं तो निर्दोष महाव्रतादि २८ मूलगुण, ८४ लाख उत्तर गुणांचें पालन करूं लागला. ३५ आत्मकल्याणासाठीं आपले वडील निघून गेले म्हणून नंदन राजाला त्यांच्या विरहापासून फार खिन्नता वाटू लागली. तो मनांत फार कष्टी झाला. जरी त्याला संसाराचें स्वरूप पूर्ण माहीत होतें तरी पित्याच्या अमूल्य गुणांचें वारंवार स्मरण होत असल्यामुळे त्याला फार दुःख झाले. बरोबरच आहे कीं, सज्जनांचा वियोग झाला असतां विद्वानासही दुःख वाटत असतेच. ३६ अमात्य, सरदार व बंधु यांनीं पित्याच्या वियोगाने खिन्न झालेल्या राजाला अनेक तऱ्हेच्या कथा सांगून त्याचा शोक कमी करण्याचा प्रयत्न केला. बरोबरच आहे कीं, महापुरुषांच्या सुखासाठीं कोण बरे प्रयत्न करीत नाहीं? मोठ्या लोकांना सुख व्हावे म्हणून सर्वच झटत असतात. अमात्यादिकांच्या सभेनें विनंती केली कीं, "महाराज! आतां आपण शोक सोडून द्या. या नाथरहित झालेल्या प्रजाजनांना धीर द्या. महाराज! अधीर प्रकृतीचे लोक शोकवश होतात. आपणासारख्या धीर बुद्धीच्या लोकांनीं शोकवश होऊं नये. ३८ महाराज! आतां आपण पूर्वीप्रमाणेच

आपल्या इच्छेनें सर्व राज्यकारभार पाहणे वगैरे दैनिक कर्तव्ये करण्यास सुरु करा. हे नृपेश्वरा! आपण असें शोकयुक्त होऊन बसल्यावर कोणत्या सचेतन प्राण्याला सुखानें राहतां येईल बरें?" ३९ याप्रमाणें मनुष्याचा नाथ असलेल्या या राजाला उपदेश केल्यानंतर राजानें सभा विसर्जित केली. तेव्हां सर्व लोक आपल्या घरीं गेले. सर्व याचकांच्या इच्छा तृप्त करणाऱ्या नंदन राजानें शोकत्याग केला व पूर्वींप्रमाणें राजकार्यें करण्याला प्रारंभ केला. थोड्याच दिवसांनीं या नवीन राजानें मोठ्या खेदावांचून—अनायासें आपल्या बुद्धि चातुर्यानें सर्व पृथ्वीरूपी स्त्रीला आपल्या गुणावर लुब्ध केलें व शत्रूसमूहासही भीति दाखऊन नम्र केलें. ४० या राजाचा आश्रय मिळाल्यामुळें चंचल अशी ही राजलक्ष्मी निश्चल झाली याच्यांत आम्हांस कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. परंतु या राजाची स्थिर अशी ही कीर्ति चोहिकडे भटकू लागली. सगळ्या जगांत संचार करूं लागली. हें मात्र फार मोठें आश्चर्य आहे. राजाची कीर्ति सर्वत्र पसरली असा येथें अभिप्राय समजावा.

अनूनसत्वेन विमत्सरात्मना गुणैः शरच्चंद्रमरीचिहारिभिः ॥
न केवलं तेन सनाभिमंडलं प्रसाधितं शत्रुकुलं च लीलया ॥ ४२ ॥
इति स्वशक्तित्रयसारसंपदा क्षितीश्वरे कल्पलतीकृते क्षितौ ॥
दिने दिने राज्यसुखं वितन्वति न्यधत्त गर्भं प्रमदाय तत्प्रिया ॥४३॥
असूत कालेन ततः सुतं सती प्रियंकरा प्रीतिकरं महीपतेः ॥
अभिख्यया नंद इतीह विश्रुतं मनोहरं चूतलतेव पल्लवं ॥४४॥
विवर्धयन् ज्ञातिकुमुद्वतीमुदं प्रसारयन्नुज्ज्वलकांतिचंद्रिकां ॥
कलाकलापाधिगमाय केवलं दिने दिनेऽवर्धत बालचंद्रमाः ॥ ४५॥
अथोच्छ्वसन्नूतनपुष्पपल्लवानुपायनीकृत्य तमीश्वरं मुदा ॥
दिदृक्षयागत्य सुदूरतो मधुः परिश्रमं नेतुमिवावसद्वनं ॥४६॥
पुराणपत्राण्यपनीय दूरतो विधूननैर्दक्षिणमातरिश्वनः ॥
अलंचकारांकुरकोरकादिभिर्वनं मधुर्मत्तमधुव्रताकुलं ॥ ४७ ॥
अपीपदुद्यन्मुकुलांकुरांकितं परीत्य चूतं भ्रमराः सिषेविरे ॥
वदान्यमेष्यद्धनसंपदां पदं सुदक्षिणं बंधुमिवार्थिबांधवाः ॥ ४८ ॥
निरंतरं कुड्मलकोरकोत्करान्स्वमूलतो बिभ्रदशोकपादपः ॥
मृगेक्षणानां चरणांबुजाहतः प्रहृष्टरोमेव जनैरदृश्यत ॥ ४९ ॥
स्वभुक्तशेषं विरहार्दितात्मनां निकृत्य मांसं मदनोग्ररक्षसा ॥
पलाशशाखिप्रसवच्छलेन वा निरंतरं शोषयितुं न्यधारयत् ॥५०॥

४२ नंदनराजाचें सामर्थ्य पुष्कळ होतें. गुणांचा चाहता असल्यामुळें याच्या ठिकाणीं मत्सरभाव नव्हता. यानें शरदृतूच्या चंद्रकिरणाप्रमाणें मनोहर अशा आपल्या गुणांनीं फक्त आपल्या बंधुवर्गांनाच लीलेनें प्रसाधित केलें—अलंकृत केलें असें नाहीं:तर शत्रुसमूहासही प्रसाधित केलें अर्थात् जिंकिलें. ४४ प्रभुशक्ति—सर्वांवर दरारा बसविणें, मंत्रशक्ति—आपले विचार गुप्त ठेवून अन्यराजांचे विचार जाणून घेणें, व उत्साह शक्ति—सैन्याची चांगली व्यवस्था ठेऊन राज्य वाढविण्याची इच्छा असणें, अशा तीन शक्तिरूपी उत्कृष्ट संपत्तीनें या राजानें पृथ्वीला कल्पलता बनविलें होतें. अर्थात तिच्यापासून त्याला इच्छित पदार्थांची प्राप्ति अनायासें होत होती. अशा रीतीनें हा राजा राज्य करीत असतां, प्रजाजनांना फार सुख मिळूं लागलें. पुढें कांहीं दिवसांनीं राणी प्रियंकरेनें राजाच्या हर्षाकरितां गर्भ धारण केला. ४४ योग्यवेळीं पतिव्रता प्रियंकरा राणीने आम्रलता जशी कोमल सुंदर पल्लवाला प्रसवते त्याप्रमाणें राजाला आनंददायक अशा मुलाला जन्म दिला. याचें नांव नंद असें ठेविलें गेलें. ४५ जसा द्वितीयेचा चंद्र कमलिनींना आनंदित—प्रफुल्लित करतो, आपली उज्ज्वल कांति चोहोकडे पसरितो व एक एक कला प्राप्त करुन घेण्यासाठीं दररोज वाढतो तसा हा बालकरूपी चंद्र आपल्या बांधवरूपी कमलांना आनंदित करूं लागला. आपली सुंदर देहकांति चोहोकडे फेकूं लागला व नाना प्रकारच्या कलाकौशल्याचें ज्ञान करुन घेण्यासाठीं दररोज वाढूं लागला. ४६ यानंतर एके वेळीं आनंदानें जणू आपल्या प्रभूला—राजाला पाहण्याच्या इच्छेनेंच विकसित झालेलीं फुलें व कोमल पानें नजराणा करण्यासाठीं हुरुन वसंत ऋतु आला. व येऊन आपला थकवा नाहींसा करण्याकरितां राजाच्या बगीचामध्यें त्यानें मुक्काम केला. ४७ वसंत ऋतूनें दक्षिणदिशेच्या वाऱ्याला बोलवून झाडांचीं सर्व जुनीं पानें काढून दूर फेकून दिलीं. बगीचाला नवीन उगवणाऱ्या कळ्यांनीं आणि कोमल पानांनीं अलंकृत केलें व उन्मत्त झालेल्या भुंग्यांच्या झुंडींनीं भरुन टाकिलें. ४८ थोडे थोडे उत्पन्न झालेल्या मोहरांनीं व कोमल पल्लवांनीं आम्रवृक्ष युक्त झालेला पाहून त्याचा भुंग्यांनीं आश्रय केला. बरोबरच आहे कीं, ज्याला विपुल संपत्ति प्राप्त होणारी आहे अशा दानी व सरळ मनुष्याला त्याचे मतलबी बंधु येऊन भेटतातच.
४९ बुंध्यापासून शेंड्यापर्यंत मिटलेल्या कळ्यांच्या समूहांना धारण करणारा अशोक वृक्ष हरिणाप्रमाणें ज्यांचे डोळे आहेत अशा सुंदर स्त्रियांच्या चरणकमलांच्या ताडनानें ज्याला जणु सर्व अंगभर शहारे आले आहेत असा लोकांकडून पाहिला गेला. अर्थात् अशोक वृक्षाला सुंदर स्त्रियांनीं लत्ताप्रहार केला असतां तो फुलतो अशी कविप्रसिद्धि आहे. स्त्रियांच्या पादप्रहारानें आनंदित होऊन

जणू तो रोमांचयुक्त झाला असें कविनें येथें वर्णिलें आहे. ५० मदनरूपी उग्र राक्षसानें विरहानें पीडित झालेल्या स्त्रीपुरुषांचे मांस काढून खाल्लें व उरलेलें मांस पळसाच्या झाडांना आलेल्या फुलांच्या मिषानें वाळविण्यासाठीं येथें दाट पसरून जणु ठेविलें आहे!

**भावार्थ**—वसंत ऋतुमध्यें पळसांच्या झाडाला फुलें येत असतात. त्यांना पाहून विरही लोकांना पीडा होत असते त्यामुळें त्यांचें मांस सुकूं लागलें.

विलासिनीवक्त्रसरोरुहासवप्रपायिनं केसरसेत्य पुष्पितं ॥
तुतोष कूजन्मधुपायिनां कुलं प्रियाः समानव्यसना हि देहिनां॥५१॥
अनर्तयत्कोकिलपुष्करध्वनिः प्रयुक्तभृंगस्वनगीतशोभिते ॥
वनांतरंगे स्मरबंधिनाटकं लताङ्गना दक्षिणवातनर्तकः ॥ ५२ ॥
हिमक्षतां वीक्ष्य समस्तपद्मिनीमिति क्रुधा प्रोज्झितदक्षिणायनः ॥
रविर्विधास्यन्निव तस्य निग्रहं हिमालयस्याभिमुखं न्यवर्तत ॥५३॥
×समन्वितोऽप्युज्ज्वलवर्णशोभया न कर्णिकारो लभते स्म सौरभं।
तथा हि लोके सकले न दृश्यते समाश्रयः कोऽपि समस्तसंपदां।५४।
अनन्यसाधारण सौरभान्वितं दधानमप्युज्ज्वलपुष्पसंपदं ॥
न चंपकं भृंगगणाः सिषेविरे कथं सुगंधे मलिनात्मनां रतिः ॥५५॥
सरोरुहिण्या शिशिरात्यये चिरात्कथं चिदासादितपूर्वसंपदा ॥
वसंतलक्ष्मीसभिवीक्षितुं मुदा महोत्पलं चक्षुरिवोदमील्यत ॥५६ ॥
अदृष्टपूर्वामिव पूर्ववल्लभां विहाय कौंदीलतिकां मधुव्रताः ॥
प्रपेदिरे पुष्पितमाधवीलतां चला हि लोके मधुपायिनां रतिः।५७।
हिमव्यपायाद्विशदां सुखावहां कुमुद्वतीनां कुमुदाकरप्रियः ॥
प्रसारयामास निशासु चंद्रिकां मनोभुवः कीर्तिमिवोर्जितश्रियः ५८
स्वसौरभामोदितसर्वदिङ्मुखं समं मधुश्रीर्मधुपांगनागणैः ॥
स्वयं सिषेवे तिलकं मनोरमं विशेषकीकर्तुमिवेच्छयात्मनः ॥५९॥

× दीप:— [illegible] कर्णिकार [illegible] ॥
[illegible] ॥५४॥ [illegible]

जगद्वशीकर्तुमलं मनोभुवा प्रयोजितं चूर्णमिवौषधैः परैः॥
मनोज्ञगंधास्थितिदक्षिणानिलस्ततान संतानकपुष्पजं रजः ॥ ६०॥
निवृत्य गच्छ स्वगृहं प्रियस्त्रियः सदा स्मरन् किं म्रियसे स्मरान्मुधा ॥
इतीव निर्भर्त्सयति स्म कोकिलः स्वकूजितैरध्वगमध्वचूतगः॥ ६१॥
इति प्रफुल्लद्रुमराजिराजितं वनं समन्ताद्वनपालको भ्रमन् ॥
तदेकदेशे मुनिसूर्जितावधिं प्रतिष्ठितं प्रौष्ठिलमैक्षत प्रभुं ॥ ६२॥
प्रणम्य भक्त्या परया महामुनिं जगाम वेगाद्वनपालकः पुरीं ॥
तदीयमभ्यागमनं महीपतेरभीष्टमावेदयितुं मधोरपि ॥ ६३ ॥

५१ स्त्रियांनिर्नाच्या मुखकमलांतील आसवाचें- मद्याचें पान करून नागके- सर वृक्ष फुलांनीं युक्त झाला असतां, गुंजारव करणारा भुंग्यांचा समुदाय त्याच्या कडे येऊन आनंदित झाला. बरोबरच आहे कीं, समान व्यसन सेवन करणारे जे असतात ते एकमेकांचे प्रियमित्र बनतात. सुंदर स्त्रियांनीं आपल्या तोंडांत दारू धरून तिची चूळ नागकेसर वृक्षावर टाकिली असतां त्याला फुलें येतात. यास्तव हा वृक्ष 'मधुप' आहे. मधुप—दारू पिणारा असा या शब्दाचा अर्थ आहे. व भुंगेही मधुप आहेत अर्थात् तेही फुलांतील मकरंदाचे पान करितात. मकरंदाला मधु म्हणतात यास्तव मधुपत्व उभयतांमध्यें समान असल्यामुळे हे नागकेसर व भुंग परस्परांचे मित्र आहेत असें कवि म्हणतात. ५२ या बगीचाच्या मध्यभागीं कोकिलपक्षी रूपी मृदंगाचा ध्वनि व भुंग्याचा गुंजारव हेंच गायन यांनीं युक्त होऊन दक्षिणेकडून वाहणारा वारा हाच कोणी नर्तक त्यानें शृंगाररसानें युक्त अशा नाटकाची रचना करून वेलीरूपी नृत्य करणाऱ्या स्त्रीला नाचविलें. ५३ संपूर्ण कमलिनींचा वर्फानें—थंडीनें नाश केला आहे असें पाहून रागानें सूर्यानें दक्षिणायनाचा त्याग केला व वर्फाचा जणू सूड उगविण्याकरितां तो हिमालयाच्या सन्मुख जाण्यासाठीं निघाला. अर्थात् वसंत ऋतुमध्यें सूर्य उत्तरायण होतो. ५४ पांगाऱ्यांची फुलें सुंदर रंगानें मनोहर दिसत होती परंतु त्यामध्यें सुगंधाचा लेशही नव्हता. बरोबरच आहे की, सर्व जगामध्ये कोणतीही व्यक्ति सर्व तऱ्हेच्या संप- त्तीचा आश्रय होत नाहीं. अर्थात् कांहीं तरी न्यूनता असतेच. ५५ चंपक वृक्षानें इतरांमध्यें न आढळून येणाऱ्या सुगंधाने युक्त अशी पुष्पसंपत्ति धारण केली होती परंतु त्या वृक्षाचा भुंग्यांनीं आश्रय केला नाही. बरोबरच आहे कीं, जे मलिन असतात ते उत्कृष्ट गंधानें युक्त असलेल्यावर प्रेम करीत नाहींत. ५६ शिशिर ऋतूचा नाश झाल्यावर पुष्कळ दिवसांनीं जिला आपली पूर्व संपत्ती मिळाली आहे अशा कमलाच्या वेलीनें आनंदानें वसंत लक्ष्मीची शोभा पाहण्यासाठीं नेत्रा- प्रमाणें असलेलीं आपलीं कमले प्रगट केली. अर्थात् वसंतऋतूचे वेळीं तळ्यांत

कमळें उत्पन्न झालीं. ५७ जणूं पूर्वी न पाहिलेली अशा प्रथम प्रिय असलेल्या कुंद्लतेला सोडून भुंग्यांनी पुष्पांनी लकडलेल्या मोगऱ्याच्या वेलीचा आश्रय घेतला. बरोबरच आहे जगांत जे मधुपान करणारे आहेत त्यांची प्रीति चंचलच असणार. अर्थात् मकरंद पिऊन उन्मत्त झालेले भुंगे पूर्व वेलीवर कसचे राहू शकतात. जेथ त्यांना मकरंद आढळून येतो तिकडेच ते वळतात. पूर्वी जिचा आश्रय घेतला होता तिला जणूं पूर्वी कधींच पाहिलें नाही इतकें विसरुन जातात. ५८ रात्रीं विकास पावणाऱ्या कमलांना आवडता असलेल्या चंद्राने कमलिनीला सुख देणारी, थंडीचे दिवस अर्थात् शिशिर ऋतु नष्ट झाल्यामुळें अधिक स्वच्छ दिसणारी अशी चंद्रिका सर्वत्र पसरावयास सुरवात केली. रात्री पसरलेली ही चंद्रिका (चंद्रप्रकाश) ज्याची शोभा वाढली आहे अशा मदनाची जणू कीर्तिच आहे असें पाहणाऱ्यांना वाटत असे.

महाप्रतीहारनिवेदितागमः सदःस्थिताय प्रणतो महीभुजे ॥
न्यवेदयद्दर्शितपुष्पपल्लवैर्मधुं वचोभिश्च मुनींद्रमागतं ॥ ६४ ॥
इतो निशम्योपवने स्थितं मुनिं महीभृदुत्थाय मृगेंद्रविष्टरात् ॥
पदानि सप्त प्रतिगम्य तां दिशं ननाम चूडामणिपीडितावनिं ॥६५॥
धनं स्वनद्धाभरणैः समं तदा वितीर्य तस्मै बहु पारितोषिकं ॥
अदापयत्ख्यातमुनींद्रवंदनाप्रयाणभेरीं नगरे नरेश्वरः ॥ ६६ ॥

५९ आपल्या सुगंधानें तिलक वृक्षानें सर्व दिशांची तोंडे सुगंधित केली होती. यास्तव अशा मनोहर तिलकवृक्षाचा वसंतशोभेनें भ्रमरांच्या समूहासह आपली शोभा वाढविण्याच्या इच्छेनें जणु काय आपण होऊन आश्रय केला. अर्थात् कुंकुमतिलकानें जशी सुवासिनी स्त्री अधिक शोभते तशी वसंतशोभा कुंकुमतिलका प्रमाणे असलेल्या या तिलकवृक्षानें शोभू लागली. ६० मनोहर सुगंधाला धारण करणाऱ्या दक्षिणवायूने पारिजात वृक्षाच्या पुष्पांचे रज कण सर्वत्र पसरिले. जणु जगाला अधिक वश करण्यासाठी इतरांच्या द्वारें वशीकरण करणाऱ्या औषधांचा मदनानें प्रयोग केला आहे. ६१ रस्त्यावर असलेल्या आंब्याच्या वृक्षावर बसलेला कोकिल पक्षी 'हे वाटसरा, आतां परतून घरी जा. प्रिय स्त्रीचें स्मरण करुन मदनाच्या तडाख्यांत सांपडून आपले प्राण व्यर्थ कां गमावित आहेस असा अभिप्राय आपल्या शब्दांनीं व्यक्त करुन त्या वाटसराची जणु निर्भर्त्सना करीत आहे. ६२ याप्रमाणें प्रफुल्लित झालेल्या वृक्षांच्या पंक्तींनी शोभणाऱ्या त्या बगीचांत सर्व बाजूनें वनपाल भ्रमण करीत असतां त्याला बगीचाच्या एका प्रदेशांत बसलेले उत्कृष्ट अवधिज्ञानी प्रोष्ठिल नांवाचे महामुनि दिसले.

मुनीश्वरास माळ्यानें मोठ्या भक्तीनें नमस्कार केला व बगीचांत त्यांचे आणि वसंत ऋतूचेंहि आगमन झाले आहे ही गोष्ट नंदनमहाराजास कळविण्याकरितां तो वेगानें शहराकडे गेला. ६४ राजवाड्याकडे आल्यावर द्वारपालानें माळी बाहेर आला आहे असें नंदन महाराजांना कळविलें, तेव्हां त्याला आंत पाठव अशी आज्ञा केल्यावर माळी सभेंत आला आणि त्यानें महाराजांना लवून नमस्कार केला व फुले आणि कोवळीं वृक्षांचीं पानें पुढें ठेऊन वसंत ऋतूचें आगमन झालें आहें हे सुचविलें व शब्दांनीं मुनीश्वरांचें आगमन झाले आहे हें कळविलें. ६५ मुनीश्वरांचें वनामध्यें येणें झालें आहे हें माळ्याचें तोंडून ऐकून नंदनमहाराज सिंहासनावरून उठले व सात पावलें पुढें जाऊन आपल्या चूडामणीचा जमीनीस स्पर्श करून त्यांनीं त्या दिशेला नमस्कार केला.

**तात्पर्य:**—मुनीविषयीं राजाच्या मनांत अत्यंत भक्ति असल्यामुळें त्यानें हा परोक्ष विनयाचा प्रकार केला.

६६ त्यावेळीं राजानें माळ्याला आपल्या अंगावरील पुष्कळ डागिन्यासह धन देऊन आणखी इतर पुष्कळ बक्षीस दिलें व अतिशय प्रसिद्ध अशा मुनीश्वरांचें आगमन झालें आहे यास्तव सर्व प्रजाजनांनी त्यांना वंदन करण्यासाठीं चलावें असें दौंडीच्या द्वारें सूचित केलें. अर्थात शहरांत सर्व ठिकाणी दौंडी देवविली.

**प्रतिस्वनापूरितसर्वदिङ्मुखं तदीयमाकर्ण्य रवं समन्ततः ॥**
**जिनेन्द्रधर्मश्रवणोत्सुकात्मना विनिर्ययौ पौरजनेन तत्क्षणं ॥६७॥**
**पुरःसरैरष्टनवैःपदातिभिः समन्वितं द्वारमुपेत्य वेगतः ॥**
**अभीष्टवाहानधिरुह्य राजकं प्रतीक्षयामास नरेंद्रनिर्गमम् ॥६८॥**

६७ ज्याने सर्व दिशामध्ये प्रतिध्वनि उत्पन्न केला आहे असा तो दौंडीचा शब्द ऐकून जिनेश्वराचा धर्म आतां मुनीश्वराच्या मुखांतून आपणास ऐकावयास मिळेल अशा उत्सुकतेने सर्व नगरवासी लोक तत्काल मुनिदर्शनासाठी निघाले. ६८ आठ नऊ पायदळ शिपायांना पुढे करून व आपणांस आवडतें अशा वाहनावर आरोहण करून अर्थात् हत्ती, घोडा, पालखी इत्यादिकावर वसून राजांचा समूह राजवाड्याच्या द्वाराजवळ वेगाने आला व तो तेथें नंदन महाराजांची निघण्याची वाट पाहू लागला.

गृहीतनेपथ्यविलासविभ्रमं परीतमंतःपुरमंगरक्षकैः ॥
समन्ततो युग्यगतं दिनिर्ययौ तदाज्ञया ज्ञाननिधिं निरीक्षितुम् ।६९।
अर्थैरर्थिमनोरथान्सफलयन्नारुह्य मत्तद्विपं ॥
तत्कालोचितवेषभृत् क्षितिभृतां व्रातैर्वृतः सर्वतः ॥
भूपेंद्रो मुनिवंदनाय परयाऽयासीद्धनं संपदा ॥
हर्म्याग्रस्थितचारुपौरवनितानेत्रोत्पलैरर्चितः॥७०॥

* इत्यसगकृते वर्धमानकाव्ये ंदनाभक्तिगमनो नाम द्वितीयः सर्गः *

६९ अंगरक्षकांनी युक्त असलेला, डागडागिन्यांनीं सजलेला. हावभावांनीं युक्त, असा अंतःपुरांतील स्त्रीसमूह देखिल ज्ञाननिधि अशा मुनिवर्यास पाहण्यासाठीं महाराजांच्या आज्ञेनें रथावर आरोहण करून निघाला. ७० नंदनमहाराज देखिल त्यावेळेला योग्य असा पोषाख करून, याचकांचे मनोरथ धन दानाने तृप्त करून, व मत्त हत्तीवर आरोहण करून मुनिवंदनार्थ निघाले. त्यांच्या सभोवतीं पुष्कळसे राजे चालत होते. अशा मोठ्या थाटमाटाने ते निघाले. ज्यावेळीं महाराज बाहेर निघाले त्यावेळीं वाड्यांच्या गच्चीवर वसलेल्या शहरांतील सुंदर स्त्रियांनीं आपल्या नेत्रकमलांनीं त्यांची पूजा केली अर्थात् त्यांना पाहून त्यांनीं आपणास धन्य मानिलें.

ज्यांत भक्तिपूर्वक मुनिवंदनेसाठी केलेल्या गमनाचें वर्णन आहे असा हा असग महाकवि कृत वर्धमान चरित्रांतील दुसरा सर्ग संपला.

## तृतीयः सर्गः ।

अथ प्राप मुनेस्तस्य निवासात्पावनं वनं ॥
नंदनो नंदनोद्यानसन्निभं शक्रसन्निभः ॥ १ ॥
परिरेभे तमभ्येत्य दूराद्दूरीकृतश्रमः ॥
सुगंधिर्बंधुवन्दूरिदक्षिणं दाक्षिणानिलः ॥ २ ॥
दूरादवातरन्नागान्नगोत्तुंगान्महीपतिः ॥
विनयेन विना का श्रीरित्युक्तं व्यक्तयन्निव ॥ ३ ॥
अपनीतातपत्रादिराजचिन्होऽविशद्वनं ॥
अपि त्यक्त्वा महीपालो भृत्यहस्तावलंबनं ॥ ४ ॥
रक्ताशोकतरोर्मूले निर्मले स्फटिकोपले ॥
आसीनं मुनिमैक्षिष्ट सद्धर्मस्येव मूर्धनि ॥ ५ ॥
किरीटकोटिविन्यस्तहस्तांभोरुहकुड्मलः ॥
त्रिः परीत्य महीपालः प्रणनाम महामुनिम् ॥ ६ ॥
स निविश्य तदाभ्यर्णभूतले भूभृतां विभुः ॥
प्रांजलिः प्रणिपत्यैवमवादीन्मुदितो मुनिम् ॥ ७ ॥
भगवन्भव्यसत्वानां निर्वृतिः किं न जायते ॥
तव निर्धूतमोहस्य दर्शनाद्दर्शनादिव ॥ ८ ॥
अकामेनापि दृष्ट्यैव पूर्णकामः कथं कृतः ॥
नाथ ! त्वयाहमित्यस्माद्विस्मयो नापरो मम ॥ ९ ॥
भव्यसत्वसमूहानामनुग्रहकरादहं ॥
भवतः श्रोतुमिच्छामि भवसंततिमात्मनः ॥ १० ॥
इत्युदाहृत्य वचनं तूष्णीभूते महीभुजे ॥
ततो यतिरुवाचैवं सकलावधिलोचनः ॥ ११ ॥

१ तदनंतर इंद्रतुल्य असे नंदन महाराज त्या मुनीश्वराच्या निवासानें पवित्र बनलेल्या नंदनवनासारख्या बगीचांत गेले. २ सुगंधयुक्त दक्षिणवायूनें दुरूनच

महाराजांचा श्रम नाहींसा केला व जवळ जाऊन उदार अशा महाराजांना बंधूं-प्रमाणें आलिंगन दिलें. महाराज दुरूनच पर्वताप्रमाणे उंच असलेल्या हत्तीवरून खालीं उतरले. स्वतःच्या खालीं उतरण्यानें त्यांनी विनयाच्या अभावीं संपत्ति असूनही तिचा काय उपयोग आहे ही गोष्ट जणु स्पष्ट केली. ४ छत्र, चवऱ्या वगैरे राजचिन्हांचा त्यावेळी त्यांनी त्याग केला. एवढेच नव्हे तर नोकराच्या हाताचाही आधार घेतला नाहीं. अशा रीतीनें त्यांनी उद्यानांत प्रवेश केला. ५ तांबड्या अशोक वृक्षाच्या खालीं निर्मळ स्फटिक मण्याच्या शिलेवर बसलेले मुनि महाराजांना जणुं उत्तम धर्माच्या मस्तकावर बसलेले आहेत असें दिसलें. ६ महाराजांनीं आपले हात कमळाच्या कळीप्रमाणें करून ते मुकुटाच्या अग्रावर ठेविले व तीनदां प्रदक्षिणा करून त्यांनीं मुनीश्वरांना पंचांग नमस्कार केला. ७ राजांचे स्वामी असे ते नंदन महाराज मुनीश्वरांच्या जवळ जमिनीवर बसले व आपले हात जोडून नमस्कार करून पुढे लिहिल्याप्रमाणे मुनीश्वरांना ह्मणाले. ८ हे भगवंता ! आपण मोहाचा नाश केला आहे. सम्यग्दर्शनाप्रमाणें असलेल्या आपल्या दर्शनानें भव्य जीवांना मोक्षप्राप्ति होणार नाही काय? अवश्य होईल. ९ हे नाथ ! आपण अकाम असून देखील मला पूर्णकाम कसे केलें याचे मला आश्चर्य वाटतें. याशिवाय मला दुसरें आश्चर्य वाटत नाही. अर्थात् आपण अकाम अहात ह्मणजे आपण कामविकाराने रहित आहात. व मला आपण पूर्णकाम केलें ह्मणजे माझ्या सर्व इच्छा पूर्ण केल्या. तसेच आपण अकाम ह्मणजे इच्छारहित आहात. पण आपल्या आश्रयानें भक्तांच्या सर्व इच्छा पूर्ण होतात असा या श्लोकाचा अभिप्राय आहे. १० हे नाथ ! आपण सर्व भव्य प्राण्यावर अनुग्रह—उपकार करीत असता ह्मणून आपल्यापासून माझी पूर्वजन्मपरंपरा मी ऐकण्याची इच्छा करीत आहे. ११ याप्रमाणें नंदन महाराज भाषण करून थांबल्यावर सकलावधिज्ञानरूपी डोळा ज्यांना प्राप्त झाला आहे असे प्रौष्ठिल मुनीश्वर पुढें लिहिल्याप्रमाणें बोलूं लागले.

यथावत्कथ्यमानानि मया जन्मांतराणि ते
त्वमेकाग्रधिया व्यक्तं भव्यचूडामणे ! शृणु ॥ १२ ॥
अथेह भारते वास्ये कुलशैलसरोभवा ॥
विद्यते जान्हवी फेनैर्हसन्तीवान्यानिम्नगाः ॥ १३ ॥
अस्त्युत्तरतटे तस्या वराहो नाम पर्वतः ॥
उल्लंघ्य शिखरैर्व्योम द्रष्टुं नाकमिवोच्छ्रितः ॥ १४ ॥

१२ भव्यसमूहांत मस्तकावरील रत्नाप्रमाणें शोभणाऱ्या हे नंदन राजा! मी तुझे पूर्वजन्म जसे झाले आहेत तसें स्पष्टरीतीनें सांगावयास सुरवात करितों. तूं आपली बुद्धि स्थिर करून ऐक १३ या भरत क्षेत्रांत हिमवानपर्वतावरील पद्मनांवाच्या सरोवरापासून गंगा नदी उत्पन्न झाली आहे. ती आपल्या फेसांनीं जणुं अन्य नद्यांना हसतच आहे अशी भासते. या नदीच्या उत्तर किनाऱ्यावर वराह नांवाचा पर्वत आहे. आपल्या शिखरांनीं त्यानें आकाशाचें उल्लंघन केलें असल्यामुळें जणुं स्वर्गाला पाहण्यासाठीं इतका उंच तो गेला असावा असें वाटू लागते.

अभवस्त्वं गिरौ तत्र त्रासितक्षीबकुंजरः ॥
इतः प्रभृति राजेन्द्र ! मृगेंद्रो नवमे भवे ॥ १५ ॥
बालेंदुस्पर्द्धिदंष्ट्राग्रकरालितबृहन्मुखः ॥
दावानलशिखापिंगभंगुरस्कंधकेसरः ॥ १६ ॥
कपिलभ्रूधनुर्भीमो ज्वलदुल्कोपमेक्षणः ॥
पूर्वानुवृत्तलांगूलपल्लवोच्छ्रितध्वजः ॥ १७ ॥
प्रोत्तुंगपूर्वकायेन क्रामन्निव नभस्तलं ॥
सांद्रचंद्रांशुसंपातप्रोल्लसत्कुमुदच्छविः ॥ १८ ॥
तत्सानौ गर्जतो मेघांस्तर्जयन्गर्जितैः क्रुधा ॥
उत्प्लुत्योत्प्लुत्य वेगेन द्रावयन्नखरैः खरैः ॥ १९ ॥
कुंजराननुकुंजाद्रिमनुधावन्प्रधावतः ॥
इति तत्रावसत्स्वैरं चिरकालं गिरौ हरिः ॥ २० ॥
अन्यदा वन्यनागेंद्रं हत्वा सिंहः श्रमातुरः
अध्यशेत गुहावक्रं नगस्याहेतुहासवत् ॥ २१ ॥

१५ हे राजेंद्रा ! या भवापासून मागील नवव्या भवांत तूं त्या पर्वतावर उन्मत्त हत्तींना दे माय धरणी ठाय असें वाटावयास लावणारा सिंह झाला होतास १६ बालचंद्राशीं स्पर्द्धा करणाऱ्या दाढांच्या अग्रभागांनीं त्याचें मोठें तोंड फार भयंकर दिसत होतें. जंगलांत पेटलेल्या अग्नीच्या ज्वालाप्रमाणें पिवळसर व चंचल अशा खांद्यावरच्या केसांनीं तो अधिक भयंकर दिसत असे. त्याच्या धनुष्याकृति व पिंगट भुवयांनीं त्याच्या क्रूर आकृतींत क्रूरपणाची अधिक भर पडली होती.

आकाशांतून पडणाऱ्या उज्ज्वल नक्षत्रसमूहाप्रमाणें त्याचे घारे डोळे होते. त्यानें आपलें शेंपूट पाठीवर वळविलें असल्यामुळें त्याचा शेंडा उंच केलेल्या पताकेप्रमाणें दिसत होता. त्याच्या शरीराचा पूर्वभाग उंच व विशाल असल्यामुळें तो आकाशावर आक्रमण करण्याची जणू इच्छा करीत आहे असें वाटत असे. चंद्राचे दाट किरण पडण्यानें विकसित झालेल्या पांढऱ्या कमलाप्रमाणें त्याच्या शरीराची कांति होती. त्या पर्वतावर मेघ गर्जना करीत असतां क्रोधानें गर्जना करून त्यांची तो निर्भत्सना करीत असे. अर्थात मेघांची गर्जना त्यास सहन होत नसे. त्यामुळें तो वारंवार उडी मारून वेगानें त्यांच्यावर झडप घालीत असे व त्यांना आपल्या तीक्ष्ण नखांच्या अग्रभागांनीं फाडून टाकीत असे. २० हत्ती धांवत सुटून जोंपर्यंत पर्वताच्या कोणत्या तरी लतांनीं व्याप्त झालेल्या जागेंत जाऊन घुसत नसत तोंपर्यंत त्यांचा तो सिंह पाठलाग करीत असे. याप्रमाणें तो सिंह त्या पर्वतावर फार दिवसपर्यंत स्वच्छंदानें राहिला होता. २१ कोणे एके वेळीं एका जंगली मोठ्या हत्तीला मारल्यामुळें त्याला फार श्रम झाले होते म्हणून तो थकून गुहेच्या तोंडीं निजला होता. तेंव्हां तो पर्वताच्या निष्कारण हास्याप्रमाणें भासला.

आयातौ तं तथा सुप्तं पावनौ पवनाध्वना ॥
यती ददृशतुर्नाम्नामितकीर्त्यमितप्रभौ ॥ २२ ॥
अवतीर्य यती मुख्यावंबरादंबरेचरौ ॥
आसातां सप्तपर्णस्य मूले मणिशिलातले ॥ २३ ॥
चारणौ हरिबोधाय सानुकंपावकंपनौ ॥
पेठतुः कलकंठौ तौ प्राज्ञौ प्रज्ञप्तिमूर्जिताम् ॥ २४ ॥
ततस्तद्ध्वनिना ध्वस्तनैद्रतंद्रो मृगाधिपः ॥
विहाय सहजं क्रौर्यमार्यचित्तोऽभवत्क्षणात् ॥ २५ ॥
निर्गत्य स्रस्तकर्णाग्रवालधिस्तद्गुहामुखात् ॥
भीषणाकृतिमुत्सृज्य भेजे सिंहस्तदंतिकं ॥ २६ ॥
अत्यंतशांतभावेन पुरो निविविशे तयोः ॥
सन्मुखं तन्मुखालोकप्रीतिविस्तारितेक्षणः ॥ २७ ॥
आलोक्यामितकीर्तिस्तमित्यवादीदुदारधीः ॥
अहो मृगेंद्र ! सन्मार्गमप्राप्यैवं भवानभूत् ॥ २८ ॥

नात्रैव केवलं नूनं सिंह! सिंहायितं त्वया ॥
दुरंतानादिसंसारकांतारेऽप्यभयात्मना ॥ २९ ॥
अनादिनिधनो जीवः परिणामी स्वकर्मभुक् ॥
कर्ता शरीरमात्रोऽस्ति ज्ञानादिगुणलक्षणः ॥ ३० ॥

२२ आकाशमार्गानें येणारे पवित्र अशा अमितकीर्ति व अमितप्रभ या नांवाच्या दोघा मुनींनीं त्याला गुहेच्या तोंडाजवळ निजलेला पाहिलें. २३ चारणऋद्धि (आकाशांतून जिने गमन करतां येते अशी ऋद्धि) धारक असे ते दोघे मुख्य मुनि आकाशांतून उतरून सप्तपर्ण झाडाच्या खाली रत्नशिलेवर बसले. २४ त्या सिंहाला पाहून त्यांच्या अंतःकरणांत दया उत्पन्न झाली ह्मणून न भीतां ते निपुण मुनि सिंह जागा व्हावा ह्मणून मधुर स्वरानें उत्कृष्ट प्रज्ञप्ति विद्येचें उच्चारण करूं लागले. २५ त्यांचा तो ध्वनि ऐकून सिंहाचें झोंप व आळस नाहींसे झाले. त्यानें आपल्या स्वाभाविक क्रूरपणाला रजा दिली व तत्काल तो आर्यचित्त-कोमल परिणामी बनला. २६ त्यानें आपले शेंपूट कानाच्या अग्रभागावर ठेवून दिलें व आपली भयंकर मुद्रा सोडिली व तो गुहेच्या तोंडापासून निघून त्या दोघा मुनीश्वराजवळ प्राप्त झाला. २७ त्या दोघा मुनींचें तोंड पाहिल्याबरोबर त्याच्या मनांत प्रेम उपजलें. व त्यामुळें त्याचे डोळे विस्तृत झाले तो अत्यंत शांत होऊन व त्यांच्या मुखाकडे आपली निश्चल नजर लाऊन त्यांच्या पुढें बसला. २८ उदार बुद्धिचे धारक अमितकीर्ति नांवाचे मुनि त्याला पाहून पुढें लिहिल्याप्रमाणें बोलले- " हे मृगेंद्रा ! तुला आजपर्यंत सन्मार्ग-जैनधर्म मिळाला नाही ह्मणून तुझी अशी अवस्था झाली आहे. २९ हे सिंहा ! तूं याच जन्मांत ही सिंहाची अवस्था धारण केली आहेस असें नाहीं तर दुःखे देणाऱ्या या अनादिकालापासून चालत आलेल्या संसारांत निर्भय अशा तुजकडून अनेक वेळां सिंहपणा धारण केला गेला आहे. हे सिंहा ! हा जीव अनादि निधन आहे अर्थात् मागें होता व पुढेंही राहील. याचा जीवपणा केव्हांही नष्ट होणार नाहीं. हा आत्मा परिणामी आहे अर्थात् याच्यामध्यें नेहमीं अनेक पर्याय उत्पन्न होतात. हा आत्मा जी पापपुण्यें करितो त्यांचें फल-सुख व दुःख यांचा हा उपभोग घेतो ह्मणून हा कर्ता व भोक्ता आहे याला या संसारांत शरीरनामकर्माच्या उदयानें जसें लहान किंवा मोठें शरीर मिळतें तसा हा त्या शरीरांत लहान किंवा मोठ्या आकृतीचा होऊन हा राहतो. याचें ज्ञान, दर्शन, सुख, चारित्र हीं लक्षणें आहेत. या गुणांनीं हा इतर पुद्गलादि पदार्थांपासून वेगळा करता येतो.

*रागी बध्नाति कर्माणि वीतरागो विमुंचति ॥
जीवो जिनोपदेशोऽयं संक्षेपाद्बंधमोक्षयोः ॥ ३१ ॥
अतो रागादिभिः सार्धं मिथ्यात्वविषमुत्सृज ॥
काललब्ध्यादयो लभ्या नासपूर्वा यतस्त्वया ॥ ३२ ॥
मूलं बंधादिदोषस्य रागद्वेषावुदाहृतौ ॥
तयोरुपचयेनैव सम्यक्त्वं च विहन्यते ॥ ३३ ॥
त्वया रागादिदोषैर्या भ्रान्ता जन्मपरंपरा ॥
सा सिंह! श्रूयतां श्रोत्रं पात्रीकृत्य गिरां मम ॥ ३४ ॥
द्वीपेऽस्मिन्नगरी पूर्वविदेहे पुंडरीकिणी ॥
सार्थवाहोऽभवत्तस्यां धर्मस्वामीति धार्मिकः ॥ ३५ ॥
सार्थेन तस्य सार्थेन तेन सार्धं महामुनिः ॥
ययौ सागरसेनाख्यो विख्यातस्तपसां निधिः ॥ ३६ ॥
एकदा दस्युवृंदेन तस्मिन्सार्थे विलुंठिते ॥
शूरैर्मृतं गतं भीतैर्नरै रत्नपुरांतरे ॥ ३७ ॥
नार्या पुरूरवानामा कश्या मधुवने श्रुतः ॥
ददृशे यतिना तेन दिङ्मूढेन वनेचरः ॥ ३८ ॥
स क्रूरोऽपि मुनेर्वाक्यात्पुलिंदो धर्ममग्रहीत् ॥
अप्याकस्मिकतः साधोः संयोगात्को न शाम्यति ॥ ३९ ॥
अतिदूरं समं गत्वा तेन प्रगुणवर्त्मनि ॥
दस्युना योजितो भक्त्या ययौ यतिरनाकुलं ॥ ४० ॥

३१ हा जीव रागद्वेष, मोह, अज्ञान वगैरेच्या तावडीत सांपडून ज्ञानावरणादिक आठ कर्मांनीं बांधला जातो. व जेव्हां या विकारापासून याची सुटका होते अर्थात् तो पूर्ण वीतराग-शुद्ध बनतो तेव्हां त्याला मोक्षलाभ होतो. तो कर्मापासून वेगळा होतो. असा हा जिनेश्वरांनीं संक्षेपानें बंध व मोक्षाचा उपदेश केला आहे.

---

टीप-बध्यते मुच्यते जीवः सममो निर्ममः क्रमात् ॥ -श्रीपूज्यपादविरचित इष्टोपदेश ।

अहिंसादीनि संरक्ष्य व्रतानि स चिरान्मृतः ॥
सौधर्मे द्विसमुद्रायुरासीद्देवः पुरूरवाः ॥ ४१ ॥
अणिमादिगुणोपेतस्तत्र दिव्यं सुखामृतं ॥
पीत्वाप्यवातरन्नाकात्पूर्वपुण्यक्षयात्ततः ॥ ४२ ॥

३२ यास्तव हे सिंहा ! तूं या रागद्वेषादि विकारासह मिथ्यास्वरूपी विषाचा त्याग कर व यांचा त्याग केलास म्हणजे काललब्धि वगैरे निमित्तें जीं तुला पूर्वीं कधींही प्राप्त झालीं नव्हतीं तीं प्राप्त होतील. अर्थात् जैनधर्माचा उपदेश, जातिस्मरण वगैरे कारणें मिळून तुला सम्यग्दर्शनाचा लाभ होईल. ३३ कर्मांचा बंध होणें, त्यांचा उदय होऊन आत्म्याला सुखदुःखादि प्राप्त होणें या गोष्टीचें मूलकारण राग व द्वेष हेंच जिनेश्वरांनीं सांगितलें आहे. या रागद्वेषांचा अतिशय संग्रह झाला असतां जीवांचें सम्यक्त्व नष्ट होतें.३४हे सिंहा! रागादि दोषांनीं तूं युक्त झाल्यामुळें तुला संसारांत अनेक जन्मांत भ्रमण करावें लागलें आहे. हे सिंहा! त्या तुझ्या अनेक जन्माचें मी वर्णन करितों, तूं माझ्या वचनांचें ग्रहण करण्यासाठी आपल्या कानाला पात्र कर अर्थात् माझें भाषण ऐक. ३५-३६ या जंबूद्वीपांत पूर्वविदेह क्षेत्रामध्यें पुंडरीकिणी नांवाचें शहर आहे. तेथे धर्मस्वामी नांवाचा एक व्यापारी राहात असे. तो धार्मिक व व्यापाऱ्यांचा पुढारी होता. एके वेळीं पुष्कळ धन स्वतः जवळ घेऊन तो व्यापाऱ्यांचा पुढारी व्यापारासाठीं पुष्कळ व्यापाऱ्यासह निघाला असतां त्याचे बरोबर तपश्चरणांचा साठा असलेले प्रसिद्ध सागरसेन नांवाचे मुनिही निघाले. ३७ एके वेळीं चोरांनीं त्या व्यापाऱ्यांच्या समूहाला लुटलें. तेव्हां जे शूर लोक होते ते मारले गेले व भ्यालेलीं माणसें जवळ असलेल्या रत्नपुर शहराकडे पळून गेलीं. ३८ इकडे मुनिराज आतां आपण कोणत्या रस्त्यानें जावें हें समजेनासें झाल्यामुळें गोंधळून गेले व मधुवन नांवाच्या जंगलांत ते चुकून गेले. तेथें काशी नांवाच्या स्त्रीसह पुरूरवा नांवाच्या भिल्लाला त्यांनीं पाहिलें. ३९-४० पुरूरवा क्रूर होता तथापि मुनीश्वरांच्या उपदेशानें त्यानें जिनधर्माचा स्वीकार केला. बरोबर आहे कीं, आकस्मिक जरी सत्पुरुषाचा संयोग झाला तरी त्यापासून कोणाचें अंतःकरण शांत होत नाहीं बरें ? मुनिराजाबरोबर तो पुरूरवा फार दूरपर्यंत गेला व त्यानें त्यांना सरळ वाटेवर आणून सोडिलें तेव्हां मुनीश्वर व्याकुलतेनें रहित होत्साते पुढें निघून गेले. ४१-४२ इकडे अहिंसादिक व्रतांचे पुरूरव्यानें पुष्कळ दिवसपर्यंत रक्षण केलें व

तो मरून सौधर्मस्वर्गांत दोन सागर वर्षे आयुष्य ज्याचें होतें असा देव झाला. तेथें त्याला अणिमादि आठ गुणांची प्राप्ति झाली व तेथें तो दिव्य सुखरूपी अमृताचें प्राशन करूं लागला. तदनंतर पुण्याचा क्षय झाल्यामुळें तो तेथून अवतरला.

भारतेऽस्मिन्पुरी ख्याता विनीतास्ति पुरां पतिः ॥
स्वर्गसारमिवोच्चित्य स्वयं शक्रेण कल्पिता ॥ ४३ ॥
रत्नसालप्रभाजालैर्निरुद्धतिमिरागमा ॥
व्यर्थोदयं हसंतीव या निशासु निशाकरं ॥ ४४ ॥
हर्म्याग्रशिखरानद्धस्फुरन्नीलरुचां चयैः ॥
आच्छाद्यते सहस्रांशुर्यत्रनीलघनैरिव ॥ ४५ ॥
निश्वाससौरभाकृष्य वक्रांभोजेषु योषितां ॥
यूनां यत्रेक्षणैः सार्द्धं निपतंति मदालिनः ॥ ४६ ॥
यत्र च प्रतिमायातरमणीलोललोचनाः ॥
नीलोत्पलसरःकांतिं वहंति मणिभूमयः ॥ ४७ ॥
सौधगोपानसीलग्नपद्मरागांशुमंडलैः ॥
यत्राकालिकसंध्याभ्रविभ्रमो दिवि तन्यते ॥ ४८ ॥
यस्यां मरकतच्छायाच्छादिता हर्म्यमूर्धसु ॥
मयूरा व्यक्तिमायांति परं केकारवैः कलैः ॥ ४९ ॥
श्रीमांस्तीर्थकृतामाद्यः सार्वः सर्वगुणास्पदः ॥
वृषभो वृषसंपन्नो नगरीमध्युवास तां ॥ ५० ॥
यस्य गर्भावतारे भूरिंद्राद्यैर्निचितामरैः ॥
बभार सकलां लक्ष्मीं स्वर्गलोकस्य तत्क्षणं ॥ ५१ ॥
दिव्यदुंदुभयो नेदुः प्रणनर्तोप्सरोगणः ॥
यस्मिन् जाते जहास द्यौः पतत्कुसुमवृष्टिभिः ॥५२ ॥
उत्पन्नमात्रमानंदाद्यं नीत्वा मेरुमूर्धनि ॥
स्नापयांचक्रिरे देवाः शक्राद्याः क्षीरवारिभिः ॥ ५३ ॥

४३ या भरत क्षेत्रांत सर्व नगरांची स्वामिनी अशी विनीता नांवाची नगरी आहे. ही नगरी इंद्रानें स्वर्गांतील सर्व उत्कृष्ट पदार्थ एकत्र करून जणु बनविलेली होती. ४४ या नगरीचा तट रत्नांनीं बनविला होता. त्यामुळें त्यांच्या कांति-समूहाने अंधकारानें आगमन होऊं शकत नसे. म्हणून रात्रीं व्यर्थ उगवलेल्या चंद्राला ही नगरी जणु हसत होती. ४५ येथील वाड्यावर असलेल्या शिखरावर वसाविलेल्या नील रत्नांच्या कांतिसमूहाने सूर्य निळ्या मेघांनीं जणु काय आच्छादिला जात असे. ४६--४७ स्त्रियांच्या श्वासोच्छ्वासाच्या सुगंधाला लुब्ध होऊन आलेले उन्मत्त भृंगे तरुणांच्या नेत्रासह स्त्रियांच्या मुखावर पडत असत. या नगरींत ज्यामध्यें सुंदर स्त्रियांचे डोळे प्रतिबिंबित झाले आहेत अशा रत्नांच्या भूमि निळ्या कमळांनीं युक्त असलेल्या सरोवराच्या शोभेला धारण करितात. ४८ राजवाड्यांच्या सज्जावर बसविलेल्या पद्मरागमण्याच्या किरण मंडलानें या नगरीमध्यें संध्याकाळची वेळ झाली नसतांही आकाशांत संध्याकाळच्या मेघांची शोभा उत्पन्न केली जात असे. ४९ या नगरींत वाड्यांच्या शिखरावर असलेले मोर पांच रत्नांच्या कांतीनें आच्छादित झाल्यामुळे लोकांना दिसत नव्हते पण ते जेव्हां मधुर शब्द करीत असत त्यावेळीं त्यांच्या केकांनीं लोक त्यांना ओळखूं शकत. ५० अशा त्या नगरींमध्यें लक्ष्मीसंपन्न, सर्व तीर्थंकारापैकीं पहिले, सर्वांचे हित करणारे, व सर्व सद्गुणांचे माहेरघर असलेले, धर्मसंपन्न असे आदि-तीर्थंकर राज्य करीत असत. ५१ श्री आदिनाथ तीर्थंकर जेव्हां मरुदेवी मातेच्या गर्भांत आले तेव्हां सर्व इंद्रादि देव या भूमीवर आले होते. त्यावेळीं या भूमीनें थोडा वेळपर्यंत स्वर्गाच्या पूर्ण शोभेला धारण केलें होतें. स्वर्गांतील सर्वच देव या भूमीवर आल्यामुळें ही भूमी त्यावेळीं पूर्ण स्वर्गमय झाली असें लोकांना वाटलें. ५२–५३ जेव्हां प्रभूंचा जन्म झाला तेव्हां पडत असलेल्या पुष्पवृष्टीच्या मिषानें आकाश जणु हंसू लागले. अप्सरांच्या समुदायानें नृत्य केलें व आकाशांत स्वर्गीय नगाऱ्यांचा गंभीर नाद होऊं लागला. प्रभु उत्पन्न झाल्यावरोवर त्यांना इंद्रादिकांनी मेरु पर्वताच्या मस्तकावर नेलें व तेथें क्षीर समुद्राच्या पाण्यांनीं त्यांनीं प्रभूला स्नान घातलें.

मतिश्रुतावधिज्ञानैः सहोत्पन्नैर्यतः स्वयं ॥
व्यबुद्ध सिद्धिसन्मार्गं यः स्वयंभूरभूत्ततः ॥ ५४ ॥
षट्कर्मजीवनोपायैः सन्नियुज्याकुलाः प्रजाः ॥
येन कल्पद्रुमापाये कल्पवृक्षायितं पुनः ॥ ५५ ॥

आसीत्तस्यात्मजो नाम्ना भरतो भारतावनेः ॥
पाता चक्रभृतामाद्यः प्राज्य साम्राज्यराजितः ॥ ५६ ॥
चतुर्दशमहारत्नसंपत्संपादितोन्नतैः
आसन्यस्यालये नित्यं निधयो नवकिंकराः ॥ ५७ ॥
यस्य दिग्विजये भूरिसेनाभरनिपीडनम् ॥
असहन्ती धरा रेणुव्याजेनेवारुरोह खं ॥ ५८ ॥
रेजिरे तच्चमूचारुनारीभिरवतंसिताः ॥
वेलावनलतालीनां भंगं प्राप्यापि पल्लवाः ॥ ५९ ॥
अंभोराशिः करानिंदोः पीत्वा पुनरिवोद्गिरन् ॥
ददृशे सैनिकैर्यस्य तीरस्थैः फेनराशिभिः ॥ ६० ॥
यस्यालब्धरणारंभा वारिधौ वारिकुंजरैः ॥
प्रत्युत्थितैर्मदामर्षात् क्रुधा युध्यंति दन्तिनः ॥ ६१ ॥
यं शशास स्फुरच्चक्राश्रिया दक्षिणबाहुना ॥
षट्खंडमंडलां धात्रीं धात्रीशामादिपूरुषः ॥ ६२ ॥
तस्य प्रिया महादेवी त्रिजगच्चारुतावधिः ॥
धारिणीति क्षितौ ख्याता बभूव गुणधारिणी ॥ ६३ ॥
तयोर्महात्मनोरासीत्स्वर्गादेत्य सुरः सुतः ॥
मरीचिरुदितादित्यमरीचीन् न्हेपयन्रुचा ॥ ६४ ॥

५४ प्रभु मतिज्ञान, श्रुतज्ञान व अवधिज्ञान हीं तीन ज्ञानें बरोबर घेऊ-
नच उत्पन्न झाले होते. व त्यांनी स्वतः मोक्षमार्गाचें स्वरूप जाणिलें होतें यास्तव ते
स्वयंभू होते. ५५ जीवनाच्या उपायाची माहिती नसल्यामुळे खिन्न झालेल्या
प्रजेला षट्कर्मामध्यें–अर्थात् आसि, माषि, कृषि, वाणिज्य, विद्या व शिल्प सामर्थ्यें
नियुक्त केलें ह्मणून कल्पवृक्षांचा जरी त्यावेळी अभाव झाला होता तरी प्रभूच
तेव्हां पुनः प्रजेला कल्पवृक्षाप्रमाणें वाटूं लागले. ५६ प्रभु आदिनाथ स्वामीला
भरत या नांवाचा सर्व भरत क्षेत्राचें संरक्षण करणारा मुलगा होता. हा चक्रवर्ती-
मध्यें पहिला चक्रवर्ती होता व उत्कृष्ट सार्वभौम राज्यानें अलंकृत झाला होता.
५७ या भरतनृपतीनें चौदा दिव्य रत्नांच्या संपत्तीच्या प्राप्तीनें स्वतःची ऐहिक उन्नती

पूर्णतेस नेली होती. या चक्रवर्तीच्या घरीं नऊ प्रकारचे निधि नोकर होऊन राहिले होते अर्थात या निधीपासून त्याला नाना प्रकारच्या वस्तूंची प्राप्ति होत असे. ५८ हा चक्रवर्ती दिशांना जिंकण्यासाठीं निघाला तेव्हां याच्या पुष्कळ सैन्याच्या ओझ्यानें उत्पन्न झालेलें दुःख पृथ्वीला सहन झालें नाहीं. ह्मणून जणु ती धुळीच्या मिषानें आकाशांत निघून गेल्याप्रमाणें वाटूं लागलें. ५९ समुद्राच्या किनाऱ्यावर असलेल्या जंगलांतील वेलींच्या समूहांची कोमल पानें भंग पाऊन देखील भरत चक्रवर्तीच्या सेनेंतील स्त्रियांनीं आपल्या कर्णभूषणासाठीं त्यांचा उपयोग केला असल्यामुळें शोभूं लागलीं. ६० समुद्राच्या किनाऱ्यावर पुष्कळ फेस जमलेला पाहून भरताच्या सैन्याला असें वाटलें कीं, चंद्राचे किरण प्रथमतः पिऊन हा समुद्र पुनः जणू ते ओकीत आहे. ६१ ज्यांना युद्ध करण्याचा प्रसंग आला नव्हता असे भरत चक्रवर्तीचे हत्ती समुद्रामध्यें वर उसळून आलेल्या पाणहत्तींशीं मदानें बेफाम होऊन रागानें युद्ध कारितात. ६२–६४ राजसमूहांत प्रथम असलेला हा भरत चक्री स्फुरायमाण झालेल्या चक्राच्या शोभेनें अलंकृत झालेल्या आपल्या उजव्या हातानें सहा खंडांनीं युक्त असलेल्या या पृथ्वीचें राज्य करीत होता. या चक्रवर्तीच्या प्रिय पट्टराणीचें धारिणी असें नांव होतें. या राणीचें सौंदर्य इतकें उत्तम होतें कीं तसलें सौंदर्य त्रैलोक्यांत कोठेंच आढळून येत नसे. तिनें पुष्कळ सद्गुणांना धारण केलें असल्यामुळेंही तिचें धारिणी हें नांव सार्थक होतें. तो स्वर्गांतील देव पुरूरवा [जो पूर्वभवीं भिल्ल होता] तेथून अवतरून या उभयतांना मरीचि नांवाचा मुलगा झाला. यानें आपल्या कांतीनें उगवलेल्या सूर्याच्या मरीचींना— किरणांना लज्जित केले होतें.

लौकांतिकामरैरेत्य बोधितेन स्वयंभुवा ॥
स दीक्षां पुरुदेवेन मरीचिः सममग्रहीत् ॥ ६५ ॥
दीनेन दुःसहास्तेन सेहिरे न परीषहाः ।
नैर्ग्रन्थ्यं हि परं धत्ते धीरचित्तो न कातरः ॥ ६६ ॥
प्रविहाय तपो जैनं संसारोन्मूलनक्षमं ॥
स्वयं प्रवर्तयामास सांख्यं सांख्याविदां विभुः ॥ ६७ ॥
नियुज्य कापथे तस्मिन्नन्यानप्यल्पमेधसः ॥
मस्करी घोरामिथ्यात्वादाचचार चिरं तपः ॥ ६८ ॥
मृत्युमासाद्य कालेन मरीचिः कुटिलाशयः ॥
त्रिदशः पंचमे कल्पे कायक्लेशफलादभूत् ॥ ६९ ॥

दशामनुभवन्दिव्यां दशांभीराशिराजितः ॥
अवसत्सुरनारीभिस्तत्र नेत्रार्द्धवीक्षितः ॥ ७० ॥
आससाद कृतान्तस्तं जीवितांते निरंकुशः ॥
संसृतौ वर्तमानस्य कस्य मृत्युरगोचरः ॥ ७१ ॥
पुरे कौलीयके जातः सर्वशास्त्रविशारदः ॥
द्विजन्मा कौशिको नाम कौसीद्येन विवार्जितः ॥ ७२ ॥
तस्य प्रणयिनी चासीत्कापिला कपिलोपमा ॥
निसर्गमधुरालापा भर्तृपादैकदेवता ॥ ७३ ॥
अजायत तयोः प्रेयान्स्वर्गादेत्य सुतः सुरः ॥
तन्वन्मिथ्यादृशां चित्ते मैत्रीं मैत्रायणः परां ॥ ७४ ॥
पारिव्राज्यं तपो घोरमाचर्याचार्यतां गतः ॥
क्रुद्धेनेवेति स प्रापे कृतान्तेन कृतान्तकृत् ॥ ७५ ॥

६५ लौकांतिक देवांनी येऊन श्री आदिनाथ प्रभूला संबोधन केलें. अर्थात् त्यांचें वैराग्य दृढ होण्याकरितां आपली संमती दर्शविली. त्यावेळीं प्रभु बरोबर मरीचीनेंही दीक्षा घेतली. ६६ परंतु सहन करण्यास कठीण असे भूक, तहान, थंडी, उष्णता वगैरे परीषहांना दीन असा तो मरीचि मुनि सहन करूं शकला नाहीं. बरोबरच आहे कीं, ज्याचें चित्तांत धैर्य वास करीत आहे तोच निर्ग्रंथ लिंगाला–जिनदीक्षेला धारण करूं शकतो. भित्रीं माणसें धारण करण्यास समर्थ होत नाहीं. ६७ संसाराचा पूर्णपणें नाश करण्यास समर्थ असलेले जिनेश्वरांनीं सांगितलेले उपवास वगैरे बारा प्रकारचें तप त्यानें सोडून दिलें व अनेक प्रकारचे तर्क कुतर्क करणाऱ्यांचा गुरु असा या मरीचीनें सांख्य-मताची स्थापना केली. * ६८ या मरीचीनें या कुमार्गामध्यें इतर मंदज्ञानी

---

* टीप—मरीचिश्च गुरोर्नप्ता परिव्राड्भूयमास्थित ॥
मिथ्यात्ववृद्धिमकरोदपसिद्धांतभाषितैः ॥ ६१ ॥
तदुपज्ञमभूद्योगशास्त्रं तंत्रं च कापिलं ॥
येनायं मोहितो लोकः सम्यग्ज्ञानपराङ्मुखः ॥ ६२ ॥
महापुराण १८ पर्व.

विनाय दर्शन मान्यं कुमारेण मरीचिना ॥
व्याख्यातं निजशिष्यस्य कपिलस्य पटीयसा ॥ ६३ ॥
धर्मपरीक्षायां अष्टादशाधिकारे १८

लोकांनाही वळवून घेतलें. व तीव्र मिथ्यात्वकर्मामुळें यानें पुष्कळ दिवसपर्यंत तप केलें. ६९ कांहीं कालानें मरण पावून कुटिल विचाराचा तो मरीचि शरीराला ज्यांत क्लेश दिले जातात, आत्मतत्वाची ज्यांत निर्मळता होत नाहीं अशा मिथ्यातपानें ब्रह्मस्वर्गामध्यें देव झाला. ७० तेथें याचे दहासागरोपम वर्षांचें आयुष्य होतें. देवांगना याच्याकडे अर्धे डोळे मिटवून प्रेमानें पाहात होत्या. अशा रीतीनें तो दिव्य अवस्थेचा अनुभव घेत तेथें राहिला. ७१ तेथेंही जेव्हां त्याचें आयुष्य संपलें तेव्हां ज्याला रोकतां येत नाहीं अशा मृत्यूनें त्याच्यावर हल्ला केला. बरोबरच आहे कीं, संसारांत असलेल्या कोणत्या प्राण्याला मृत्यूनें ग्रासलें नाहीं बरें ? ७२ कौलीयक नगरांत सर्व शास्त्रांत पारंगत आळस ज्याला माहीत नाहीं असा कौशिक नांवाचा ब्राह्मण राहत असे. ७३ त्याच्या पत्नीचें नांव कपिला होतें. ती जमदग्नीची स्त्री जी रेणुका तिच्या सारखी होती. ती आपल्या पतीच्या पायांना देव मानणारी होती अर्थात् पतिव्रता होती. व स्वाभाविकपणेंच सर्वांशीं ती मधुर बोलत असे. ७४-७५ या उभयतांना तो देव स्वर्गाहून येऊन मुलगा आला. हा त्यांचा फार आवडता होता. याचें मैत्रायण असें नांव होतें. यानें मिथ्यात्वी लोकांच्या अंतःकरणांत स्वतः विषयीं मैत्री उत्पन्न केली अर्थात् यानें पुष्कळ मिथ्यात्वी लोकांना आपले अनुयायी बनविलें. पुढें यानें दीक्षा घेतली व घोर मिथ्या तप करून आचार्य पदवी मिळविली. व मिथ्यातत्वांचा प्रचार केला व मिथ्याशास्त्रें रचिलीं. यामुळेंच जणु रागावलेला मृत्यु याच्याजवळ येऊन उभा राहिला अर्थात् कालान्तरानें हा मरण पावला.

अमेयकान्तिसंपत्तिं दधानो दिविजो महान् ॥
अभवत्प्रथमे स्वर्गे स्वर्गनारीमनोहरः ॥ ७६ ॥
ज्वलन्मणिविमानांतमध्यास्य प्रीतमानसः ॥
निर्विशन्नामरान्भोगान्निर्ववार प्रियासखः ॥ ७७ ॥
तदपायभवामेयशोकाशनिहतो हृदि ॥
निपपात ततो नाकाद्द्विसमुद्रायुषः क्षयात् ॥ ७८ ॥
स्थूणाकारे पुरे सोभूद्भारद्वाजो द्विजोत्तमः ॥
यः शुद्धोभयपक्षाभ्यां राजितो राजहंसवत् ॥ ७९ ॥
कुंदकुड्मलसत्कान्तिं हसन्ती दन्तशोभया ॥
पुष्पदन्ताभवत्तस्य गृहिणी गृहभूषणा ॥ ८० ॥

अवतीर्य ततः पुत्रः पुष्पमित्रस्तयोरभूत् ॥
अन्योन्यरक्तयोर्नित्यं मोहबीजप्ररोहवत् ॥ ८१ ॥
उपगम्य परिव्राजामाश्रमं स्वर्गलिप्सया ॥
बाल एव बलाद्दीक्षां जग्राह निरवग्रहः ॥ ८२ ॥
चिरकालं तपस्तप्त्वा मृत्योर्दशमुपागतः ॥
ईशानेऽजनि गीर्वाणो द्विपारावारजीवितः ॥ ८३ ॥
पश्यन्नप्सरसां नृत्यं तस्मिन्नास्ते मनोहरे ॥
कंदर्पविबुधातोद्यवाद्यगीतक्रमानुगं ॥ ८४ ॥
तं स्वर्गः पातयामास क्षीणे पुण्येऽपि निर्जरं ॥
आधोरणं दिनापाये शयालुं मत्तदन्तिवत् ॥ ८५ ॥

७६–७७ तो मैत्रायण मिथ्या तापसी पहिल्या सौधर्म स्वर्गांत स्वर्गीय देवांगनांचें मनोहरण करणारा व पुष्कळ कांतीचा धारक असा मोठा ऋद्धिधारक देव होऊन जन्मला. तेथें प्रकाशमान रत्नांनीं बनलेल्या विमानामध्यें बसून देवांगनासहित अतिशय आनंदित चित्तानें देवांना प्राप्त होणाऱ्या भोग्यपदार्थांचा उपभोग घेत सुखानें राहिला. ७८ जेव्हां त्याचें दोन सागरोपम वर्षांचें आयुष्य संपलें तेव्हां या सर्व भोगांना सोडून मला जावें लागणार ह्मणून तो फार शोकयुक्त झाला. या शोकरूपी वज्राचा याच्या हृदयावर आघात झाल्यामुळें तो स्वर्गापासून खाली पडला. ७९ स्थूणाकार नांवाच्या शहरांत भारद्वाज नांवाचा उत्तम ब्राह्मण राहात असे. जसा राजहंस आपल्या दोन सुंदर व पांढऱ्या पंखांनीं शोभतो तसा हा ब्राह्मण माता व पिता यांच्या शुद्ध कुलानें शोभत होता. अर्थात् मातृपक्ष व पितृपक्ष हे दोन्हीं ही याचे शुद्ध होते. ह्मणून याला कुलीनपणाच्या दृष्टीनें चांगली शोभा आली होती. ८०–८१ आपल्या दांतांच्या शोभेनें कुंदपुष्पांच्या कळ्यांच्या कांतीला हंसणारी, घराचें भूषण अशी पुष्पदन्ता नांवाची याची पत्नी होती. तो स्वर्गापासून खाली पडलेला देव नेहमीं एकमेकांवर अनुरक्त असलेल्या या उभयतांना मोहरूपी बीजाच्या अंकुराप्रमाणें पुत्र होऊन जन्मला. ८२ बालपणींच हा स्वर्गप्राप्ती करून घ्यावी अशा इच्छेनें मिथ्या तपस्व्यांच्या आश्रमाकडे गेला व तेथें आईबापांची परवानगी नसतांहीं स्वच्छंदपणानें यानें पारिव्राजक दीक्षा घेतली. ८३ पुष्कळ दिवस तपश्चरण करून हा मृत्यूच्या स्वाधीन होऊन

ईशान स्वर्गांत दोन सागर वर्षे आयुष्याचा धारक देव होऊन जन्मला. ८४–८५ त्या मनोहर स्वर्गांत कंदर्प जातीच्या देवांनीं वाजविलेलीं वाद्यें व गीत आणि ताल यांना अनुसरून होणारें अप्सरांचें सुंदर नृत्य पाहात तो देव सुखानें राहिला. जेव्हां त्याचें पुण्य क्षीण झालें तेव्हां माजलेला हत्ती ज्याचे दिवस भरले आहेत अशा निजलेल्या महाताला आपल्या पाठीवरून जसें फेकून देतो तसें स्वर्गानें त्याला आपल्या स्थानापासून टाकून दिलें.

पुरे श्वेतविकाख्यायामग्निभूतिर्द्विजोऽग्निचित् ॥
तद्भार्या गौतमी चासीद्द्युम्नद्युतिरपांशुला ॥ ८६ ॥
उदपादि दिवश्च्युत्वा सूनुरग्निसहस्तयोः ॥
कपिलीकृतदिग्भागो विद्युद्दीप्रतनुद्युता ॥ ८७ ॥
पारिव्राजमनुष्ठाय तपो निष्ठितजीवितः ॥
सुरः सनत्कुमारेऽभूत्कल्पेऽनल्पश्रिया युतः ॥ ८८ ॥
सप्तसागरसंख्यातमायुस्तस्यागमत्क्षयं ॥
निपीतमिव तद्वीक्ष्य व्याजेनाप्सरसां दृशा ॥ ८९ ॥
अस्तीह मन्दिरं नाम सानंदं भारते पुरं ॥
मंदिराग्रचलत्केतुमालामंदीकृतातपं ॥ ९० ॥
गौतमोऽभूत्पुरे तस्मिन् द्विजः कुंदसमद्विजः ॥
कौशिकी कुशला गेहे गेहिनी चास्य वल्लभा ॥ ९१ ॥
दावानलशिखाकल्पानल्पकेशैर्ज्वलन्निव ॥
मिथ्यात्वेनापरेणासीत्सोऽग्निमित्रस्तयोः सुतः ॥ ९२ ॥
गृहवासरतिं हित्वा तपस्यामाचरन्परां ॥
परिव्राजकरूपेण चक्रे मिथ्योपदेशनं ॥ ९३ ॥
पंचतां चिरकालेन कालेन प्राप्य दुर्मदः ॥
कल्पे बभूव माहेन्द्रे माहेन्द्रप्रतिमः सुरः ॥ ९४ ॥
सप्तोदधिसमं कालं तत्र स्थित्वा यथेच्छया ॥
ततोऽच्यवत निःश्रीकः पादापाज्जीर्णपर्णवत् ॥ ९५ ॥

स्वस्तिमत्यां पुरि श्रीमान्सालंकायननामभाक् ।
द्विजन्माभूत्प्रिया चास्य मंदिरा गुणमंदिरा ॥ ९६ ॥
स्वर्गादेत्य तयोरासीदपत्यमनपत्ययोः ॥
वैनतेय इवाधारो भारद्वाजो द्विजप्रियः ॥ ९७ ॥
पारिव्राजं तपस्तप्त्वा चिराद्गलितजीवितः ॥
माहेन्द्रे महनीयश्रीः कल्पेऽनल्पामरोऽभवत् ॥ ९८ ॥
सस्पृहं दिव्यनारीभिरायतैर्घनपंक्तिभिः ॥
कर्णोत्पलैः कटाक्षैश्च मुमुदे तत्र ताडितः ॥ ९९ ॥
अनारतं रतं तासामन्वभूदान्वितः श्रिया ॥
सप्तसागरसंख्यातकालस्थितिसमेतया ॥ १०० ॥

८६-८७ श्वेताविका नांवाच्या शहरांत आग्निभूति नांवाचा अग्निहोत्री ब्राह्मण राहात असे. त्याची गौतमी नांवाची स्त्री पतिव्रता व लक्ष्मीप्रमाणें सुंदर होती. या उभयतांना तो देव स्वर्गापासून चऊन आग्निसह नांवाचा पुत्र झाला. याच्या शरीराची कांति विजेप्रमाणें तेजस्वी होती.त्यामुळें यानें दिशांचे भाग पिंगट वर्णाचे केले. अर्थात् याच्या शरीराची कांति चोहींकडे पसरत असे. ८८ पारिव्राजक तपश्चरण करून त्यानें आपलें आयुष्य समाप्त केलें. व तिसऱ्या सानत्कुमार स्वर्गांत पुष्कळ ऐश्वर्याचा धारक असा तो देव बनला. ८९ तेथें देवांगनांच्या नेत्रांनी जणु प्यालें गेल्यामुळें त्याचें तेथील सात सागराचे आयुष्य संपलें ९०-९२ या भारत क्षेत्रांत आनंदानें सहित असें मंदिर नांवाचें शहर आहे. येथील वाड्यांच्या गच्चीवर हलणाऱ्या ध्वजपताकांनीं सूर्याचा प्रकाश मंद केला होता. अशा त्या शहरात कुंदपुष्पाप्रमाणें ज्याची दंतपंक्ती आहे असा गौतम नांवाचा ब्राह्मण राहात असे. गृहकार्यामध्ये निपुण व गृहस्वामिनी अशी कौशिकी नांवाची आवडती पत्नी याला होती. या उभयतांना तो देव आग्निमित्र नांवाचा मुलगा झाला. जंगलांत पेटलेल्या अग्नीच्या ज्वालाप्रमाणें पिंगट वर्णाचे पुष्कळ केस याच्या डोकीवर असल्यामुळें हा आग्निमित्र दुसऱ्या गृहीत मिथ्यात्वानें जणु जळत आहे असें वाटत असे ९३ पुढें यानें गृहत्याग केला, व पारिव्राजजक दीक्षा घेऊन हा तीव्र तपश्चरण करूं लागला. व मिथ्यात्वाचा सर्वांना उपदेश देत फिरू लागला. ९४ पुढें पुष्कळ दिवसांनीं खोट्या गर्वाला धारण करणारा हा तपस्वी

मृत्यु पावला. व चौथ्या स्वर्गामध्यें इंद्रतुल्य ऐश्वर्याचा देव होऊन जन्मला. त्या स्वर्गांत तो सात सागर वर्षें सुखानें राहिला. तदनंतर आयुष्य संपल्यावर तो कांतिहीन होऊन झाडापासून जुनें पान जसें खालीं पडावें तसा तो स्वर्गापासून पतन पावला.९६-९७ स्वस्तिमती शहरांत सालंकायन नांवाचा एक श्रीमत ब्राह्मण राहत असे. याची गुणांचें घर असलेली मंदिरा नांवाची पत्नी होती. तो देव स्वर्गांतून येऊन पुत्ररहित असलेल्या या उभयतांस भारद्वाज नांवाचा मुलगा होऊन जन्मला. हा ब्राह्मणांना फार प्रिय होता. जसा गरुड विष्णूला आधारभूत आहे तसा हा आपल्या मातापित्यांना आधार होता. ९८ पुष्कळ दिवसपर्यंत परिव्राजक तप करून याचें या भवांतील आयुष्य संपल्यावर हा माहेंद्र स्वर्गांत विपुल लक्ष्मीचा धारक मोठा देव होऊन जन्मला. ९९ येथें ज्यांच्या पापण्या दाट आहेत अशा दीर्घ कटाक्षांनीं व कानावर ठेविलेल्या दीर्घ कमलांनीं कामेच्छेनें देवांगनांकडून ताडला गेलेला तो देव फार आनंद मानीत असे. १०० लक्ष्मीसंपन्न अशा या देवानें त्यांच्या संभोग सुखांचा नेहमीं अनुभव घेतला. अशा रीतीनें या स्वर्गसंपत्तीचा व सुखांचा सातसागर वर्षेंपर्यंत त्यानें उपभोग घेतला.

कल्पवृक्षस्य कंपेन म्लानमंदारमालया ।<br>
दृष्टिभ्रांत्यादिभिश्चान्यैः सूचितः स्वर्गनिर्गमः ॥१०१॥<br>
विललाप कृताक्रंदो मंदीभूततनुद्युतिः ।<br>
विषादविधुरां दृष्टिमिष्टरामासु पातयन् ॥१०२॥<br>
शांतपुण्यप्रदीपस्य चिंतासंतप्तचेतसः ।<br>
आशाचक्रं निराशस्य ममाद्य तिमिरावृतं ॥१०३॥<br>
हा स्वर्ग! विभ्रमोपेतदिव्यनारी जनांचित ! ।<br>
किं मां न धारयस्यार्त्तं निपतंतं निराश्रयं ॥१०४॥<br>
शरणं कं प्रपद्येऽहं किं कृत्यं का गतिर्मम ।<br>
केनोपायेन वा मृत्युं वंचयिष्यामि तत्वतः ॥१०५॥<br>
सहजेन गतं क्वापि लावण्येनापि देहतः ।<br>
हा हा! पुण्यक्षये किं वा विश्लेषं नोपगच्छति ॥१०६॥

प्रणयेन समाश्लिष्य गाढं कंठे तनूदरि ! ।
रुंद्धि वेगेन गात्रेभ्यो निर्यियासूनसूनिमान् ॥१०७॥

कुर्वन्प्रलापमिति मानसदुःखभारसंप्रेरणादिव दिवः सहसा पपात ।
कारुण्यबाष्पलुलिताक्षियुगेन दृष्टः कष्टं विधृत्य निजमुग्धवधूजनेन ॥१०८॥

ततोऽवतीर्यास्तमितोरुपुण्यो मिथ्यात्वदाहज्वरविव्हलात्मा ।
चिरं त्रसस्थावरयोनिमध्यमध्यास्त दुःखानि समश्नुवानः ॥१०९॥

भ्रान्त्वा कुयोनिषु चिरात्कथमप्यवाप मानुष्यकं पुनरिहाद्भुतपाप-भारात् ।
जीवस्तथा हि निजनिर्मितकर्मपाकान्नाभ्येति किं किमिह नोज्झति किं न धत्ते ॥११०॥

अस्याः पुरे भारतवास्यलक्ष्म्या लीलांबुजे राजगृहे द्विजोऽभूत् ।
शांडिल्यपूर्वायननामधेयः पारासरी तस्य वधूश्च नाम्ना ॥१११॥

१०१ कल्पवृक्षाच्या हलण्यानें व गळ्यांतील मंदार पुष्पांची माला सुकून जाण्यानें, दृष्टिमध्यें भ्रम होण्यानें व इतर चिन्हांनीं त्याचें स्वर्गांतून निघून जाणें सूचित झालें. ( देवांना जेव्हां त्याचे आयुष्य सहा महिने उरतें तेव्हां अशीं चिन्हें होत असतात. ) १०२ या चिन्हांनीं घाबरून जाऊन तो देव मोठ्यानें रडून शोक करूं लागला. त्याच्या शरीराचें तेज त्यावेळीं फार कमी झालें व खिन्न दृष्टीनें तो आपल्या देवांगनाकडे पाहूं लागला. १०३ त्याचा पुण्यरूपी दिवा त्यावेळीं मालवलेला होता. त्याचें अंतःकरण चिंतारूपी संतापानें संतप्त झालें होतें. तो अगदीं निराश झाल्यामुळें त्याला सर्व दिशा अंधकारानें व्याप्त झाल्या आहेत असें वाटूं लागलें. १०४ तो याप्रमाणें शोक करूं लागलाः—हे स्वर्गा ! तूं नानाप्रकारच्या विलासांनीं युक्त अशा देवांगनांनीं भरलेला आहेस. मी दुःखी होऊन येथून पडत आहे. मला कोणी आधार देणारा दिसत नाहीं. यास्तव तूं मला यावेळीं शरण कर १०५ मी आतां कोणाला शरण जाऊं ? मी आतां काय करूं ? आतां मला कोणती गति प्राप्त होणार आहे ? कोणत्या उपायानें मृत्यूला फसवून मी अमर होऊं ? माझ्या देहावरोवरच उत्पन्न आलेलें लावण्य आज कोठें गेलें तें समजत

नाहीं. अरेरे! पुण्याचा क्षय झाला असतां कोणती वस्तु आपल्यापासून दूर होत नाहीं बरें? सर्व आवडत्या वस्तु पुण्याच्या अभावीं हातांत आलेल्याही नाहींशा होतात. १०७ हे कृशांगी प्रियतमे! प्रीतीनें माझ्या कंठाला घट्ट मिठी मार व माझ्या शरीरांतून वेगानें जाऊं पाहात असलेल्या ह्या प्राणांना आवरून धर. १०८ दयेनें ज्यांच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिलें आहेत अशा त्याच्या स्त्रिया त्याला धरून मोठ्या दुःखानें पाहांत असतां तो विलाप करीत करीत त्या स्वर्गांतून एकदम पतन पावला. जणु मानसिक दुःखाच्या ओझ्यानेंच तो ढकलला गेल्यामुळें स्वर्गापासून पडला असावा. १०९ तदनंतर ज्याच्या मोठ्या पुण्याचा अस्त झाला आहे व ज्याचा आत्मा मिथ्यात्वकर्मोदयरूपी दाहज्वरानें तळमळत आहे असा तो देव तेथून अवतरून त्रसस्थावर योनीमध्यें नानाप्रकारच्या दुःखाचा उपभोग घेत राहिला. ११० त्रसस्थावरादि कुयोनींत भ्रमण करून त्यानें पुनः मोठ्या कष्टानें मनुष्य जन्म प्राप्त करून घेतला, पण या जन्मांतही त्याचें पापाचें ओझें फार मोठें होतें. बरोबरच आहे कीं, जीव स्वतः प्राप्त करून घेतलेल्या कर्मोदयानें कोणत्या अवस्थेला प्राप्त होत नाहीं? अथवा कोणत्या अवस्थेचा त्याग करीत नाहीं? अथवा कोणता पर्याय धारण करीत नाहीं बरें? १११ या भारत वर्षरूपी लक्ष्मीच्या क्रीडाकमलाप्रमाणें सुंदर अशा राजगृह नगरांत शांडिल्यायन नांवाचा ब्राह्मण होता व त्याच्या पत्नीचें पारासरी असें नांव होतें.

भूत्वा तयोः स्थावर इत्याभिख्यां बिभ्रत्सुतः स्थावरकर्ममुक्तः ॥
कृत्वा तपो मस्करिणां जगाम स ब्रह्मलोकं दशसागरायुः ॥११२॥
सहजमणिविभूषाक्षौममंदारमालामलयजरसरम्यं देहमासाद्य सद्यः॥
चिरमरमत तत्र स्फीतसंपत्समेतः सुरयुवतिपरीतः पूर्णकामो
निकामं ॥ ११३ ॥

❀इत्यसगकृते श्रीवर्धमानकाव्ये मरीचिमनुष्यभवलाभो नाम
तृतीयः सर्गः❀ ॥ ३ ॥

११२ स्थावर नाम कर्माच्या उदयांतून सुटलेला तो जीव त्या उभयतांना स्थावर या नांवाला धारण करणारा मुलगा झाला. पुढें त्यानें मिथ्या तपस्व्यांचें तपश्चरण करून ब्रह्म स्वर्गाची प्राप्ति करून घेतली. तेथें १०

सागर वर्षांचें आयुष्य होतें. ११३ या स्वर्गात जन्मतःच नैसर्गिक रत्नालंकारांनीं सुंदर व पातळ अशा वस्त्रांनीं, कल्पवृक्षाच्या माळांनीं. आणि चंदन यानें रमणीय असा देह त्याला प्राप्त झाल्यावर तो देव विपुल ऐश्वर्यानें युक्त होऊन व देवांगनांनीं वेष्टित होऊन ज्याच्या इच्छा पूर्ण झाल्या आहेत असा होत्साता त्या स्वर्गात यथेच्छ फार कालपर्यंत रममाण झाला.

* याप्रमाणें असगमहाकविकृत या वर्धमानमहाकाव्यामध्यें मरीचीला स्थावर कर्मापासून सुटल्यानंतर पुनः मनुष्यभवलाभ झाला. या वर्णनाचा तिसरा सर्ग समाप्त झाला ॥ ३ ॥*

# चतुर्थः सर्गः

अथ भारतवास्यभूतलेऽस्मिन्सुरलोकश्रियमुद्वहन्स्वकान्त्या ॥
प्रथितो मगधाख्यया जनांतः सुकृतामस्ति निवासहेतुरेकः ॥ १ ॥
सकलर्तुषु यत्र शालिवप्राः कलमामोदहतालिनां समूहैः ॥
शुकपातभयात्कृषीवलौघैः स्थगिता नीलपटैरिव व्यराजन् ॥ २ ॥
प्रतिबुद्धमहोत्पलोत्पलान्तर्विहरत्सारसहंसचक्रवाकैः ॥
महिषीकलुषीकृतावतारैर्वरबंधैः परितः परीतमालः ॥ ३ ॥
निगमैर्वहदिक्षुयंत्रगंत्रीचयचीत्कारविभिन्नकर्णरन्ध्रैः ॥
परिपुंजितसस्यकूटकोटीनिकटालुंचिवृषैर्विभूषितो यः ॥ ४ ॥
कदलीफलखादनावसाने शुचि पीत्वा नवनालिकेरतोयं ॥
अधिशय्य नवप्रवालशय्यां पथिका यत्र विशश्रमुर्वनेषु ॥ ५ ॥
धरणीतलसर्वसारसंपत्प्रकराणां पदमस्ति तत्र रम्यं ॥
वरराजगृहेण राजमानं नगरं राजगृहाभिधां दधानं ॥ ६ ॥
उरुहर्म्यगवाक्षजालनिर्यद्घनकालागरुधूपधूमजालैः ॥
द्युमणिद्युतयो विभिन्नवर्णा दधिरे यत्र चमूरुचर्मलीलां ॥ ७ ॥
प्रतिमागतशालपद्मरागद्युतिभिः पाटलितांबुरंबुखातः ॥
नवविद्रुमजालभिन्नवीचेः सरितां पत्युरुवाह यत्र कांतिं ॥ ८ ॥

१ स्वर्ग जसा पुण्यवान लोकांचें राहण्याचे ठिकाण आहे त्याप्रमाणें या भरतक्षेत्रांत स्वतः च्या कांतीनें स्वर्ग लोकाची शोभा धारण करणारा व पुण्यवान लोकांचें निवासस्थान बनलेला असा मगध नांवांचा प्रसिद्ध व अद्वितीय देश आहे. २ या देशांत सर्वऋतूमध्ये साळींच्या सुगंधानें लुब्ध झालेले भुंग्याचे समूह साळींच्या शेतांत येऊन वसत असत तेव्हां तीं शेते पोपटांच्या समूहापासून भ्यालेल्या शेतकऱ्यांनीं नीलवस्त्रांनीं जणु आच्छादून टाकिल्याप्रमाणें शोभत असत. ३ तळयामध्यें निळीं व पांढरी कमळे प्रफुल्लित झालेलीं असून त्यामध्यें सारस,

हंस व चक्रवाक पक्ष्यांचे समूह क्रीडा करीत असत. कोठें कोठें तळ्यांच्या घाटा-जवळ रेड्यांनीं पाणी गढूळ केलेलें असे. अशा उत्तम बांधांनीं युक्त असलेल्या तळ्यांनीं हा देश शोभत असे. ४ या देशांतील खेडेगांवांत सर्वत्र उसांचे पुष्कळ चरक होते व पुष्कळ गाड्या होत्या त्यामुळें त्यांच्या चाकापासून व चरकापासून निघालेल्या आवाजानें लोकांच्या कानठाळ्या बसत असत. तसेंच या खेडेगांवांत एकत्र केलेल्या धान्यांच्या पुष्कळ राशी होत्या व त्यांच्या शिखरांना विदीर्ण करून टाकणारे बैलही तेथें असल्यामुळें अशा खेड्यांनीं तो देश शोभत असे. ५ या देशांतील बगीच्यामध्ये केळीं खाऊन तदनंतर स्वच्छ असे नारळांतलें पाणी पिऊन व नवीन कोवळ्या पानांच्या बिछान्यावर निजून प्रवासी लोक आलेला थकवा दूर करीत असत. ६ अशा या देशांत पृथ्वीतलावरील सर्व उत्तम संपत्तीचें स्थान असलेलें राजगृह नांवाचें रमणीय नगर उत्कृष्ट अशा राजवाड्यानें शोभत असल्यामुळें ' राजगृह ' या यथार्थ नांवाला धारण करीत होतें. ७ या नगरांत श्रीमंताच्या वाड्यांच्या खिडकीतून नेहमीं कालागरु धूपाचा पुष्कळ धूर निघून तो सूर्याच्या किरणांत मिसळून जात असे तेव्हां तें किरण अनेक रंगाचे दिसत असल्यामुळें वाघाच्या चित्रविचित्र कातड्याप्रमाणें दिसत असत. ८ प्रतिबिंबित झालेल्या तटाच्या पद्मरागमण्यांच्या कांतींनीं या नगराच्या खंदकाचें पाणी तांबूस झालें होतें त्यामुळें तो खंदक नवीन पोवळ्यांच्या कांतीनें ज्याच्या लाटा व्याप्त झाल्या आहेत अशा समुद्राची शोभा धारण करीत असे.

उरुसौधतलस्थदंपतीनामतुलां कांतिमुदीक्ष्य निर्निमेषाः ॥
अधुनाप्यतिविस्मयेन यस्मिन्विबुधा इत्यनुमन्यते नृलोकः ॥ ९ ॥
सदनाग्रनिबद्धनीलभासां निवहैः संवलितैर्गभस्तिहस्तैः ॥
विसृजन्निव सर्वतः कलंकं ददृशे यत्र शशी निजं निशासु ॥१०॥
नृपतिर्जगति प्रतीतवंशो निजतेजोदवदग्धशत्रुवंशः ॥
स्वयमर्थिगृहीतविश्वभूतिर्नगरं तत्प्रशशास विश्वभूतिः ॥ ११ ॥
नयचक्षुरनूनसत्वशाली भजतां पूरयिता मनोरथानां ॥
विनयैकधनोर्जितो जितात्मा परमासीद्गुणसंपदां पदं यः ॥ १२ ॥
अभवत्कमलेव यौवनस्य त्रिजगत्कांतिरिवैकतामुपेता ॥
पदवीव सतीव्रतस्य सिद्धेर्जयिनी तस्य जनेश्वरस्य जाया ॥ १३ ॥

२ कमलाप्रमाणे कांतियुक्त असलेल्या आपल्या दोन हातानी इंद्राणीनें उचलून घेतलेल्या जिनबालकाला देवांनी अनुसरलेल्या सौधर्मेंद्राने शरत्कालच्या मेघाप्रमाणें ज्याचे शरीर शुभ्र आहे व स्वतःच्या मदगंधानें भुंग्यांच्या पंक्तीचें आकर्षण करणारा अशा ऐरावत हत्तीच्या खांद्यावर स्थापन करून आकाशमार्गानें नेलें

पृष्ठ ३५१

विजिताखिलभूतलो निधाय स्वहिते मंत्रिणि राज्यतंत्रचिंतां ॥
मृगशावदृशा तया नरेन्द्रः सह सर्वर्तुसुखानि निर्विवेश ॥ १४ ॥
अवतीर्य दिवस्तयोरुदारस्तनयः ख्यातनयो बभूव देवः ॥
अजहत्प्रकृतिं कृती स दिव्यां कुशलो विश्वकलासु विश्वनंदी॥१५॥
उपयांतमथैकदा विलोक्य प्रतिहारं जरसा परीतमूर्तिं ॥
इति चिंतयति स्म निश्चलाक्षःस्थितिमाङ्गीं नृपतिर्जुगुप्समानः॥१६॥

९ ज्या शहरांत अत्याश्चर्यानें मोठमोठ्या राजवाड्याच्या गच्चीवर बसलेल्या दंपतीचें अनुपम सौंदर्य पाहून देव अद्यापि देखील निमेषरहित झालेले आहेत असें मनुष्य समजतात १० या शहरांतील घरांच्या गच्चीवर बसविलेल्या इंद्रनीलमण्यांच्या कांतिसमूहांनीं चंद्राचे किरण मिश्रित झाल्यामुळें जणु तो रात्रीच्या वेळीं आपल्या किरणरूपी हातांनीं आपल्या कलंकाचा सर्वत्र प्रसार करीत आहे असा लोकांना भासतो. ११ ज्यानें आपल्या पराक्रमरूपी अग्नीनें शत्रुरूपी वेळूंचा समुदाय जाळून टाकिला असा, जगत् प्रसिद्ध वंशांत जन्मलेला विश्वभूति नांवाचा राजा या राजगृह शहरांत राज्य करीत असे. याचक लोक याची विश्वभूति—सर्व संपत्ति याचना न करतां ग्रहण करीत असत म्हणून याचें विश्वभूति हें नांव सार्थक होतें १२ हा राजनीतिरूपी नेत्रांनी युक्त होता. व याचें सामर्थ्य फार मोठें होतें. सेवा करणाऱ्यांचे मनोरथ हा पूर्ण करीत असे. विनयरूपी धनानें हा ऊर्जितावस्थेला पोहोंचला होता व जितेंद्रिय होता. उत्कृष्ट गुणरूपी संपत्तीचें हा उत्कृष्ट स्थान होता. १३ या राजाच्या पट्टराणीचें नांव जयिनी असें होतें. ही राणी तारुण्याची जणु लक्ष्मी होती. त्रैलोक्याचें सौंदर्य जणु तिच्या ठिकाणीं एकत्र झालें होतें. पातिव्रत्याच्या सिद्धीचा ती जणु मार्ग होती. १४ सर्व पृथ्वीला जिंकिलेल्या या राजानें राजहितामध्ये दक्ष असलेल्या आपल्या प्रध्यावर राज्य-कार्याच्या चिंतेचा भार टाकिला. व हारिणबालकाप्रमाणें जिचे दीर्घ डोळे आहेत अशा आपल्या राणीबरोबर सर्व ऋतूंच्या सुखांचा तो उपभोग घेऊं लागला. १५ या उभयतांना तो देव स्वर्गांतून उतरून विश्वनंदी नांवाचा मुलगा झाला. या विश्वनंदीनें आपल्या दिव्य--स्वर्गीय--स्वभावाचा त्याग केला नाहीं. हा उदार, राजनीतींत निपुण व सर्व कलांमध्यें कुशल होता. १६ एके दिवशीं वृद्धपणानें ज्याच्या शरीरावर पूर्ण तावा बसविला आहे असा द्वारपाल आपल्याकडे येत असलेला राजानें पाहिला. आपली दृष्टि निश्चल करून प्राण्यांच्या शारीरिक

परिस्थितीविषयीं ज्याला तिटकारा उत्पन्न झालेला आहे अशा या राजानें पुढें लिहिल्याप्रमाणे विचार केला.

वपुरस्य पुरा विवृत्य जुष्टं मुहुरुक्तेन यदंगनाजनेन ॥
बलिना पलितेन चाभिभूतं तदिदं संप्रति कस्य वा न शोच्यं ॥ १७ ॥
सकलेंद्रियशक्तिसंपदायं जरसा विप्लुतया निराकृतोऽपि ॥
न जहाति तथापि जीविताशां खलु वृद्धस्य विवर्द्धते हि मोहः॥१८॥
× अवनम्य पदेपदे शिरोधिं शिथिलं भ्रूयुगलं निरुध्य दृष्टया ॥
पतितं नवयौवनं धरण्यामयमन्वेष्टुमिवेक्षते प्रयत्नात् ॥ १९ ॥
अथवा किमिहास्ति देहभाजां कुशलं जन्मवने विनष्टमार्गे ॥
भ्रमतां सततं स्वकर्मपाकादिति निर्वेदमुपागमन्महीशः ॥ २० ॥
अवयन्परिपाकदुःखबीजं विजहौ राज्यसुखं तदा नरेंद्रः ॥
विदिताखिलसंसृतिस्थितीनां महतां किं विषयेषु सक्तिरस्ति॥२१॥
धवलातपवारणस्य मूले विनिवेश्यावरजं विशाखभूतिं ॥
तनयं च निधाय यौवराज्ये व्यरुचन्निःस्पृहता सतां हि जुष्टा॥२२॥
उपगम्य चतुःशतैर्नरेन्द्रैः सहितः श्रीधरपादपद्ममूलं ॥
अजरामरतामुपैतुकामो जिनदीक्षां पृथिवीपतिः प्रपेदे ॥ २३ ॥
उपगम्य विनिर्जितारिजातं कृतषड्वर्गजयं विशाखभूतिं ॥
अभिवृद्धिमियाय राजलक्ष्मीः सततं कल्पलतेव कल्पवृक्षं ॥ २४ ॥

१७ जें याचें शरीर पूर्वी स्त्रीजनांकडून मार्गे वळून वारंवार पाहिलें जात होतें तेंच त्याचें हें शरीर आतां सुरकुत्या व म्हातारपणानें जर्जर आलें आहे असें पाहून कोणास वरें वाईट वाटत नाही? १८ म्हातारपणानें याची सर्व इंद्रियशक्ति-रूपी संपत्ती जर्जर होऊन गेलेली आहे. अशी हीन परिस्थिति याला प्राप्त झाली असतांही हा जगण्याची आशा सोडून देत नाहीं. बरोबरच आहे कीं, वृद्ध माण-

टीपः—असभूत मंडनमगयष्टेर्नष्टं क्व मे यौवनरत्नमेतत् ॥
इतीव वृद्धो नतपूर्वकाय पश्यन्नधोऽधो भुवि बंभ्रमीति ॥
धर्मशर्माभ्युदयमहाकाव्ये चतुर्थ सर्गे

सांचा मोह नियमानें वाढतच जातो. १९ हा द्वारपाल पावलो पावलीं आपली मान वांकवून व शिथिल झालेल्या भुवया वर चढवून प्रयत्नपूर्वक इकडे तिकडे नजर फेकून आपलें नूतन तारुण्य या पृथ्वीवर जणूं शोधीत आहे. अर्थात् आपलें गमावलेलें तारुण्य हुडकण्यासाठीं जणूं हा वाकून तें शोधीत आहे. २० जेथें खरा मार्ग सांपडणे अशक्य झालें आहे अशा या संसाररूपी जंगलांत आपल्या कर्मोदयास अनुसरून भटकणाऱ्या प्राणिमात्रांना खरें सुख कसें बरें मिळेल ? अर्थात् मिळणार नाहीं. अशा रीतीच्या विचारांनीं विश्वभूति राजाला वैराग्य उत्पन्न झालें. २१ त्यावेळीं परिणामीं दुःखें उत्पन्न करण्यास कारण असलेल्या राज्याचा त्यानें त्याग केला. बरोबरच आहे कीं, संसाराचें पूर्ण स्वरूप ज्यांना माहीत झालें आहे अशा महात्म्यांना विषयसुखामध्यें आसक्ति उत्पन्न होतें काय ? २२ शुभ्र छत्रांच्या खालीं अर्थात् राजसिंहासनावर आपल्या धाकट्या भावाची—विशाखभूतीची राजा विश्वभूतीनें स्थापना केली. व आपल्या विश्वनंदी पुत्राला युवराज पदावर आरूढ केलें. बरोबरच आहे कीं, सत्पुरुषांनीं निःस्पृहता धारण केली म्हणजे तिला जास्ती शोभा येते. २३ तदनंतर विश्वभूति राजानें चारशें राजासह श्रीधर मुनीश्वरांच्या चरण कमलांचा आश्रय घेऊन म्हातारपणा व मृत्युरहित असें मोक्षसुख प्राप्त करून घेण्याच्या इच्छेनें जिनदीक्षा धारण केली. २४ ज्यानें शत्रुसमूह जिंकिला आहे व कामक्रोधादिक सहा अंतरंग शत्रूंना ज्यानें वश केलें आहे अशा विशाखभूति राजाचा आश्रय घेऊन राजलक्ष्मी कल्पवृक्षाच्या आश्रयानें कल्पवल्ली जशी सतत वृद्धिंगत होते तशी वृद्धिंगत होऊं लागली.

अधिकोऽपि नयेन वीरलक्ष्म्या युवराजो बलसंपदा पितृव्यं ॥
न विलंघयति स्म मेदिनीशं स्थितिमाक्रामति किं महानुभावः ॥२५॥
ऋतुभिः सकलैः सदा परीतं विरुवन्मत्तमधुव्रतान्यपुष्टं ॥
वनमिंद्रवनाभिभाविशोभं युवराजः समकारयद्विचित्रं ॥२६॥
ललितेन विलासिनीजनेन व्यहरत्तत्र सह त्रिकालरम्ये ।
सहकारतले रतिद्वितीयं स्थितिमन्वेष्टुमिवादरादनङ्गं ॥२७॥
नारनाथपतेश्च लक्ष्मणायाः प्रियसूनुः प्रथमो विशाखनंदी ।
अभवन्नवयौवनेन मत्तो मदनेनापि निरंकुशः करीव ॥२८॥
स कदाचिदुदीक्ष्य वीक्षणीयं युवराजस्य वनं मदेभगामी ।
जननीं प्रणिपत्य वर्जितान्नस्तदुपादाय दिशेति याचते स्म ॥२९॥

तनयाय वनं प्रदत्स्व राजन्यदि कार्यं मम जीविते तवास्ति ।
इति सा रहसि स्ववल्लभत्वादनुबंधेन नराधिपं बभाषे ॥३०॥
सहसा वचनेन वल्लभाया युवराजे स्वहितैकमानसेऽपि ।
अगमद्विकृतिं विशाखभूतिः प्रियजानेः स्वजनो हि वैरिवर्गः॥३१॥
अथ किं करणीयताकुलेन द्रुतमाहूय रहस्यमात्यवर्गं ।
तमुदंतमशेषमाचचक्षे क्षितिनाथेन तदुत्तरं च पृष्टं ॥३२॥
विमलेतरया दृशैव राज्ञो नयहीनामवगम्य चित्तवृत्तिं ।
इति वाचमुदाजहार कीर्तिः शिरसा मंत्रिगणेन चोदितार्थः॥३३॥

२५ नीति, पराक्रमलक्ष्मी, व बलसंपत्ति यांनीं युवराज विश्वनंदी हा आपला चुलता जो विशाखभूति राजा त्यापेक्षां अधिक असूनही त्यानें त्याचें उल्लंघन केलें नाहीं. बरोबरच आहे कीं सत्पुरुष मर्यादेचें उल्लंघन करितो काय ? २६ युवराजानें एक विचित्र-आश्चर्यचकित करून सोडणारा बगीचा करविला. या बगीचांत नेहमी सहाही ऋतूंची शोभा एकवटली होती. उन्मत्त भुंगे व कोकिल यांच्या मधुर आवाजानें हा युक्त होता. व इंद्राच्या नंदनवनाच्या शोभेचा यानें पराभव केला होता. २७ आम्रवृक्षाच्या खाली रतिदेवीनें सहित असलेल्या मदनाला जणु शोधण्याकरितांच युवराज सुंदर अशा विलसिनी स्त्रियांसह सकाळीं, दोन-प्रहरीं व संध्याकाळीं रमणीय अशा बगीचांत विहार करीत असे. २८ राजा विशाखभूति व राणी लक्ष्मणा या उभयतांचा अतिशय आवडता असा विशाख-नंदी नांवाचा पहिला वडील मुलगा होता; तो अंकुशरहित हत्तीप्रमाणें तारुण्य व कामविकारानें उन्मत्त झालेला होता. २९ हत्तीप्रमाणें ज्याची गति आहे अशा त्या विशाखनंदीनें एकेवेळीं युवराजाचा प्रेक्षणीय बगीचा पाहून आईकडे येऊन तिला नमस्कार केला व अन्नत्याग करून मला तो बगीचा दे अशी तिची तो विनंती करूं लागला. ३० लक्ष्मणा राणीवर राजाचें अतिशय प्रेम होतें म्हणून लक्ष्मणा राणीनें एकांत ठिकाणीं राजाला आग्रहानें असें म्हटलें कीं, 'महाराज ! जर माझ्या जगण्याची आपणास आवश्यकता असेल तर आपल्या मुलाला युवराजाचा बगीचा द्या ' ३१ आपल्या प्रियपत्नीचें भाषण ऐकून विशाखभूति आपल्या हिताविषयीं ज्याचे मनांत काळजी आहे अशा युवराजाविषयींही विकारयुक्त झाला. अर्थात् त्याच्याविषयीं राजाच्या मनांत द्वेष उत्पन्न झाला. बरोबरच आहे कीं ज्याला आपली बायकोच प्रिय आहे त्याला त्याचे सर्व संबंधी

लोक शत्रूसारखेच वाटतात. ३२ आतां काय उपाय करावा या विषयीं ज्याची बुद्धि गोंधळून गेली आहे अशा राजानें तत्काल प्रधान मंडळींना बोलाविलें व त्यांना सगळी हकीकत सांगून याविषयीं काय उपाय करावा हेंहि विचारिलें ३३ मंत्रिमंडळाकडून मस्तक हालवून आपला अभिप्राय कळविण्याकरितां ज्याला सूचना दिली गेली अशा कीर्ति नांवाच्या प्रधानानें राजाच्या पापी नजरेनेंच त्याच्या अंतःकरणांतील अन्याययुक्त अभिप्राय जाणून घेतला व पुढें लिहिल्याप्रमाणें त्यानें भाषण केलें.

मनसा क्रियया च विश्वनंदी तव भूवल्लभ जातुचिन्न दुष्टः ।
उपगम्य चरैरलक्ष्यचेष्टैर्बहुशोऽस्माभिरसौ परीक्षितश्च ॥३४॥
प्रणतस्य समस्तमौलिवर्गैर्नयसंपादितविक्रमक्रमस्य ॥
यदि तस्य जिगीषुतास्ति राजन् किमसाध्यं सकले धरातलेऽपि॥३५॥
अनुकूलतमेऽपि सोदरस्य प्रियपुत्रे विमुखत्वमभ्युपैति ।
भवतः स्थितिशालिनोऽपि बुद्धिर्धिगिमां वैरकृतां नरेंद्रलक्ष्मीं॥३६॥
न विषं मरणस्य हेतुभूतं न तमो दृष्टिपथावृत्तिप्रवीणं ।
बहुदुःखकरं न चापि घोरं नरकं न्यायविदः कलत्रमाहुः ॥३७॥
नयमार्गविदांवरस्य युक्तं न तव स्त्रीहृदयेप्सितं विधातुं ।
असतां वचने प्रवर्तमानो विपदां याति हि पात्रतामवश्यं ॥३८॥
न ददाति वनं स याच्यमानो भवता तद्गतरम्यतानुरक्तः ।
अवलोकय नाथ शुद्धबुद्ध्या ननु कस्याभिमते मतिर्न लुब्धा॥३९॥
अनवाप्य वनं प्रयासि कोपं प्रियया वाक्कशया प्रताड्यमानः ।
हरणाय हठात्प्रवर्तसे चेत्प्रतिपक्षस्य तदानपेक्ष्य पक्षं ॥४०॥
स्थितिहीनमिति प्रतीतसत्वाः सकलास्त्वामपहाय राजमुख्याः ।
उपयांति तदा तमेव धीरं भुवि विख्यातनदा इवाम्बुराशिं ॥४१॥
विजितान्यनरेश्वरोऽपि राजन्युवराजस्य पुरो न भासि युद्धे ।
कुमुदाकरबंधुवद्दिनादौ किरतो रश्मिचयं सहस्ररश्मेः ॥४२॥

३४ हे राजन् ! युवराज विश्वनंदीनें मनानें व क्रियेनेंही आपल्याविषयीं कधींही दुष्टपणा धारण केला नाहीं. ज्यांच्या हालचाली गुप्त आहेत अशा हेरांनीं व

आम्हीही त्याच्याकडे जाऊन त्याविषयीं त्याची पुष्कळ प्रकारें परीक्षा केली आहे. ३५ सर्व मुख्य अधिकारी ज्याला नमस्कार करीत आहेत व ज्यानें योग्य नीतीला अनुसरून पराक्रम गुण प्राप्त करून घेतला आहे अशा या युवराजाच्या मनांत जयप्राप्ति करून घेण्याची इच्छा उद्भवली तर सांगा बरे त्याला या भूतलावर कोणती गोष्ट असाध्य आहे ? ३६ युवराज आपल्याशीं अत्यंत अनुकूल आहे. पुनः तो आपल्या भावाचाच प्रियपुत्र आहे. कोणी परका नाहीं. असें असतांही त्याच्याविषयीं आपण मर्यादेनें युक्त असूनही आपली बुद्धि आज विरुद्ध झाली आहे म्हणून वैर उत्पन्न करणाऱ्या या राजलक्ष्मीचा आम्ही धिक्कार करितो. ३७ या जगांत विष हे मरणाला कारण नाहीं व अंधार हा दृष्टि रोकण्यास निपुण नाहीं किंवा नरक देखिल तीव्र दुःखांचें कारण नाहीं. नीतीला जाणणारे विद्वान लोक स्त्री हेंच विष आहे असें समजतात व तीच न्याय मार्गाला रोकणारी आहे व तिलाच नरक मानणें योग्य आहे. ३८ महाराज ! आपण नीतिमार्गाला जाणणाऱ्या लोकामध्यें श्रेष्ठ आहांत यास्तव स्त्रीच्या मनाला जी गोष्ट आवडते ती करणें आपणास योग्य नाहीं. कारण दुष्टांच्या बोलण्याला अनुसरून जो वागतो तो अवश्य संकटाना पात्र होतो. ३९ युवराजाचें मन बगीच्याच्या सौंदर्यानें मोहून गेलें आहे यास्तव या बगीचाचो आपण मागणी केली तरी तो आपणास मिळणार नाहीं. महाराज आपण निर्मळ बुद्धीनें विचार करा म्हणजे आपणास आमचें म्हणणे योग्य वाटेल. अहो आवडत्या पदार्थावर कोणाची बुद्धि लुब्ध होत नाहीं बरें ? ४० आपणास बगीचा न मिळाल्यामुळें आपल्या प्रियतमेच्या भाषणरूपी चाबुकाच्या प्रहारांनीं आपण अवश्य क्रुद्ध होऊन युवराजाच्या बाजूचा विचार न करितां बगीचा बलात्कारानें ताब्यांत घेण्याचा प्रयत्न करण्यास प्रवृत्त व्हाल तर ज्यांचें बल--शौर्य प्रसिद्ध आहे असे मुख्य मुख्य राजे आपण मर्यादेला तोडणारे आहांत असें समजून आपला त्याग करून प्रसिद्ध नद जसे समुद्राला जाऊन मिळतात त्याप्रमाणें त्या धीर गंभीर युवराजाला जाऊन मिळतील.

अथवा निहतः स युद्धरंगे भवता दैववशेन वा कथंचित् ।
पिदधाति जगज्जनापवादो बहुले नक्तमिवांधकारराशिः ॥४३॥
अनपेतनयं विपाकरम्यं वचनं कर्णरसायनं बुधानां ।
हितमित्यभिधाय मंत्रिमुख्ये विरते प्रत्यवदन्नराधिनाथः ॥४४॥
इदमीदृशमेव यत्प्रणीतं भवता कृत्यविदा तदेव कृत्यं ।
तदुपायमुदीरयार्य येन क्षतहीनं तदवाप्यते सुखेन ॥४५॥

इति तद्वचनं निशम्य पत्युः पुनरूचे सचिवो विचारदक्षः ।
तमुपायवरं वयं न विद्मः कुशलो यस्तदवाप्तये विपाके ॥४६॥
यदि वेत्सि विधत्स्व तं स्वबुद्धया मतयो हि प्रतिपूरुषं विभिन्नाः ॥
ननु कृत्यविधौ प्रमाणमीशः सचिवोऽपि स्वमतं प्रवक्तुमीशः॥४७॥
इति वाचमुदीर्य मंत्रिमुख्ये विरते मंत्रिगणान्विसर्ज्य राजा ।
मनसा स्वयमाकलय्य किंचित्तरसाहूय युवाधिपं बभाषे ॥४८॥
भवता विदितो न किं प्रतीतः प्रातिकूले पथि कामरूपनाथः।
मम वर्तत इत्यहं विहन्तुं द्रुतमभ्येमि तमाप्तपुत्र पश्चात् ॥४९॥
इति तद्वचनं निशम्य सम्यक् प्रणिपत्यैवमुवाच विश्वनंदी ।
मयि तिष्ठति कस्तव प्रयासः क्षितिप प्रेषय माममुं विजेष्ये ॥५१॥

४२ हे राजन्, जरी आपण इतर राजांना जिंकिलें आहे तथापि युद्धप्रसंगीं आपण युवराजाच्या पुढें शोभणार नाहीं. यास उदाहरण असें पाहा कीं, दिवसाच्या प्रारंभीं चोहोंकडे किरणसमूह पसरणाऱ्या सूर्याच्या पुढें चंद्र शोभतो काय? ४३ अथवा युद्धभूमीमध्यें दैवयोगानें आपण त्याला कसें तरी जरीं ठार मारलें तरी लोक आपल्या अपकीर्तीनें कृष्णपक्षांत अंधाराचा समूह जसा रात्रीला आच्छादून टाकितो त्याप्रमाणें जग आच्छादून टाकितील. ४४ नीतियुक्त, परिणामीं रमणीय, विद्वान लोकांच्या कानाला रसायनासारखें असलेलें हितकर भाषण बोलून मुख्यमंत्री थांबल्यावर विशाखभूति महाराज त्यास पुढें लिहिल्याप्रमाणें बोलले. “ अहो प्रधानजी! योग्य कृत्यें जाणणाऱ्या आपणाकडून जें कांहीं सांगितलें गेलें तें तसेंच आहे अर्थात् योग्यच आहे परंतु हे आर्या ! असा कांहीं निर्दोष उपाय सांगा कीं ज्या उपायानें कांहीं हानि न होतां तो बगीचा मिळूं शकेल. ४६ महाराजांचें भाषण ऐकून विचार करण्यांत निपुण अशा प्रधानजीनें पुनः महाराजांना म्हटलें कीं, “अहो महाराज! जो परिणामीं हितकर व बगीचाची प्राप्ति करून देण्यास कुशल आहे असा श्रेष्ठ उपाय आम्हास माहीत नाहीं. ४७ हे राजन्! जर आपल्याला योग्य उपाय माहीत आहे तर तो आपल्या बुद्धीच्या जोरावर अंमलांत आणा. कारण प्रत्येक पुरुषांची बुद्धि वेगवेगळी असते. तसेंच कार्य करणें अथवा न करणें याविषयीं आपण समर्थ आहांत व प्रधान आपलें मत काय आहे तें सांगण्यामध्यें समर्थ आहे. अर्थात् आम्ही जें सांगितलें आहे त्या

प्रमाणें वागणें न वागणें आपल्या स्वाधीन आहे परंतु आम्ही मात्र योग्य मार्ग दाखविणें हें आमचें कर्तव्य आहे." ४८ याप्रमाणें भाषण करून मुख्य मंत्री स्तब्ध बसला. नंतर राजानें सर्व मंत्रिमंडळाला घरीं जाण्यास सांगितलें व मनानें कांहीं विचार करून तत्काल युवराजाला बोलावून तो त्यास पुढें लिहिल्याप्रमाणें बोलला. ४९ "हे वत्सा! कामरूप देशाचा राजा माझ्याहून विरुद्ध अशा मार्गामध्यें प्रवृत्त झालेला आहे हें तुला माहीत नाहीं काय ? यास्तव त्याचा नाश करण्यासाठीं मी शीघ्र जातों. तूं मागें या राज्याचें रक्षण कर" ५० याप्रमाणें राजाचें भाषण लक्षपूर्वक ऐकून विश्वनंदी युवराजानें नमस्कार करून याप्रमाणें म्हटलें —"हे राजन! मी असतां आपण हा प्रयास कां करितां? मला आपण पाठवून द्या म्हणजे मी त्याला खात्रीनें जिंकीन.

प्रतिपक्षमनाप्य मत्प्रतापो भुजयोरेव चिरं विलीयमानः ॥
नरनाथ! न जातु वीक्षितो यः परमाविःक्रियतां त्वया स तत्र॥५१॥
इति गामभिधाय सावलेपां पुनरप्यानतपूर्वकायमीशः ॥
विससर्ज तमेव सोऽप्ययासीत्प्रविधायोपवनस्य चाभिरक्षां ॥ ५२ ॥
दिवसैरथ सम्मितैः स्वदेशं तरसातीत्य नयेन संगताभिः ॥
पथि राजककोटिभिः परीतो रिपुदेशस्य समीपमाससाद ॥ ५३ ॥
प्रविशन्नथ दूरतः सभांतं प्रतिहारेण सहान्यदा प्रतीतः ॥
व्रणपट्टकबद्धसर्वदेहो युवराजा ददृशे वनाधिरक्षः ॥ ५४ ॥
प्रणनाम निवेशितेन भूम्यां शिरसा नाथमनाथवत्सलं सः ॥
अभिसद्य च विष्टरोपविष्टं स्थितवांस्तत्प्रियदृष्टिदत्तदेशे ॥५५ ॥
क्षणमात्रमथोपविश्य पूर्वं व्रणितैरेव निवेदितं शरीरैः ॥
पुनरुक्तमिवेश्वरेण पृष्टो निजगादागमनस्य कारणं सः ॥ ५६ ॥
नरनाथपतेरनुज्ञयास्मानवमत्योपवनं विशाखनंदी ॥
विशति स्म भवत्प्रतापयोग्यं तदपि श्रोष्यसि यत्कृतं च रक्षैः॥५७॥
इति तेन निवेदितां विदित्वा वनवार्तां कुपितोऽपि विश्वनंदी ॥
अवधीरयति स्म धीरचित्तः कथया तामथ लीलयान्ययैव ॥ ५८ ॥
महतीमथ तस्य कारयित्वा महसा स्नानपुरस्सरां सपर्यां ॥
विभावधिपः स च प्रसादं पुनरासाद्य नमस्यया विनम्रः ॥५९॥

५१ हे राजन! शत्रूंच्या अभावीं माझा जो पराक्रम माझ्या दोन बाहूमध्येंच फार दिवसापासून विलीन होत आहे तो आपण कधीं पाहिला नाहीं. यास्तव त्या माझ्या पराक्रमाला त्या शत्रूच्या ठिकाणीं प्रगट होण्यास आपणाकडून अवसर दिला जावा. ५२ याप्रमाणें गर्वयुक्त भाषण करून पुनः आपल्या शरीराचा पूर्व भाग युवराजानें वांकाविला अर्थात् त्यानें लवून राजाला नमस्कार केला. राजानें युवराजाचें विसर्जन केल्यावर तो जाण्यास निघाला व जातांना त्यानें वगीचाच्या रक्षणाची चांगली व्यवस्था केली. ५३ थोडक्या दिवसांनीं आपला देश शीघ्र ओलांडून मार्गामध्यें नीतिमार्गाला अनुसरून येऊन मिळालेल्या अनेक राजांनीं युक्त होऊन युवराज शत्रूच्या देशाच्या जवळ येऊन पोहोंचला. ५४ कोणे एके वेळीं दुरूनच द्वारपालासह सभेंत प्रवेश करणारा, जखमांच्या पट्ट्यांनीं ज्याचे देहाचे सर्व अवयव बांधले आहेत असा, वनाचें रक्षण करणारा विश्वासू माळी युवराजानें पाहिला. ५५ माळ्यानें आपलें मस्तक जमीनीवर टेकवून अनाथांवर प्रेम करणाऱ्या, सिंहासनावर बसलेल्या युवराजाला नमस्कार केला. व जवळ जाऊन त्यानें आपल्या दयेच्या नजरेनें दाखविलेल्या ठिकाणीं तो बसला. ५६ क्षणपर्यंत बसून नंतर प्रथमतःच जरी त्याच्या जखमी झालेल्या देहांनी-सर्व हकीकत सांगितली होती तथापि युवराजानें विचारल्यामुळें जणु पुनरुक्तिप्रमाणें त्यानें आपल्या यण्याच कारण सांगितलें. [ कसा अर्थात् शरीरांत झालेल्या जखमांनींच त्यानें आपला अभिप्राय सांगितल्यासारखाच होतो परंतु युवराजानें विचारल्यावरून शब्दाचे द्वारें पुनः तोच अभिप्राय त्यानें व्यक्त केल्याचीमुळें एकच गोष्ट दोनदां सांगितल्याप्रमाणें येथें झालें आहे.] ५७-५८ हे युवराज ! महाराजांच्या आज्ञेनें आह्मांला न जुमानतां विशाखनंदीनें वगीचांत प्रवेश केला· परंतु वनाचें रक्षण करणाऱ्या लोकांनीं आपल्या पराक्रमाला शोभेल असें जें कार्य केलें तें देखील आपणास मागाहून ऐकावयास मिळेलच. याप्रमाणें वनपालाने सांगितलेली बगीचाची हकीकत जाणून विश्वनंदीला क्रोध आला परंतु तो धीर अंतःकरणाचा असल्यामुळें लीलेनें इतर गोष्टी काढून त्या हकीकतीकडे त्यानें दुर्लक्ष केलें. ५९ स्नानपूर्वक भोजन वगैरे देऊन त्याचा मोठा आदर सत्कार केला यामुळे युवराज शोभू लागला व प्रभूच्या कृपेचा लाभ झाल्यामुळें तो वनपालही अति नम्र झाला त्यामुळें तोही फार शोभू लागला.

**अथ तेन नयैः प्रतापशक्त्या परया च प्रवणीकृतः सपत्नः ॥**
**प्रणिपत्य करं वितीर्य सारं विनिवृत्यापि तदाज्ञया जगाम ॥६०॥**

निरवर्तत वेगतो युवेशः सफलीकृत्य ततस्तदा तदाज्ञां ॥
स्वपुरं प्रतिपूज्य राजलोकं विसृजन्नप्रतिमः प्रतिप्रयाणं ॥ ६१ ॥
अवलोकयति स्म स स्वदेशं तरसा प्राप्य पलायमानलोकं ॥
किमिदं कथयेति तेन पृष्टो निजगादेत्यनिरुद्धनामधेयः ॥ ६२ ॥
परितोऽपि वनं विशाखनंदी तत्र तद्दुर्गतरं विधाय भीमं ॥
भवता सह वांछतीश योद्धुं नरनाथो युवयोः स तुल्यवृत्तिः ॥६३॥
तदवेत्य पलायते जनांतो हृतमाशंक्य किमप्ययं भयेन ॥
कथितं च मया यथा प्रवृत्तं तदिदं देव ! परं न वेद्मि किंचित् ॥६४॥
इति तद्वचनेन विश्वनंदी स विचिन्त्येति जगाद धीरनादः ॥
त्रपते मम यत्र चित्तवृत्तिस्तदुपादाय पुरः स्थितं च धात्रा ॥ ६५ ॥
विनिवृत्य यदि प्रयामि पश्चादभयः कोऽपि निवर्तते न भृत्यः ॥
यदि हन्मि ततो जनापवादो वद किं कृत्यमकृत्यमप्यथैकं ॥६६॥
पुनरित्यधिपेन नोदितः सन्सचिवः स स्फुटमित्युदाजहार ॥
नरनाथ यथा च वीरलक्ष्मीर्विमुखी नैव भवेत्तदेव कृत्यम् ॥ ६७ ॥
अभवद्विमुखो भवांश्च तस्मिन्वनमाकर्ण्य हृतं पुरापि देव ॥
अपहृत्य च स त्वदीयमेव प्रसभं हंतुमपीहते भवन्तं ॥ ६८ ॥

६० तदनंतर युक्ति प्रयुक्तींनी व उत्कृष्ट अशा पराक्रमाच्या जोरावर युवराजानें कामरूप देशाच्या राजाला वश केलें. तेव्हां तो करभाग व उत्कृष्ट पदार्थ युवराजाला अर्पण करून व नमस्कार करून त्याच्या आज्ञेनें परत निघून गेला. ६१–६३ यानंतर राजाची आज्ञा सफल करून युवराज आपल्या राजधानीकडे येण्यास निघाला. जे राजे याला मदत करण्यासाठीं आले होते त्यांचा आदर सत्कार करून त्यांचें अनुपम अशा या युवराजानें विसर्जन केलें व अनेक प्रयाणांनीं तो आपल्या देशास शीघ्र जाऊन पोहोंचला. परंतु आपले देशांतून लोक पळत असलेले पाहून हें काय आहे सांग बरें ? असा प्रश्न त्यानें अनिरुद्ध या नांवाच्या एका मनुष्यास केला. तेव्हां त्यानें पुढें लिहिल्याप्रमाणें हकीकत निवेदन केली तो म्हणाला, "हे नाथ विशाखनंदी वनाच्या सभोंवतीं भयंकर व मजबूत असा कठिण किल्ला बांधून आपणाबरोबर युद्ध करण्याची इच्छा करीत आहे. परंतु विशाख-

भूति महाराज आपणा उभयतांविषयीं मध्यस्थ वृत्तीचे आहेत. ६४ ही सर्व हकीकत जाणून आपल्या देशांतील लोक आपलें कांहीं अनिष्ट होईल अशी शंका मनांत घेऊन भीतीनें पळत सुटले आहेत. हे नाथ ! मला जेवढें माहीत होतें तेवढें मी हें आपणांस सांगितलें. या शिवाय मला अधिक कांहीं माहीत नाहीं. " ६५ हें त्याचें भाषण ऐकून विश्वनंदीनें थोडा वेळ विचार करून गंभीर शब्दांनीं म्हटलें कीं, " जें कार्य करण्याविषयीं माझें मन लाजतें तेंच कार्य दैवानें माझ्यापुढें आणून ठेविलें आहे ६६ जर मी येथूनच परत जावें म्हणतों तर कोणताही निर्भय सेवक परतूं इच्छीत नाहीं. व विशाखनंदीला मी ठार मारीन तर लोकामध्यें माझी अपकीर्ति झाल्यावांचून राहणार नाही. तेव्हां या दोन कार्यांपैकीं मी कोणतें कार्य करूं तें सांगा" ६७ याप्रमाणे युवराजानें प्रधानजींना विचारलें असतां प्रधानजींनी पुढें लिहिल्याप्रमाणें स्पष्ट उत्तर दिलें. ते म्हणाले कीं, "हे प्रभो ? जेणे करून वीरलक्ष्मी विमुख होणार नाहीं असेंच कार्य आपण करावे. ६८ हे नाथा ! आपण विशाखनंदीनें बगीचाचे हरण केलें हें ऐकूनही त्याविषयीं पूर्वीं देखिल विमुख झाला नाहींत अर्थात् त्याच्या विषयीं आपल्या मनांत प्रीतीचा अभाव होऊन द्वेष उत्पन्न झाला नाहीं. परंतु आतां तर तुमचा बगीचा लुटून पुनः तुम्हालाच तो मारण्याचीही इच्छा करीत आहे.

इदमद्भुतमीदृशेऽपि कोपो भवतस्तत्र न जायते कथं वा ॥
प्रतिकूलगतं मनाक्कि लोके द्रुमसत्युद्धतमापगारयोऽपि ॥ ६९ ॥
यदि च त्वयि तस्य बंधुबुद्धिः किमु न प्रेषयतीति दूतमेकं ॥
विहितागसि च प्रयाति कोपं मयि भीत्या रचितांजलौ किमार्यः॥७०॥
कृतभूरिपराभवेऽपि शत्रौ प्रतिलोमेन करोति पौरुषं यः ॥
प्रतिबिंबितमीक्षते स पश्चान्निजनारीमुखदर्पणे कलंकं ॥ ७१ ॥
अयमेव पराक्रमस्य कालो भवतो मानवतामधीश्वरस्य ॥
कथितं च मया विचार्य कार्यं सदृशं त्वद्भुजयोरिदं न चान्यत्॥७२॥
इति विक्रमशालिनां मनोज्ञं वचनं न्यायविदां च तस्य मत्वा ॥
अविलंबितमेव विश्वनंदी प्रययावभ्यरि दुर्गमुग्रकोपात् ॥ ७३ ॥
सेनामथ प्रमुदितां प्रधनागमस्य दूरे निविश्य सुभटैःसह कैश्चिदेव ॥
दुर्गावलोकनपदेन जगाम वेगाद्युद्धे निधाय हृदयं युवराजसिंहः॥७४॥

प्रापत्तदप्रतिमसालमलंध्यखातं नानाविधैः परिगतं परितोऽपि यंत्रैः॥
विख्यातशूरनिकुरंबकपाल्यमानं ॥
स्थानांतरोच्छ्रितासितध्वजवीजिताशं ॥ ७५ ॥
उत्प्लुत्य खातमचिरेण विलंध्य सालं ।
भग्ने समं रिपुबलेन निशातखड्गे ।
उत्पाटितेन सहसैव शिलामयेन ।
स्तंभेन भासुरकरो रिपुमापकोपात् ॥ ७६ ॥

६९ आम्हाला याविषयीं मोठें आश्चर्य हें वाटतें की, अशी परिस्थिति असतांही आपणास विशाखनंदीविषयीं कोप कसा उत्पन्न होत नाहीं? या जगांत नदीचा वेग देखील आपल्याला प्रतिकूल झालेल्या उद्धत झाडास मोडून टाकितो. हें उदाहरण आपण आपल्या दृष्टीपुढें ठेवा. ७० हे महाराज ! जर आपणाविषयी त्याच्या अंत करणांत बंधुबुद्धी जागृत आहे अशी जर आपली समजूत असेल तर " मी अपराध केला आहे व आपण रागावाल म्हणून मी आतां हात जोडले आहेत तरीही आपण माझ्यावर कां कोप करितां " असा आपला अभिप्राय कळविणाऱ्या एखाद्या स्वतःच्या दूताला तो कां बरें पाठवीत नाहीं? ज्या अर्थी तो दूतास पाठवीत नाहीं त्या अर्थी त्याच्याविषयी आपण आपल्या मनांतून बंधु बुद्धि काढून टाकणें रास्त आहे. ७१ शत्रु आपली पुष्कळ प्रकारें मानहानि करीत असतांही—नेहमीं उलट वागत असतांही त्याच्यावर जो आपला पराक्रम गाजवीत नाही तो मनुष्य आपला पराभव झाल्यानंतर आपल्या स्त्रियांच्या मुखरूपी दर्पणांत प्रतिबिंबित झालेला स्वत.च्या तोंडाचा कलंक पाहतो असें म्हणावयास हरकत नाहीं. ७२ स्वाभिमानी पुरुषांचा प्रभु असलेल्या हे युवराजा ! हाच आपला पराक्रम गाजविण्याचा काल आहे. आपल्या दोन बाहूंना शोभण्यासारखें हें कार्य मी विचार करून आपणास सांगितलें आहे. हेंच कार्य आपणास योग्य आहे, दुसरें नाहीं." ७३ याप्रमाणें प्रधानजीनें केलेलें हे भाषण पराक्रमशाली मनुष्यांच्या मनाला आवडणारें व नीतिवेत्त्यांना पटणारें आहे असें जाणून विश्वनंदी युवराज तीव्र क्रुद्ध होऊन शीघ्र शत्रूच्या किल्ल्यावर हल्ला करण्यासाठीं निघाला. ७४ पुनः युद्ध करण्याचा प्रसंग आल्यामुळें आनंदित झालेल्या सेनेला दूर ठेऊन थोडेसे वीरपुरुष बरोबर घेऊन किल्ला पाहण्याच्या मिषानें परंतु युद्ध करण्याचा अभिप्राय हृदयांत ठेऊन युवराज वेगानें निघाला. ७५ ज्याचा तट अप्रतिम आहे व ज्याचा

खंदक ओलांडण्यास अशक्य आहे व ज्याच्या सर्व बाजूंनीं नानाप्रकारचीं यंत्रें बसविलीं आहेत, विख्यात शूर योद्धे ज्याचें संरक्षण करण्याकारितां सज्ज झाले आहेत व ठिकाठिकाणीं रोवलेल्या उंच पांढऱ्या ध्वजांनीं जो दिशांना वारा घालीत आहे अशा किल्ल्याजवळ युवराज आला. ७६ युवराजानें खंदक ओलांडून तटही ओलांडला व शत्रुसैन्याचा फन्ना पाडीत असतां त्याची तरवार तुटली. परंतु लागलीच एक दगडी खांब उपटून त्यानें हातांत घेतला त्यामुळें त्याचा हात शोभूं लागला. असा पराक्रम गाजवीत तो क्रुद्ध होऊन शत्रूवर--विशाखनंदीवर धावला.

आयांतमंतकनिभं तमुदग्रसत्व ॥
मालोक्य वेपथुगृहीतसमस्तगात्रः ॥
तस्थौ कपित्थतरुमेत्य विशाखनंदी ॥
मंदीकृतद्युति वहन्वदनं भयेन ॥ ७७ ॥

तस्मिंस्तरावपि समं स्वमनोरथेन ॥
प्रोन्मूलिते महति तेन महाबलेन ॥
सत्रासरावरचिताञ्जलिना प्रपेदे ॥
भीत्या नमन्नशरणः शरणं तमेव ॥७८॥

पादानतं तमवलोक्य विहीनसत्वं ॥
सव्रीडमाप सहसा प्रविहाय कोपं।
नूनं भयावनतचेतसि शात्रवेऽपि ॥
प्रख्यातपौरुषनिधिः स्वयमेति लज्जां ॥७९॥

मूर्धानमानतमुदस्य तदा तदीयं पर्यस्तरत्नमुकुटं स करद्वयेन।
तस्मै ददावभयमूर्जितसाहसानां युक्तं तदेव महतां शरणागतेषु॥८०॥

कृत्वाहमीदृशमनात्मसमं कथं वा ॥
स्थास्यामि तस्य पुरतोऽत्र विशाखभूतेः ॥
इत्याकलय्य हृदयेन गृहीतलज्जो ॥
'राज्यं विहाय तपसे निरगादगारात् ॥८१॥

यांतं तदा चरितमचरितुं यतीनां ॥
रोद्धुं शशाक समुपेत्य न तं पितृव्यः ॥
पादानतोऽपि सकलैः सह बंधुवर्गैः ॥
किंवा महान्व्यवसिताद्विनिवृत्य याति ॥८२॥
उल्लंघ्य मंत्रिवचनं विहितं पुरा य-
त्तस्मात्तदानुशयमाप्य नरेश्वरोऽपि ॥
लोकापवादचकितः स्वसुते स तस्मिन् ॥
लक्ष्मीं निधाय सकलां तदनु प्रतस्थे ॥८३॥
गत्वा महीपतिभिराशु समं सहस्रैः संभूतपादयुगलं प्रणिपत्य मूर्ध्ना।
दीक्षां विरेजतुरुभावपि तौ गृहीत्वा पुंसां तपो ननु विभूषणमेकमेव८४

७७ यमाप्रमाणें भासणारा व प्रचंड शक्तीचा धारक अशा विश्वनंदी युवराजाला येत असलेला पाहून विशाखनंदीच्या सर्व अंगाला कांपरें सुटलें. भीतीनें त्याच्या तोंडावरची कांति सुकून गेली अर्थात् मंद झाली. व तो कवठाच्या झाडाकडे येऊन त्यावर चढून बसला. ७८ परंतु सामर्थ्यशाली अशा युवराजानें विशाखनंदीच्या सर्व भावी आशासह तें मोठें कवठाचें झाडही उपटून टाकिलें. त्यामुळें 'माझें रक्षण कर' असे भीतीचे शब्द उच्चारीत हात जोडून दुसरा कोणी रक्षक न दिसल्यामुळें तो युवराजालाच नमस्कार करून शरण गेला. ७९ शक्तिहीन असा विशाखनंदी आपल्या पायांस नमस्कार करीत आहे हे पाहून युवराजाला लाज वाटूं लागली. त्यानें तत्काल आपला राग सोडला. बरोबरच आहे की प्रख्यात पराक्रमाचे निधि असे पुरुष शत्रु मनामध्येही नम्र झाला असतां लज्जायुक्त होतात. अर्थात् तो आपणास शरण आला हे अयोग्य झालें असे त्यांना वाटूं लागतें. ८० ज्याचा रत्नांचा मुकुट ढिला झाला आहे अशा त्या विशाखनंदीचें आपल्या पायावर नम्र झालेलें मस्तक युवराजानें आपल्या दोन हातांनी वर केलें व त्याला अभयदान दिलें. उत्कृष्ट साहस करणारे सत्पुरुष शरण आलेल्यांना अभयदान देत असतात हें योग्यच आहे. ८१ युवराजाला असें वाटूं लागलें की, "मी हें स्वतःला न शोभणारें कृत्य केलें. मी आतां या विशाखभूतिपुढें कसा उभा राहूं" या प्रमाणें विचार उत्पन्न होऊन तो मनांत खजील झाला. व राज्याचा त्याग करून तपश्चरण करण्यासाठीं तो घराच्या बाहेर पडला. ८२ यतींच्या महाव्रतांचें आचरण करण्यासाठीं जात असलेल्या युवराजाकडे त्याचा चुलता अर्थात् विशाखभूति राजा

आला व तो आपल्या सर्व संबंधि जनांसह त्याच्या पाया पडून त्याला अडवि-ण्याचा प्रयत्न करूं लागला पण त्याला त्या कामांत यश आलें नाहीं. बरोबरच आहे कीं, सत्पुरुष आपल्या मनांत ठरविलेल्या कार्यापासून कधीं परावृत्त होतात काय ? ८३ विशाखभूतीनें मंत्र्याच्या भाषणाचा अन्हेर करून जें कार्य केलें त्यापासून त्याला आतां पश्चात्ताप झाला. त्याला लोकापवादापासून भय वाटूं लागलें. यास्तव त्यानें आपली राजलक्ष्मी आपल्या पुत्रावर-विशाखनंदीवर ठेविली. युवराजाचे मागें तोही दीक्षा घेण्यास निघाला. ८४ हजार राजांसह राजा विशाख-भूति संभूत मुनिकडे गेला व त्यांच्या दोन पायांना मस्तकानें त्यानें नमस्कार केला. चुलता व पुतण्या या दोघांनींही दीक्षा घेतली यामुळें ते दोघे फार शोभू लागले. खरोखर पुरुषांचें भूषण तपश्चरण करणे हेंच होय. यानेंच त्यांना शोभा येते.

कृत्वा तपश्चिरतरं स विशाखभूतिः ॥
सोढ्वा परीषहगणानथ दुर्निवारान् ॥
हित्वा त्रिशल्यमनघं दशमं समापत् ॥
द्व्यष्टाम्बुधिस्थितिमनल्पसुखं तु कल्पं ॥ ८५ ॥

अथावगम्याशु विशाखनंदिनं विवर्जितं दैवपराक्रमक्रमैः ॥
विजित्य युद्धे समुपाददे श्रियं पुरेण दायादमहीपतिः समं ॥८६॥
आत्मंभरित्वादपहाय मानं तमेव दूतक्रियया सिषेवे ॥
महीपतिः प्रागयमित्यशंकं निर्दिश्यमानोऽपि जनांगुलीभिः ॥८७॥
* अथैकदात्युग्रतपोविभूतिर्मासोपवासेन कृशीकृतांगः ॥
प्रोत्तुंगहर्म्यां मथुरां स्वकाले विवेश भिक्षां प्रति विश्वनंदी ॥ ८८ ॥
शृंगप्रहारेण पशोःपतंतं रथ्यामुखे साधुमसाधुवृत्तः ॥
जहास तं वीक्ष्य विशाखनंदी वारांगनासौधतलाधिरूढः ॥ ८९ ॥

---

* टीपः—काले मासमुपोष्य स्वे विशत मथुरापुरीं ॥
तं मध्यान्हदुघा गृष्टिर्घटोघ्नी प्राहरत्पथि ॥ ४१ ॥
तस्या श्रृंगप्रहारेण पतितं विश्वनंदनं । अहासीह्लक्ष्मणमुनुर्वेश्यासौधतले स्थित ॥४२॥
प्रहासात्तस्य सोत्सेकाच्चुकुवे मुनिना भृशं ॥ तेनाकारी निदान च प्रायस्तद्वधलिप्सया ॥४३॥
स निवृत्त्य ततो गत्वा हित्वा तनुतरातनु । महर्द्धिर्विबुधो जज्ञे महाशुक्रे तप.फलात् ॥४४॥
इति असग कवि कृते शांतिपुराणे अष्टम सर्गे ॥

जगाद चेति क्व गतं बलं ते विजित्य सेनां सकलां सदुर्गां ॥
उन्मूलितो येन शिलाविशालः स्तंभः कपित्थश्च पुरा तदद्य ॥९०॥
आकर्ण्य तस्य वचनं प्रविलोक्य तं च ॥
क्षान्तिं विहाय विनिवृत्य तथैव गत्वा ॥
कृत्वा निदानममुचन्मुनिरात्मदेहं कोपो हि कारणमनर्थपरंपरायाः ९१
ततो महाशुक्रमवाप्य कल्पं महेन्द्रकल्पास्त्रिदशो बभूव ॥
स षोडशांभोनिधिसम्मितायुर्दिव्याङ्गनालोकनलालसाक्षः ॥९२॥

८५ विशाखभूति मुनिराजांनीं पुष्कळ दिवसपर्यंत तपश्चरण करून रोकण्यास अशक्य असे भूक, तहान, थंडी, उष्ण वगैरे बावीस परीषह सहन केले. मायाशल्य ( कपट ) मिथ्यात्वशल्य आणि निदानशल्य ( मला पुढें नानाप्रकारचे भोग्य पदार्थ भोगावयास मिळावेत, मी इंद्र व्हावा, चक्रवर्ती व्हावा इत्यादि संसारपरिवर्धक इच्छा ) या तीन शल्यांचा त्याग केला. त्यामुळे आयुष्य संपल्यावर ते जेथें सोळा सागर वर्षांचें आयुष्य असून विपुल सुख मिळतें अशा दहाव्या महाशुक्र स्वर्गात उत्पन्न झाले. ८६ इकडे विशाखनंदी हा दैव व पराक्रम यांनी रहित आहे हें जाणून त्याचा भाउबंद असलेल्या एका राजानें त्याला युद्धामध्यें शीघ्र जिंकिलें व राजगृह शहराबरोबर त्याच्या राजलक्ष्मीचा त्यानें स्वीकार केला. ८७ विशाखनंदीला आपले पोट कसें भरावे एवढेंच माहीत होतें म्हणून अभिमान सोडून त्यानें त्याच राजाची नोकरी धरली. एकाचा निरोप दुसऱ्यास सांगण्याचा उद्योग करूं लागला अर्थात तो दूत बनला. लोक त्याला पाहुन हा मनुष्य पूर्वी या शहराचा राजा होता असें त्याचेकडे बोट करून निःशंक त्याच्या विषयी अजाण माणसाला सांगत असत. पण याविषयीं त्याला कांहींच दुःख वाटत नसे. ८७ एके दिवशीं तीव्रतपश्चरणाचें वैभवाला धारण करणारे, एक महिन्याच्या उपवासानें ज्यांचें शरिर कृश झाले आहे असे विश्वनंदि मुनिराज श्रीमंतांच्या उंच उंच वाड्यांनी शोभत असलेल्या मथुरा शहरांत आहार घेण्याच्या वेळीं अर्थात् दिवसा दहा वाजतां आले. ८९ त्यावेळीं त्यांना एका गल्लीच्या तोंडाशीं रस्त्यावर एका गायीच्या शिंगांचा धक्का लागला. त्यामुळे ते पडत असतां वेश्येच्या माडीवर बसलेल्या दुराचरणी विशाखनंदीनें त्यांना पाहिले व हंसून म्हटले की, “ ज्या सामर्थ्यानें तूं पूर्वी सर्व सैन्य व किल्ला जिंकिलास आणि मोठा दगडी खांब उपटून कवठाचें झाडही उपटून टाकिलेस तें तुझें सामर्थ्य आज

कोठें गेलें ? " ९१ त्याचें तें भाषण ऐकून व त्याला पाहून मुनिराजांनीं क्षमाभाव सोडून दिला. आहार न घेतां ते तसेंच परतून निघून गेले व अन्तीं त्यांनीं निदान बांधून अर्थात् या विशाखनंदीचा पुढच्या जन्मीं मी अवश्य सूड घेईन असा निश्चय करून देहत्याग केला. बरोबरच आहे कीं क्रोध हा अनेक प्रकारच्या अनर्थांचें कारण आहे ९२ हे विश्वनंदि मुनिराज महाशुक्र नांवाच्या दहाव्या स्वर्गांत इंद्राप्रमाणें महाऋद्धिधारक असा देव होऊन जन्मले. या देवाचें तेथें सोळा सागर प्रमाण आयुष्य होतें. सुंदर देवांगनांचें रूप पाहण्यांत याचे नेत्र नेहमीं उत्सुक असत.

विचित्रमणिरश्मिभिर्जटिलिताखिलाशामुखं ।
शशांककिरणांकुरद्युतिहरं विमानोत्तमं ।
अनेकशिखरावलीतटनिबद्धशुभ्रध्वजं ।
समग्रसुखसंपदां पदमधिष्ठितः पिप्रिये ॥९३॥
श्रित्वा जैनं व्रतमनुपमं लक्ष्मणायास्तनूजो ।
दृष्ट्वा व्योम्नि प्रचुरविभवं खेचराणामधीशम् ।
वांछन्भोगानकृत कृपणो दुर्निदानं तपःस्थः ।
कल्पं प्राप्तस्तमपि वपुषः क्लेशतः सद्व्रतैश्च ॥ ९४ ॥
इत्यसगकविकृते श्रीवर्धमानचरिते विश्वनंदिनिदानो
नाम चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

९३ नाना प्रकारच्या रत्नांच्या कांतींनीं ज्यानें सर्व दिशांचीं तोंडे व्याप्त केलीं आहेत अर्थात् ज्याची रत्नकांति सर्व दिशांत पसरली आहे, जे चंद्रकिरणांची कांति हरण करितें, ज्याला अनेक शिखरें असून ज्याच्या-वर पांढऱ्या ध्वजा बसविलेल्या आहेत व जें संपूर्ण सुखसंपत्तीचें स्थान आहे, अशा विमानांत राहणारा तो विश्वनंदीचा जीव देव फार आनंदित झाला.

९४ विशाखभूति व लक्ष्मणा राणीचा दोन पुत्र विशाखनंदी यानें जिनेश्वराचें व्रत अर्थात् जिनदीक्षा धारण केली. एके वेळीं आकाशांत पुष्कळ ऐश्वर्याचा धारक असा एक विद्याधरांचा राजा जात होता त्याला यानें पाहिलें.

तेव्हां याच्या सारखी भोगसंपत्ति मला प्राप्त व्हावी असें यानें निदान बांधिलें. तपश्चरणांत निमग्न राहून उत्तम व्रतांनी व शारीरिक क्लेशांनी यानें त्याच दहाव्या स्वर्गाची प्राप्ति करून घेतली.

याप्रमाणें असगकविविरचित श्रीवर्धमानचरितांतील विश्वनंदीच्या निदानाचें वर्णन करणारा चौथा सर्ग संपला ॥ ४ ॥

द्वीपेऽथ जंबूमति भारताख्ये वर्षे महीध्रो विजयार्द्धनामा ।
समुन्नतानेकसुकूटरश्मिश्वेतीकृताशेषनभःस्थलोऽस्ति ॥१॥
यत्रामलस्फाटिककूटकोटिस्थिता विलोक्यात्मवधूः खगेन्द्राः ।
साम्येन मूढा विबुधांगनानां प्रयांति केल्यां सहसा व्यतीत्य ॥२॥
* यत्पादनीलांशुमहाप्रभाभिर्मृगेंद्रशावो बहु विप्रलब्धः ।
गुहामुखं शंकिमनाश्चिरेण विवेश सत्यासु गुहासु नैव ॥३॥
यः सानुदेशस्थितपद्मरागमरीचिमालारुणितांतरिक्षः ।
संशोभते नित्यमनंततेजाः संध्याघनो वा नितरां मनोज्ञः ॥४॥
० यत्सानुदेशप्रतिबिंबितं स्वं निरीक्ष्य वन्यद्विरदो मदांधः ।
समेत्य वेगेन रदप्रहारैर्हिनस्ति को वा मदिनां विवेकः ॥५॥
विषानलोद्रेककरालभोगा यस्मिन्भुजंगाः परितो भ्रमन्तः ।
गरुन्मणिस्फीतमरीचिजालसंस्पर्शतस्त्यक्तविषा भवन्ति ॥६॥
श्रेण्यामपाच्यामलकाभिधाना पुरी धरायास्तिलकायमाना ।
तत्रोत्सवातोद्यसुगीतनादैरापूरिता भात्यमरावतीव ॥७॥

१ या जंबूद्वीपांतील भारत क्षेत्रांत विजयार्ध नांवाचा पर्वत आहे. त्याने अतिशय उंच अशा आपल्या अनेक शिखरांच्या किरणांनीं सर्व आकाश प्रदेशाला

---

* यत्सानुनीलमणिदीप्तिपरंपराभिः पञ्चाननस्य शिशवो बहु विप्रलब्धा ।
सत्येऽपि कन्दरमुखे परिशंकमाना निश्चित्य गर्जनकृतध्वानिभिर्विशंति ॥८॥
० स्वं वीक्ष्य वन्यद्विरदो नितम्बे यस्य बिम्बित ।
समेत्य दन्तैस्त हान्ति मादिना का विवेकिता ॥९॥
जीवधरचंप्वा तृतीयलम्बे इमौ समानार्थकौ श्लोकौ ।
बिंब विलोक्य निजमुज्ज्वलरत्नभित्तौ क्रोधात्प्रतिद्विप इतीह ददौ प्रहारं ॥
तद्भग्नदीर्घदशनः पुनरेव तोषा—छीलालस स्पृशति पश्य गज क्षितीति ।
धर्मशर्माभ्युदये चाय समानार्थकः श्लोको दशमसर्गे ॥

पांढरें केलें आहे. २ या पर्वताच्या निर्मल स्फटिक पाषाणांनीं बनलेल्या शिखराच्या अग्रभागावर आरूढ झालेल्या स्वतःच्या स्त्रियांना पाहून विद्याधर लोक देवांगनांच्या सादृश्यानें भ्रांत होतात व क्रीडेच्या वेळीं त्यांना सहसा ओलांडून जातात. ३ या पर्वताच्या पायथ्याला असलेल्या नीलमण्यांच्या पुष्कळ प्रकाशानें सिंहाचे बच्चे पुष्कळ वेळां फसत असत. त्यामुळें पुढें गुहा असतांही त्यांना येथ गुहेचें तोंड आहे की नाहीं अशी शंका येत असे व वऱ्याच वेळानें ते गुहेंत शिरत असत. नीलरत्नांचा प्रकाश कृष्णवर्णाचा असतो यामुळें तो सर्वत्र पसरल्यामुळें सिंहाच्या पिलांना गुहांचीं तोंडें दिसत नसत म्हणून ते संशययुक्त होत असत. ४ शिखरावर असलेल्या पद्मरागरत्नांच्या किरणसमूहानें सर्व आकाशाला ज्यानें लालभडक केलें आहे व ज्याचें तेज कधींही नष्ट होत नाहीं असा तो विजयार्द्ध पर्वत संध्याकाळच्या लाल मेघाप्रमाणें अतिशय सुंदर दिसतो. ५ या पर्वताच्या कड्यामध्यें आपलें पडलेलें प्रतिबिंब पाहून मदानें उन्मत्त बनलेला रानटी हत्ती वेगानें येऊन त्या प्रतिबिंबाला हा आपला प्रतिपक्षी आहे असें समजून दांतांनीं प्रहार करितो. बरोबर आहे कीं, जे उन्मत्त आहेत त्यांना विवेक कसा असणार ? ६ विषरूपी अग्निच्या उत्कटतेनें ज्यांचें शरीर फार भयप्रद दिसतें असे सर्प त्या पर्वतावर सर्वत्र फिरत असत. परंतु गारुड मण्याच्या पसरलेल्या किरणसमूहाच्या स्पर्शानें ते तत्काल निर्विष होत असत. गारुड मणि सर्पाचें विष नाहींसें करितात. हे मणि तेथें पुष्कळ असल्यामुळें विषारी सर्पही निर्विष सर्पांप्रमाणें तेथील लोकांना वाटत असत. ७ या विजयार्ध पर्वताच्या दक्षिण श्रेणीमध्यें पृथ्वीला सौभाग्यतिलकाप्रमाणें शोभा आणणारी अलका नांवाची नगरी आहे. ही उत्सव व गाणें बजावणें यांच्या शब्दांनीं नेहमीं भरलेली असल्यामुळें इंद्राच्या अमरावती नांवाच्या नगरीप्रमाणें शोभते.

महाशया धीरतरा गभीरा सत्वाधिका सत्पुरुषाब्धितुल्या ।
प्रथीयसी यत्परिखा चकास्ति भंगप्रचारैः परिपूरिताशा ॥ ८ ॥
* सालो विशालः स्फुरदंशुजालः परैरभेद्यो निरवद्यमूर्तिः ।
सतीजनोरःस्थलसाम्यरूपपयोधरालीढसदम्बरश्रीः ॥ ९ ॥

---

* टीप—यत्सालजालः स्फुरदंशुजालः पयोधरप्रोल्लसदम्बरश्रीः ॥
वसन्त्यतीव प्रमदाजनानां मनो नरीहर्ति च निर्जराणां ॥ १४ ॥

यद्गोपुराग्रस्थितसालभंजीकोट्यंतरप्रांतमुपेत्य सम्यक् ।
० विलीयमाना शरदभ्रमाला सदुत्तरीयद्युतिराविभाति ॥ १० ॥
मंदानिलोल्लासितसौधनद्धध्वजोत्करैर्नाकभुवः समंतात् ।
उद्धीकृतात्मीयकरैः स्वशोभामाहूय संदर्शयतीव नित्यं ॥ ११ ॥
* प्रसिद्धमानेन विरोधवर्जिना प्रमिण्वते यद्वणिजो निकामं ।
सत्तार्किका वा सदसद्विचाराद्वस्तुप्रयत्नाद्धि यतः स्ववाचा ॥१२॥

८ या नगरीचा मोठा खंदक स्वतःच्या उसळणाऱ्या लाटांनीं दिशांना भरून टाकीत असून सत्पुरुष व समुद्र या उभयताप्रमाणें शोभत आहे. कारण हा खंदक सत्पुरुष व समुद्र याप्रमाणें महाशय, धीर, गंभीर आणि सत्वाधिक आहे. जसे सत्पुरुष महाशय–असतो अर्थात् उत्तम अभिप्रायाला धारण करितो. व समुद्र महाशय— मोठेपणाला धारण करितो. त्याप्रमाणें हा खंदक ही महाशय होता अर्थात् फार मोठा होता. जसे समुद्र व सत्पुरुष धीर आणि गंभीर असतात त्याप्रमाणें हा खंदक देखिल धीर—स्थिर व गभीर—खोल होता. सत्पुरुष जसा अधिक सत्वधारक—पराक्रम धारक असतो त्याप्रमाणें समुद्र व खंदकही अधिक सत्वधारक—आर्थात् मगर मासे वगैरे जलचर प्राण्यांना धारण करणारे असतात. ९ या नगरीचा विशाल तट पतिव्रता स्त्रीच्या वक्षःस्थलाप्रमाणें लोकांना भासतो. पतिव्रतेचें वक्षःस्थल जसें अन्य पुरुषाकडून स्पर्शिलें जाणें अशक्य असतें व निर्दोष आणि सुंदर असतें त्याप्रमाणें हा तटही शत्रूकडून अभेद्य–छिद्र वगैरेंनीं रहित आहे व चमकणाऱ्या किरणांनीं युक्त आहे. पतिव्रतेचें वक्षःस्थल जसें पयोधरालीढसदंबरश्री असतें अर्थात् दोन स्तनांनीं व उत्तम वस्त्रांनी आच्छादित असतें त्याप्रमाणें हा तटही पयोधरांनीं—मेघांनीं चुंबित झालेल्या आकाशाची शोभा धारण करणारा होता. १० या अलकानगरीच्या वेशीच्या

---

० यद्गोपुराग्रसूत्रामममणिपुत्री विराजते ॥
धृतसूक्ष्मदुकूलेव शारदाबुदमालया ॥ १९ ॥
जी. च. काव्ये तृतीयलंबे समानार्थकाविमौ श्लोकौ ।

* प्रसिद्धेनाविरुद्धेन मानेनाव्यभिचारिणा ॥
वणिजस्तार्किकाश्चापि यत्र वस्तु प्रमिण्वते ॥ १४२ ॥
समानार्थकोऽयं श्लोकः चंद्रप्रभकाव्ये द्वितीयसर्गे ॥

शिखरावर असलेल्या पुतळीच्या वरच्या अवयवावर येऊन तेथें चिकटणारी शरत्कालच्या पांढऱ्या मेघांची पंक्ति उत्तम अशा पांघरण्याच्या वस्त्राची शोभा धारण करिते. ११ मंद वाऱ्यानें हलणाऱ्या अशा राजवाड्यांच्या व जिनमंदिरांच्या पताकारूपी आपल्या उंच केलेल्या हातांनी ही अलकानगरी स्वर्गभूमीला बोलाऊन तिला आपली शोभा जणु नित्य दाखवीत आहे अशी शोभते. १२ ज्यामध्यें विरोध दोष येत नाहीं अशा प्रसिद्ध प्रत्यक्षादि प्रमाणांनी योग्यायोग्य विचार करून उत्तम तर्कज्ञ लोक जसे निर्दोष वस्तूंचें ग्रहण करितात व नियमित निर्दोष वचनांनीं तिच्या स्वरूपाचा निश्चय करितात. त्याप्रमाणें या नगरीतील व्यापारी लोक धान्यादिक पदार्थांच्या योग्यायोग्यतेचा विचार करून ज्यामध्यें विरोध येणार नाहीं अशा प्रसिद्ध मापानी व वजनानीं त्या धान्याची मोजणी करितात व उत्तम तार्किकाप्रमाणें आपल्या शब्दाचा मागचा पुढचा विचार करून प्रयोग करितात.

यत्राकुलीनाः सततं हि तारा दोषाभिलाषाः पुनरेव घूकाः ।
सद्वृत्तभंगोऽपि न गद्यकाव्ये रोधः परेषां सुजनस्य चाक्षे ॥ १३ ॥
दंडो ध्वजे सन्मुरजेषु बंधो वरांगनानां चिकुरेषु भंगः ।
सत्पंजरेष्वेव सदा विरोधो गतावहीनां कुटिलप्रयोगः ॥ १४ ॥
तस्याः पतिर्धैर्यधनः खगेंद्रो महेंद्रलीलो विविधर्द्धिराशिः ।
विद्यावलिप्तोन्नतचारुचेता महाप्रभावोऽथ मयूरकंठः ॥ १५ ॥
सुरक्तसर्वप्रकृतिः प्रतापी नित्योदयोऽपास्ततमःप्रचारः ।
पद्माकरेशो जगदेकदीपो विभाति यो भास्करवत्सदार्च्यः ॥ १६ ॥

१३ या नगरीत नक्षत्रसमूहच फक्त नेहमी अकुलीन होता. इतर कोणताही मनुष्य अकुलीन–नीच कुलांत जन्मलेला नव्हता. नक्षत्रें अकुलीन- अर्थात कुं—पृथ्वी लीन—चिकटलेली अशी नव्हती. ती आकाशांत होतीं म्हणून तींच फक्त अकुलीन होती. या नगरींत घुबडच दोषाभिलाषी होते. इतर दोषाभिलाषी-दोषांची इच्छा करणारे नव्हते. आपण दोषी व्हावें असें तेथें कोणासही वाटत

टीपः—भंग कचेषु नारीणां न व्रतेषु तपस्विनां ॥
विरोधः पंजरेष्वेव न मन सु महात्मनां ॥
इति चंद्रप्रभकाव्ये द्वितीयसर्गे समानार्थक श्लोकः ॥

नसे. दोषा म्हणजे रात्र, अभिलाष म्हणजे तिची इच्छा करणें अर्थात घुबडाला नेहमीं रात्रच असावी, दिवस असू नये असें वाटत असतें. या नगरीत सद्वृत्तभग गद्य काव्यांतच असे. लोकांच्या ठिकाणी सद्वृत्त—उत्तम व्रतें त्यांचा भंग—नाश हा नव्हता. लोक आपल्या अहिंसादि उत्तम व्रतांचा कधींही नाश करीत नसत. गद्य काव्यांतच सद्वृत्तभंग अर्थात् उत्तम अशा शार्दूलविक्रीडित, वसंततिलक वगैरे वृत्तांचा—छंदाचा अभाव होता. या नगरींत शत्रूनाच रोध होता अर्थात् त्यांनाच अडकऊन ठेवीत असत. इतरांना रोध नव्हता. तसेंच सज्जनांचा इंद्रिया-मध्येंच रोध—प्रतिबंध होता. अर्थात् सज्जन आपलीं इंद्रियें ताब्यांत ठेवीत असत. १४ या नगरींत ध्वजाच्या ठिकाणींच दंड होता इतरांना दंड होत नव्हता. बंध मृदंगामध्येच होता. अर्थात् कातड्याच्या वाद्यांनीं मृदंग आवळून बांधला जात असे तेथील लोकांना बंध नव्हता. भंग—भांग हा स्त्रियांच्या मस्तकावरील केशांतच होता. तेथें भंग—नाश नव्हता उत्तम पिंजऱ्यामध्यें विरोध—वि—पक्षी त्यांना रोध-अडकविणें हें होतें. लोकांमध्ये विरोध—द्वेष नव्हता. सर्पाच्या चालण्याच्या पद्धतींतच कुटिलत्व-योग वांकडेपणाचा संबंध होता. तेथील लोकांच्या ठिकाणीं कुटिलत्वयोग—कपटपणाचा संबंध नव्हता. १५ या नगरीचा मयूरकंठ या नांवाचा विद्याधर राजा होता, हा राजा धैर्यरूपी धनानें युक्त होता. इंद्राप्रमाणें क्रीडा करणारा व अनेक प्रकारच्या ऐश्वर्याचा स्वामी होता. अनेक तऱ्हेच्या विद्यांनीं याचें मन सुसंस्कृत झालें असून ते उदार होतें. हा राजा मोठा प्रभावशाली होता. १६ हा श्रेष्ठ पुरुषांना पूजनीय होता. सर्व प्रजाजनांची त्याच्यावर प्रीति होती. नेहमीं याचा उदय असे अर्थात हा नेहमीं उन्नतावस्थेनें युक्त होता व अज्ञानरूपी अंधकाराचा नाश करणारा असल्यामुळे नेहमीं उदय पावणारा, व अंधकाराचा नाश करणारा आणि उदय कालीं आपल्या लाल प्रकाशानें सर्व सृष्टीला आरक्त करणाऱ्या सूर्याप्रमाणे शोभत होता. सूर्य जसा पद्माकरेश—कमलसमूहांचा पति व जगाचा अद्वितीय दीप असतो त्याप्रमाणें हा राजाही पद्माकरेश अर्थात् संपत्ति समूहाचा अधिपति व जगाला अपूर्व दिव्यासारखा होता. दिव्याप्रमाणें हा लोकांना सन्मार्ग दाखवीत असे.

अपास्तपद्मा कमलेव कांतिर्गृहीतमूर्तिः स्वयमागतेव ।
रतिःस्मरस्येव बभूव देवी मनोहरांगी कनकादिमाला ॥१७॥
जंघामृदुत्वेन हता नितांतं विसारतां सत्कदली प्रयाता ।
पयोधराभ्यां विजितं च यस्या मालूरमास्ते कठिनं वनांते ॥१८॥

× नेत्रोत्पलाभ्यामनवाप्य यस्या नीलोत्पलं सत्परिभूयमानं ।
सरस्यगाधे पतितं प्रगत्य निकारसंतापनिरीषयेव ॥१९॥
यद्वक्रसंस्थामनवाप्य शोभां शशी समग्रोऽपि कलंकितोऽभूत् ।
प्रभिन्नमातंगगतेस्तु तस्याः केनोपमानं समुपैति कांतिः ॥२०॥
तस्यामभूत्प्रीतिरनन्ययोग्या खगेशिनः सद्गुणभूषितायां ।
कलानिधौ निर्मलशीलवत्यां मनोहरे को न हि सक्तिमेति ॥ २१ ॥
दिवः पतिर्योऽथ विशाखनंदी बभूव पुत्रः कमनीयमूर्त्योः ।
सद्भारतार्द्धस्य पतिं प्रहृष्टः सांवत्सरस्तं सहसा दिदेश ॥२२॥
क्रांतापि यद्गर्भमहाभरेण महाजिगीषामकृत त्रिलोक्यां ।
दिवाकरे याप्युपरि प्रयाते क्रुध्यत्त्यरं स्मारुणिकाननाक्षी ॥२३॥
देहीतिशब्देन विवर्जिता भूरकारि राज्ञा सुतजन्मकाले ।
सानंदवादित्रसुगीतनादैः शब्दात्मकं व्योमतलं समस्तं ॥२४॥

१७ या मयूरकंठ विद्याधर राजाची मनोहर अवयवांना धारण करणारी कनकमाला नांवाची मुख्य राणी होती. ही कमलामध्यें निवास करणे जिनं सोडून दिलें आहे अशा लक्ष्मीप्रमाणे, किंवा सौंदर्यानें आपले स्वरूप लोकांना दाखवावें म्हणून तें शरीर धारण करून आले आहे अशी अथवा ही मदनाची स्त्री जणू रति आहे अशी शोभत असे. १८ या राणीच्या मांड्याच्या मृदुपणानें पराजित झालेली सुंदर केळी निःसार झाली. व हिच्या दोन स्तनांच्या द्वारे जिंकले गेलेले कठिण वेलाचे फळ वनांत जाऊन राहूं लागले. १९ या राणीच्या सुंदर नेत्ररूपी कमलाची कांति प्राप्त न झाल्यामुळें स्वत चा पराभव झाला असें समजणारें नीलकमल पराभवाचें दुःख नाहींसें करण्याकरितां अगाध सरोवरामध्यें जाऊन पडलें. २० या राणीच्या मुखावर असलेली शोभा स्वत ला मिळाली नाहीं म्हणून पूर्ण देखील चंद्र कलंकयुक्त झाला ज्याच्या गंडस्थलांतून मद वाहात आहे अशा मत्त हत्तीप्रमाणें जिची गति आहे अशा या राणीची कांति कोणत्या पदार्थांच्या द्वारें

---

× विलुप्तशोभानि विलोचनोत्पलैः सितेतराण्यम्बुरुहाणि योषिताम् ।
मरुच्चलद्वीचिनि यत्र शीतले लुठन्ति तापादिव दीर्घिकाजले ॥३६॥
चन्द्रप्रभचरितकाव्य प्रथमसर्ग समानार्थक श्लोक. ॥

उपमित केली जाईल. अर्थात् या राणीचें अंगसौंदर्य अनुपम होतें. २१ सद्गुणांनीं शोभणारी, निर्मल पतिव्रता, गुणानें युक्त असलेली, गायन वादन वगैरे अनेक कलांनीं परिपूर्ण असलेली अशा या राणीच्या ठिकाणीं राजाचें असाधारण प्रेम होतें. बरोबरच आहे कीं, मनोहर पदार्थामध्यें कोण आसक्त होत नाहीं बरें ? २२ दहाव्या स्वर्गात देव होऊन जन्मलेला तो विशाखनंदी सुंदर शरीर धारण करणाऱ्या या राजा राणींना पुत्र होऊन जन्मला. त्याच्या जन्मकालीं ज्योतिषीनें हा अर्ध्या भरत क्षेत्राचा पति होईल असें आनंदित होऊन सांगितलें. २३ ज्याच्या गर्भाच्या ओझ्यानें भारावलेली ही राणी त्यावेळीं त्रैलोक्याला जिंकण्याची इच्छा करीत होती व सूर्य वरून जात असतां त्याच्यावरही ही राणी डोळे व तोंड लाल करून क्रुद्ध होत असे. २४ मयूरकंठ राजानें या पुत्राच्या जन्मकाळीं पृथ्वी 'देहि' या शब्दानें रहित केली. अर्थात् याचक लोकांना इतकें दान दिलें कीं, त्यांनीं 'देहि' म्हणजे दे असें म्हणण्याचें सोडून दिलें. तसेंच त्यावेळीं आनंदवाद्यांच्या शब्दांनीं व मंगल गाण्यांच्या शब्दांनीं सर्व आकाश शब्दमय झालें.

विधाय पूजां महतीं जिनानामनुज्ञया गोत्रमहत्तराणां ।
तेजस्विनः खेचरपुंगवोऽसौ चकार सूनोर्हयकंधराख्यां ॥ २५ ॥
पद्माप्रियः कोमलशुद्धपादो नेत्रोत्पलानंदकरो जनानां ।
कलाकलापं समवाप्नुवानो दिने दिनेऽवर्धत बालचंद्रमाः ॥ २६ ॥
अन्येद्युरादाय सिताक्षसूत्रं पर्यंकमास्थाय गुहोदरस्थः ।
ध्यानं न यावद्वितताम सम्यक् विद्यागणस्तावदभूत्तदग्रे ॥ २७ ॥
कृतार्थतामेत्य सुराचलस्य जिनालयान्सानुगतान्प्रणम्य ।
प्रदक्षिणीकृत्य च पांडुकाख्यां शिलां प्रपूज्येत्य गृहं विवेश ॥२८॥
चक्रं सहस्रारममोघशक्तिं दंडं सखड्गं सितमातपत्रं ।
प्रापाधिपत्यं भरतार्धलक्ष्म्याः पुण्योदयात्साध्यमहो न किं स्यात् ॥२९॥
अष्टासहस्राणि षडाहतानि नितंबिनीनां ललितस्मितानां ।
बभूवुरत्यंतमनोहराणां प्रोत्तुंगपीनस्तनराजितानाम् ॥ ३० ॥
स संयुतः षोडशभिः सहस्रैर्महीभुजामुन्नतसाहसानां ।
विद्याप्रभावप्रथितोन्नतानां चकार राज्यं करदीकृताशः ॥ ३१ ॥

अथ भारतेऽस्ति विषयोऽत्र वहन्सुरमाभिधां सुरनिवाससमः।
विविधोऽपि कांतिनिवहो जगतः स्वयमेकतां गत इवाप्रतिमः॥३२॥
सरसाः समुन्नततया सहिताः स्वयमार्थिभिः परिगृहीतफलाः।
अभवन्नधःकृतसमस्तजनास्तरवोऽपि यत्र सह सत्पुरुपैः॥ ३३ ॥
अटवीषु यत्र सरसां सरसैर्नलिनीदलैः पिहिततीरजलं।
सहसा पपौ न तृषितापि मृगी गरुडोपलस्थलविमूढमतिः॥ ३४॥

२५ वंशांतलि वृद्ध माणसांच्या संमतीनें विद्याधरांमध्यें श्रेष्ठ अशा या राजानें जिनेश्वरांची मोठी पूजा करून तेजांचा साठा असलेल्या या मुलाचें ‘ हयकंधर ’ असें नांव ठेविलें. अर्थात् ‘ अश्वग्रीव ’ असें नांव ठेविलें. २६ जसा वालचंद्र लक्ष्मीचा आवडता असतो, कोमल व निर्मल किरणांनीं युक्त असतो व कमलांना आनंदित करितो व कला समूहांना प्राप्त करून घेऊन दररोज वाढत जातो तसा हा वालकरूपी चंद्र लक्ष्मीचा आवडता, कोमल व निर्मल पायांनीं शोभणारा, लोकांच्या नेत्ररूपी कमलांना आनंदित करणारा व अनेक तऱ्हेच्या कलांची प्राप्ति करून घेणारा होत्साता दररोज वाढूं लागला. २७ एके दिवशीं पांढरी जपमाळ घेऊन व गुहेमध्यें पद्मासनानें बसून चांगल्या रीतीनें ध्यान करावयाला सुरवात करणार तोंच सर्व विद्यांचा समुदाय त्याच्या पुढें उभा राहिला. २८ विद्यांच्या प्राप्तीनें कृतार्थ होऊन तो मेरुपर्वताच्या शिखरावर असलेल्या जिनमंदिरांना नमस्कार करून व पांडुकाशिलेला प्रदक्षिणा देऊन व तिचें पूजन करून आपल्या घरीं आला. २९ या हयग्रीवाला ज्याला हजार आरे आहेत असें चक्र, निष्फळ न होणारे शक्ति नांवाचें आयुध, दंडरत्न, खड्गरत्न व पांढरे छत्र हीं रत्नें प्राप्त झालीं. व अर्ध्या भरत क्षेत्राच्या लक्ष्मीचें प्रभुत्व प्राप्त झालें. वरोवरच आहे कीं, पुण्याच्या उदयानें या जगांत कोणती गोष्ट साध्य होत नाहीं वरें ? ३० ज्या उंच व कठिन स्तनांनी शोभतात, ज्यांचें हंसणें फार मधुर आहे अशा अठ्ठेचाळीस हजार अत्यंत मनोहर स्त्रिया याला होत्या. ३१ विद्यांच्या प्रभावानें जे प्रसिद्ध अशा उन्नतीप्रत पोहोचले आहेत व जे अतिशय साहसी आहेत अशा सोळा हजार राजांनी युक्त होऊन व सर्व दिशांना कर द्यावयास भाग पाडून हा हयकंधर अर्ध चक्रवर्ती राज्य करूं लागला.

३२ या भरतक्षेत्रांत स्वर्गासारखा सुंदर सुरमा या नांवाचा एक देश आहे. नानाप्रकारचें जगाचे सौंदर्य जणु एकत्र होऊन हा अनुपम देश उत्पन्न झाला आहे

असें याला पाहणाऱ्यांस वाटत असे.३३ जसें सत्पुरुष प्रीतियुक्त, उन्नतीनें सहित व स्वतः याचक लोक ज्यांच्यापासून इच्छित पदार्थ घेतात असे व सर्व लोकांना खालीं करणारे अर्थात् सर्व लोकांमध्यें आपली श्रेष्ठता कायम ठेवणारे असे असतात त्याप्रमाणें येथील वृक्ष देखिल सत्पुरुषाप्रमाणें सरस, उंचीनें सहित व ज्यांचीं फळें सर्व लोक स्वतःच ग्रहण करितात असें व सर्वांना आपल्या छाये-खालीं आश्रय देणारे असे होते. ३४ या देशांतील जंगलांमध्यें सरोवरांच्या किनाऱ्यांचें पाणी सरस अशा कमलपत्रांनीं आच्छादिलेलें असल्यामुळें हें गरुड-मण्यांनीं बनलेलें स्थळ आहे अशी जिला भ्रांति झाली आहे अशी हरिणी तहानेनें युक्त होऊन देखील एकदम तें पाणी पीत नसे.

सुपयोधराः सपुरलोलदृशः सकलाश्च यत्र तनुवीचिभुजाः ।
अपि लोकसेवितानितंबभुवः सरिदंगना बभुरपंकतया ॥ ३५ ॥
अनपेतपुष्पफलचारुकुजैर्निचितैः सुधाधवलसौधचयैः ।
निगमैः समुज्ज्वलनिवासिजनैरधरीचकार च कुरूनपि यः ॥ ३६ ॥
पुरमस्ति पोदनमिति प्रथितं पृथु तत्र वैबुधसमूहचितं ।
अधरीकृतान्यनगरं स्वरुचा नभसोऽवतीर्णमिव शक्रपदं ॥ ३७ ॥
रजनीषु यत्र सदनाग्रभुवो मणिदर्पणामलरुचो व्यरुचन् ।
प्रतिमागतैरुडुगणैः परितो नवमौक्तिकैरिव विकीर्णतलाः ॥ ३८ ॥
परिवारितो धवलवारिधरैर्बहुभूमिकः स्फटिकसौधचयः ।
सकलां दधावुदितपक्षततेस्तुहिनाचलस्य भुवि यत्र रुचिं ॥ ३९ ॥
सरसीषु यत्र च शिरीषनिभास्तटबद्धगारुडमणिद्युतयः ।
अतिसंदधुः समदहंसवधूर्नवशैवलाशनकुतूहलिनीः ॥ ४० ॥
सदनाग्रलग्नहरिनीलरुचां पटलेन सामिपिहितं ददृशे ।
वपुरैंदवं युवतिभिः सहसा निशि यत्र राहुपरिदष्टमिव ॥ ४१ ॥
ललनामुखांबुरुहगंधवहो गृहदीर्घिकातनुतरङ्गभवः ।
भ्रमति स्म यत्र पवनः सततं गणयन्निव ध्वजदुकूलपटान् ॥ ४२ ॥
रविमंडलं विमलरत्नभुवि प्रतिबिंबितं सपदि मुग्धवधूं ।
तपनीयदर्पणधिया दधतीमवलोक्य यत्र च जहास सखी ॥ ४३ ॥

३५ या सुरम्य देशांतील सर्व नद्या व सर्व स्त्रिया समान शोभेला धारण करीत असत. तें याप्रमाणें—स्त्रिया सुपयोधरा–उत्तम स्तनांनीं युक्त होत्या व नद्या सु उत्तम–पयोधरा–पाण्याला धारण करणाऱ्या होत्या. स्त्रिया तनुवीचि भुजाः—अर्थात् कृश लहरीप्रमाणें बाहूंना धारण करीत असत व नद्या बारीक लाटारूपी बाहु धारण करीत असत. स्त्रिया अपंकतया म्हणजे पापरहित असल्या मुळें लोकसेवितनितंबभुवः—त्यांच्या पतिकडून ज्यांचे मध्यभाग उपभोगले गेले आहेत अशा होत्या व नद्या अपंकतया–चिखलरहित असल्यामुळें त्याही लोक सेवितनितंबभुवः म्हणजे लोकांकडून ज्यांचा तटभाग सेविला जात आहे अशा होत्या. ३६ सुंदर फुलें व फळें यांनी लकडून गेलेल्या वृक्षांनीं, अमृताप्रमाणें शुभ्र असलेल्या श्रीमंतांच्या वाड्यांच्या समूहांनीं, व स्वरूपसुंदर अशा मनुष्यांनीं सुंदर दिसणाऱ्या हजारो गांवांनीं हा देश भरलेला होता. म्हणून अशा अपूर्व सौंदर्याच्या द्वारें या देशानें देवकुरु व उत्तरकुरु या भोगभूमींनाही तुच्छ लेखलें होतें. ३७ या देशांत स्वतःच्या शोभेनें इतर शहरांना तुच्छ समजणारें असें पोदन-पुर नांवाचें राजधानींचें शहर जणु आकाशांतून इंद्राचें निवासस्थान–स्वर्गच येथें अवतरलें आहे अशी भ्रांति उत्पन्न करणारें होतें. कारण हीं दोनहीं वैबुधसमूह-चित होतीं. अर्थात् स्वर्ग देवसमूहांनीं भरलेला होता व हें शहर वैबुधसमूहचित–विद्वान लोकांच्या समूहानें भरलेला होता. ३८ या शहरांत वाड्यांचे वरचे भाग रत्नदर्पणाप्रमाणें निर्मल कांतीनें युक्त होते. रात्रीं सर्व बाजूंनीं प्रतिबिंबित झालेल्या नक्षत्रसमूहांनीं हे वरचे भाग नवीन मोत्यांच्या समूहांनी व्याप्त झाल्याप्रमाणें शोभत असत. ३९या शहरांत शुभ्र मेघांनीं वेढलेल्या व पुष्कळ मजल्यांनी युक्त अशा शुभ्र राजवाड्यांच्या समूहांनीं, ज्याला पंख फुटले आहेत अशा हिमालयाच्या संपूर्ण शोभेला या जगांत धारण केले. ( पूर्वीं पर्वतांना पंख होते पुढें तें इंद्रानें वज्रानें तोडून टाकिले अशी हिंदु लोकांच्या पुराणांत कथा आहे. तो अभिप्राय घेऊन येथें उपर्युक्त कल्पना केली आहे. ) ४० या शहरांतील तळ्यांच्या तटाला लावलेल्या पांच रत्नांच्या शिरीष पुष्पाप्रमाणें कोमल व हिरण्यागार कांति पाहून हें नवीन शेवाळ आहे असें समजून तें खाण्यास उन्मत्त हंसी कौतुकयुक्त होऊन जात असत. परंतु खाण्याचा प्रयत्न करीत असतां त्यांची फसगत होत असे. ४१ या शहरांत वाड्यांच्या गच्चीला लावलेल्या नीलरत्नांच्या कांतिसमूहानें अर्धें आच्छादिलें गेलेलें चंद्राचें बिंब रात्रीं अकस्मात् पाहात असतां स्त्रियांना तें राहूनें ग्रासल्याप्रमाणें वाटत असें. ४२ स्त्रियांच्या मुखकमलांतून निघालेल्या सुगं-

धाला धारण करणारा व घरांतील विहीरींच्या कृश तरंगापासून उत्पन्न झालेला वारा या शहरांतील ध्वजांच्या रेशमी पतकांना मोजीत जणू वाहात असे. ४३

या शहरांत रत्नांनीं बनविलेल्या स्वच्छ जमीनींत प्रतिबिंबित झालेलें सूर्यमंडल पाहून हें सोन्याचें दर्पण आहे असें समजून, ते घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या एका अज्ञान स्त्रीला बघून तिची मैत्रीण हसूं लागली.

समकारयन्न परिखावलयं न च यत्र शालमपि बाहुबली ।
प्रतिपक्षभीतिपिशुनेन सता किमनेन कृत्यमिति मानधनः ॥ ४४ ॥
सकलावनीशमुकुटाग्रमणीद्युतिमंजरीजटिलितांघ्रियुगः ।
तदलंचकार पुरमप्रतिमो नृपतिः प्रजापतिरिति स्वगुणैः ॥ ४५ ॥
महतां वरे सकलसत्वचयस्थितिराजिते प्रविमलात्मगुणे ।
श्रियमाप यत्र कमलाप्यपरां वियति स्थिता निशि कलेव विधोः॥४६॥
स्थिरसंगतो विनयसारधनो नयवर्त्मनि स्थितविशुद्धमतिः ।
स्ववशीकृताक्षहृदयप्रसरो विरराज यः स्वयमपि प्रशमः ॥ ४७ ॥
उरुपौरुषं रिपुषु साधुषु च प्रणयं प्रजासु च नयं विनयं ।
गुरुषु श्रियं च विनतेषु परां प्रथयांबभूव भुवि यः सततं ॥४८॥
प्रतिपद्य भूपतिरुभे शुशुभे धृतिसाधुते इव गृहीततनू ।
ललने स्वकांतिविजिताप्सरसौ स जयावतीं मृगवतीं च विभुः॥४९॥
स्ववशं विनिन्यतुरनन्यसमे सममेव ते निजमनोज्ञतया ।
तमिलाधिनाथमरविंदलया श्रुतदेवते स्वयमिव प्रगटे ॥ ५० ॥
स विशाखभूतिरवतीर्य दिवस्तनयोऽजनि क्षितिपतेर्विजयः ।
स जयावतीप्रमदहेतुरभूत् भुवि यः पुरापि मगधाधिपतिः ॥५१॥
सकलः शशीव विमलं गगनं कुसुमोद्गमो महदिवोपवनं ।
भुवि विश्रुतं श्रुतमिव प्रशमस्तदलंचकार स कुलं धवलः ॥ ५२ ॥

४४ ज्याच्या बाहुमध्यें विपुल बल आहे अशा स्वाभिमानरूपी धन नेहमीं जवळ बाळगणाऱ्या राजानें या नगरीच्या सभोंवती खंदक व तट ही बनविला नाहीं. हे बनविले असतां शत्रूंची भीति मनांत आहे हें सूचित होतें. यास्तव यापासून

कोणता फायदा आहे असें त्यास वाटत होतें. ४५ संपूर्ण राजांच्या किरीटांच्या अग्रभागीं असलेल्या रत्नकांतीच्या समूहांनीं ज्याचे दोन पाय व्याप्त झाले आहेत अशा प्रजापति नांवाच्या अनुपम राजानें प्रजेचे पालन करणें, दुष्टांना शिक्षा देणें व शिष्टांवर अनुग्रह करणें या आपल्या गुणांनीं 'प्रजापति' हें नांव सार्थक करून या शहराला अलंकृत केलें होतें. ४६ हा प्रजापति राजा सज्जनामध्यें श्रेष्ठ होता, संपूर्ण प्राण्यांना त्यांच्या त्यांच्या मर्यादेंत यानें ठेविलें होतें. याचे सर्व गुण फार निर्मळ होते. जशी आकाशांत राहणारी चंद्रकला चंद्राला प्राप्त करून अधिक शोभते त्याप्रमाणें या राजाचा आश्रय करून लक्ष्मीला अपूर्व शोभा आली होती. ४७ हा राजा धैर्यानें युक्त होता, विनयरूपी उत्कृष्ट धन याचे जवळ होतें, न्यायमार्गामध्यें याची बुद्धि नेहमीं स्थिर राहात असे यानें आपलीं इंद्रियें व मनाचे व्यापार वश केले होते. यामुळे हा राजा स्वतः प्रशमरूपच आहे असा शोभू लागला. अर्थात् हा शांततेचा अवतारच आहे असें लोकांना वाटत असे. ४८ या राजानें शत्रूवर पुष्कळ शौर्य गाजविलें होतें. हा सत्पुरुषावर फार प्रेम करितो अशी याची सर्वत्र प्रसिद्धी झाली होती. प्रजेला योग्य न्याय देण्यामध्यें हा प्रसिद्ध झाला होता. वडिलांविषयीं विनयगुण दाखविणें व नम्र झालेल्यांना विपुल संपत्ति देणें याविषयी याची सर्वत्र प्रसिद्धि झाली होती. ४९ ज्यांनीं आपल्या सौंदर्यानें देवांगनांना जिंकिलें आहे अशा जयावती व मृगवती अशा दोन राण्या या राजाला होत्या. यांच्या योगें राजाला फार शोभा आली होती. धीरता व सज्जनता यांनीं शरीर धारण करून या दोघी राण्यांच्या रूपानें पृथ्वीवर जणु अवतार घेतला आहे असा यांना पाहून लोकांना भास होत होता. ५० या दोघी राण्या स्वतः लक्ष्मी व सरस्वती जणु प्रगट झाल्या आहेत अशा दिसत होत्या. लोकोत्तर अशा या दोघींनी आपल्या सौंदर्यानें राजाला समान रीतीनें वश केलें होतें. ५१जो पूर्वीं मगध देशाचा राजा विशाखभूति म्हणून होता व नंतर जो तप करून दहाव्या महाशुक्र स्वर्गांत देव झाला होता, तो या राजाला विजय या नांवाचा पुत्र होऊन जन्मला. हा जयावतीला ( आपल्या मातेला ) फार आनंदाचें कारण झाला. ५२ जसा पूर्ण चंद्र निर्मळ आकाशाला सुशोभित करितो, पुष्पांचा बहार बगीचास शोभा आणतो, शांतता गुण उत्तम शास्त्रज्ञानाला भूषित करितो त्याप्रमाणें शुभ्र वर्णाच्या या विजय राजपुत्रानें आपल्या वंशास शोभा आणिली.

अवनिं प्रसाधयितुमेव दिवस्तमथागतं मृगवती विबुधं ।
उदरेण निर्मलमलं प्रदधौ प्रथमांबुबिंदुमिव शुक्तिवधूः ॥५३॥

उदरस्थितस्य यशसेव युतं परिपांडुतामुपययौ वदनं ।
असहद्भिसोढुमिव तद्गुरुतां तनुतां तदीयमगमञ्च वपुः ॥५४॥
समभूदरातिकमलालयया स्तनयोर्युगं सह सुनीलमुखं ।
ववृधे तदीयमुदरं च मुदा प्रतिवासरं सह समग्रभुवा ॥५५॥
अवलोक्य तां प्रथमगर्भवतीं दधतीं निधानमिव सारमिलां ।
उदयाचलांतरितशीतकरं रजनीमिव क्षितिपतिर्मुमुदे ॥५६॥
कृतचारुदोहृदविधिः क्रमतः समये सुतं मृगवती सुषुवे ।
निलयं श्रियो विपुलगंधयुतं शरदीव पद्ममुकुलं नलिनी ॥५७॥
अथ हृष्टिवृद्धिरुदपादि तदा सकलेऽपि तत्र नगरे महती ।
परितश्च पंचविधरत्नमयी निपपात वृष्टिरमला नभसः ॥५८॥
अनवद्यवाद्यलयतालसमं प्रणनर्त वारवनिताभिरमा ।
नृपमंदिरेऽपि शिखिनां निवहः किमुतान्यदुत्सवनिविष्टमनाः ॥५९॥
स्वयमाददे निजमनोऽभिमतं सहसा वनीपकजनने धनं ।
अपहाय लांछनमिलाधिपतेर्धवलातपत्रमितरत्सकलम् ॥६०॥
गणकस्त्रिकालविदनुच्चतनुः प्रथितो वर्त्तत इति दिग्वलये ।
स्फुटमादिदेश नृपतेः स्वसुतो भविताऽर्द्धचक्रधर एष इति ॥ ६१ ॥
स्वकुलोचितां जिनपतेर्महिमां महतीं विधाय विधिना नृपतिः ।
अकरोत्त्रिपृष्ट इति नाम मुदा तनयस्य तस्य दशमे दिवसे॥६२॥
शरदंबरद्युतिमुषा वपुषा स शनैः शनैः कठिनतामुपयन् ।
परिरक्षया नरपतेर्ववृधे जलधेरमूल्य इव नीलमणिः ॥ ६३ ॥

५३ जशी शिंप निर्मल अशा पहिल्या थेंबाला धारण करिते त्याप्रमाणें पृथ्वी साध्य करण्याकरितांच स्वर्ग लोकापासून आलेल्या अतिशय निर्मल अशा त्या देवाला—विश्वनंदीच्या आत्म्याला ( जो दहाव्या महाशुक्र स्वर्गांत होता. ) मृगवती राणीने आपल्या उदरानें धारण केलें. अर्थात् तो देव या राणीच्या गर्भांत आला. ५४ उदरांत येऊन राहिलेल्या या देवाच्या कीर्तीनें जणु युक्त झालेलें मृगवती राणीचें तोंड पांढरें फटफटित झालें. व गर्भाच्या महत्वाला जणु

सहन न करणारें तिचें शरीर त्यावेळीं कृश झालें. ५५ शत्रूच्या राजलक्ष्मीसह या राणीच्या दोन स्तनाचे अग्रभाग नील वर्णाचे झाले. व तिचें पोट प्रतिदिवशीं सर्व पृथ्वीसह आनंदानें वाढूं लागलें. ५६ उत्कृष्ट रत्नादिकांच्या निधीला जशी पृथ्वी धारण करिते अथवा उदयाचलाच्या आड असलेल्या चंद्राला रात्र जशी धारण करिते तसें प्रथमगर्भाला धारण करणाऱ्या मृगवती राणीला पाहून राजा फार आनंदित झाला. ५७ जिचे सुंदर डोहाळे पूर्ण केले आहेत अशा या मृगवती राणीनें शरदृतुमध्यें कमलिनी जशी अतिशय सुगंधित व लक्ष्मीचें निवासस्थान असलेल्या कमलाला प्रसवते तसें अतिशय मानी व लक्ष्मीचें घर असलेल्या अशा पुत्राला जन्म दिला. ५८ राजाला मुलगा झाला म्हणून त्या सर्व नगरांतील लोकांना फार आनंद झाला. व अकाशांतून पांच प्रकारच्या निर्मल रत्नांची वृष्टि सर्व बाजूनीं होऊं लागली. ५९ राजवाड्यांत निर्दोष वाद्यांच्या ठेक्यावर व थांबण्याच्या त्या त्या वेळीं वेश्यासह मोरांचा समूह देखिल आनंदानें बेहोप होऊन नृत्य करूं लागला. मग इतर लोक नृत्य करीत होते यांत आश्चर्य तें कोणतें? ६० राजाचें चिन्ह असलेलें, अर्थात् ज्यानें राजाला ओळखतां येतें असें राजचिन्ह असलेलें श्वेतच्छत्र फक्त सोडून म्हणजे तें न घेतां याचक लोकांनीं आपल्याला आवडत्या अशा सर्व वस्तु निःशंकपणें राजाला न विचारतां घेतल्या. अर्थात् राजानें याचकांना पुष्कळ द्रव्य दिलें. ६१ सर्व दिशामध्यें प्रसिद्ध असलेला, गर्वरहित, भूत, भविष्य व वर्तमान जाणणारा अशा वसंत नांवाच्या ज्योतीषीनें हा मुलगा खालीने अर्ध चक्रवर्ती अर्थात् त्रिखंडाधीश होईल असें स्पष्टपणें राजाला सांगितलें. ६२ प्रजापति राजानें आपल्या कुलाला साजेल अशी जिनेश्वराची मोठी पूजा शास्त्रोक्त पद्धतीनें केली व दहाव्या दिवशीं आनंदानें त्या मुलाचें त्रिपृष्ट असें नांव ठेविलें. ६३ जसा समुद्राचा अमूल्य असा नीलमणि हळूहळू वाढून कठिनपणाला पावतो तसें शरत्कालच्या नील आकाशाच्या शोभेला हरण करणाऱ्या अशा शरीरानें कोमलपणा त्यागून दृढता धारण करणारा तो त्रिपृष्ट कुमार उत्तम रीतीनें रक्षण केल्यामुळे हळूं हळूं वाढू लागला.

सुतरामशिक्षत कलाः सकलाः नृपविद्यया सममनन्यमतिः ।
गुणसंग्रहे जगति यत्नपरः शिशुरप्यहो भवति सत्पुरुपः ॥ ६४ ॥
तमवाप्य यौवनमवाप परां श्रियमेत्य सोऽपि तदभूत्सुभगः ।
प्रथमं प्रसूनमिव चूततरुं स च संप्रपद्य समये तदिव ॥ ६५ ॥

अतिमानुषं तमथ वर्म्मधरं जयगामिनी प्रथममप्रकटं ।
स्वयमालिलिंग मदनाकुलधीरभिसारिकेव हृदयाभिमतं ॥ ६६ ॥
अथ भूपतिः सुतयुगेन समं सह राजकेन च सभाभवने ।
सुखमेकदास्त हरिपीठतटे घटितारुणाश्मकिरणांकुरितेः ॥६७॥
परिकुड्मलीकृतकरांबुरुहः प्रणिपत्य देशसचिवो विदितः ।
उपलब्धवागवसरप्रसरः क्षितिपं व्यजिज्ञपदिति प्रकटं ॥ ६८ ॥
अभिरक्षितामपि तवासिलताशितधारया धरणिनाथ ! धरां ।
परिबाधते मृगगणाधिपतिर्बलवानहो जगति कर्मरिपुः ॥६९॥
स्वयमेव किं हरिपदेन यमो जनतां हिनस्त्युत महानसुरः ।
तव पूर्वशत्रुरथवा विबुधो न हि तादृशी मृगपतेर्विकृतिः ॥७०।
सुतयोषितोऽध्वनभिवीक्ष्य भयात्प्रपलायितं सकलजानपदैः ।
तव शात्रवैरिव शरीरभृतां न हि जीवितादपरमिष्टतमं ॥७१॥
स निशम्य तस्य वचनेन तदा विषयव्यथामिति मृगेंद्रकृतां ।
नृपतिस्ततान हृदये नितरां मृदुनोत्यहो खलु जगद्व्यसनं ॥७२॥
दशनांशुमंडलनिभेन किरन् हृदयस्थितामिव कृपाममलां ।
निजगाद धीरस्वरुद्धसभाभवनोदरं नरपतिर्वचनं ॥ ७३ ॥

६४ या त्रिपृष्टराजकुमारानें एकाग्रचित्त होऊन राजविद्यांसह सर्व कलांचे शिक्षण घेतलें. बरोबरच आहे कीं, या जगांत गुणांचा संग्रह करण्यांत एखादा बालकही जर तत्पर असला तर त्यासही सत्पुरुष म्हणावयास हरकत नाहीं. तात्पर्य हें कीं, बालपणीं त्रिपृष्ट राजकुमारानें उपर्युक्त गुणाचा सग्रह केला म्हणून तो सत्पुरुष होता असें म्हणणें योग्य होतें. ६५ वसंतऋतुमध्यें प्रथमतः आम्रवृक्षाला मोहोर प्राप्त होऊन तो जसा शोभतो व आम्रवृक्ष मोहोर प्राप्त करुन घेऊन जसा शोभूं लागतो. तसे या त्रिपृष्टाच्या आश्रयाने तारुण्याला फार शोभा आली व तारुण्यानें त्रिपृष्ट फार शोभूं लागला. असा उभयतामध्यें भूष्यभूषणभाव होता. ६६ जशी एखादी कामाकुल झालेली स्वैरिणी स्त्री संकेतस्थानीं जाऊन आपल्या इच्छित पुरुषाला आलिंगन देतें तसे लोकोत्तर बलाला धारण करणारा, व चिलखत धारण करण्यास योग्य अशा वयाचा झालेला या राजपुत्रास उत्कंठित

जयलक्ष्मीनें अप्रगट रूपानें आलिंगन दिले. ६७ तदनंतर एके दिवशीं बसविलेल्या पद्मराग मण्यांच्या किरणांचे अंकुर ज्यांतून बाहेर निघत आहेत अशा सिंहासनावर सभेंत आपल्या दोन मुलांसह व सर्व सरदार मंडळीसह राजा सुखानें बसला होता. ६८ त्यावेळीं त्या प्रांतांतल्या एका प्रसिद्ध प्रधानानें आपले हातरूपी कमलांस कळी प्रमाणें करून व नमस्कार करून बोलण्याची योग्य संधि प्राप्त झाल्यावर राजास पुढें लिहिल्याप्रमाणें स्पष्ट विनंति केली. " ६९ हे पृथ्वीनाथ ! आपल्या तरवारीच्या तीक्ष्ण धारेनें या पृथ्वीचें चांगलें रक्षण होत आहे व झाले आहे. परंतु एक बलवान सिंह आपल्या प्रजेला फार त्रास देत आहे. अहो जगामध्ये कर्मरूपी शत्रु फार बलवान आहे. ७० हे प्रभो ! यमच जणु स्वतः सिंहाच्या मिषानें प्रजेचा संहार करीत आहे ? अथवा कोणी महान् असुर हे कार्य करीत आहे ? किंवा आपल्या पूर्व जन्माचा शत्रु असलेला कोणी देव प्रजेला त्रास देत आहे ? हे कांहीं समजत नाहीं. वास्तविक इतकें मोठें संहाराचें कार्य सिंहाकडून होणें शक्य नाहीं. देशांतील लोकांना सिंहापासून इतकी भीति वाटू लागली आहे कीं, हे नाथ ! आपले शत्रू जसे बायका पोरांची पर्वा न बाळगतां भीतीनें आपणापासून पळून जातात तसे बायका पोरांना न पाहतां आपण गेल्यावर त्यांची काय स्थिति होईल इकडे लक्ष्य न देतां ते पळून गेले आहेत. बरोबरच आहे कीं, जगामध्यें, आपल्या जीवितापेक्षां कोणतीही वस्तु अत्यंत आवडती नाहीं. " ७२ सिंहापासून आपला देश किती पीडित झाला आहे याची हकीकत प्रधानजींच्या भाषणावरून ऐकण्यांत आल्यानें राजाला मनांत फारच दुःख झालें. बरोबरच आहे कीं, संकटें हीं नेहमीं जगाला दुःख करीत असतातच. ७३ दंतकिरणांच्या पंक्तीच्या मिषानें जणु आपल्या हृदयांत असलेली निर्मळ दया बाहेर प्रगट करणारा तो प्रजापति राजा आपल्या गंभीर शब्दांच्या द्वारें सभागृहाच्या सर्व मध्यभागाला व्याप्त करून पुढें लिहिल्याप्रमाणें बोलूं लागला.

भुवि सस्यरक्षणविधौ विहितस्तृणमानुषोऽपि मृगभीतिकरः ।
अगमं ततोऽपि भृशमप्रभुतां करदीकृताखिलमहीभृदपि ॥ ७४ ॥
अविनाशयन्प्रतिभयं जगतो जगताधिपत्यमथ यः कुरुते ।
स वृथैव चित्रगतभूपतिवत्प्रविलोक्यते जनतया नतया ॥ ७५ ॥
मनुवंशजेऽपि सति भूमिपतौ समभूत् क्षितौ प्रकटभीतिरिति ।
अयशस्तनोति सकलाः ककुभः किमिदं न संप्रति हतेऽपि हरौ ॥७६॥

स जनांतमैक्षत मृगाधिपतेः प्रथयन्तमंतकनिभस्य गतिं ।
इति गामुदीर्य रचितभ्रुकुटिं स्वयमुत्थितं हरिवधाय तदा ॥७७॥
पितरं निषिध्य विजयावरजः स्मितपूर्वमेवमवदाद्विनतः ।
पशुनिग्रहेऽपि भुवि तात ! महान्यदि संभ्रमो भवति चेद्भवतः॥७८॥
प्रतिधीयते किमपरं तनयैरिह मादृशैस्तमपहाय पुरा ।
तदपाकुमार्य ! तव यान भीति क्षितिपं निगद्य विजयानुगतः ॥७९॥
तदनुज्ञया सह बलेन बली प्रथमो ययौ हरिवधाय हरिः ।
नखकोटिविच्युतनरांत्रचयग्रहणाकुलैर्नभसि गृध्रकुलैः ॥ ८० ॥
हत मानुषास्थिपरिपांडुरितं नगमेत्य रुंद्रविवरे शयितं ।
पटहैरबोधयदभिप्रहतैर्ध्वनिभिरवैरपि मृगाधिपतिः ॥ ८१ ॥
प्रतिबोधजृंभणविभीमसुखः परिकेकराक्षमवलोक्य बलं ।
उदगात्प्रसार्य परिभुग्नतनुं स शनैः शनैर्विधुतपिंगसटः ॥ ८२ ॥

७४ "शेतामध्यें धान्याचे संरक्षण करण्याकरितां गवताचा मनुष्य केलेला असतो व तो पशूंना व पक्ष्यांना भय उत्पन्न करीत असतो. परंतु मी सर्व राजे लोकांना कर देणारे केलें आहे तथापि त्या गवताच्या माणसापेक्षांही प्रभुत्वहीन झालों आहे. ७५ जगाची भीति नाहींशी न करितां जो जगाचे स्वामित्व—राज्य करितो तो नष्ट झालेल्या लोकांकडून निःसार झालेल्या चित्रांतील राजाप्रमाणे पाहिला जातो. 'राजा प्रकृतिरंजनात्' जो प्रजेचे अनुरंजन करितो, अर्थात् तिला जो नेहमीं सुखी करितो तो राजा होय. जो हें आपले कर्तव्य बजावीत नाहीं तो चित्रांतील राजाप्रमाणें व्यर्थ होय. ७६ हा राजा मनूच्या वंशांत—भरत चक्रवर्तीच्या वंशांत उत्पन्न होऊनही जगांत उघड रीतीनें सर्व प्रजेला भीति उत्पन्न झाली आहे असा लोकापवाद सर्व देशामध्यें माझ्या अकीर्तीचा डंका वाजवीत आहे. यावेळीं तरी मी सिंहाचा वध केला तरी माझी अकीर्ति पसरावयाची थोडीच थांबणार आहे." ७७ अशा रीतीचे भाषण करून व क्रोधानें आपल्या भुवया वक्र करून प्रजापति महाराज सिंहाला ठार मारण्याकरितां स्वतः उठले असतां विजयबलिभद्राचा धाकटा बंधु त्रिपृष्ट हा नम्र होऊन व बापाचा निषेध करून—आपण सिंहवधार्थ जाणें योग्य नाही असें बोलून पुढे लिहिल्याप्रमाणें भाषण करूं लागला. ७८ "अहो बाबा, पशुवधासाठींही आपल्याला या जगांत एवढी

खटपट करावी लागत आहे तर आमच्यासारख्या मुलांनीं या गोष्टी प्रथम करावयाच्या नाहींत तर मग आम्ही करावयाचें तरी काय ? ७९ यास्तव अहो बाबा आपलें जाणें योग्य नाहीं. आम्हीच या कार्यासाठीं जातों. " असे बोलून नऊ नारायणापैकीं पहिला नारायण असलेला विजय राजपुत्राचा धाकटा बंधु असा तो त्रिपृष्ठ कुमार महाराजांच्या आज्ञेनें सैन्यासह व विजयबलभद्रासह सिंहवधार्थ निघाला. ८० त्रिपृष्ठ राजपुत्रानें यमाप्रमाणें भयंकर अशा सिंहानें उत्पन्न केलेल्या भयाण परिस्थितीचा द्योतक तो प्रदेश पाहिला. या प्रदेशांत पुष्कळ माणसांचा नाश झालेला होता. हा प्रदेश नखांच्या अग्रभागांतून गळून पडलेल्या मनुष्यांच्या आतड्यांना पुनः ग्रहण करण्यासाठीं आकाशांत घिरट्या घालणाऱ्या गिधाडांनीं भरून गेला होता. ८१ ठार मारलेल्या माणसांच्या हाडांनीं सर्वत्र पांढरा दिसणाऱ्या त्या पर्वतावर येऊन त्रिपृष्ठ कुमारानें तेथें रुंद अशा गुहेत निजलेल्या सिंहास वाजविलेल्या वाद्यांच्या ध्वनींनीं व सैन्याच्या गलबल्यानें जागें केलें. ८२ जागें झाल्यावर जांभयीनें ज्याचें तोंड भयंकर दिसत आहे अशा त्या सिंहानें इकडे तिकडे दृष्टी फेंकून जमलेलें सैन्य पाहिलें व आपल्या मानेवरील पिंवळ्या सटा हळू हळू हालवून आणि आळसावलेलें किंवा वांकडे तिकडे झालेलें आपलें शरीर पसरून तो उठून उभा राहिला.

अथ गर्जितैर्ध्वनयतः ककुभो विवृतास्यकंदरमुदग्रतनोः ।
गतभीरतिष्ठदभिलंघयतो हरिरेक एव पुरतः स हरेः ॥ ८३ ॥
विनियम्य दक्षिणकरेण शिलाकठिनौ तदग्रचरणावदयं ।
इतरं निवेश्य वदने स करं समपातयन्मृगपतिं सहसा ॥ ८४ ॥
स रुषा वमन्निव दवाग्निकणान्नयनद्वयेन नवरक्तभृता ।
विफलीकृतोद्यमबलो बलिना विवशो मुमोह हरिरेकपदे ॥ ८५ ॥
मृगविद्विषं नवमृणालमिव प्रविदार्य तस्य रुधिरैरवनेः ।
शमयांचकार परितापचयं स तदा नवाम्बुभिरिवाम्बुधरः ॥ ८६ ॥
निजसाहसेन महतापि महानुपयाति नूनमवनौ न मुदं ।
यदनन्यवध्यमपि केसरिणं स निहत्य निर्विकृतमास्त हरिः ॥८७॥
अथ लीलया करयुगेण हरिः समुदस्य कोटिकशिलामुपरि ।
प्रथयांबभूव निजवीर्यचयं निकषोऽथवा बलवतामवधेः ॥ ८८ ॥

नगरं ततः प्रतिनिवृत्य ययौ जयकेतनैर्मुकुलितार्ककरं ।
उपकर्णयन्निजयशः पृथुकैरपि गीयमानमनुरागपरैः ॥ ८९ ॥
कृतमंगलं सपदि राजकुलं विजयी प्रविश्य नरनाथपतिं ।
विजयानुजोऽनुविजयं शिरसा प्रणनाम चंचलशिखामणिना ॥९०॥
परिरभ्य सम्मदभवाश्रुभृता नयनद्वयेन सुचिरं स पुरा ।
घनमालिलिंग तदनु स्वसुतौ भुजयोर्युगेण पुनरुक्तमिव ॥ ९१ ॥

८३ तदनंतर मुखरूपी गुहा उघडून आपल्या गर्जनांनीं दिशांना प्रतिध्वनींनीं युक्त करून जोरानें हल्ला करणाऱ्या, प्रचंड शरीराचा धारक अशा त्या सिंहापुढें तो राजकुमार एकटाच भयरहित होऊन उभा राहिला. ८४ आपल्या उजव्या हातानें शिलेप्रमाणे कठिन असलेले त्या सिंहाचे दोन पाय निर्दयपणें दाबून धरून व डावा हात त्याच्या तोंडांत घालून त्याला एकदम राजपुत्रानें जमिनीवर आपटलें. ८५ नवीन रक्त धारण करणाऱ्या राजपुत्रानें ज्याचे प्रयत्न व सामर्थ्य हे व्यर्थ केले आहेत असा तो सिंह रागानें लालबुंद झाला व आपल्या दोन डोळ्यांनीं जणु अग्नीचें स्फुलिंग—ठिणग्या बाहेर टाकीत आहे असा भासूं लागला. परंतु राजपुत्रापुढे त्याचें कांहीं चालेनासें झाल्यामुळें तो विवश होऊन एकदम मूर्च्छित होऊन पडला. ८६ जसा नवीन मेघ आपल्या नवीन पाण्याच्या वृष्टीनें जमीनीची उष्णता नष्ट करून तिला शीतल बनवितो तसें या राजपुत्रानें सिंहाला कमळाच्या दांड्याप्रमाणे फाडून त्याच्या रक्तांनीं पृथ्वीचा संताप दूर केला. अर्थात् सिंहापासून होत असलेल्या दुःखांचा अंत सिंहाचा अंत करून केला. ८७ मोठे लोक स्वतः केलेल्या मोठ्या साहसानें देखिल खरोखर आनंद मानीत नाहींत. अर्थात् मी एक मोठें कार्य केले असे त्यांना मुळीच वाटत नाही. राजपुत्रानें इतरांकडून वध करण्यास अशक्य अशा सिंहाला जरी मारलें तरी तो हर्षित झाला नाहीं. तो निर्विकारच राहिला. ८८ नंतर या राजपुत्रानें लीलेने आपल्या दोन हातांनीं कोटिशिला वर उचलून आपलें अतुलबल सर्वत्र प्रसिद्ध केलें. कोटिशिला उचलणे हे बलवान् पुरुषांच्या बलाची कसोटी आहे. सामान्य माणसे कोटिशिला उचलूं शकत नाही. जो नारायण पदवीचा धारक आहे तोच ती उचलूं शकतो. म्हणून ती बल जाणण्याची कसोटी आहे. ८९ आपल्या विजयपताकांनी सूर्याच्या किरणांना संकुचित करणारा व प्रीतियुक्त बालकांच्या द्वारेंही गायिलें गेलेलें आपलें यश ऐकणारा तो राजपुत्र परतून आपल्या शहराला आला. ९० तत्काल

मंगलकार्ये जेथें करण्यास सुरवात झाली आहे अशा या विजयी राजपुत्रानें आपल्या विजय नांवाच्या वडील भावासह प्रवेश केला व विजयानें महाराजांना नमस्कार केल्यानंतर चंचल चूडामणीनें युक्त असलेल्या आपल्या मस्तकानें महाराजास त्यानें नमस्कार केला. ९१ प्रजापति महाराजांनी प्रथमतः आनंदाश्रूंनी भरलेल्या आपल्या दोन डोळ्यांनी आपल्या दोन मुलांना आलिंगून तदनंतर पुनः आपल्या दोन बाहूंनीं त्यांना दृढ आलिंगिलें. या प्रकारें त्यांनी आपल्या पुत्रांना आलिंगन देण्यांत जणु पुनरुक्ति केली. अर्थात् आनंदानें बराच वेळपर्यंत आपल्या मुलांना त्यांनीं पाहिलें व छातीशीं दृढ धरून पुनः त्यांना आलिंगिलें.

शिथिलीचकार परिरंभणतः स चिरात्सुतौ पुलकरुद्धतनुः ।
तदनुज्ञया पुनरपि प्रणतौ समुपासितौ नृपतिपीठतटे ॥ ९२ ॥
परिपृच्छतःक्षितिपतेर्विजयेऽनुजविक्रमं वदति सत्यमपि ।
विनताननो निभृतमास्त हरिर्ननु दे गुणस्तुतिरहो महतां ॥९३॥
इति भूपतिः सुतयुगेन समं परिरक्षया प्रमदयन्धरणीं ।
सकलां शशास शरदिंदुकलाविमलं यशः प्रतिदिशं विकिरन् ॥९४॥
अथैकदा कौतुकनिश्चलाक्षोदौवारिकः कांचनवेत्रहस्तः ।
धावन्नुपेत्यावनिनाथमित्थं व्यजिज्ञपत्संभ्रमरुद्धवाक्यः ॥ ९५ ॥
विहायसा कश्चिदुपेत्य देव ! द्वारि स्थितो विस्मयनीयमूर्तिः ।
तेजोमयो वीक्षितुमिच्छति त्वां प्रमाणमत्र त्वमिति व्यरंसीत् ॥९६॥
प्रवेशय द्राक्सुतुरवेत्यथाज्ञामवाप्य राज्ञो विनिवृत्य गत्वा ।
प्रावेशयत्तं सभया समीक्ष्य सविस्मयोत्फुल्लदृशा विभूत्य ॥ ९७ ॥
राजा समेत्यानतमादरेण स्वहस्तनिर्दिष्टहिरण्यपीठे ।
अदूरवर्तिन्युपवेश्य किंचिद्विश्रान्तमालोक्य तमावभाषे ॥ ९८ ॥
सौम्याकृतिः कस्त्वमनन्यरम्यः कस्मादिमां भूमिमुपागतोऽसि ।
किमर्थमायात इति क्षितीशा स्वयं स पृष्टः पुनरेवमूचे ॥ ९९ ॥
अस्त्यत्र शैलो विजयार्धनामा नरेंद्र ! विद्याधरलोकवासः ।
श्रेणीद्वयेनोत्तरदक्षिणेन विराजितो राजततुंगशृंगः ॥ १०० ॥

९२ प्रजापति महाराजांच्या सर्व अंगभर आनंदानें रोमांच उभे राहिले. त्यांनीं फार वेळपर्यंत आलिंगन करून मग आपल्या दोन मुलांना सोडून दिलें. अतिशय नम्र झालेलीं ती दोन मुलें महाराजांच्या आज्ञेने महाराजासह राजसिंहासनावर बसलीं. ९३ महाराजांनीं हकीकत विचारल्यावर विजय बलिभद्र त्यांना आपल्या धाकट्या भावाचा स्वतः पराक्रम सांगत असतांही त्रिपृष्ठ नारायणानें आपलें मस्तक नम्र करून स्तब्धता धारण केली. बरोबरच आहे कीं, मोठ्या पुरुषांना आपल्या गुणांची स्तुति हर्षाला कारण होत नाहीं. ९४ याप्रमाणें आपल्या दोन मुलांसह संपूर्ण पृथ्वीचें रक्षण करून प्रजापति महाराज तिला आल्हादित करीत राज्य करू लागले असतां त्यांचे चंद्राच्या कलेप्रमाणे शुभ्र यश सर्वत्र पसरलें. ९५ एकेवेळीं आश्चर्याने ज्याचे डोळे स्थिर झाले आहेत व ज्याच्या हातांत सोन्याने मढविलेली वेताची छडी आहे असा द्वारपाल धांवत धांवत महाराजाकडे आला व गडबडीने अडखळत भाषण करून महाराजांना त्याने पुढे लिहिल्याप्रमाणे प्रस्तावना केली. अर्थात् त्याने अशी हकीकत सांगितली. ९६ "हे प्रभो ! कोणी एक मनुष्य आकाशमार्गाने येऊन राजवाड्याच्या दरवाजाजवळ उभा राहिला आहे. त्याचें स्वरूप आश्चर्य उत्पन्न करणारें आहे व अतिशय तेजस्वी आहे. महाराजांचें दर्शन घ्यावें अशी त्याची इच्छा आहे. यास्तव आपली आज्ञा प्रमाण आहे. अर्थात् आपली आज्ञा असल्यास त्यास आंत घेऊन येतो." असें बोलून तो थांबला. ९७ "हे सुमुखा ! त्याला लौकर आंत पाठवून दे" अशी राजाची आज्ञा झाल्याबरोबर तो परतून गेला व आश्चर्याने ज्यांचे डोळे विकसित झाले आहेत अशा सभेकडून वळून पाहण्याला योग्य अशा त्या मनुष्याला त्यानें पाठवून दिलें. ९८ त्या मनुष्याने सभेत प्रवेश करून महाराजांना नमस्कार केला. महाराजांनीं आपल्या हाताने दाखविलेल्या जवळच्या आसनावर तो बसला. त्याचा थकवा थोडा दूर झालेला पाहून महाराज त्यास याप्रमाणे बोलले. ९९ "ज्याची समानता इतर ठिकाणीं आढळत नाहीं असा सौम्य आकाराचा तूं कोण आहेस ? या प्रदेशांत तू कोठून आलेला आहेस व तुझें येण्याचें काय कारण आहे?" असा महाराजांनीं प्रश्न केल्यावर तो पुनः पुढें लिहिल्याप्रमाणे बोलूं लागला. १०० "अहो महाराज ! या भरत क्षेत्रांत विद्याधर लोक जेथे राहतात असा विजयार्ध नावाचा पर्वत आहे. दक्षिण श्रेणी व उत्तर श्रेणी यांनीं हा फार शोभत आहे व याला चांदीचीं उंच शिखरें आहेत.

श्रेणीमपाचीं रथनूपुराख्यं पुरं समाध्यास्य महेंद्रलीलः ।
नभश्चराणां ज्वलनादिरेकः पतिर्जटी नाम भुनक्ति तत्र ॥ १०१ ॥

त्वदन्वयाद्यः प्रथमस्य सूनुर्महात्मनां बाहुबली जिनानां ।
निपीडय दोर्भ्यां भरतेश्वरं यो मुमोच लक्ष्म्या सह हेलयैव ॥१०२॥
अलंकरोतींदुकरावदातं नमेः कुलं कच्छनृपात्मजस्य ।
नभश्चरणामधिपोऽपि राजन्पितृष्वसुस्ते तनयो नयज्ञः ॥ १०३ ॥
अतोऽस्मदीशः कुशली भवन्तं दूरस्थितोऽपींदुरिवाम्बुराशिं ।
अनामयं पृच्छति मन्मुखेन प्रेम्णा समाश्लिष्य पुराणबंधुं ॥१०४॥
सुतोऽर्ककीर्तिः क्षपितारिकीर्तिः स्वयंप्रभा तस्य सुता द्वितीया ।
देवी च पादद्वितयं प्रणामैरभ्यर्चयंतीश ! तवार्चनीयं ॥ १०५ ॥
अथ कल्पलतामिवैकपुष्पां सदृशां कामफलोन्मुखीमुपेतां ।
तनयामवलोकय तत्समानं न वरं मंत्रिविलोचनोऽप्यपश्यत् ॥१०६॥
कुशलं सकले निमित्ततंत्रे विहितप्रत्ययमाप्तमाप्तमानं ।
उपगम्य रहस्यमात्यमुख्यैः सह संभिन्नमवोचदेवमीशः ॥ १०७ ॥
सदृशः सुदृशः स्वयंप्रभायाः पतिरस्माभिरवीक्षितो न कश्चित् ।
अवलोकय दिव्यचक्षुषा तं ननु भर्तृकृत्यविधौ भवान्प्रमाणं ॥१०८॥
इत्युक्त्वा विरतवति स्वकार्यनिजं संभिन्नः खचरपताववोचदित्थं ।
त्वत्कृत्यं शृणु विदितं मया मुनींद्रादायुष्मन्नवधिदृशः पुरा यथावत्
॥ १०९ ॥

अस्मिन्प्रतीहि भरते भरतशवंशे राजा प्रजापतिरुदारयथार्थनामा ।
तस्यात्मजौ विजयिनौ विजयत्रिपृष्ठावाद्यावमानुषबलौ बलवासु-
देवौ ॥ ११० ॥

१०१ जो इंद्राप्रमाणें क्रीडा करीत असतो असा विद्याधरांचा प्रभु ज्वलनजटी नांवाचा राजा त्या विजयार्ध पर्वतावर रथनूपुर शहरामध्ये राहून दक्षिणश्रेणीचें रक्षण करीत आहे. हे राजन्! तुझ्या वंशांतील पहिला पुरुष हा महासत्त्वरूप अशा चोवीस तीर्थकरापैकी पहिल्या तीर्थंकराचा आदिनाथ स्वामीचा सत्पुत्र होता. यानें सहज आपल्या दोन बाहूंनी भरतेश्वर अर्थात् भरतचक्रवर्तीला पीडित करून राज्यलक्ष्मीसह त्याचा त्याग केला. १०२ हे राजन् हा ज्वलनजटी विद्याधरराजाही कच्छ नांवाच्या

राजाचा मुलगा जो नमि त्याच्या चंद्र किरणाप्रमाणें निर्मल अशा वंशाला अलंकृत करीत आहे. हे प्रभो! हा नीतिज्ञ राजा पूर्व परंपरेनें तुझ्या बापाच्या बहिणीचा मुलगा आहे. अर्थात् तुझा आतेभाऊ आहे. १०४ ज्याप्रमाणें दूर असलेलाही चंद्र आपला जुना संबंधी असलेल्या समुद्रास प्रेमानें आलिंगन देतो त्याप्रमाणें पूर्वपरंपरेनें बंधु असलेल्या आपणास हा सकुशल राजा प्रेमानें आलिंगून माझ्या मुखानें आपलें आरोग्य अर्थात् कुशल वर्तमान विचारीत आहे. १०५ या ज्वलनजटीला शत्रूंची कीर्ति नष्ट करणारा अर्ककीर्ति नांवाचा मुलगा आहे व स्वयंप्रभा नांवाची दुसरी मुलगी आहे. व या राजाची राणी वायुवेगा नांवाची आहे. हे राजन्! हे सर्व आपल्या पूज्य चरणांची नमस्कारांनीं पूजा करीत आहेत. अर्थात् आपल्या चरणांना त्यांनीं माझ्या मुखानें अनेक नमस्कार सांगितले आहेत. १०६ नंतर एके दिवशीं कल्पलतेप्रमाणें अद्वितीय पुष्पाला धारण करणारी व कामविकाररूपी फल उत्पन्न होण्याच्या अवस्थेला पोहोंचलेली अर्थात् तरुण झालेली अशा आपल्या मुलीस-स्वयंप्रभेस पाहून तिला शोभणारा असा वर सचिवरूपी डोळ्यांनीं राजा युक्त असूनही त्याला आढळून येईना. १०७ तदनंतर सर्व निमित्त शास्त्रामध्यें प्रवीण, हित करणाऱ्या जिनेंद्राप्रमाणे प्रमाणयुक्त व ज्यानें सांगितलेल्या गोष्टी अनुभवास येत असल्यामुळें विश्वासपात्र अशा संभिन्न नांवाच्या निमित्त ज्ञान्याकडे आपल्या मुख्य मंत्र्यासह येऊन एकांतस्थानीं ज्वलनजटी राजानें याप्रमाणें विचारलें. १०८ "हे प्रभो, सुंदर नेत्रांना धारण करणाऱ्या आमच्या स्वयंप्रभेला साजेल असा वर शोधण्याचा आम्ही पुष्कळ प्रयत्न केला परंतु तो आढळून आला नाहीं. यास्तव हे निमित्तज्ञा! आपल्या दिव्यनेत्रानें अर्थात् आपल्या लोकोत्तर ज्ञानानें त्याचें अवलोकन कर. माझ्या या कार्यांत तूंच प्रमाण आहेस; विश्वास पात्र आहेस." १०९ याप्रमाणें आपल्या कार्याचें कारण सांगून ज्वलनजटी विद्याधर राजा थांबला असतां तो संभिन्न नांवाचा निमित्तज्ञानी राजाला ह्मणाला कीं "हे राजन्! तुझ्या या कार्याविषयीची हकीकत मी पूर्वी एका अवधिज्ञानरूपी नेत्राचे धारक मुनिवरापासून यथार्थ ऐकिली होती. ती सांगतो ऐक." ११०" या भरत क्षेत्रांत भरतचक्रवर्तीच्या वंशांत उदार गुणांचा व सार्थक नांवाचा प्रजापति या नांवाचा राजा आहे असें जाण. त्याला अमानुष शक्तीचे धारक व विजयशाली असे विजय व त्रिपृष्ठ या नांवाचे दोन पुत्र आहेत. हे दोघे बलदेव व वासुदेव अर्थात् नारायण व बलभद्र या पदवीचे धारक आहेत. विजय हा बलदेव पदवीचा धारक आहे व त्रिपृष्ठ हा नारायण पदवीचा धारक आहे.

रिपुस्त्रिपृष्ठस्य पुरा भवेऽभवत् विशाखनंदीत्ययमश्वकंधरः।
ततः प्रहत्याहवदुर्मदं रणे नभश्चरेंद्रं भविताऽर्द्धचक्रभृत् ॥१११॥

तस्मादेतत्खेचरावाससारं कन्यारत्नं वासुदेवाय देयं।
निःसंदेहं तत्प्रसादादुदीचीं प्राप्य श्रेणीं यास्यसि त्वं च वृद्धिम् ॥११२॥
इत्यादेशादवितथगिरस्तस्य कार्तांतिकस्य।
ध्वस्ताशंकं ज्वलनजटिना प्रेषितं विद्धि दूतं ॥
मामिन्द्वाख्यं घटयितुमिदं देव कल्याणकार्यं।
कार्याभिज्ञं स्थिरतरधिया त्वत्सकाशं प्रकाशं ॥११३॥
श्रीमानागमनस्य कारणमिति व्यक्तं निवेद्य स्थितं।
स्वांगस्पृष्टसमस्तभूषणगणैरभ्यर्च्य तं भूपतिः ॥
मर्त्यानामचिरादगोचरतया तस्यैव हस्ते पुनः।
संदेशं खचराधिपस्य मुदितः सप्राभृतं प्राहिणोत् ॥११४॥
क्षोणीनाथं प्रणम्य श्लथमुकुटतटीकोटिविन्यस्तहस्तः।
सोत्कान्विद्याधराणां पतिमनतिचिरादानय द्रष्टुमस्मान् ॥
इत्युक्त्वा तेन मुक्तो गगनतलमगादिन्दुरिन्दीवराभं।
सद्यो विद्योरुसंपद्विहितमधिवसन्राजमानं विमानं ॥११५॥

इति श्रीअसगभूपकृते श्रीवर्द्धमानचरिते त्रिपृष्ठसंभवो नाम पंचमः सर्गः ॥ ५ ॥

१११ या त्रिपृष्ठ राजकुमाराचा पूर्वजन्मी विशाखनंदी नांवाचा शत्रु होता; तोच आतां अश्वग्रीव नांवाचा विद्याधराधिपति अर्धचक्रवर्ती होऊन जन्मला आहे युद्धाविषयी ज्याला दुराभिमान उत्पन्न झाला आहे अशा या अश्वग्रीवाला ठार मारून हा त्रिपृष्ठ राजकुमार अर्धचक्रवर्ती होणार आहे. ११२ यास्तव या विद्याधर भूमीतळें साररूप हे कन्यारत्न हे राजन्! तूं त्या कुमाराला अर्पण कर म्हणजे त्याच्या कृपेनें तुला खात्रीनें उत्तर श्रेणीचे आधिपत्य-राज्य मिळेल व तुझी उत्तरोत्तर उन्नतीच होत जाईल." ११३ ज्याचें भाषण सत्य आहे अशा निमित्तज्ञान्याच्या आज्ञेने ज्वलनजटी नृपालानें निःशंक होऊन हें कल्याणकार्य-विवाहकार्य जुळविण्यासाठीं हे राजन्! कार्याची माहिती असलेल्या मला चांगला विचार करून उघड रीतीनें तुझ्याकडे पाठविलें आहे. हे राजन! माझें 'इंदु' असें नांव आहे व मी दूत आहे असें समज. ११४ या प्रमाणें आपल्या येण्याचें कारण प्रगट करून तो इंदु नांवाचा दूत स्वस्थ बसला. नंतर लक्ष्मी संपन्न प्रजापति

राजानें आपल्या अंगावरील सर्व अलंकार देऊन त्याचा सत्कार केला. व भूमि-गोचरी मनुष्यांना विद्याधरांच्या निवासस्थानीं जाऊन लौकर निरोप सांगता येत नसल्यानें त्याच दूताच्या हातीं विद्याधरेंद्र जो ज्वलनजटी त्याच्या करितां निरोप व नजराणा मोठ्या आनंदानें प्रजापति राजानें अर्पण केला. व त्याला पाठऊन दिलें. ११५ व पाठवितांना त्याला हें सांगितलें कीं. ' विद्याधराचा राजा अशा त्या ज्वलनजटीला पाहण्याविषयीं आम्हांला फार उत्कंठा लागून राहिली आहे; म्हणून त्याला शीघ्र आण असें बोलून राजानें त्याला जाण्यास परवानगी दिली. त्या दूतानें देखिल ढिला झालेल्या मुकुटाच्या पुढच्या भागावर आपले हात ठेऊन महाराजांना नमस्कार केला व तत्काल विद्यांच्या मोठ्या सामर्थ्यानें बनविलेल्या सुंदर 'विमानांत बसून नील कमलाप्रमाणें ज्याचा वर्ण आहे अशा आकाश मार्गानें विजयार्द्धपर्वताकडे निघून गेला.

याप्रमाणें असगनृप रचित या वर्द्धमान चरितांतील त्रिपृष्ठाच्या उत्पत्तीचें वर्णन करणारा हा पांचवा सर्ग संपला.

---

# षष्ठः सर्गः

यातेषु केषुचिदहःस्वथ खेचरेंद्रमागत्य बाह्यवनमेकदिने प्रशस्ते ।
अध्यासितं सह बलेन निशम्य सौम्याद्द्रष्टुं मुदा तमुदियाय विशामधीशः ॥ १॥

एकेन साधुजनतां प्रति दक्षिणेन वामेन वैरिनिवहे च परेण गच्छन् ।
दोर्भ्यामिवोन्नतघनांसविराजिताभ्यां ताभ्यामराजत समं क्षितिपः सुताभ्यां ॥ २ ॥

आरूढवाहगतिवेगविलोलहारस्फारांशुचक्रधवलीकृतदिग्विभागैः ।
ख्यातान्वयैः पथि निजप्रतिबिंबकैर्वा राजन्यकैरनुगतो वनमाप भूपः ॥ ३ ॥

विद्याप्रभावरचिताद्भुतसौधकूटकोटिस्थितांबरचरीजनलोलनेत्रैः ।
प्रत्युत्थितेन सहसा सह खेचरेशा प्रीतिप्रसारितदृशा ददृशे नरेंद्रः ॥४॥

यानात्ससंभ्रममुभाववतीर्य दूरादासन्नचारुभटदत्तकरावलंबौ ।
अन्योन्यसन्मुखमभीयतुरुत्सुकौ तौ पादद्वयेन धरणीं धरणीशनाथौ ॥ ५ ॥

गाढोपगूहनसुधासलिलेन सिक्तः संबंधचंदनतरुः सममेव ताभ्यां ।
जीर्णोऽपि सन्नव इवांकुरितो विरेजे केयूरकोटिमणिरश्मिभिरुन्मिषद्भिः ॥ ६ ॥

तस्यार्ककीर्तिरवनीश्वरनायकस्य दूरानतेन शिरसा चरणौ ववंदे ।
पित्रा तदानभिहितोऽपि कटाक्षपातैर्नैसर्गिको हि महतां विनयो महत्सु ॥ ७ ॥

लक्ष्मीप्रतापबलशौर्यमतिश्रुताद्यैर्लोकाधिकावपि समं विजय त्रिपृष्टौ।
प्रीत्या प्रणेमतुरुभौ खचराधिपं तं स्तब्धो महान्गुरुजने न गुणाधिकोऽपि ॥ ८ ॥

कित्येक दिवस गेल्यानंतर एका सुमुहूर्ताच्या दिवशीं विद्याधर राजा ज्वलनजटी बरोबर सैन्य घेऊन पोदनपुराच्या बाहेरील बगीचांत येऊन राहिला आहे ही गोष्ट एका सौम्य स्वभावाच्या मनुष्यानें येऊन प्रजापति महाराजांना सांगितली. तेव्हां महाराज आनंदानें त्याला पाहण्यास निघाले अर्थात् त्याला भेटण्यास निघाले. २ उंच व बळकट अशा दोन खांद्यांनीं युक्त असलेल्या उजव्या व डाव्या बाहूप्रमाणे शोभणाऱ्या आपल्या दोन मुलांना बरोबर घेऊन जाणारे प्रजापति महाराज फार शोभू लागले. महाराजांचा उजवा बाहु साधुजनाविषयीं सरळ होता अर्थात् त्यांच्यावर तो अनुग्रह करीत असे. व त्यांचा डावा बाहु वैरीजनाविषयीं नेहमीं वामच राहात असे अर्थात् प्रतिकूलच राहत असे. याचप्रमाणें विजय व त्रिपृष्ट या उभयतांचा स्वभाव क्रमानें महाराजांच्या उजव्या व डाव्या बाहूप्रमाणें होता म्हणून हे दोघे महाराजांच्या दोन बाहूप्रमाणें शोभत असत ३ उत्तम घोड्यावर आरोहण करून प्रसिद्ध वंशांतील सरदार मंडळीही महाराजासह बाह्य वनाकडे निघाली. त्यावेळीं सर्व सरदार लोक मार्गामध्यें जात असतांना लोकांना हीं महाराजाचीं दुसरीं प्रतिबिंबेंच जणु आहेत असे वाटू लागले. कारण ते घोड्यावरून जात असतां वेगानें त्यांच्या गळ्यांतील हार हालून त्यांच्या किरण समूहांनीं सर्व दिशांचे भाग पांढऱ्या प्रकाशानें व्याप्त झाले होते. या सरदारांचा थाट माटही महाराजा प्रमाणेंच असल्यामुळें लोकांना ही महाराजांचीं प्रतिबिंबें असतील असें वाटणे साहाजिक आहे. ४ विद्यांचे प्रभावानें बनविलेल्या राजवाड्यांच्या गच्चीच्या पुढच्या भागावर बसलेल्या विद्याधर स्त्रियांच्या चंचलनेत्रासह उठलेला व प्रीतीनें ज्याचे डोळे विस्तृत झाले आहेत अशा विद्याधराधिपति ज्वलनजटी राजानें एकदम प्रजापति महाराजांना पाहिलें. अर्थात् विद्याधर स्त्रियांनीं व ज्वलनजटीनें महाराजास पाहिलें. ५ त्यावेळी दोघेही राजे अर्थात् पृथ्वीपति, प्रजापति व विजयार्द्धपर्वताचा अधिपति ज्वलनजटी हे दोघेही दुरूनच आपआपल्या वाहनावरून खालीं उतरले. तदनंतर ज्यांना उत्तम शूर पुरुषांनीं आपल्या हाताचा आश्रय दिला आहे असे होत्साते ते दोघे मोठ्या उत्सुकतेनें पादचारी बनून एकमेकांच्या सन्मुख आले. ६ त्या उभयतांनीं गाढ आलिंगनरूपी

अमृत जलानें सिंचिलेला त्यांचा संबंधरूपी चंदन वृक्ष जरी फार जुना झाला होता तरी तो पुनः स्फुरण पावणाऱ्या बाहुभूषणाच्या रत्नकिरणांनीं नवीन पालवी फुटल्याप्रमाणें शोभू लागला. ७ ज्वलनजटीनें कटाक्षांच्या द्वारेंही सुचविलें नसतां अर्ककीर्ती राजपुत्रानें दुरूनच नम्र झालेल्या मस्तकानें राजाधिराज प्रजापति महाराजांच्या दोन चरणास वंदन केलें. बरोबर आहे की, मोठ्या लोकांचा पूज्य माणसाविषयीं स्वाभाविकच विनय असतो. ८ लक्ष्मी, पराक्रम, बल, तेजस्वीपणा, बुद्धि, शास्त्रज्ञान या गुणांनी विजय व त्रिपृष्ठ हे जरी लोकोत्तर होते तरी या उभयतांनीं विद्याधरांचा राजा अशा ज्वलनजटीला एकदम नमस्कार केला. बरोबरच आहे कीं, महापुरुष गुणांनी गुरुजनांपेक्षां अधिक असले तरी ते त्यांच्यापुढें नम्रताच धारण करतात. अर्थात् सत्पुरुष गुणश्रेष्ठ असतांही वयानें अधिक माणसाशीं विनयानेंच वागतात.

आलिंग्य तुंगतरदेहमनंगकल्पं तावर्ककीर्तिममलं प्रथितार्ककीर्तिं ।
प्रीतौ बभूवतुरुभावपि भूरिशोभौ केषां तनोति न मुदं प्रियबंधुसंगः ॥ ९ ॥

ज्ञात्वा तयोर्विवदिषामथ भूतधात्रीधात्रीधरप्रमुखयोर्मुखविभ्रमेण ।
प्रेयान्प्रजापतिनराधिपतेरमात्यः प्रोवाच वाचमिति कालविदो हि दक्षाः ॥ १० ॥

सम्यक्प्रसन्नमधुना कुलदेवताभिः पक्वं शुभैश्च भवतोःसफलं च जन्म।
छिन्नापि पूर्वपुरुषाचरिता स्वतेयं येनात्मनैव पुनरंकुरिता लतेव ।११।

त्वां देव! निष्प्रतिघमात्मसमं दुरापमन्यैःप्रजापतिरभूद्भुवनस्य मान्यः।
कृष्णस्य केवलमिव प्रतिपद्य योगी प्राप्तं पदं ध्रुवमनुत्तरमप्यनेन॥१२॥

इत्थं तदा निगदतःसचिवस्य वाक्यमाक्षिप्य खेचरपतिःस्वयमेवमूचे।
अभ्यर्चयन्विकचकुंददलैरिवान्तर्वाग्देवतां दशनरश्मिभिरिंदुगौरैः ॥ १३ ॥

ईदृग्वचो मतिमतां वर ! मा वदस्त्वमिक्ष्वाकवो नमिकुलस्य चिरंतनेशाः ।

आराध्य कच्छतनयो यदहींद्रदत्तां वैद्याधरीं श्रियमशिश्रयदादिदेवं ॥ १४ ॥

आज्ञामनादरसमुन्नमितांतवामभ्रूमंजरीविलसनैकपदेन दत्तां ।
सज्जस्ततोऽस्य च विधातुमयं जनोऽपि पूर्वक्रमो ननु सतामविलंघनीयः ॥ १५ ॥

संभाष्य ताविति महीपतिखेचराणां नाथौ पुरा प्रणिधिना विधिनेव सृष्टां ।
स्फीतां विवाहमहिमां सुतयोर्विधातुमभ्युद्यतौ विविशतुर्गृहमुत्पताकम् ॥ १६ ॥

९ विपुल सौंदर्यधारक असे विजय व त्रिपृष्ठ हे दोघे राजपुत्रही ज्याची कीर्ति सूर्याप्रमाणें उज्ज्वल आहे, जो अधिक उंच शरीराचा, मदनाप्रमाणें सुंदर व निर्दोष आहे अशा अर्ककीर्तीला आलिंगून आनंदित झाले. बरोबरच आहे कीं, आवडत्या संबंधी जनांचा सहवास कोणास आनंदित करीत नाहीं बरें ? सर्वांस आनंदित करितोच. १० पृथ्वीपति प्रजापति महाराज आणि विजयार्द्ध पर्वताचा अधिपति ज्वलनजटी यांच्या मुखावरील आकृतीनें त्यांच्या मनांत भाषण करण्याची इच्छा आहे असें जाणून प्रजापति महाराजांचा आवडता मंत्री पुढें लिहिल्याप्रमाणे बोलू लागला. बरोबर आहे कीं, हुशार माणसें योग्य कालाला जाणणारीं असतात. ११ "आज कुलदेवता चांगल्या प्रसन्न झाल्या, आज शुभकर्मे उदयास आलीं व आज उभयतांचा जन्म सफळ झाला. पूर्व पुरुषांचा संबंध जो बऱ्याच कालापासून तुटला होता तो आज तुटलेल्या वेलीप्रमाणें पुनः अंकुरयुक्त झाला आहे. १२ ज्याप्रमाणे एखादा योगी–मुनि प्रतिपक्षरहित, इतरांना प्राप्त होण्यास कठिण असें, आत्मस्वरूप असलेलें केवलज्ञान प्राप्त करून घेऊन त्रैलोक्य वंद्य होतो व सर्वोत्कृष्ट अविनाशी असें मोक्षस्थान प्राप्त करून घेतो त्याचप्रमाणें हे प्रभो ! प्रजापति महाराज प्रतिपक्षरहित, अन्य जन दुर्लभ, आपल्या बरोबरीच्या अशा आपल्या आश्रयानें जगन्मान्य झाले आहेत व स्थिर आणि उत्कृष्ट अशी प्रतिष्ठा त्यांना लाभली आहे." १३ याप्रमाणें भाषण करणाऱ्या मंत्र्याचें बोलणें मध्येंच थांबवून विद्याधरांचा राजा ज्वलनजटी हा कुंदपुष्पांच्या दळाप्रमाणें

असलेल्या चंद्रनिर्मल दांतांच्या किरणांनीं हृदयांत असलेल्या वाग्देवतेची–सरस्वतीची जणू पूजा करणारा असा होत्साता स्वतः याप्रमाणें बोलूं लागला १४ "हे विद्वच्छ्रेष्ठा ! तूं असें बोलूं नकोस. इक्ष्वाकुवंशीय राजे नमिकुलाचे फार प्राचीन कालापासून मालक होत आले आहेत. कच्छ राजाचा पुत्र जो नमिकुमार त्यानें श्रीआदि भगवंताची आराधना करून धरणेंद्रानें दिलेल्या विद्याधराच्या लक्ष्मीचा स्वीकार केला आहे. अर्थात् आमच्या कुलांतील प्राचीन मुख्य पुरुषानें इक्ष्वाकुकुलोत्पन्न आदि तीर्थकराची सेवा करूनच विद्याधर पद प्राप्त करून घेतलें आहे. ह्मणून आह्मी या वंशाचे पिढीजाद सेवक आहोत. १५ सहज जिचा शब्दचा भाग वर झाला आहे अशा सुवईरूपी मंजरीच्या विलासरुपी निमित्तानें केलेल्या या महाराजांच्या आज्ञेला अनुसरून हा मी देखील नेहमी कार्य करण्यास तयार राहीन. अर्थात् आपली आज्ञा मानणें माझें कर्तव्यच आहे कारण सत्पुरुष आपल्या वंशपरंपरेची पद्धती उल्लंघीत नाहींत. १६ याप्रमाणें भाषण करून भूगोचरीराजे व विद्याधर यांचे स्वामी असे ते दोघेजण ज्याची तयारी ब्रह्मदेवानें–पुण्यकर्मानें आधींच करून ठेविली आहे अशा आपल्या मुलगा व मुलगी यांच्या रमणीय विवाहाचा उत्सव करण्यासाठीं उद्युक्त होऊन पताका, तोरणें यांनीं सुशोभित अशा आपल्या घरीं गेले.

प्रत्यालयं प्रहतमंगलतूर्यशंखमुत्थापितध्वजवितानकृतांधकारं ।
प्राग्द्वारदेशविनिवेशितशातकुंभकुंभाग्रदत्तसुकुमारनवप्ररोहं ॥१७॥
नृत्यन्मदालसवधूजनवक्त्रपद्मन्यासक्तकामुकविलोचनमत्तभृंगम् ।
रंगावली विरचितोज्ज्वलपद्मरागप्रेंखत्प्रभापटलपल्लवितांतरिक्षं॥१८॥
उच्चारणाचतुरचारणवंदिवृंदकोलाहलप्रतिनिनादितसर्वदिक्कं ।
आसीत्परस्परविभूतिजिगीषयेव रम्यं पुरं खचरसंनिहितं वनं च १९
संभिन्नदत्तदिवसेऽथ जिनेंद्रपूजां पूर्वं विधाय जिनमंदिरमंदराग्रे ।
लक्ष्मीमपास्तकमलामिव खेचरेंद्रःपुत्रीं दिदेश विधिना पुरुषोत्तमाय २०
केयूरहारकटकोज्ज्वलकुंडलाद्यैः संमान्य राजकमशेषमशेषदानैः ।
कन्याप्रदानवहनेन समं महिम्ना चिंतासमुद्रमतरन्नमिवंशकेतुः २१
इत्थं प्रणम्य तनुजां विजयाय तुजाय प्रीतिं परामुपनयन्स्वनगरीं जगाम

एण्यन्महाभ्युदयवैभवभाजनेन संबंधमेत्य महता सह को न तुष्येत्॥२२
श्रुत्वाथ खेचरपतेर्दुहितुःप्रदानं भूगोचराय विदितात्मचरेण नीतं।
सद्यश्चुकोप गगनेचरचक्रवर्ती सिंहो यथा नवपयोधरधीरनादं ।२३।
कोपेन पल्लवितभीषणदृष्टिपातैरंगारसंचयमिवावकिरन्सभायां ।
इत्थं जगाद विततशनिघोरनादः प्रस्वेदवारिकणिकास्तबकावतंसः
॥ २४ ॥
हे खेचराःश्रुतमिदं न तु किं भवद्भिर्यत्कर्म तेन विहितं खचराधमेन।
युष्मान्नरस्तृणमिव प्रविलंघ्य दत्तं कन्याललाम मनुजाय जगत्प्रधानं२५

१७ त्यावेळीं पोदनपुर शहरांत व विद्याधरांनीं जेथें मुक्काम केला होता त्या वगीचामध्यें प्रत्येकाचे घरीं मंगल वाद्यें व शंख वाजूं लागले. ध्वज व चांदवे लावण्यानें तेथें अंधार झाला होता. घरांच्या पुढच्या दारावर सुवर्णाचे कुंभ ठेविले होते व त्यांच्या मुखावर सातूंच्या कोमल अंकुरांची स्थापना केली होती. १८ तारुण्यमदानें आळशी बनलेल्या स्त्रिया प्रत्येकाच्या घरीं नृत्य करीत असतां त्यांच्या मुखरूपी कमलांवर कामुक जनांचे डोळेरूपी उन्मत्त भृंगे आसक्त होत असत. प्रत्येकाच्या घरीं रांगोळी काढलेली असून त्यांत उज्ज्वल पद्मरागमणि बसाविलेले असल्यामुळें त्यांच्या पसरलेल्या कांतिसमूहानें आकाशाला जणु लाल कोमल पालवी फुटली आहे असा भास होत होता. १९ उच्चारण करण्यांत निपुण असलेले चारण लोक व बंदीलोकांच्या स्तुतिपाठांनीं जेथें सर्व दिशा प्रतिध्वनींनीं युक्त झालेल्या आहेत; असें तें सुंदर पोदनपुर शहर व विद्याधरांचें रमणीय वन हीं एकमेकांच्या ऐश्वर्याला जिंकण्याची जणुं इच्छा करीत आहेत अशीं भासू लागलीं. २० याप्रमाणें दोन्ही ठिकाणीं खूप शोभा झाल्यावर संभिन्न निमित्तज्ञान्यानें काढून दिलेल्या दिवशीं प्रथम जिनमंदिर व मेरुपर्वतावर जिनेश्वरांची पूजा करून विद्याधरराजा ज्वलनजटीनें शास्त्रोक्त पद्धतीनें कमलवनामध्यें राहणें जिनें सोडलें आहे अशा लक्ष्मीप्रमाणें सुंदर असलेली आपली स्वयंप्रभा कन्या त्रिपृष्ठ कुमाराला अर्पण केली. २१ बाहुभूषणें, हार, कडीं, सुंदर कुंडलें वगैरे अलंकार राजे लोकांना अर्पण करून ज्यानें संपूर्ण शत्रु नष्ट केले आहेत असा नमिकुळांत ध्वजासारखा भासणारा ज्वलनजटी आपल्या राणीसह कन्याप्रदानरूपी नौकेच्या द्वारें चितारूपी समुद्र तरून गेला.

२२ याप्रमाणें विजयबलभद्राच्या धाकट्या बंधूला आपली कन्या अर्पण करून विद्याधरांचा राजा फार संतुष्ट झाला. पुढें ज्यांना उन्नतियुक्त ऐश्वर्य प्राप्त होणार आहे अशा मोठ्या लोकांशीं आपला संबंध झाला असतां कोणास बरें आनंद होत नाहीं ? सर्वांसच होतो. २३ विद्याधरराजा ज्वलनजटीनें आपली कन्या भूगोचरी राजाला दिली अशी हकीकत आपल्या प्रसिद्ध हेरानें आणिलेली ऐकून विद्याधरांचा चक्रवर्ती अश्वग्रीव प्रतिनारायण नवीन मेघांच्या गंभीर ध्वनीला ऐकून जसा सिंह रागावतो तसा तत्काल रागावला. २४ कोपानें लाल भडक झालेल्या आपल्या भयंकर नेत्रकटाक्षांनी तो सभेमध्यें विस्तवांची जणु वृष्टि करीत आहे असा भासू लागला. घामाच्या पाण्याच्या बारीक कणांनीं त्याचें शरीर शोभू लागलें. विजेच्या कडकडाटाप्रमाणें ज्याचा भयंकर ध्वनि पसरला आहे असा तो अर्धचक्रवर्ती याप्रमाणें बोलूं लागला. २५ " हे विद्याधरानों ! त्या अधम खचरानें अर्थात् विद्याधरानें जें काम केलें तें तुह्मी ऐकिलें नाही काय ? तुह्मा सर्व विद्याधरांना जीर्ण गवतताप्रमाणें तुच्छ मानून-तुमचें उल्लंघन करून त्यानें त्रैलोक्यांत अद्वितीय रूपवती सर्व कन्यामध्यें सौभाग्यतिलकाप्रमाणें शोभणारी कन्या स्वयंप्रभा एका मनुष्याला दिली आहे. ही गोष्ट तुह्मी ऐकिली नाहीं काय? अर्थात् आतांच ऐकिली आहे.

इत्याहतं प्रतिमुखं वचनेन तस्य प्रक्षोभघूर्णितमुवाह सदःसमस्तं ।
लीलां प्रसादविरहादविलोकनीयां कल्पांतकालपवनक्षुभितांबुराशेः
॥ २६ ॥

अग्रेसरः स्थितिमतामविलंघनीयां बिभ्रत्समुन्नतिमनन्यभवोऽग्रतवः
कोपात्प्रकंपितजगज्जनताक्षयाय प्रालेयशैल इव नीलरथश्चचाल
॥ २७ ॥

चित्रांगदो निहतशात्रवशोणितेन चित्रां गदां परिमृशन्नुदगात्करेण
वामेन वेगचलितांगदपद्मरागछायापदोन्मिपितकोपदवानलेन ॥२८॥

भ्रूभंगभंगुरमुखः परिपाटलाक्षः प्रस्वेदवारिलवकीर्णकपोलमूलः ।
दोलायितोच्चततनुः स्फुरिताधरोऽभूद्भीमः स्वयं मदपि कोपवदुग्र-
कोपः ॥ २९ ॥

विद्यावलिप्तहृदयः शरणातुराणां दत्ताभयः प्रतिभये सति नीलकंठः।
उच्चैर्जहास ककुभां विवराणि कोपात्प्रध्वानयन्कहकहध्वनिभिर्ग-
भीरैः ॥ ३० ॥

स्वेदार्द्रनिर्मलतनुप्रातिबिंबितेन क्रुद्धेन संसदि गतेन जनेन तेन।
आसीदनेकमिव हंतुमरीन्विकुर्वन्विद्याबलेन बलमाजिरसेन सेनः
॥ ३१ ॥

क्रोधोद्धतःसमदशात्रवदंतिदंतप्राशाभिघातविपुलव्रणमग्नहारं।
वक्षःस्थलं विपुलमुत्पुलकं करेण वामेतरेण परिघः परितो ममार्ज
॥ ३२ ॥

निर्व्याजपौरुषवशीकृतवैरिवर्गो विद्याविभूतिजनितोन्नतिरुन्नतांसः।
उर्वीं जघान कुपितो हरिकंधरांकः कर्णोत्पलेन चलितालिकुला-
कुलेन ॥ ३३ ॥

२६ प्रत्येकाच्या मुखाकडे वळून अश्वग्रीवानें याप्रमाणें भाषण केलें. त्याच्या भाषणानें ताडित झालेल्या लोकांवर बराच परिणाम झाला. सगळ्या सभेंत प्रसन्नतेचा अभाव झाला व कल्पांतकालाच्या वाऱ्यानें समुद्र खवळला असतां जसा तो भयंकर होतो, त्याच्याकडे त्यावेळीं पाहणेंही शक्य नसते तशी सभा अगदीं क्षुब्ध होऊन गेली. २७ कोपानें जगाला कंपित करणारा नीलरथ सर्व भूमिगोचरी मनुष्यांचा क्षय करण्यासाठीं निघाला असतां तो हिमाळयपर्वताप्रमाणें शोभूं लागला. हिमालय जसा स्थिरपर्वतामध्यें अग्रेसर–मुख्य आहे तसा हाही स्थितिमान लोकांमध्यें–मर्यादेचें रक्षण करणाऱ्या लोकांमध्यें अग्रेसर–पुढारी आहे. हिमालय उल्लंघन करतां न येणाऱ्या समुन्नतिला–उंचीला धारण करितो. व हा नीलरथही उल्लंघन न करतां येईल अशा समुन्नतिला–वैभवाला धारण करीत आहे. हिमालय अनन्य-भवोरुसत्व अर्थात् इतर ठिकाणीं न आढळून येणाऱ्या अपूर्व प्राण्यांना धारण करितो तसा हा विद्याधरही अनन्यभवोरुसत्व होता अर्थात् त्याच्या ठिकाणीं इतरांच्या ठिकाणीं न आढळून येणारें असें मोठें सामर्थ्य होतें. २८ ठार मारलेल्या शत्रूंच्या रक्तानें चित्रित झालेल्या गदेला डाव्या हातानें धरून चित्रांगद सभेंत उठून उभा राहिला व डाव्या हातानें ती फिरऊ

लागला. फिरविण्याच्या वेगानें रथानापासून खालीं सरकलेल्या बाहुभूषणांतील पद्मरागमण्यांच्या कांतीच्या मिषानें जणु त्याचा हात कोपरूपी वडवाग्नीनें युक्त झाल्याप्रमाणें शोभू लागला. २९ भीम नांवाचा विद्याधर राजा अश्वग्रीवाचें भाषण ऐकून भुवया वाकड्या झाल्यामुळें ज्याचे मुख वांकडें झालें आहे असा झाला. त्याचे डोळे लाल झाले, घामाच्या थेंबांनीं गालांच्या जवळचा प्रदेश व्यापून गेला. त्याचें उंच व धिप्पाड शरीर झोंक्याप्रमाणें हालूं लागलें, ओठ थरथर कांपू लागले. त्याला फार तीव्र कोप आला. त्यामुळें सभेंत जणु तो साक्षात् कोपाप्रमाणें भासू लागला. ३० ज्याचें हृदय विद्यांच्या प्राप्तीनें गर्वयुक्त झालें आहे, शत्रूपासून भय उत्पन्न झालें असतां शरण नसल्यामुळें भयाकुल झालेल्या लोकांना जो अभयदान देतो असा नीलकंठ नांवाचा एक राजा गंभीर अशा कहकहाट ध्वनींनीं दिशांच्या विवरांना प्रतिध्वनियुक्त करून कोपानें मोठ्यानें हंसू लागला. ३१ घामानें ओले झालेल्या ज्याच्या निर्मल देहामध्यें सभेंतील सर्व क्रुद्ध झालेल्या लोकांचें प्रतिबिंब पडले आहे असा सेन नांवाचा एक विद्याधर राजा युद्धप्रेमानें शत्रूंना ठार मारण्यासाठीं विद्येच्या सामर्थ्यानें जणु ज्यानें विपुल सैन्य तयार केलें आहे असा दिसू लागला. ३२ शत्रूच्या उन्मत्त हत्तींच्या दन्तप्रहारामुळें झालेल्या मोठ्या जखमेंत बुडालेल्या मोत्याच्या हारानें युक्त व ज्याच्यावर शहारे आले आहेत असें स्वतःचें मोठें रुंद वक्षःस्थल क्रुद्ध झालेला परिघ नांवाचा राजा आपल्या उजव्या हातानें सर्व बाजूंनीं चोळू लागला. ३३ स्वाभाविक पराक्रमानें ज्यानें शत्रूसमूहास वश केलें आहे, विद्या व ऐश्वर्य यांच्या द्वारें ज्यानें प्रजाजनांना उन्नतावस्थेला पोहोचविलें आहे, ज्याचे खांदे उंच आहेत अशा अश्वग्रीव अर्धचक्रवर्तीनें क्रुद्ध होऊन चंचल झालेल्या भ्रमरसमूहानें युक्त असलेलें कानावरील कमलानें जमीनीवर आघात केले.

भूरिप्रतापपरिपूरितसर्वदिक्कः पद्माकरार्पितजगत्प्रणताग्रपादः ।
कोपाञ्जनक्षयमिव प्रथयन्विवर्णस्तूर्ण दिवाकर इवैष दिवाकरोऽभूत् ॥ ३४ ॥

ज्याघातजैः किणकणैःस्थपुटाग्रहस्तो हस्तद्वयेन मथितारिकुलाचलेन ।

संचूर्णयन्नुरसि हारलतां न चक्रे सूत्राविशेषमपि संसदि कामदेवः ॥ ३५ ॥
योद्धुं द्विषा सह वियत्प्रविगाहमानौ सभ्यैर्धृतौ कथमपीश्वरवज्रदंष्ट्रौ
उत्खातधौतकरवालकरप्ररोहप्रारोहभासुरितदक्षिणबाहुदंडौ । ३६ ।
कालान्तरादधिगतावसरोऽप्यनेन नांगीकृतोऽहमिति रुष्ट इवास्तकोपः -
दूरादंकपननृपस्य यथार्थनाम्नः कुप्यत्यहो सदसि चंचलधीर्न धीर। ॥ ३७ ॥
आस्फालिता रभसनिर्दयदष्टकांतदन्तच्छदेन बलिनाशनिविक्रमेण।
क्रुद्धेन दक्षिणकरेण रसा ररास स्फीतांबरं रणरणायितभूषणेन ।३८।
इत्युद्धतःसदसि धूमशिखो जगाद व्यात्ताननप्रसृतधूमविधूमिताशः

आलोक्य कोपपरिपाटलितेक्षणाभ्यां
नीराजयन्निव सभामभिमानशाली ॥ ३९ ॥

आज्ञापयाश्वगल ! तिष्ठसि किं वृथैव
प्रज्ञा सतां परिभवे सति निर्व्यपेक्षा ।
वामेन किं करतलेन धरामशेषामुद्धृत्य
चक्रधर ! वारिनिधौ क्षिपामि ॥ ४० ॥

३४ जसा दिवाकर–सूर्य आपल्या पुष्कळ कडक उन्हानें सर्व दिशांना भरून टाकितो व जग ज्यांना नमस्कार करितें असे आपले किरण कमल-समूहावर टाकितो त्याप्रमाणें भूरिप्रतापपरिपूरितसर्वदिक्ः अर्थात् आपल्या अतिशय पराक्रमानें सर्व दिशा भरून टाकणारा, व पद्माकरार्पितजगत्प्रणताग्रपादः अर्थात् जग ज्याला नमस्कार करितें असा, ज्याचें पाय लक्ष्मी हातानें चुरीत आहे असा हा दिवाकर रागानें लाल भडक होऊन जणु जगाचा शीघ्र क्षय करणारा असा होत्साता दिवाकर झाला अर्थात् सूर्यासारखा झाला. ३५ धनुष्याच्या दोरीच्या आघातानें उत्पन्न झालेल्या लहानशा अनेक घट्टयांनी ज्याच्या हाताचे तळवे उंच सखल झाले आहेत अशा सभेंत

बसलेल्या कामदेव नांवाच्या विद्याधर राजानें शत्रूरूपी कुलाचलपर्वतांचा चुराडा करणाऱ्या आपल्या दोन हातांनीं आपल्या वक्षःस्थलावर असलेल्या रत्नमालेचा चुरा करून तिचें सूत देखिल बाकी ठेविलें नाहीं.

३६ म्यानांतून बाहेर काढलेल्या तेजस्वी तरवारीच्या किरणरूपी उगवलेल्या अंकुरांनीं ज्यांचे उजवे बाहुदंड तेजस्वी दिसतात असे ईश्वर व वज्रदंष्ट्र नांवाचे दोन विद्याधर राजे शत्रूशीं लढण्यासाठीं आकाशमार्गानें जात असतां त्यांना सभेंत असलेल्या इतर विद्याधर राजांनीं मोठ्या कष्टानें धरून ठेविलें. ३७ पुष्कळ दिवसांनीं आज मला याच्या ठिकाणीं उत्पन्न व्हावयास संधि मिळाली असतांही यानें माझा स्वीकार केला नाहीं ह्मणून जणु रुसल्याप्रमाणें अकंपन या यथार्थ नांवाला धारण करणाऱ्या या अकंपन राजापासून कोप दूर झाला. बरोबरच आहे कीं, सभेमध्यें चंचल बुद्धीचीं माणसें तेव्हांच रागावतात. पण धीर मनुष्य शांत असतो. हा अकंपन राजा स्थिरबुद्धीचा असल्यामुळें खरोखरच अकंपन होता ह्मणून त्यानें आपलें मन क्रोधाविष्ट होऊं दिलें नाहीं. ३८ ज्याचा शनीसारखा पराक्रम आहे. ज्यानें वेगानें निर्दय होऊन आपला सुंदर ओठ चावला आहे, अशा बालि राजानें ज्याचीं भूषणे वाजत आहेत अशा आपल्या उजव्या हातानें जमीनीवर जोरानें प्रहार केले. त्यावेळीं जमीन शब्दयुक्त झाली व तिच्या प्रतिध्वनीनें आकाश भरून गेलें.

३९ उघडलेल्या मुखांतून निघालेल्या धुरानें ज्यानें दिशा व्याप्त करून टाकिल्या आहेत असा अभिमानशाली उद्भट धूमशिख नांवाचा विद्याधर राजा सभेला पाहून कोपानें आरक्त झालेल्या आपल्या दोन डोळ्यांनीं जणु तिची आरती करणारा होत्साता अश्वग्रीव राजाला याप्रमाणें बोलला. सभेमध्यें त्यानें चोहोंकडे आपले लालभडक डोळे वळवून पाहिलें तेव्हां तो जणू सभेची आरती करीत आहे असा लोकांना भासू लागला. ४० हे अश्वग्रीव राजा! यावेळेस व्यर्थ गप्प कां बसतोस? दुष्ट लोकांकडून पराभव होण्याची वेळ आली असतां बुद्धि अपेक्षारहित असावी अर्थात् कोणाची जरूर न बाळगतां दुष्टांचा नाश करण्याचा प्रयत्न करावा. त्यावेळीं स्वस्थ बसूं नये. मला आज्ञा कर. डाव्या हातानें भूमिगोचरी लोकांचा सगळा प्रदेश हे चक्रधरा! उचलून समुद्रांत फेकून देऊं काय?

लोकाधिकां नमिकुलप्रवरस्य पुत्रीं
कंठे कृतामसदृशा मनुजेन तेन ।
को वा सहत्यसहनो न विधेर्मनीषी
दृष्ट्वा शुनो गल इवोज्ज्वलरत्नमालां ॥ ४१ ॥

एतेषु कश्चिदपि यः खचराधिपेषु
भ्रूविभ्रमेण भवताभिहितः स एव ।
आकस्मिकं नमिकुलप्रलयं विधत्ते
काकेषु नाथ मनुजेषु च तस्य कास्था ॥ ४२ ॥

क्रुद्धे यमे त्वयि च जीवति कः क्षणं वा
लोके प्रसिद्धमिति वाक्यमिदं न जानन् ।
इत्थं विरोधमकरोत्स कथं
पुनस्ते सीदत्यहो मतिमतां मतिरप्यभावे ॥ ४३ ॥

अत्रात्मबंधुनिवहैः सह नागपाशैर्बद्ध्वा
वधूवरयुगं सहसानयामः ।
इत्युत्थितानुनयन्खचरान्कथंचित्
मंत्री निवार्य हयकंधरमित्यवादीत् ॥ ४४ ॥

निष्कारणं किमिति कुप्यसि नाथ !
बुद्धिर्याता क्व ते सकलनीतिपथप्रवीणा ।
कोपान्न शत्रुरपरोऽस्ति शरीरभाजां
लोकद्वयेऽपि विपदां ननु हेतुभूतः ॥ ४५ ॥

तृष्णां विवर्धयति धैर्यमपाकरोति
प्रज्ञां विनाशयति संजनयत्यवाच्यं ।
संतापयेत्स्ववपुरिंद्रियवर्गमुग्रः
पित्तज्वरप्रतिनिधिः पुरुषस्य कोपः ॥ ४६ ॥

रागं दृशोर्वपुषि कंपमनेकरूपं
चित्ते विवेकरहितानि विचिंतितानि ।

पुंसाममार्गगमनं श्रमदुःखजातं
कोपः करोति सहसा मदिरा मदश्च ॥ ४७ ॥
यः कुप्यति प्रतिपदं भुवि निर्निमित्त–
मासोऽपि नेच्छति जनः सह तेन सख्यं ।
मंदानिलोल्लसितपुष्पभरानतोऽपि
किं सेव्यते विषतरुर्मधुपव्रजेन ॥ ४८ ॥
आलंबनः प्रतिभये सति मानभाजां
वंशोन्नतः प्रथितसारगुणैर्विशुद्धः ।
श्रीमानसाधुपरिवारतिरोहितात्मा
प्राप्नोति मानद ! कलंकमसिश्च सद्यः ॥ ४९ ॥

४१ नमिकुलांतील श्रेष्ठ विद्याधराची–ज्वलनजटीची कन्या स्वयंप्रभा ही लोकोत्तर सुंदरी आहे. परंतु अशा अनुपम सुंदर कन्येला त्या क्षुद्र मनुष्यानें अर्थात् त्रिपृष्टानें आपल्या गळ्यांत धारण केलें आहे. हें कुत्र्यानें आपल्या गळ्यांत उज्ज्वल रत्नमाला धारण करण्यासारखें झालें आहे. विधात्याचें हें अयोग्य कृत्य कोणता बुद्धिमान मनुष्य सहन करूं शकतो बरें ? अर्थात् त्या क्षुद्र मनुष्यापासून ही अनुपम कन्या हिरावून आणिली पाहिजेच. ४२ हा सर्व विद्याधरांचा समूह येथें बसला आहे यापैकीं आपण भुवईच्या संकेतानें ज्या कोणालाही आज्ञा द्याल तो एकदम नमिकुलाचा सत्यनाश करण्यास समर्थ आहे. मग हे प्रभो ! कावळ्यासारखे हीनबल मनुष्यांची त्याला काय किंमत आहे ? ४३ यम अथवा आपण रागावला असतां या जगांत कोण जगण्यास समर्थ आहे ? अशी जी आपल्याविषयीं हे प्रभो ! ह्मण प्रसिद्ध आहे, ती माहीत न झाल्यामुळें ज्वलनजटीनें असलें अयोग्य कार्य केलें आहे. अर्थात् आपल्याशीं विरोध केला आहे. हें शक्य नाहीं, अथवा बुद्धिमान लोकांचीही बुद्धि विनाशकाल समीप आला असतां नाश पावते असें ह्मणावयास हरकत नाहीं. ४४ यास्तव या सभेंत नगाम आणि वज्रास त्यांच्या आसनातलगासह नागपाशांनीं बद्ध करून आह्मी एकदम आणतो असें ह्मणून तसें करण्यासाठीं उठलेल्या विद्याधरांना अश्वग्रीवाच्या मंत्र्यानें प्रार्थना वगैरे करून थांबविलें. तो अश्वग्रीवाला पुढें

लिहिल्याप्रमाणें बोलूं लागला. ४५ " हे प्रभो, आपण व्यर्थ कां बरें क्रुद्ध होत आहांत? हे नाथा, सर्व नीतिमार्गामध्यें प्रवीण असलेली आपली बुद्धि आज कोठें गेली? महाराज! संसारी जीवांना कोपाहून दुसरा शत्रु नाहीं. हा कोपरूपी शत्रु या लोकीं व परलोकींही खात्रीनें विपत्तीलाच कारण आहे. ४६ पित्तज्वर आला असतां ज्या गोष्टी घडून येतात त्या गोष्टी कोपापासूनही घडून येतात ह्मणून तो पित्तज्वराचा प्रतिनिधि आहे असें ह्मणतां येतें. पित्तज्वरानें तहान वाढतें, धैर्य नष्ट होतें, बुद्धीचा नाश होतो व न बोलण्यायोग्य देखिल गोष्ट मनुष्य बोलून जातो. हा उग्र ज्वर मनुष्याची इंद्रियें व शरीर यामध्यें दाह उत्पन्न करितो. याच गोष्टी कोपाच्या-द्वारेंही अवश्य घडून येतात. ४७ कोप आणि दारूची धुंदी यापासून समानच कार्यें घडून येतात. तीं अशीं:— डोळे लाल होतात, शरीर अनेक प्रकार कंप पावतें, मनामध्यें विवेकरहित नाना प्रकारचे विचार येतात, वाईट मार्गानें गमन होतें व श्रम झाल्यानें दुःख उत्पन्न होतें. या गोष्टी या कोपानें व दारूच्या धुंदीनें एकदम प्राप्त होतात. ४८ जो मनुष्य पावलोपावलीं विनाकारण रागावतो, जगामध्यें आप्तनातलग देखिलही त्याच्याशीं मैत्री करूं इच्छित नाहीत. यास उदाहरण असें पहा कीं, मंद वाऱ्यानें हालणाऱ्या पुष्पसमूहाच्या भारानें लवलेलाही विषवृक्ष भुंग्यांच्या समूहांकडून सेविला जातो काय? केव्हांही नाहीं. ४९ भय उत्पन्न झालें असतां स्वाभिमानी पुरुषांना आश्रय देणारा, उत्तम कुलामध्यें जन्मून उन्नतावस्थेला पोहोंचलेला, प्रसिद्ध अशा उत्कृष्ट सत्य, औदार्य वगैरे गुणांनीं विशुद्ध झालेला, संपत्तिमान् मनुष्य दुष्ट परिवाराकडून त्याचें स्वरूप झाकले गेलें असतां तो कलंकयुक्त होतो. अर्थात् जगांत त्याची अपकीर्ति होते. तरवारीचें दुष्ट पुरुषांनीं घेरलेल्या श्रीमंत मनुष्यांशी असेच साम्य आहे. तें याप्रमाणेः— शत्रूपासून भय उत्पन्न झाल्यें असता स्वाभिमानी माणसांना तरवार आधारभूत आहे. तिच्या योगानें भय नाहींसें करतां येतें. मध्यें तिला बांक आल्यामुळें ती उन्नत दिसते. प्रसिद्ध उत्कृष्ट गुण तीक्ष्णता वगैरे असतात. आणि ती अतिशय स्वच्छ असते. व कांतियुक्त असल्यामुळें चमकते. परंतु तिच्यावरचें म्यान खराब असेल तर तिचें स्वरूप झांकून जातें; अर्थात् ती गंजते, तिची धार कमी होते अशा रीतीनें जशी ती कलंक युक्त होते तसेंच शत्रूंचा अभिमान तोडून टाकणाऱ्या हे चक्रवर्ती

अश्वग्रीवा ! दुष्ट पुरुषान्च्या महत्वामानें तुझें खरें स्वरूप झांकून तुला तत्काल कलंक लागेल.

रक्षापरा समभिवांछितकार्यसिद्धेः
सिद्धांजनैकगुलिका तिमिरस्य दृष्टेः ।
लक्ष्मीलतावलयवर्धनवारिधारा
क्षांतिः सतामभिमता भुवि केन नास्तु ॥ ५० ॥
न श्रेयसे भवति विक्रमशालिनोऽपि
कोपः परेष्वतिबलस्य समुन्नतेषु ।
अंभोधरान्समभिलंघ्य मृगाधिराजो
निष्कारण स्वयमुपैति न किं प्रयासम् ॥ ५१ ॥
युक्तात्मपक्षबलगर्वितयैव मूढः
स्वस्येतरस्य च समीक्ष्य न शक्तिसारं ॥
उद्यञ्जिगीषुरभिवन्हि पतत्पतंगप्राप्यां
दशामनुभवत्यचिरादचिंत्यां ॥ ५२ ॥
तुल्ये रिपौ जगति दैवपराक्रमाभ्यां
संधिः प्रभोरभिहितो नयशास्त्रविद्भिः ।
अभ्युन्नतो भवति पूज्यतमश्च ताभ्यां
हीनोऽपि सन्मतिमतां सहसा न दंड्यः ॥ ५३ ॥
अंतर्मदं करिपतेरिव बृंहितानि
प्रातःकरा इव दिनेशमुदीयमानं ।
लोकाधिपत्यमपि भाविं विनांतरायं
प्रख्यापयन्ति पुरुषस्य विचेष्टितानि ॥ ५४ ॥
यस्तादृशं मृगपतिं मृगराज-
राजकोटीवल नवमृणालमिवांगुलीभिः ।
स्वैरं व्यदारयदथैककरेण दध्रे
येनातपत्रमिव कोटिशिला व्युदस्य ॥ ५५ ॥

यं च स्वयं ज्वलनजट्युरगस्य विद्वान्
कन्याप्रदानविधिपूर्वमुपास्त धीरः ।
तेजोनिधिः स कथमद्य तवाशियोध्यो
यातव्य इत्यपि वदासि वद त्रिपृष्ठः ॥ ५६ ॥

चक्रश्रिया परिगतोऽहमिति
स्वकीये गर्व वृथा मनसि मानद ! माकृथास्त्वं ।
किं वा विमूढमनसामजितेंद्रियाणां
संपत्सुखाय सुचिरं परिणामकाले ॥ ५७ ॥

५० हे प्रभो, क्षमा ही इच्छित कार्यांच्या सिद्धीचें रक्षण करणारी आहे, दृष्टींतील तिमिररोग काढून टाकण्यास जसें सिद्धांजन समर्थ असतें त्याप्रमाणें सम्यग्दर्शनांत दोषाचा प्रवेश झाल्यास तो काढून टाकण्यास ही क्षमा सिद्धांजन गुटिकेप्रमाणें आहे. संपत्तीरूपी लतेची वाढ होण्यास ही पाण्याच्या धारेप्रमाणे आहे. ही क्षमा सत्पुरुषांना मान्य असल्यामुळें कोपास ते मान्य होणार नाहीं ? सर्वांस मान्य होईल. ५१ पराक्रमयुक्त व शक्तिशाली अशा मनुष्यांनीही जे उन्नतावस्थेला पोहोचले आहेत अशावर कोप करूं नये. कारण तो त्यांच्या कल्याणाला कारण होत नाही. यास उदाहरण असे पहा कीं, मेघांना पकडण्या-साठीं सिंह पुष्कळ उड्या मारतो; परतु तो व्यर्थ श्रमच पावतो. तसें समर्थ माणसावर कोप केल्याने विक्रमशाली माणसासही अहिताशिवाय दुसरें फळ मिळत नाही. ५२ स्वत ची शक्तच योग्य आहे व तिचेंच पुष्कळ सामर्थ्य आहे अशी ज्याला घमेंड उत्पन्न झाली आहे तो मनुष्य खरोखर स्वतःच्या व इतरांच्या शक्तीचें महत्व जाणीत नाहीं असे ह्मणावें लागते शत्रूला अविचारानें जिंकण्यास तयार झालेला तो गर्वयुक्त मनुष्य लौकरच अग्निकडे धावून त्यावर उडी मारणाऱ्या पतंगाला जी अवस्था प्राप्त होते त्या अचित्य अवस्थेची प्राप्ति करून तिचा अनुभव घेतो. ५३ हे राजन्, जो शत्रु सुदैव व पराक्रम यानी आपल्या तोडीचा आहे त्याच्याशीं राजानें संधीच करावा असे नीतिज्ञ लोक ह्मणतात. हीन मनुष्य देखिल दैव व पराक्रमाच्या जोरावर उन्नत व पूज्य बनतो. यास्तव हीन मनुष्यासही बुद्धिमान लोकानीं विचार न करितां दुखवूं नये.

५४ जसें हत्तीच्या वारंवार होणाऱ्या गर्जना त्याच्या अंगांत उत्पन्न झालेल्या उन्मत्तपणाच्या सूचक आहेत. प्रातःकाळीं नुकतेंच बाहेर पडलेलें सूर्यकिरण जसे उदित होणाऱ्या सूर्याचें ज्ञान करून देतात त्याप्रमाणें पुरुषाचें पराक्रम त्याला पुढें विघ्नरहित जगाचें साम्राज्य मिळेल याचें सूचक असतात. ५५–५६ जो सिंह अनेक सिंहांचा स्वामि व कोट्यावधि सिंहापेक्षांही अधिक बलवान होता; त्यालाही ज्यानें सहज आपल्या बोटांनी कोमल कमलांच्या दांड्याप्रमाणें फाडून टाकिलें व ज्यानें एका हातानें छत्राप्रमाणें कोटि शिलेला उचलून आपल्या मस्तकावर धारण केलें व स्वतः विद्वान ज्वलनजटीनें जाऊन आपली कन्या देऊन ज्याची उपासना केली; त्या धीर तेजांचा साठा अशा त्रिपृष्ठ कुमाराबरोबर आज तुम्ही लढण्यास कसें योग्य आहात व त्याच्यावर आज चालून जाणें तरी कसें योग्य आहे? हे प्रभो, आपण विचार करून सांगा बरें! ५७ शत्रूंचा अभिमान नष्ट करणाऱ्या हे अश्वग्रीवा, मी चक्रवर्तीच्या लक्ष्मीनें युक्त आहे असा मनांत व्यर्थ गर्व धारण करू नकोस. कारण असें की, ज्यांचें मन मोहित झालें आहे व ज्यांनीं आपलीं इंद्रियें ताब्यांत ठेविली नाहीत अशांची संपत्ति पुष्कळ दिवस टिकत नाहीं व परिणामीं सुखकरही होत नाहीं यास्तव आपण युद्धाच्या भानगडींत पडूं नये.

तस्मान्न कार्यमभियानमनात्मनीनमेतत्तव प्रतिनरेश्वरमीश्वरस्य ।
इत्थं निगद्य सचिवः परिणामपथ्यं
तूष्णीं बभूव मतिमान्न हि वक्त्यकार्यं ॥ ५८ ॥

तत्त्वावलोकनकरैर्जगदेकदीपैर्घर्मद्युतेरिव मयूखचयैरुलूकः ।
वाक्यैः स तस्य तमसि प्रतिबद्धबुद्धिर्दुष्टः प्रबोधमगमन्न तुरंगकंठः ५९
दुःशिक्षितैरनवलोकितकार्यपाकैः कैश्चित्समेत्य निजबुद्धिबलावलिप्त
उत्तेजितः सचिवमित्यवदत्स कोपाद्भ्रूभंगभंगुरिततुंगललाटपट्टः ६०
*नोपेक्षते परिणतावथ पथ्यमिच्छन्नल्पीयसीमपि रिपोरभिवृद्धिमिद्धां

---

* टिप्पणीः— उपेक्षितः क्षीणबलोऽपि शत्रु प्रमाददोषात्पुरुषैर्मदान्धैः ॥
साध्योऽपि भूत्वा प्रथमं ततोऽसावसाध्यतां व्याधिरिव प्रयाति ॥
समानार्थकोऽयं श्लोकः ॥

अखंतको ननु भवत्यचिरादरातिः
कालेगदश्च सहसा परिवर्द्धमानः ॥ ६१ ॥

पद्माकरं समवलंब्य स राजहंसः पक्षान्वितोऽपि कुरुते भुवि न प्रतिष्ठां।
एकत्र शत्रुजलदेऽपि ननु स्वकाले
गर्जत्युपात्तनिशितासितडित्कराले ॥ ६२ ॥

भूरिप्रतापसहितैरविभिन्नदेहैस्तेजोमयैरगणितैः सहितः सहायैः।
उद्यन्न साधयति किं भुवनं जिगीषु–
र्भास्वान्करैरिव गृहीतसमस्तदिक्कैः ॥ ६३ ॥

दानांबुसेकसुरभीकृतगंडभित्तीन्संचारिणोऽजनगिरीनिव
तुंगकायान्।
हन्त्यूर्जितः शयुसमानकराननेकान्–
कस्योपदेशमधिगम्य गजान्गजारिः ॥ ६४ ॥

इत्थं हरिश्मश्रुमुदारबोधं प्रमाणभूतं प्रविलंघ्य वाग्भिः ॥
स्वातंत्र्यमत्यंतमवाप कोपादाधोरणं मत्त इव द्विपेन्द्रः ॥ ६५ ॥

५८ यास्तव हे राजन्! त्रिपृष्ठ नरपालावर आपण चालून जाऊं नये. हें आपल्याला हितकर होणार नाहीं. 'याप्रमाणें मंत्र्यानें ज्याचा परिणाम हितकर आहे असें भाषण करून मौन धारण केलें. बरोबरच आहे की, सुज्ञ मनुष्य अयोग्य कार्य करण्यास सांगत नसतो. ५९ जसे सूर्याचें किरणसमूह सत्य पदार्थ दाखविणारे, जगांत अद्वितीय कांति धारण करणारे असे असूनहि अंधारांवरच ज्याच्या बुद्धिचें प्रेम जडलें आहे असें घुबड त्यापासून पदार्थांना जाणूं शकत नाहीं. अंधारांतच त्याची बुद्धि चालत असते त्याप्रमाणें खरी परिस्थिति दाखवून देणाऱ्या उपदेशानें अश्वग्रीवाची बुद्धि ठिकाणावर आली नाहीं. कारण त्याची बुद्धि अज्ञानांधकारानें ग्रस्त झाली होती. ६०–६१ स्वतःच्या बुद्धिसामर्थ्याचा ज्याला गर्व आला आहे व भुवया वर चढविल्यामुळें ज्याचें उच्च कपाळ आठ्यांनीं व्याप्त झालें आहे अशा त्या अश्वग्रीवाला कुशिक्षित व पुढील परिणामाकडे

लक्ष न देणाऱ्या अशा लोकांनीं उत्तेजन दिल्यामुळें तो पुढें लिहिल्याप्रमाणे क्रुद्ध होऊन बोलूं लागला. "ज्याला आपला शेवट चांगला व्हावा असें वाटतें असा मनुष्य शत्रूची परिणाम करणारी अल्प देखिल उन्नति सहन करूं शकत नाहीं. अर्थात् तिच्याविषयीं उपेक्षा धारण करीत नाहीं त्याची उन्नति हाणून पाडण्याचा तो प्रयत्न करितो. उपेक्षा केली तर योग्यकालीं सहसा उन्नतावस्थेला पोहोचलेला शत्रु व रोग हे शीघ्र परिणामीं दुःख देणारे होतात. ६२ मेघरूपी शत्रु योग्यकालीं तीक्ष्ण विद्युत् रूपी तरवार हातांत घेऊन गर्जना करूं लागला असतां पक्षान्वित-पंखांनीं युक्त असूनही राजहंस कमलवनाचा आश्रय करूनहि या जगांत स्थिरत प्राप्त करून घेऊं शकत नाहीं. तसें शत्रुरूपी मेघ विजेसारखी तीक्ष्ण चमकणारी तरवार हातांत घेऊन योग्यकालीं गर्जना करूं लागला असतां आपल्या बाजूच्या राजांनीं युक्त व लक्ष्मीच्या हाताचा आश्रय घेतलेला असाहि एखादा बलिष्ठ श्रेष्ठ राजा या भूतलावर स्थिर राहूं शकत नाहीं. त्याचेंहि आसन डळमळतें.

६३ पुष्कळ तीक्ष्ण प्रकाशानें युक्त, सूर्यापासून अभिन्न देहाला धारण करणारे. तेजस्वी, अगणित. सर्व दिशामध्यें पसरलेले व सहायक अशा स्वतःच्या किरणांच्या मदतीनें उगवणारा सूर्य सगळ्या भूतलाला जिंकीत नाहीं काय? तो जसें हे जग जिंकितो त्याप्रमाणें अतिशय पराक्रमी, तेजस्वी, सर्व दिशांना प्राप्त करून घेण्यास समर्थ अशा आपल्या जणु हाताप्रमाणें स्वतःपासून अभिन्न देहाचे असलेल्या अगणित वीर पुरुषांच्या सहाय्यानें दिग्विजय करण्याची इच्छा करणारा राजा हें जगत जिंकीत नाहीं काय?

६४ मदजल नेहमी वाहत असल्यामुळें ज्यांचें गंडस्थळ सुगंधित झालें आहे, जे जणु संचार करणारा अंजनगिरीच आहे असे भासतात, ज्यांच्या सोंडी अजगराप्रमाणें लठ्ठ आहेत अशा लठ्ठ शरीराचे धारक हत्तींना बलिष्ठ सिंह कोणाच्या उपदेशानें मारीत असतो काय? अर्थात् हत्तीचा नाश करणें हे जसें सिंह आपलें कर्तव्य समजतो तसें मी माझें कर्तव्य समजून त्रिपृष्ठाशीं युद्ध करणारच व त्याला ठार मारणार! ६५ याप्रमाणें प्रमाणभूत-विश्वास पात्र व महाज्ञानी अशा हरिश्मश्रु मंत्र्याचें आपल्या भाषणानें अश्वग्रीवानें उल्लंघन केलें व जसा उन्मत्त झालेला हत्ती महाताला न जुमानता अत्यंत स्वच्छंदीपणानें वागतो तसें अर्धचक्रवर्ती अत्यंत स्वच्छंदानें वागूं लागला.

उत्तस्थावथ विलंघ्य सद्यो दुर्वारस्तुरगगलः प्रतीतसत्वः ।
कल्लोलैरिव जलधिर्युगांतकाले आच्छन्नो गगनतलं बलैरसंख्यैः ६६

प्रतिलोममारुतविकंपितध्वजां ध्वजिनीं निवेश्य रुचितोपकार्यके ।
तृणकाष्ठतोयसुलभे नगे स्थितः प्रतिपालयन्नथ परान्परैक्षत ॥६७॥

इति स्फुटं तुरगगलस्य चेष्टितं निरंकुशं सदसि चरेण धीमता ।
उदीरितं ज्वलनजटी निशम्य तत्प्रजापतिं सविनयमित्यवोचत ६८

रौप्ये गिरौ धनदरक्षितदिग्विभागे नानासमृद्धिरलकानगरी रराज ।
यस्यां बभूव विभवेन मयूरकंठनीलांजनातनुरुहोऽश्वगलोऽर्द्धचक्री ६९

अश्वग्रीवे दुर्निवारोरुवीर्ये संभूयान्यैः खेचरैरुत्थितेऽस्मिन् ।
यत्कर्तव्यं तद्रहस्यात्मनीनैः सभ्यैः सार्धं कार्यमालोचयामः ॥७०॥

ज्वलनजटिनः श्रुत्वा वार्तामिति क्षितिनायके ।
सचिवसमितिं भूयो भूयो विवृत्य विपश्यति ॥
स्वयमुदचलच्चित्तं ज्ञात्वा तदा परिषत्प्रभो-
रवसररमावृत्तिर्नृणां फलं मतिसंपदः ॥ ७१ ॥

इत्यसगकृते श्रीवर्द्धमानचरिते अश्वग्रीवसभाक्षोभो
नाम षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

६६ ज्याच्या सामर्थ्याची सर्वत्र प्रसिद्धि झाली आहे, व रोकण्यास अशक्य अशा अश्वग्रीवानें जसे समुद्र कल्पांतकालीं आपल्या असंख्य लहरींनी आकाशांस ओलांडून त्यास भरून टाकितो त्याप्रमाणें आपल्या असंख्यात सैन्यासह तत्काळ प्रयाण केलें व त्याच्या द्वारें त्यानें आकाश भरून टाकिलें.

६७ उलट वाऱ्यानें जिच्या ध्वजा हालत आहेत अशा सेनेला जेथें गवत, लाकडें व पाणी विपुल आहे अशा पर्वतावर त्यानें आणून ठेविलें व या पर्वतावर राहण्यासाठी पुष्कळ राहुट्या, तंबू वगैरेची व्यवस्था केली

होती. अशा ठिकाणीं अतिशय ईर्षेनें शत्रूंची वाट पाहात तो अश्वग्रीव अर्धचक्री राहिला.

६८ याप्रमाणें अश्वग्रीवाच्या स्वच्छंदप्रवृत्तीची हकीकत बुद्धिमान अशा एका दूताने सभेंत येऊन सांगितली. ती ऐकून ज्वलनजटीनें मोठ्या विनयाने प्रजापतिला पुढे लिहिल्याप्रमाणें सांगितली.

६९ "विजयार्ध पर्वतावर कुबेरानें जिचें रक्षण केलें आहे अशा उत्तर दिशेच्या एका भागांत अनेक संपत्तीनें समृद्ध असें अलका नांवाचें नगर शोभत आहे. या नगरांत मयूरकंठ अर्थात् नीलकंठ विद्याधर राजा व त्याची राणी नीलांजना ऊर्फ कनकमाला यांचा अश्वग्रीव नांवाचा मुलगा अर्धचक्रवर्ती आहे व तो या नगरीचें पालन करीत आहे.

७० अश्वग्रीवाचा पराक्रम रोकण्यास अशक्य आहे व पुष्कळ विद्याधर राजांना एकत्र करून आपणांबरोबर लढण्यास तो तयार झाला आहे. याकरितां यावेळीं आपण काय केलें पाहिजे याचा एकांत स्थानी हितकर अशा मंत्रीमंडळाला आपल्याबरोबर घेऊन विचार करूं या."

७१ ज्वलनजटी राजाचें हें भाषण ऐकून राजा प्रजापतीनें आपल्या मंत्रीमंडळाकडे वळून पाहिलें. तेव्हां महाराजांचा अभिप्राय प्रधान मंडळीच्या ध्यानांत येऊन पुढील कार्याचा विचार करण्यासाठीं ती उठली. बरोबर आहे कीं, योग्य वेळ जाणून वागणे हेंच मनुष्यांना प्राप्त झालेल्या बुद्धि रूपी संपत्तीचें फल आहे.

याप्रमाणें असग महाकविकृत श्रीवर्धमान चरितांतील अश्वग्रीवाच्या सभेच्या शोभाचें वर्णन करणारा सहावा सर्ग संपला.

अथ मंत्रविदामुपन्हरे गणमाहूय स खेचराधिपः ।
उभयं विजयेन संगतो निजगादेति वचः प्रजापतिः ॥ १ ॥

भवतामनुभावतो हि नः सकला संपदभूत्समीहिता ।
ऋतुभिस्तरवो विना स्वयं न तु पौष्पीं श्रियमुद्वहन्ति किं ? ॥२॥
निजमुग्धतया समन्वितान्विधुराद्रक्षति नः समंततः ।
पृथुकान् जननीव नो मतिः कुशला कृत्यविधौ च वत्सला ॥ ३ ॥
गुणिनां भवति प्रसंगतो गुणहीनोऽपि गुणी धरातले ।
सुरभीकुरुतेऽथ कर्पर सलिलं पाटलपुष्पवासितं ॥ ४ ॥
अविचिंतितमप्ययत्नतः स्वयमुत्पादयति प्रयोजनं ।
विधिरेकपदे निरंकुशः कुशलं वाऽकुशलं च देहिनां ॥ ५ ॥

बलवान्हयकंधरःपरं सहसा चक्रधरः समुत्थितः ॥
अपरैः सह खेचरेश्वरैर्वदतास्मान्प्रति कोऽस्य सद्नयः ? ॥ ६ ॥

इति वाक्यमुदीर्य भूपतौ विरते दर्शितभूरिकारणं ।
सचिवैः परिवीक्षितो मुहुर्वचनं सुश्रुत इत्यवोचत ॥ ७ ॥

अवबोधविधौ विशुद्धतां वयमाप्ता भवतः प्रसादतः ।
अपि नाम जडात्मकाः सदा भुवि पद्मा इव तिग्मदीधितेः॥८॥
समुपेत्य निसर्गतः शुचिं ननु यत्किंचिदपि प्रकाशनं ॥
तुहिनद्युतिबिंबसंश्रितो मलिनोऽपि प्रतिभासते मृगः ॥ ९ ॥

उपयाति जडोऽपि पाटवं सहसोपघ्नविशेषतः परं ।
करवालगतः पयोलवः करिणां किं न भिनत्ति मस्तकं ? ॥१०॥

१ अश्वग्रीवानें क्षुब्ध होऊन युद्धाची तयारी केली आहे असें एका दूतानें सांगितल्यानंतर विजयबलभद्र व ज्वलनजटी विद्याधर राजासह प्रजापति महाराजांनीं आपल्या व ज्वलनजटी विद्याधर राजाच्या प्रधान मंडळीस एकांत स्थानीं बोलाऊन घेतलें व ते पुढें लिहिल्याप्रमाणें बोलूं लागले.

२ " अहो मंत्रिगणांनो तुमच्या प्रभावांनेंच आम्हाला इच्छित संपत्ति प्राप्त झाली आहे. बरोबरच आहे कीं, वसंतादिक ऋतूंचा आश्रय घेतल्या वांचून वृक्ष पुष्पांची शोभा धारण करतात काय ? अर्थात् ऋतूंच्या आश्रयानेंच ते पानें, फुलें व फळें यांनीं शोभूं लागतात. ३ जसें प्रेमळ व मुलांचें संगोपन करण्यांत चतुर अशी माता अज्ञ बालकांचें सर्व रीतीनें संकटापासून रक्षण करिते, तसें हे मंत्रिगणहो ! साम, दाम, दंड व भेद या नीतीमध्यें कुशल असलेली आपली बुद्धि प्रेमानें अज्ञ अशा आमचें सर्वप्रकारें संकटापासून रक्षण करीत असते. ४ गुणी पुरुषांच्या सहवासानें गुणहीन मनुष्यही गुणी बनतो. यास उदाहरण असें कीं, पाडळीच्या फुलांनीं सुगंधित झालेलें पाणी ज्या मडक्यांत असतें त्यालाही तें सुगंधित बनवितें.

५ स्वच्छंदपणानें वागणारें दैव प्राण्यांच्या ध्यानीं मनीं नसतांहि त्यांचें कल्याण किंवा अकल्याणाचें कार्य स्वतः प्रयत्नावांचून एकदम उत्पन्न करीत असतें. ६ बलवान अश्वग्रीव चक्रवर्ती त्याचा आम्हीं कांहीं अपराध केला नसतांहि इतर विद्याधर राजांना बरोबर घेऊन आमच्याशीं युद्ध करण्यास उठला आहे. हें त्याचें करणें सत्य नीतीला धरून आहे काय ? सांगा बरें ? " ७ याप्रमाणें आणखी पुष्कळशीं कारणें दाखवून प्रजापति महाराजांनीं आपलें भाषण संपविल्यानंतर मंत्रिमंडळाकडून वारंवार पाहिला गेलेला सुश्रुत नांवाचा सचिव पुढें लिहिल्याप्रमाणें बोलूं लागला.

८ " हे राजन ! आम्ही आपल्याच चरणकृपेनें ज्ञानामध्यें निर्मळता-चतुरता प्राप्त करून घेतली आहे. जसें जलात्मक-पाण्यामध्यें असलेलें

अर्थात् जडात्मक-ज्ञानहीन कमळें सूर्यापासून विकास पावतात त्याप्रमाणें जडात्मक-अज्ञानी असे आह्मी आपल्या कृपेनेंच चतुर झालों आहोंत.

९ स्वाभाविकपणें निर्मल व कांतिसंपन्न पदार्थाच्या आश्रयानें कांतिरहित पदार्थहि प्रकाशूं लागतो. तोहि प्रकाशयुक्त दिसतो. यास उदाहरण असें कीं, मलिन असाहि हरिण थंड किरणांनीं युक्त अशा चंद्राच्या आश्रयानें प्रकाशयुक्त दिसूं लागतो तसें आह्मीहि ज्ञानी अशा आपल्या आश्रयानें ज्ञानयुक्त झालों आहोंत. १० अज्ञ मनुष्य उपाधिविशेषानें अर्थात् विद्वानांच्या सहवासानें निपुणपणाला प्राप्त होतो. तरवारीच्या आश्रयानें तिला दिलेलें पाणी हत्तीचें गंडस्थल फोडूं शकत नाहीं काय? अर्थात् तरवारीच्या सहवासानें तरवारीचें पाणी हत्तीची गंडस्थळें फोडण्यास समर्थ होतें. त्याप्रमाणें विद्वान् अशा आपल्या सहवासानें आह्मी विद्वान् बनलों आहोत.

भवतामपि वाग्मिनां पुरो यदहं वच्मि तदस्य चापलं ।
अधिकारपदस्य कोऽन्यथा गदितुं प्रारभते सचेतनः ? ॥११॥

त्रिभिरेव भवद्भिरूर्जितैर्नयशास्त्रं प्रतिभान्वितैर्भृतम् ।
भुवनं सचराचरं यथा पवनैरुन्नतसंहतात्मकैः ॥ १२ ॥

ननु सर्वविदोऽपि राजते न वचः श्रोतरि बोधवर्जिते ।
परिणेतरि नष्टलोचने सकलः किं नु कलत्रविभ्रमः ॥ १३ ॥

पुरुषस्य परं विभूषणं परमार्थं श्रुतमेव नापरं ।
प्रशमो विनयश्च तत्फलं प्रकटं नीतिविदः प्रचक्षते ॥ १४ ॥

विनयप्रशमान्वितं सदा स्वयमेवोपनमंति साधवः ।
स च साधुसमागमो जगत्यनुरागं विदधाति केवलं ॥ १५ ॥

अनुरागपरार्जितं जगत्सकलं किंकरतां प्रपद्यते ।
स्वयमेव महीपतेरतो विनयं च प्रशमं च मा मुचः ॥ १६ ॥

हरिणानपि वेगशालिनो ननु गृण्हंति वने वनेचराः ।
निजगेयगुणेन किं गुणः कुरुते कस्य न कार्यगाननं ? ॥१७॥

परुषाच्च मृदुः सुखावहः परमित्युक्तमुपायवेदिभिः ।
परितापयति क्षितिं रविर्ननु निर्वापयति क्षपाकरः ॥१८॥

सुवशीकरणं शरीरिणां प्रियवाक्यादपरं न विद्यते ।
मधुरं च रुवन् यथोचितं परपुष्टोऽपि जनस्य वल्लभः ॥ १९ ॥

११ आपल्यासारख्या वक्तृत्वशाली पुरुषापुढे मी ज्या अर्थी बोलावयास तयार झालो आहे त्या अर्थी ही माझी अधिकारपदाची ( मंत्रिपदाची ) चपलता आहे असे मी मानितों. नाहीं तर आपल्यापुढे कोणती ज्ञानयुक्त व्यक्ति बोलण्यास प्रारंभ करील बरे ? मला मंत्रित्वाचा अधिकार असल्यामुळे आपल्यासारख्या विद्वानापुढे बोलणे भाग पडत आहे. वास्तविक पाहिले तर आपणांपुढें बोलण्याची माझी योग्यता नाही. १२ ज्याप्रमाणे मोठे व समूहरुपाने असलेल्या तीन वातवलयांनी ( घनोदधि, घनवात व तनुवात ) स्थावर व त्रस प्राण्यांनी भरलेले हे जग धारण केले आहे त्याप्रमाणे नवीन युक्त्यांनीं युक्त अशा बुद्धीने शोभणाऱ्या बलशाली अशा तुम्हा तिघांकडून अर्थात् ज्वलनजटी, आपण [ प्रजापति महाराज ] व विजय-बलभद्र यांच्या कडून हे नीतिशास्त्र धारण केले आहे. अर्थात् राजनीति तत्वें आपणाशिवाय इतरांना अधिक समजत नाहींत. १३ श्रोता जर अज्ञानी असेल तर त्याच्या पुढे सर्वज्ञाचाहि उपदेश शोभत नाही. यास उदाहरण असे की, पति जर आंधळा असेल तर स्त्रीचा हावभाव सफल होऊं शकतो काय ? अर्थात् तिचे हावभाव दाखविणे व्यर्थ आहे.

१४ आत्मकल्याण करणारें ज्ञान हेच पुरुषाचे उत्कृष्ट भूषण आहे. दुसरें नाहीं या ज्ञानाची शांतपणा व विनय ही प्रगट फळे आहेत असें नीति जाणणारे विद्वान म्हणतात १५ जो विनय व शांतपणानें युक्त आहे त्याला सत्पुरुषहि नेहमी नमस्कार करितात. व सत्पुरुषाचा समागम हा फक्त जगामध्यें सर्वत्र प्रेमभाव उत्पन्न करित असतो.

१६ या प्रेमभावानेंच सगळ्या जगाला जिंकिले असतां तें-आपोआपच राजाचा दास बनून राहते. यास्तव हे राजन्! आपण विनय व प्रशम [ कषायाचा मंदपणा ] यांचा त्याग करूं नये. १७ हरिण जगीं अतिशय वेगाने धांवत असतात तथापि त्यांनाहि भिल्ललोक वनामध्यें स्वतःच्या गायनगुणानें पकडतात. यास्तव गुण कोणत्या मनुष्याचें इष्टकार्य सिद्ध करून देत नाहींत बरें? यास्तव गुण प्राप्त करून घेणें हे राजाचें मुख्य कर्तव्य आहे. १८ कठोर भाषणापेक्षां मृदु भाषण हें अतिशय सुख देणारे आहे असें उपाय जाणणारें विद्वान ह्मणतात. यास उदाहरण असें कीं, पृथ्वीला सूर्य संतप्त करितो परंतु चंद्र तिला आपल्या शांत किरणांनी आल्हादित करीत असतो. अर्थात् मधुर व मृदु भाषण हें लोकांना वश करिते. पण कठोर भाषण त्यांना शत्रु बनविते. १९ प्रिय भाषण हेंच प्राण्यांना वश करण्याचें मुख्य कारण आहे. याशिवाय दुसऱ्या भाषणानें लोक वश होऊ शकत नाहींत. कोकिलपक्षी योग्यकालीं मधुर शब्द करितो ह्मणून तो लोकांना प्रिय झालेला आहे.

अशितं हृदयप्रवेशकं निरपेक्षं सकलार्थसाधकं ।
विजयाय न सामतः परं मतमस्त्रं दधते क्षमाभृतः ॥ २० ॥

कुपितस्य रिपोः प्रशांतये प्रथमं साम विधीयते बुधैः ।
कतकेन विना प्रसन्नतां सलिलं कर्दमितं प्रयाति किं ॥ २१ ॥

वचसा परुषेण वर्धते मृदुना शाम्यति कोप उद्धतः ।
पवनेन यथा दवानलो घनमुक्तेन च भूरिवारिणा ॥ २२ ॥

उपशाम्यति मार्दवेन यो नहि शस्त्रं गुरु तत्र पात्यते ।
अहिते वद सामसाध्यके किमुपायैरितरैः प्रयोजनं ? ॥ २३ ॥

उपयाति न विक्रियां परः परिणामेऽपि च सान्त्वसाधितः ।
सलिलेन तु भस्मसात्कृतो ज्वलनः प्रज्वलितुं किमीहते? ॥२४॥

* विकृतिं भजते न जातुचित्कुपितस्यापि मनो महात्मनः ।
परितापयितुं न शक्यते सलिलं वारिनिधेस्तृणोल्कया ॥२५॥

नयवर्त्मनि यः सुनिश्चितं यतते तस्य न विद्यते रिपुः ।
ननु पथ्यभुजं किमामयः प्रभवत्यल्पमपि प्रबाधितुं ? ॥ २६ ॥

अयथाभिनिवेशितः फलं किमुपायः कुरुते समीहितं ? ।
दधिभावमुपैति किं पयः सहसा न्यस्तमथामभाजने ? ॥ २७ ॥

मृदुनैव विभिद्यते क्रमात्परिपूर्णोऽपि रिपुः पुरःस्थितः ।
प्रतिवत्सरमापगारयः सकलं किं न भिनत्ति भूधरं ? ॥ २८ ॥

२०. हे महाराज ! सामनीति नांवाचें हें शस्त्र तीक्ष्ण नसतांहि हृदयांत तेव्हांच प्रवेश करितें. निरपेक्ष असूनहि संपूर्ण कार्य सिद्ध करून देतें. या सामरूपी शस्त्रानेंच विजय प्राप्त होतो. याशिवाय विजय प्राप्ति करून देणारें अधिक उत्तम दुसरें शस्त्र नाहीं. म्हणूनच राजे लोक हेंच शस्त्र धारण करीत असतात. २१ रागावलेल्या शत्रूला शांत करण्यासाठीं विद्वान लोक प्रथमतः सामनीतीचा उपयोग करीत असतात. निवळीच्या बियांच्या चूर्णाशिवाय गढूळ झालेलें पाणी निर्मळ होऊं शकते काय ? अर्थात् तें जसें त्याशिवाय स्वच्छ होत नाहीं तसें सामोपचाराशिवाय शत्रु वश होत नाही. म्हणून हाच उपाय उत्तम आहे. २२ तीक्ष्ण भाषणानें कोप उद्भट बनून वाढू लागतो. परंतु मृदु भाषणानें तो शांत होतो. यास उदाहरण असें पाहा कीं, वाऱ्यानें जंगलांत अग्नी वेगानें पेट घेतो परंतु मेघानें सोडलेल्या पुष्कळ पाण्याच्या वृष्टीनें तो शांत होतो. २३ जो शत्रु सामोपचारानेंच दबतो त्याच्यावर शस्त्रप्रहार करण्याचें अर्थात् त्याच्याशीं लढाई करण्याची कांहीं जरूरी नसतें. शत्रु जर सामोपचारानेंच वश होण्यासारखा असेल तर इतर उपायांची तेथें काय जरूरत आहे बरें ? २४ सामोपचारानें वश

* टिप्पणीः— साधो प्रकोपितस्यापि मनो नायाति विक्रिया ॥
न हि तापयितुं शक्यं सागराम्भस्तृणोल्कया ॥
समानार्थकोऽयं श्लोकः ॥

केलेला शत्रु योग्यवेळींहि विकृत होत नाहीं. पाण्यानें भस्ममय केलेला अग्नि पुनः पेटण्याची इच्छा करील काय? २५ जें सत्पुरुष असतात त्यांचें मन ते रागावले असतांहि विकारयुक्त होत नाहीं. समुद्राचें पाणी गवताच्या ठिणगीनें तापविणें शक्य असतें काय?

२६ जो मनुष्य अथवा राजा नीतिमार्गामध्यें निश्चलपणें राहत असतो. त्याला शत्रु त्रास देऊं शकत नाहीं. यास उदाहरण असें कीं, नेहमीं पथ्यसेवन करणाऱ्या मनुष्याला रोग थोडीशीं देखिल पीडा देऊं शकत नाहीं. त्याच्या रोगाचें सामर्थ्य चालूं शकत नाहीं. २७ ज्या ठिकाणीं जो उपाय योजावयास पाहिजे तेथें त्याची योजना न केली तर त्यापासून इच्छित पदार्थाची-फलाची प्राप्ति होऊं शकत नाहीं. जर आपण दूध कच्च्या भांड्यांत ठेविलें तर त्यांत तें दह्याचें स्वरूपानें परिणमेल काय? उत्तम पक्क्या भांड्यांत ठेवल्यानेंच तें न गळतां दही बनेल. २८ पुढें आलेला शत्रु सामर्थ्यानें परिपूर्ण असला तरी क्रमा क्रमानें मृदु मृदु सामोपचारानेंच त्याचा नाश करावा. प्रत्येक वर्षी नदीवेग पर्वताला फोडीत फोडीत एकादे वर्षी त्याचें पूर्ण भेदन करितो त्याप्रमाणें शत्रूला सामोपचारानेंच जिंकावें.

मृदुना सहितं सनातनं भुवि तेजोऽपि भवत्यसंशयं।
दशयाथ विना सतैलया ननु निर्वाति न किं प्रदीपकः? ॥२९॥

अत एव च तत्र सामतः प्रविधेयं कलयामि नापरं।
ध्रुवमित्यभिधाय सुश्रुतो विररामान्यमतानि वेदितुं ॥ ३० ॥

अथ तस्य निशम्य भारतीं कुपितांतःकरणः परंतपः।
विजयो विजयश्रियः पतिर्निजगादेति वचो विचक्षणः ॥ ३१ ॥

पठितं न शुकोऽपि किं वदेदभिसंबंधविवर्जिताक्षरं?।
नयवित्स बुधैः प्रशस्यते कुरुते यस्य वचोऽर्थसाधनं ॥ ३२ ॥

परिकुप्यति यः सकारणं नितरां सोऽनुनयेन शाम्यति।
अनिमित्तरुषः प्रतिक्रिया क्रियते केन नयेन कथ्यतां? ॥३३॥

अतिरोपवतो हितं प्रियं वचनं प्रत्युत कोपदीपकं ।
शिखितप्ततसे हि सर्पिषि प्रपतत्तोयमुपैति वन्हितां ॥ ३४ ॥

अभिमानिनमार्द्रचेतसं पुरुषं प्रव्हयति प्रियं वचः ।
ननु तद्विपरीतचेष्टितः किमु साम्नैति खलोऽनुकूलतां ? ॥३५॥

मृदुतामुपयाति वन्हिना खरतामेति जलेन चायसं ।
इति वैरिनिपीडितस्तथा विनतिं याति खलो न चान्यथा ॥३६॥

इयमेव विधीयते मतं विनये नीतिविदां महात्मनां ।
विनयो महति स्वबांधवे प्रतिपक्षे च पराक्रमो महान् ॥ ३७ ॥

इयमेव सुखावहं परं पुरुषस्याभिमतं कृतामपि ।
अभयत्वमरौ पुरःस्थिते प्रियनारीभृकुटौ च भीरुता ॥ ३८ ॥

व अहो महाराज! जो शत्रु सकारण रागावतो त्याची पुष्कळ प्रार्थना केली असतां तो शांतही होणें शक्य आहे. परंतु कारणावांचून रागावलेल्या शत्रूचा राग घालविण्याचा उपाय कोणता आहे सांगा पाहूं बरे ? ३४ अतिशय रागावलेल्या मनुष्याच्यापुढें केलेलें हितकर व प्रिय असें भाषण त्यास शांत करण्यास समर्थ न होतां तें उलट त्यास ज्यास्ती क्रुद्ध बनविण्यास सहायक होतें. अग्नीनें अतिशय कढत असलेल्या तुपांत पडणारें पाणी तुपाचा कढ शांत करण्यास कारण न होतां उलट अग्नि बनतें ३५ स्वाभिमानी पण दयाळु अंतःकरणाच्या मनुष्याला प्रिय भाषण नम्र बनवितें. परंतु विरुद्ध स्वभावाचा दुष्ट मनुष्य सामोपचारानें अनुकूल होतो काय ? ३६ लोखंड अग्नीनें मृदु बनतें पण तेंच पाण्याचा संयोग झाला असतां कठिण होतें. याचप्रमाणें दुष्ट मनुष्य शत्रूंनीं त्रस्त झाला असतां नम्र होतो. दुसऱ्या उपायानें—सामोपचारानें नम्र होत नाहीं. ३७ नीतिज्ञ महापुरुष आपले हितकर्ते बांधव व आपले शत्रु यांच्या ठिकाणीं क्रमानें दोन गोष्टी करतात. त्या ह्याः— आपलें हित करणाऱ्या मोठ्या बांधवाविषयीं ते विनय धारण करतात व शत्रूवर पराक्रम गाजवितात. याच दोन गोष्टी सत्पुरुषांना प्रिय असतात. ३८ शत्रु पुढें आला असतां निर्भय राहणें व आपल्या प्रिय स्त्रीनें आपल्या भुवया वांकड्या केल्या असतां भयभीत होणें याच दोन गोष्टी मनुष्यांना पसंत असाव्यात असें सत्पुरुषांचेंही ह्मणणें आहे. अशा रीतीनें वागणें हेंच मनुष्यांना सुखदायक आहे.

अपि नाम तृणं च दुर्बलं प्रतिकूलस्य न मातरिश्वनः ।
प्रणतिं प्रतिपद्यते वरं पुरुषात्तन्नमतः स्वयं रिपुं ॥ ३९ ॥
गुरुतामुपयाति यन्मृतः पुरुषस्तद्विदितं मयाधुना ।
ननु लाघवहेतुरर्थना न मृते तिष्ठति सा मनागपि ॥ ४० ॥
सहसैव परं क्षमाधरो ननु तुंगोऽपि जनेन लंघ्यते ।
न भवत्यथ कस्य वा सतः परिभूतेरिह कारणं क्षमा ॥ ४१ ॥
परमस्तमुपैति भानुमानपि तेजोविरहाद्दिनात्यये ।
अत एव च धाम भासुरं न जहाति क्षणमप्युदारधीः ॥ ४२ ॥

उपगच्छति सामभिः शमं महतो नैव निसर्गशात्रवः ।
भजते च स तैः प्रचंडतां सलिलैरौर्वशिखीव वारिधेः ॥ ४३ ॥
अभिगर्जति तावदुद्धतो मदनिश्चेतनधीरनेकपः ।
पुरतः प्रतिभीषणाकृतिं न हरिं यावदुदीक्षते रिपुं ॥ ४४ ॥
असुहृत्त्वविधावुपस्थितं भुवि दुर्नामकमात्तविक्रियं ।
समये मतिमान्महोदयं सहसा च्छेदनमंतरेण कः ॥ ४५ ॥
द्विरदं विनिहन्ति केसरी स्वयमन्विष्य च यः समंततः ।
निजवासगुहामुपागतं स च तं मुंचति किं युयुत्सया ॥ ४६ ॥
भवतां प्रविलंघ्य भारतीमविलंघ्यामपि किं ममानुजः ।
न हिनस्ति तमश्वकंधरं कलभं गंधगजो यथार्गलां ॥ ४७ ॥
अहमेव हि वेद्मि केवलं न विजानाति परोऽस्य पौरुषं ।
अपि दैवममानुपाश्रयं भवतां मौनमतो विभूषणं ॥ ४८ ॥

३९ गवत दुर्बल आहे; परंतु तेंही प्रतिकूल वाऱ्याशीं नम्रता धारण करीत नाहीं ह्मणून तें स्वतः रिपूला—शत्रूला पाहून नम्र होणाऱ्या पुरुषापेक्षां श्रेष्ठ आहे असें मला वाटतें. ४० ज्या अर्थी मेलेला पुरुष गुरुत्वाला—मोठेपणाला प्राप्त होतो त्याअर्थी त्याचें कारण मला आज समजलें आहे. हलकेपणाला कारण याचना ही आहे त्या अर्थी मला जर याचनाच करावयाची नाहीं तर मी हलकेपणा कां धारण करीन ? मी वजनदारपणाच धारण करीनः अशा हेतूनेच जणु त्यानें वजनदारपणा धारण केला असावा. अभिप्राय हा कीं, दीनवृत्ति धारण करून शत्रूशीं नम्रता धारण करणें हें मोठेपणाला शोभत नाहीं. ४१ जसें क्षमाधर—पर्वत हा मोटा असला तरीही त्याला लोक सहज उल्लंघून जातात तसें क्षमाधर—क्षमा धारण करणारा राजा त्याच्या प्रजाजनाकडूनही उल्लंघिला जातो. अर्थात् प्रजा देखिल त्याची आज्ञा मानीत नाहीं, इतर शत्रु वगैरे कशी मानतील ? वास्तव क्षमा कोणाच्या पराभवाला कारण होणार नाहीं बरें ? ४२ सूर्य देखिल संध्याकाळीं आपल्या तेजाचा त्याग करतो ह्मणून त्याला अस्ताला जाणें भाग पडतें. ही परिस्थिति नित्य डोळ्यांना दिसते ह्मणूनच उदारबुद्धीचे लोक एक क्षणपर्यंतही आपल्या तेजस्वीपणाचा त्याग करीत नाहींत ४३ मोठ्या पुरुषांचा स्वाभाविकपणें शत्रु असलेला मनुष्य सामोपायाच्या

द्वारें कधींही शांत होत नाहीं. यास उदाहरण असें कीं, समुद्राचा शत्रू असलेला वडवानल समुद्रापासून पुष्कळ पाणी मिळत असताहि तो शांत न होतां प्रचंडताच धारण करीत असतो. ४४ मदानें ज्याची बुद्धि निर्विचार झाली आहे असा उदात्त हत्ती जोपर्यंत भयंकर आकृतीचा सिंह दत्त ह्मणून पुढें येऊन उभा राहिलेला पाहात नाहीं तोपर्यंतच गर्जना करीत असतो. त्याप्रमाणें गर्वानें अविवेकी बनलेला अश्वग्रीवरूपी हत्ती त्रिपृष्ठरूपी भयंकर सिंहाला आपल्यापुढें उभा राहिलेला पाहात नाहीं तोपर्यंतच गर्जना करीत आहे. ४५ जो शत्रूत्वाला प्राप्त झाला आहे, ज्याचें वाईट नांव आहे अर्थात् अश्वग्रीव या वाईट नांवाला जो धारण करीत आहे, अश्व–घोडा व ग्रीवा–गळा–घोड्याचा गळा असा ज्याच्या नांवाचा अर्थ आहे व जो विकारयुक्त व मोठ्या ऐश्वर्याला प्राप्त झाला आहे अशा त्या अर्धचक्रवर्तीचें छेदन होणार नाहीं तोपर्यंत तो शांत होत नाहीं. अथवा जसें मूळव्याध शत्रुप्रमाणें त्रास देऊं लागली व ती विकारयुक्त झाली अर्थात् तिला कोंब फुटलें व ती योग्यवेळीं चांगलीच वाढली असतां जसें ती कापल्याशिवाय गत्यंतर नसतें त्याचप्रमाणें अश्वग्रीवाचा आतां छेद केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. ४६ जो सिंह स्वतः चोहीकडे हुडकून हत्तीचा शोध करून त्यास ठार मारितो तो आपल्या राहत्या गुहेजवळ युद्धाच्या इच्छेनें आलेल्या हत्तीला ठार मारल्याशिवाय राहील काय? राहणार नाहींच. ४७ जसा उन्मत्त झालेला हत्ती जिचें उल्लंघन करणें कठिण आहे अशी आगळ मोडून टाकितो तसें माझा भाऊ त्रिपृष्ट नारायण तुह्मा मंत्रिगणांचे न उल्लंघण्यासारखेंही भाषण उल्लंघून हत्तीच्या छाव्याप्रमाणे अश्वग्रीवाला ठार मारणार नाहीं काय? अवश्य ठार मारीलच. ४८ त्रिपृष्टाच्या ठिकाणीं जे मनुष्यामध्यें न आढळून येणारें दैविक बळ आहे, जो पराक्रम आहे त्याचें खरें स्वरूप मीच जाणूं शकतों. दुसऱ्याला त्याची कल्पना येऊं शकणारी नाहीं. यास्तव आपण याविषयीं मौन धारण करणे हेंच भूषण आहे."

इति पौरुषसाधनं परं विजये कार्यमुदीर्य दुर्जये ॥
विरते मतिसागरो गिरं मतिमान्नीतिविदित्युदाहरत् ॥ ४९ ॥
इति कृत्यविधौ विदा सता विजयेनेह परिस्फुटीकृते ।
अपि देव तथापि शंकते प्रविधातुं जडधीरयं जनः ॥ ५० ॥
किमिदं कथितं न तत्वतः सकलं ज्योतिषिकेण नः पुरा ।
अहमस्य तथाप्यमानुषीं श्रियमिच्छामि परां परीक्षितुं ॥ ५१ ॥

सुविचार्य कृताद्धि कर्मणः परिणामेऽपि भयं न जायते ।
अत एव विवेकवान् क्रियामविचार्यारभते न जातुचित् ॥ ५२ ॥
सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदं ।
वृणते ही विमृश्यकारिणं गुणलुब्धाः स्वयमेव संपदः ॥ ५३ ॥
समरे ननु चक्रवर्तिनः खलु जेता भुवि यस्तु साधयेत् ।
इह सप्तभिरेव वासरैरथ विद्याः सकलाः स केशवः ॥ ५४॥
इति ते निकषोपलायितं वचनं तस्य विधेयवस्तुनः ।
अवगम्य तथेति मेनिरे करणीयं सुनिरस्तसंशयं ॥ ५५ ॥

४९ या प्रमाणें पराक्रमाची सिद्धि करून देणारें भाषण बोलून शत्रूंना अजिंक्य असा तो विजय बलभद्र थांबला असतां मतिसागर नांवाचा नीतिज्ञ विद्वान मंत्री पुढें लिहिल्याप्रमाणें बोलू लागला. ५० "तो म्हणाला अश्वग्रीवाशीं युद्धाचा प्रसंग आला आहे अशा वेळीं आपण काय केलें पाहिजे याचा खुलासा विजयबलभद्रांनी चांगला केला आहे. तरी हे प्रभो ! तें कार्य ( युद्ध ) करण्याची आम्हा बुद्धिमंदांना भीति वाटते. अर्थात् युद्धामध्यें आम्हांला विजय मिळेल किंवा नाहीं याविषयी आमचें मन साशंक आहे. ५१ पूर्वी ज्योतिष्यानें सर्व खरी अशी हकीकत– [ त्रिपृष्ठकुमार अर्धचक्रवर्ति होईल अशी हकीकत ] सांगितली नाहीं काय ? अर्थात् सांगितली आहे. परंतु या त्रिपृष्ठकुमाराच्या उत्तम अमानुष लक्ष्मीची मला परीक्षा करावीशी वाटत आहे. ५२ चांगला विचार करून काम केले असतां परिणामींही त्या विषयीं भीति राहात नाहीं म्हणूनच विवेकी माणसें न विचार करतांच कोणतेंही कार्य आरंभित नाहींत. ५३ विचार न करतां कोणतेंही कार्य करूं नये. कारण अविचार हा दुःखद असा संकटांचे स्थान आहे. अर्थात् अविचारानें संकटें येतात. जी माणसें विचार करून कार्य करितात त्यांच्या गुणावर लुब्ध झालेल्या संपत्ति आपण होऊन त्यांचा आश्रय घेतात. ५४ जो सात दिवसांत सर्व विद्या साध्य करून घेईल तो या भूतलावर नारायण मानला जाईल व निःसंशय तो या अर्द्धचक्रवर्तीला ( अश्वग्रीवाला ) युद्धांत जिंकणारा होईल. ५५ याप्रमाणे मतिसागरानें भाषण केलें असतां तें त्यांचें भाषण करण्याला योग्य अशा कामाची कसोटी आहे असे सर्वांनीं जाणून करण्याला योग्य अशा कार्यांत आतां कांहीं संशय उरला नाहीं असें मानिलें. ५६

अथ तस्य परीक्षितुं श्रियं विजयस्यापि समादिशन्मिथः ।
ज्वलनोपपदो जटी परं पुरुविद्यागणसाधनाविधिं ॥ ५६ ॥
अपरे न च साधयंति यां विधिना द्वादशवत्सरैरपि ।
महती स्वयमेव रोहिणी सहसा प्रादुरभूत्पुरोऽस्य सा ॥ ५७ ॥
अपराः पतगेशवाहिनीप्रमुखास्तं सकलाश्च देवताः ।
उपतस्थुरहो महात्मनः किमसाध्यं पुरुपुण्यसंपदः ॥ ५८ ॥
विजयस्य च सिंहवाहिनी विजया वेगवती प्रभंकरी ॥
इति पंचशतं वशं ययुर्वरविद्या दिवसेषु सप्तसु ॥ ५९ ॥
दिवसैरिति संमितैर्वशीकृतविद्यं विजयानुजं ततः ॥
धुरि तौ नृपखेचराधिपौ जगतोऽतिष्ठिपतां सुनिश्चितं ॥ ६० ॥
अथ तस्य यियासतो रिपूनभिहंतु समरे जयश्रियं ॥
कथयन्निव रोदसीं समं परितस्तार मृदंगनिस्वनः ॥ ६१ ॥

यानंतर त्रिपृष्ट कुमाराच्या अलौकिक लक्ष्मीची परीक्षा करण्याकारितां त्रिपृष्ट राजपुत्राला व विजयबलभद्राला ज्वलनजटीनें एकांतस्थानीं महाविद्यांचा समूह कसा साध्य करावा याचा उत्तम उपाय सांगितला ५७ जी विद्या सामान्य लोकांना बारा वर्षांतही सिद्ध होऊं शकत नाहीं अशी रोहिणी नांवाची विद्या एकदम यांच्यापुढे प्रगट झाली ५८ याचप्रमाणे या महात्मा त्रिपृष्टकुमाराला गरुड वाहिनी विद्या ज्यांच्यांत प्रमुख आहे अशा सगळ्या विद्या देवता सिद्ध होऊन पुढें उभ्या राहिल्या. बरोबरच आहे कीं, ज्यांची पुण्यरूपी संपत्ति फार मोठी आहे अशा महात्म्यांना या जगांत असाध्य अशा कोणत्या गोष्टी आहेत? अर्थात् पुण्यवान लोकांना असाध्य गोष्टीही सिद्ध होतात. ५९ विजयबलिभद्राला सिंहवाहिनी, विजया, वेगवती, प्रभंकरी अशा पांचशें उत्कृष्ट विद्या देवता सात दिवसांत सिद्ध झाल्या. ६० याप्रमाणें थोडक्या दिवसांत ज्यानें सर्व विद्या स्वाधीन करून घेतल्या आहेत अशा त्रिपृष्टकुमाराला प्रजापति महाराज व ज्वलनजटी विद्याधर राजा या दोघांनी निश्चित रूपानें जगाचा भार अर्पण केला. ६१ या नंतर युद्धामध्यें शत्रूला ठार मारण्यासाठीं प्रयाण करण्याची इच्छा करणाऱ्या त्रिपृष्टकुमाराच्या जयलक्ष्मीचें जणु वर्णन करणारा असा मृदंगध्वनि आकाश व जमीन यामध्यें समानरूपानें एकदम

निरगादाधिरुह्य वारणं स पुरादुच्छ्रिततोरणध्वजात् ॥
जयमंगलशंसिभिः शुभैः शकुनैस्तोपितसर्वसैनिकः ॥ ६२ ॥
सदनाग्रगतोऽगनाजनः सह लाजांजलिमात्मलोचनैः ॥
परितस्तमवाकिरन्क्षितौ प्रथयन्कीर्तिमिवास्य निर्मलां ॥ ६३ ॥
❀ करिणां कदलीध्वजोत्कराः पिदधुः केवलमेव नांबरं ॥
अतिदुःसहमन्यभूमिपैः सकलं धाम च चक्रवर्तिनः ॥ ६४ ॥
रथवाजिखुराभिघातजः क्षितिरेणुः खररोमधूसरः ॥
सकलं न जगन्मलीमसं विदधे शत्रुयशश्च तत्क्षणं ॥ ६५ ॥
न चचाल धरैव केवलं गुरुसेनाभरपीडिता तदा ॥
उरसः कमलापि विद्विषः पवनोद्धूतलतेव मूलतः ॥ ६६ ॥

पसरला. ६२ जय व कल्याण यांचें सूचक अशा शुभ शकुनांनीं आनंदित झालेल्या सर्व सैन्यासह त्रिपृष्ठकुमार गुढ्या व तोरणें जेथे उभारलीं आहेत अशा आपल्या शहरांतून हत्तीवर आरोहण करुन निघाला. ६३ वाड्यांच्या गच्चीवर चढलेल्या स्त्रियांनी आपल्या नेत्रासह लाह्यांची ओंजळ त्रिपृष्ठकुमारावर फेकली. त्यावेळी त्या जणु या कुमाराची कीर्ति चोहीकडे पसरीत आहेत असें लोकांना वाटलें. ६४ हत्तीवर असलेल्या पताका व ध्वजांच्या समूहांनीं फक्त आकाशच आच्छादित केले असे नाहीं. तर इतर राजे लोकांना असह्य असलेले चक्रवर्ती अश्वग्रीवाचें सगळें तेज देखिल आच्छादित करून टाकिलें ६५ रथाला जुंपले-ल्या घोड्यांच्या टापांच्या आघातांनीं उत्पन्न झालेली, गाढवांच्या केसा-प्रमाणें धुरकट रंगाची असलेली, जमीनिवरील धूळ, चोहीकडे पसरून तिनें सगळ्या जगालाच मळकट बनविले असे नाहीं तर तत्काळ शत्रूंचें यशही मलिन केलें. ६६ अफाट सैन्याच्या ओझ्यानें दुःखित झालेली पृथ्वीच फक्त त्यावेळीं कंप पावली असे नाही तर वाऱ्याने लता कंप पाऊन जशी-मुळासकट उन्मळून पडते तशी

---

* टिप्पणी —सैन्यध्वजैरप्रातिकूल्यवातव्याधूननप्रोल्लसितैस्तदीयै.—
नान्तर्दधे केवलमेव सूर्य . शत्रुप्रभावश्च महाप्रभावैः॥
समानार्थकोय श्लोकः चंद्रप्रभचरिते चतुर्थसर्गे ॥

विगलन्मदवारिनिर्झरा अपि दूरीकृतरोषवृत्तयः ॥
अभिनेतृवशेन लीलया ललितं गंधगजाः प्रतस्थिरे ॥ ६७ ॥
तडिदुज्ज्वलरुक्ममंडनांस्तुरगांश्चंचलकंठचामरान् ॥
द्रुतमध्यविलंबितक्रमानधिरुह्य प्रययुस्तुरंगिणः ॥ ६८ ॥
अधिरुह्य यथेष्टवाहनं धवलछत्रनिवारितातपाः ॥
गमनोचितवेषधारिणः परचक्रक्षितिपास्तमन्वयुः ॥ ६९ ॥
बलरेणुभयेन भूतलं प्रविहायोत्पतितं वियत्यपि ॥
पिदधे रजसा परीत्य तत्प्रथमं खेचरसैन्यमाकुलं ॥ ७० ॥
इतरेतररूपभूषणस्थितियानादिनिरीक्षणोत्सुकं ॥
अभवत्तदधोमुखोन्मुखं चिरकालं गमने बलद्वयं ॥ ७१ ॥
जवनिश्चलकेतनोत्करं वरमास्थाय विमानमुन्नतं ॥
खचराधिपतिर्विलोकयन्ससुतः सैन्यमगाद्विहायसा ॥ ७२ ॥

शत्रूच्या वक्षःस्थलावर निवास करणारी लक्ष्मी ही तेथून खाली धाडकन् पडली. ६७ ज्यांच्या गंडस्थलांतून मदाचे प्रवाह वाहात असूनही ज्यांनीं क्रोधाला आपल्यापासून दूर केलें आहे असे उन्मत्त झालेले हत्ती अभिनय शिकविणारा महात जसे सांगेल त्याप्रमाणें सुंदर अभिनय करीत लीलेनें चालू लागले. ६८ विजेप्रमाणें लखलखणाऱ्या सोन्याच्या अलंकारांनीं सजलेले, ज्यांच्या गळ्याजवळ चंचलचामर बांधले आहेत व जे शीघ्रगति, मध्यमगति व मंदगति अशा चालींनीं चालत आहेत अशा घोड्यावर बसून घोडेस्वार चालू लागले. ६९ आपणांस आवडत्या वाहनावर बसून अर्थात् हत्ती, घोडे, रथ, पालखी इत्यादिकावर बसून व ज्यांनीं धवलच्छत्राने सूर्याच्या उन्हाचें निराकरण केलें आहे असे इतर देशाचे राजे प्रवासाच्या वेळच्या पोषाकाला धारण करून या त्रिपृष्ट कुमाराला अनुसरूं लागले अर्थात् त्याच्याबरोबर तेही निघाले. ७० सैन्याच्या चालण्यानें उत्पन्न झालेल्या धुळीने पृथ्वीचा त्याग केला आणि ती आकाशांत उडून गेली व तेथें तिनें विद्याधराचें सैन्य वेढून त्याला प्रथम व्याकुळ करून सोडिलें व आच्छादिलें ७१ विद्याधराचें सैन्य व त्रिपृष्ट कुमाराचें सैन्य हीं दोन्ही सैन्यें चालत असतां एकमेकाचें रूप, अलंकार, उभें राहाणे, वाहनें

सुतयोः पुरतः प्रजापतिः पथि गच्छन्नतिसौम्यभीमयोः ॥
नयविक्रमयोरपि स्वयं प्रशमः प्रष्ठ इव व्यराजत ॥ ७३ ॥
ददृशे वनिताजनैः समं खचरैः स्मेरमुखैः क्रमेलकः ॥
कुरुते प्रियतामपूर्वता ननु कांत्या रहितेऽपि वस्तुनि ॥ ७४ ॥
करिणां पततां विहायसा प्रतिबिंबं विमलोपलस्थले ॥
अभिभूय निषादिनं नमन् रुरुधे वर्त्मनि मत्तवारणः ॥ ७५ ॥
पथि विस्मयनीयमंडनं शिबिकारूढमुदग्रसौविदं ॥
भयकौतुकमिश्रमैक्षत क्षितिपानामवरोधनं जनः ॥ ७६ ॥
अवगाहकटाहकर्करीकलशादीन्दधतः परिच्छदान् ॥

वगैरे गोष्टी पाहण्यांत उत्सुक होऊन बराच वेळ पर्यंत खालीं व वर तोंडें करून पाहूं लागलीं. विद्याधरांच्या सैन्यानें खाली पाहिलं व जमिनीवरून चालणाऱ्या सैन्यानें वर पाहिलं ७२ अतिशय वेगामुळें ज्याच्या वरील पताकांचा समूह निश्चल झाला आहे अशा उत्तम विमानांत विद्याधरांचा राजा ज्वलनजटी पुत्रासहित आरोहण करून सैन्याचें निरीक्षण करीत करीत आकाशमार्गानें चालूं लागला. ७३ अतिशय सौम्य व अतिशय भीम अशा आपल्या दोन मुलांच्या पुढें रस्त्यांत प्रयाण करणारे प्रजापति महाराज त्यावेळीं स्वतः नीति व पराक्रम या दोघांच्या पुढें श्रेष्ठ असा प्रशम (कषायांचा शांतपणा) जणू चालला आहे असे शोभूं लागले. ७४ विद्याधरांनीं आपल्या स्त्रियांसह मार्गांत उंटाचा समुदाय पाहिला तेव्हां त्यांना फार हसूं येऊं लागलें बरोबरच आहे की, कांतीनें रहित अशी जरी वस्तु असली तरी ती पूर्वी पाहिलेली नसेल तर तिच्या विषयीं आवड उत्पन्न होत असते ७५ आकाशमार्गानें जाणारे विद्याधरांच्या हत्तींचें जमीनीवरील निर्मळ रत्नमय पाषाणामध्यें पडलेल्या प्रतिबिंबाकडे वाकून पाहात उभा राहिलेल्या हत्तीनें त्यावेळीं आपल्या महातांनाही जुमानलं नाहीं ७६

अतिभारविवर्जिता इव त्वरितं वैवधिकाः प्रतस्थिरे ॥ ७७ ॥
वसुनंदकृपाणपाणिभिस्तरसोल्लंघितगर्तगुल्मकैः ॥
पुरतो निजनाथवाजिनां चटुलं चारुभटैरधाव्यत ॥
पुरतः प्रविलोक्य दन्तिनं सहसैवाश्वतरेण पुप्लुवे ॥
तुरगः समगादशंकितं ननु जातेः सदृशं हि चेष्टितम् ॥७८॥
नवकंदुमिवाश्ववारकं मुहुरुत्प्लुत्य हयोऽतिदुर्मुखः ॥
व्रणितांगमपातयत्परं ननु दुःशिक्षितमापदां पदं ॥७९॥
उपदीकृतभूरिगोरसैर्ददृशे मर्दितसस्यधारिभिः ॥
पथि भूमिपतिः कृषीवलैः कुरु रक्षामिति वल्गुवादिभिः ॥८०॥
अवरोधनमेतदंचितं समदानां करिणामियं घटा ॥
अयमग्रतुरंगमः प्रभोः करभोऽयं गणिकेयमुज्ज्वला ॥८१॥
पथि राजककोटिवेष्टितः क्षितिपोऽयं ससुतःप्रजापतिः ॥

जणू काय आपण मोठ्या ओझ्यानें रहित असल्याप्रमाणें कावडीवाले त्वरेनें चालूं लागले. ७८ वसुनद ( शस्त्र विशेष ) व तरवार हीं शस्त्रें ज्यांच्या हातांत आहेत व ज्यांनीं शीघ्र खाचखळगे आणि झाडें झुडपें ओलांडलीं आहेत असे सुंदर योद्धे आपल्या मालकांच्या घोड्यांच्या पुढें चपलतेनें धावत असत.

७९ आपल्यापुढें आलेल्या हत्तीला पाहून खेचर घाबरून उड्या मारूं लागलें. परंतु घोडा न भितां पुढें निघून गेला. बरोबरच आहे कीं, आपल्या जातीला–स्वभावाला अनुसरूनच प्रत्येक प्राण्याची वागणुक असते. ८० ज्यानें आपल्या तोंडाची आकृति भीति वाटेल अशी बनविली आहे अशा एका वाईट घोड्यानें वारंवार उड्या मारून आपल्यावर बसलेल्या घोडेस्वाराला नवीन चेंडूप्रमाणे दूर फेकून दिले व त्याला जखमी केलें. बरोबरच आहे कीं, खोटें शिक्षण हें विपत्तीचें ठिकाण आहे. ८१ दूध, तूप, दही यांचा ज्यांनीं नजराणा अर्पण केला आहे व कुटलेले सडलेले तांदूळ, दाळ वगैरे पदार्थ ज्यांनीं आपल्या-बरोबर आणिले आहेत व हे प्रभो ! आमचें रक्षण कर असें मधुर भाषण जे करीत आहेत अशा शेतकऱ्यांकडून मार्गामध्यें प्रजापति महाराज पाहिले गेले. ८२ डागि-न्यांनीं भूपित झालेल्या हत्तींची पंक्ति, हा महाराजांचा बसावयाचा मुख्य घोडा,

इति तत्कटकं सविस्मयं ददृशुर्जानपदाः समंततः ॥ ८२ ॥
धृतनिर्झरवारिसीकरःकरिभग्नागुरुगंधवासितः ॥
तदसेवत पार्वतो मरुत्कटकं कंपितकेतनावलिः ॥ ८३ ॥
बहुभिर्गजदंतचामरैर्धृतकस्तूरिकुरंगकैरपि ॥
अटवीपतयो वनांतरे तमुपेत्यादरतः सिषेविरे ॥ ८४ ॥
दलितांजनपुंजरोचिषो बलमालोक्य भयेन नश्यतः ॥
प्रतिभूधरमैक्षत क्षणं तिमिरौघानिव जंगमान्गजान् ॥ ८५ ॥
अवलोकनमात्रसत्फला दधतीः पीनपयोधरश्रियं ॥
शबरीरपि पत्रवाससो गिरिसिंधूश्च विलोक्य पिप्रिये ॥ ८६ ॥

हा उंट, ही सुंदर वेश्या, अनेक राजांनी वेष्टिलेले व आपल्या विजय व त्रिपृष्ट या दोन पुत्रासहित असलेले हे प्रजापति महाराज, हे त्याचे सैन्य असे वर्णन करीत त्या देशांतील लोक हा सर्व देखावा आश्चर्यचकित होऊन पाहूं लागले. ८३ झऱ्यांतून वाहणाऱ्या पाण्यांचे तुषार धारण करणारा, हत्तींनी मोडलेल्या अगरुवृक्षांच्या सुगंधानें सुवासयुक्त झालेला, व ज्यानें ध्वजांचा समूह हालविला आहे असा पर्वतावरून वाहणारा वारा, महाराजांच्या सेनेची सेवा करूं लागला. ८४पुष्कळसे हत्तींचे दांत, व चवऱ्या आणि पकडलेले कस्तूरीमृग यांचा नजराणा महाराजांना अर्पण करून जंगलाचे राजे भिल्ल वगैरे जवळ येऊन त्यांची आदरानें जंगलांत सेवा करु लागले. ८५ प्रत्येक पर्वतावर फुटलेल्या अंजनाप्रमाणे काळेकुट्ट असलेले व सैन्य पाहून भीतीनें पळत सुटलेले अशा हत्तींना जणु हे चालते फिरते अंधाराचे समूहच आहेत अशा भावनेनें प्रजापति महाराजांनी एक क्षणपर्यंत पाहिलें. ८६ ज्यांना पाहणे एवढेंच फल आहे व ज्या उंच व मोठ्या स्तनांच्या शोभेला धारण करीत आहेत, झाडांच्या पानांची वस्त्रें ज्यांनी धारण केलीं आहेत अशा भिल्लांच्या स्त्रियांना पाहून प्रजापति महाराज आनंदित झाले. तसेंच दुरानें पहात असतांच ज्या मनोहर दिसतात व पुष्कळ मेघामुळें त्यांना शोभा प्राप्त झाली आहे व ज्यांच्यावर झाडांचीं पानें पसरलीं आहेत अशा पर्वतावरून वाहणाऱ्या नद्यांनाही महाराजांनीं पाहून संतोष मानिला. पर्वतावरील नद्यांनें पाणी पानें वगैरे कुजून पिण्याला अयोग्य होते म्हणून त्यांना पाहणें हेंच

फल आहे. त्यांच्या उपभोगानें आरोग्य बिघडतें. तसेंच भिल्लांच्या स्त्रियांना पाहणें हेंच फल आहे. त्यांच्या उपभोगरूपी फलाची अपेक्षा करणें योग्य नाहीं. त्यांच्या उपभोगानें मनुष्य पतित होतो.

दलयन्महतोऽपि भूभृतः सरिदुत्तुंगतटानि पातयन् ॥
विपिनानि परं प्रकाशयन्सरसां कर्दमयञ्जलश्रियं ॥ ८७ ॥
रथचक्रचयस्य चीत्कृतैर्व्यथयन्कर्णपुटानि देहिनां ॥
ककुभां विवराणि पूरयन्रजसा छादितवायुवर्त्मना ॥ ८८ ॥
सतरंगमिवाश्वसंपदा सतडिच्छेदमिवायुधत्विषा ॥
सजलाभ्रमिव क्षरन्मदैः करिभिः संचरदद्रिभासुरैः ॥ ८९ ॥
इति भूरिबलं पुरो वितन्वन्हरिराद्यैः परिसंमितैः प्रयाणैः ॥
प्रतिसैन्यनिविष्टसानुदेशं स रथावर्तगिरिं समाससाद ॥ ९० ॥
अथ सरसतृणोलपावकीर्णामविरलपादपराजिराजितां तां ॥
उपनदि बलमध्युवास पूर्वं बलपतिना प्रविलोकितां धरित्रीं ॥९१॥
विरचितपटमंडपोपकार्या स्थलपरिभक्तमकारि सर्वतः सा ॥
प्रतिवसति समुच्छ्रितात्मचिन्हा भृतकजनेन पुरोगतेन सद्यः॥९२॥
अपहृतकुथकटंकध्वजादीन्विदितनयाः सलिलावगाहपूर्वं ॥
उपकटकमनेकपान्बबंधुस्तरुगहनेषु मदोष्मणाभितप्तान् ॥ ९३ ॥
श्रमजलकणिकाचिताखिलांगा व्यपगतपल्ययनास्तुरंगवर्याः ॥
क्षितितललुठितोत्थिताश्च पीत्वा जलमवगाह्य विशश्रमुर्निबद्धाः ॥ ९४ ॥
परिजनधुततालवृंतवातप्रशमितघर्मजलाः क्षणं नरेंद्राः ॥
क्षितिनिहितकुथासु शेरते स्म श्रममपनेतुमपेतवारबाणाः ॥९५॥
कुरु करभमपेतयंत्रभारं मसृणय भूतलमानयांबु शीतं ॥
उदवसितमुदस्य राजकीयं विरचय कांडपटं समंततोऽपि॥९६॥

८७-८९ मोठमोठ्या पर्वतांचें दलन करणारा, नद्यांच्या उंच तटांना पाडणारा, दाट जंगलांना तोडून तेथें प्रकाश उत्पन्न करणारा,

व सरोवरांच्या पाण्याच्या शोभेला गढूळ करणारा, रथांच्या चाकांच्या चीत्कारांनीं लोकांच्या कानठाळ्या बसविणारा, व दिशांच्या विभागांना आकाशाला झाकून टाकणाऱ्या धुळीनें आच्छादणारा, तो त्रिपृष्ठ नारायण, आपल्या, पुष्कळ सैन्याला पुढें करून थोडक्या मुक्कामांनीं जेथें शत्रूंच्या सैन्यानें तळ दिला आहे अशा रथावर्त पर्वताच्या प्रदेशावर येऊन प्राप्त झाला. त्रिपृष्ठ नारायणाचें तें अफाट सैन्य पुष्कळ घोड्यांनीं युक्त असल्यामुळें लहरींनीं सहित असल्याप्रमाणें शोभत असे. शस्त्रास्त्रांच्या कांतीनें चमकणाऱ्या विजांनीं तें युक्त असल्याप्रमाणें भासत असे. ज्यांचा मद गळत आहे व चालत असलेल्या पर्वताप्रमाणें शोभणाऱ्या अशा हत्तींनीं युक्त असल्यामुळें तें मेघसहित असल्याप्रमाणें वाटत असे. ९१ त्या रथावर्त पर्वतावर सेनापतिनें प्रथमच जागा पाहून ठेविली होती. ती जागा पाणी, गवत, झुडपें यांनीं युक्त होती. व दाट झाडांच्या पंक्तींनीं शोभत होती. त्याठिकाणीं नदीच्या किनाऱ्यावर त्रिपृष्ठाच्या सैन्याचा तळ पडला. ९२ त्या नदीच्या किनाऱ्यावर जागा साफ करून मजूर लोकांनीं तेथें राहुट्या, तंबु वगैरे उभा केले. व शीघ्र त्या प्रत्येकावर ओळखण्याचीं चिन्हें उभारलीं ९३ ज्यांना सैन्याच्या व्यवस्थेची माहिती आहे अशा लोकांनीं हत्तींना पाण्यामध्यें स्नान करविण्याच्या पूर्वी त्यांच्या वरचें चिलखत, ध्वज, वगैरे काढून घेतलें. व स्नान करविल्यानंतर मदाच्या उष्णतेनें तप्त झालेल्या त्यांना पर्वताजवळच्या दाट वृक्षांच्या जंगलामध्यें बांधून टाकिलें. ९४ ज्यांच्या वरचें खोगीर काढून घेतलें आहे व ज्यांचे सारें शरीर श्रम झाल्यामुळें घामानें भरून गेलें आहे. असे घोडे जमीनीवर लोळून उठल्यावर त्यांना पाणी पाजून व पाण्यामध्यें स्नान करवून बांधून टाकिल्यामुळें ते स्वस्थ विसावा घेत राहिले. ९५ नोकरांनीं पंख्याचा वारा घालून ज्यांचा सगळा घाम नाहींसा केला आहे अशा राजांनीं आपल्या आंगातलें चिलखत काढून टाकिलें व श्रम नाहींसा करण्यासाठीं जमिनीवर अंथरलेल्या गालिचावर थोडा वेळपर्यंत झोप घेतली. ९६ अरे या उंटावरून हा सर्व यंत्रांचा भार काढून घे. ही जागा झाडून साफ कर. थंड पाणी आण. राजाचा हा डेरा येथून काढून या ठिकाणीं सर्व बाजूनें पडदे लाव.

अपनय रथमत्र वध्यतेऽश्वो नय विपिनं वृषभांस्तृणाय गच्छ ॥
इति भृतकजनो महत्तरोक्तं द्रुतमकरोन्न हि सेवकः स्वतंत्रः॥९७॥
परिचितपरिचारिकाकराग्रकृतपरिपीडननष्टयानखेदाः ॥
दिनविधिमवनीश्वरैकभार्याःस्वयमनुतस्थुरनुक्रमेण सर्वं ॥ ९८ ॥
इयमुरगरिपुध्वजेन लक्ष्म्या नृपवसतिःसुनिखाततोरणश्रीः ॥
अयमपि गगनेचरेन्द्रवासो विविधविमानविटंकभिन्नमेघः॥९९॥

अयमुरुयुवसज्जनेन पूर्णो विपणिपथः क्रयविक्रयाकुलेन॥
इयमनु कितवस्थलं निविष्टा ननु वसतिर्वरवारकामिनीनां ॥१००॥

इति कटकमशेषमुद्दिशन्तः पतितजरद्गवभारमुद्वहन्तः ॥
कथमपि च विलोकयाम्बभूवुर्निजवसतिं सुचिरं प्रयुक्तभृत्याः॥१०१॥

पाश्चात्यानथ निजसैनिकप्रधानान्व्याक्रोशन्पटहरवैश्च भेदवाद्भिः ॥
उत्क्षिप्तैर्दिशि दिशि केतनैश्च चित्रैरात्मीयान्कटकजनो
मुहुर्जुहाव ॥ १०२ ॥

आवासान्प्रतिगच्छतेति वचसा भूपान्विसर्ज्य स्वयं ॥
भूदेव्या घनपक्ष्मराजिषु रजोव्याजेन संचुम्बितः ॥
आसैरध्वपरिश्रमाधिकतया खेदं गतैः सेवकैः ॥
अन्वीतः पुरुषोत्तमः स्ववसतिं सत्संपदं प्राविशत् ॥१०३॥

इत्यसगकृते श्रीवर्धमानचरिते सेनानिवेशो नाम सप्तमः सर्गः ॥

९७ अरे येथून रथ दुसरीकडे ने. याठिकाणीं घोडा बांधावयाचा आहे. या बैलांना जंगलांत ने. गवत आणण्यासाठीं जा. याप्रमाणें वरच्या अधिकाऱ्यांनीं सांगितलेलीं कामें नोकरांनीं लौकर केलीं. बरोबरच आहे कीं, नोकर स्वतंत्र असू शकत नाहीं. ९८ नेहमींच्या परिचयाच्या दासींनीं राजांच्या मुख्य मुख्य स्त्रियांच्या अंगांचें हातांनीं जेव्हां चांगलें मर्दन केलें तेव्हां त्यांचा प्रवासाचा सर्व थकवा नाहींसा झाला. व मग त्या सर्व स्नानभोजन वगैरे दिवसाचा कार्यक्रम स्वतः करू लागल्या- ९९ हा गरुड चिन्हाचा ध्वज येथें दिसत आहे ह्मणून ज्याच्या सभोवतीं तोरणांनीं शोभा आणिली आहे असें हें त्रिपृष्ठ नारायणाचें निवासस्थान आहे. व नानाप्रकारच्या विमानांच्या सज्जांनीं मेघाचें विदारण करणारा, हा ज्वलनजटी विद्याधरराजाचा प्रासाद ( राहाण्याचें ठिकाण ) आहे. १०० हा बाजार खरेदी व विक्रीमध्यें निमग्न झालेल्या पुष्कळ तरुण व सज्जन पुरुषांनीं भरलेला आहे. येथें जुगारी लोकांच्या अड्ड्याजवळ उत्तम वेश्यांचीं राहाण्याचीं ठिकाणें आहेत. १०१ या प्रमाणें सर्व सैन्याच्या जागांचें वर्णन करणारे व पडलेल्या म्हाताऱ्या बैलांच्या पाठीवर लादलेलें ओझें वाहणारे असे नेमून दिलेलें काम करणारे कित्येक नोकर आपलें स्वतःचे राहण्याचे ठिकाण फार उशीरानें कसें तरी पाहू शकले, १०२ सैन्यांतील

लोकांनीं मागें राहिलेल्या आपल्या मुख्य सैनिकांना नानाप्रकारच्या वाद्यांच्या आवाजांनीं व प्रत्येक दिशामध्ये उभारलेल्या चित्रविचित्र ध्वजांनीं बोलाऊं लागले. १०३ आतां आपण आपल्या निवासस्थानीं जा असें म्हणून सर्व राजांचें विसर्जन करून पृथ्वीदेवीनें दाट पापण्याच्या पंक्तीच्या ठिकाणीं रजःकणांच्या मिषानें ज्याचें चुंबन घेतलें आहे, जो रस्त्याच्या अधिकश्रमानें लंगडत असलेल्या विश्वस्त सेवकांनीं अनुसरलेला आहे अशा त्रिपृष्ठ नारायणानें उत्कृष्ट संपत्तियुक्त अशा आपल्या निवासस्थानीं प्रवेश केला.

याप्रमाणें असगकविकृत श्रीवर्धमान चरित्रांतील ' सेनेनें तळ दिला ' या विषयाचें वर्णन करणारा हा सातवा सर्ग संपला.

---

एकदा सदसि केसरिद्विषं कश्चिदेत्य विदितः कृतानतिः ॥
इत्युवाच वचनं वचोहरः शासनात्खचरचक्रवर्तिनः ॥ १ ॥
शृण्वतां गुणगणान्न केवलं सूचयन्ति विदुषां परोक्षतः ॥
दिव्यतां तव वपुश्च पश्यतां दुर्लभं द्वयमिदं त्वयि स्थितम् ॥२॥
धैर्यमाकृतिरियं व्यनक्ति नश्चेतसस्तव सदा समुन्नता ॥
तोयधेरतिमहत्त्वमंभसः किं ब्रवीति न तरंगसंहतिः ॥ ३ ॥
प्रश्रयास्तव सुधारसच्छटाशीतलाः कठिनमप्यवान्तरे ॥
द्रावयंति पुरुषं विशेषतश्चंद्रकांतमिव चंद्ररश्मयः ॥ ४ ॥
स्निह्यति त्वयि गुणाधिके परं चक्रपाणिरतिसद्गुणप्रियः ॥
स्वीकरोति भुवि किं न साधुतां साधवो ननु परोक्षबांधवाः ॥५॥
युक्तमत्र भवतोरसंशयं संविधातुमितरेतरक्षमं ॥
सौहृदय्यमविनश्वरोदयं तोयराशिकुमुदेशयोरिव ॥ ६ ॥
जन्मनः खलु फलं गुणार्जनं प्रीणनं गुणफलं महात्मनां ॥
इत्युशंति कृतबुद्धयः परं तत्फलं सकलसंपदां पदं ॥ ७ ॥
पूर्वमेव सुविचार्य कार्यवित्सर्वतो विमलबुद्धिसंपदा ॥
श्रेयसे सृजति केवलं क्रियां सा क्रिया विघटते न जातुचित् ॥८॥
यःप्रतीपमुपयाति वर्त्मनः सोऽधिगच्छति किमीप्सितां दिशं ॥
किं प्रयात्यनुशयं न तन्मनो वीक्ष्य दुर्णयविपाकमग्रतः ॥ ९ ॥
स्वामिनं सुहृदमिष्टसेवकं वल्लभामनुजमात्मजं गुरुं ॥
मातरं च पितरं च बांधवं दूषयन्ति न हि नीतिवेदिनः ॥ १० ॥

१ एके दिवशीं विद्याधर चक्रवर्ती अश्वग्रीवाच्या आज्ञेनें एक प्रसिद्ध दूत त्रिपृष्ट-नारायणाच्या सभेंत आला.व बलाढ्य सिंहाचा वध ज्यानें केला होता अशा त्याला (त्रिपृष्टनारायणला) नमस्कार करून पुढें लिहिल्याप्रमाणें बोलूं लागला. २ हे प्रभो आपले गुण ऐकणाऱ्या विद्वान लोकांना ते आपली दिव्यता सूचित करीत असतात. व ज्यांनीं आपल्याला पाहिले आहे अशा लोकांना आपलें शरीरही आपली दिव्यता सूचित करीत असते. दिव्य शरीर व त्याला अनुरूप गुण असणें या दोन गोष्टी दुर्लभ आहेत परंतु यांचा आपल्या ठिकाणीं संगम झाला आहे. ३ अतिशय भव्य दिसणारी ही आपली आकृति आपल्या अंतःकरणांतील धैर्य गुणाला व्यक्त करीत आहे. बरोबरच आहे कीं, समुद्राच्या लहरींचा समूह त्याच्या विशाल गंभीरपणाचा परिचय करून देत नाहीं काय? ४ अमृतरसाच्या छटेप्रमाणें अति शीतल–मनास आनंद करणारा आपला विनय पाहून कठोर मनाचा पुरुष देखिल विशेष रीतीनें द्रवतो–आपल्या विषयीं त्याचें मन प्रेमळ बनतें. चंद्राचें किरण जसें कठिण अशाही चंद्रकांत मण्याला द्रवयुक्त करितात तसें कठिण अंतःकरणाचा मनुष्यही आपला विनय, सौजन्य वगैरे गुण पाहून प्रेमळ बनतो. ५ आमच्या चक्रवर्तीला सद्गुण अतिशय आवडतात ह्मणून तो गुणाधिक अशा आपल्यावर फार प्रेम करीत आहे. सज्जनपणा या जगांत सद्गुणांचा स्वीकार करीत नाहींत काय? खरोखर सज्जन हे जगाचे परोक्ष बंधु आहेत. ६ जसे समुद्र व चंद्र यांची मित्रता जिचा उत्कर्ष कधींही नाश पावत नाहीं अशी असते. तसे आपणा उभयतामध्येही कधीं नाश न पावणारी व परस्परांना साजेल अशी उत्कर्षशाली मित्रता उत्पन्न व्हावयास पाहिजे. ७ सद्गुण प्राप्त करून घेणें हेंच जन्म घेण्याचें फल होय. सत्पुरुषांना संतुष्ट करणें हें गुण प्राप्तीचे फल होय. सत्पुरुषांना संतुष्ट करण्याचें फल सर्व संपत्तीची प्राप्ति होणें हे आहे असें कुशलबुद्धीचे विद्वान लोक ह्मणतात. ८ कार्य करण्यात निपुण असलेले विद्वान् प्रथमतःच आपल्या निर्मल बुद्धिरूपी संपत्तीनें चांगला विचार करून फक्त ज्यापासून कल्याण होईल असेंच कार्य करीत असतात. व असलेंच कार्य मजबूत असल्यामुळें चिरस्थायी होतें. तें कधींही नाश पावत नाहीं. ९ जो मनुष्य मार्गाच्या विरुद्ध जातो तो आपल्या इच्छित दिशेला पोहोंचू शकेल काय? खोट्या रस्त्याने चालले असतां त्यापासून आलेल्या कडु अनुभवानें त्याचें मन पश्चात्तापयुक्त होणार नाहीं काय? अवश्य होईलच. १० नीतिज्ञ माणसें, मालक, मित्र,

आवडता नोकर, प्रिय पत्नी, आपला धाकटा बंधु, गुरु, माता, पिता व नातलग यांच्याशीं विरोध करीत नसतात.

न्यायवानभिनिवेशमात्मनो नानुरूपमकरोद्भवानमुं ॥
प्रार्थिता ननु पुरा स्वयंप्रभा चक्रिणा स्वयमनन्यचेतसा ॥ ११ ॥
नूनमेतदधुनैव तावकं श्रोत्रगोचरमुपागतं वचः ॥
चित्तवृत्तिमवयन्प्रभोः पुरा कः करोति विनयातिलंघनम् ॥ १२ ॥
एवमुक्तमथ चक्रवर्तिना तेन सा स्थितिमजानता मम ॥
स्वीकृता ननु परोक्षबंधुना कोऽत्र दोष इति वीतमत्सरं ॥ १३ ॥
वल्लभं प्रणयिनामथांतरे मन्यते न खलु जीवितं च यः ॥
बाह्यवस्तुषु कथं नु जायते तस्य लोभकणिकापि चेतसि ॥ १४ ॥
कन्यया स्विदनया प्रयोजनं धीमतस्तव पुरैव च त्वया ॥
प्रार्थितः किमिति नाश्वकंधरः किं न यच्छति परां च वांछितां १५
किं न संति बहवो मनोरमा योषितः सुरविलासिनीसमाः ॥
तस्य केवलमतिक्रमं मनः सोढुमल्पमपि नो विचक्षणं ॥ १६ ॥
चक्रपाणिमनुनीय यत्सुखं निर्विशास्यनुपमं त्वमक्षयं ॥
तत्कुतस्तव वद स्वयंप्रभालोललोचनविलासवीक्षितैः ॥ १७ ॥
यः सदा भवति निर्जितेन्द्रियस्तस्य नास्ति परिभूतिरन्यतः ।
जीवितं ननु तदेव सम्मतं यन्निकाररहितं मनस्विनां ॥ १८ ॥
तावदेव पुरुषः सचेतनस्तावदाकलयति क्रमाक्रमं ।
तावदुद्वहति मानमुन्नतं यावदिन्द्रियवशं न गच्छति ॥ १९ ॥
यः कलत्रमयपाशवेष्टितः सून्नतोऽपि स विलंघ्यते परैः ।
वल्लरीवलयितं महातरुं नाधिरोहति किमाशु बालकः ॥ २० ॥

११ हे प्रभो ! आपण न्यायी असूनही हा आग्रह-( स्वयंप्रभेला वरण्याचा ) धारण केला हे मात्र आपण अयोग्य केलें. स्वयंप्रभेंत आसक्त

होऊन-तन्मय होऊन पूर्वी ज्वलनजटीला तिची अश्वग्रीवचक्रवर्तीनें मागणी केली होती. १२ कदाचित् ही गोष्ट आतांच आपल्या कानीं आली असेल म्हणून आपल्या हातून उपर्युक्त गोष्ट घडून आली असावी. नाहींतर चक्रवर्तीची मनोवृत्ति जाणणारा कोणता मनुष्य विनयाचें उल्लंघन करील बरें ? १३ माझा अभिप्राय न जाणतां त्या परोक्षबंधूनें मनामध्ये मत्सरभाव न धरतां स्वयंप्रभेचा स्वीकार केला असेल. वास्तव याविषयीं त्याचा कांहीं दोष नाहीं असें चक्रवर्तीनें म्हटलें आहे. १४ या चक्रवर्तीच्या अंतःकरणांत ज्यांच्याविषयीं प्रेम आहे त्यांच्याकरितां हा आपलें जीवित देखिल प्रिय मानील नाहीं. अर्थात् त्यांच्याकरितां हा आपले प्राण द्यावयासही तयार असतो. वास्तव अशा त्या चक्रवर्तीच्या मनांत बाह्य वस्तुविषयीं अणुमात्र देखिल लोभ राहण्याचा संभव आहे काय ? १५ हे राजन् ! जर या स्वयंप्रभा कन्येशीं बुद्धिमान अशा आपलें प्रयोजन होतें तर पूर्वीच अश्वग्रीवाची याविषयी प्रार्थना कां केली नाहीं ? प्रार्थना केल्यावर त्यानें तीच काय इतर कन्याही दिल्या असत्या. १६ अश्वग्रीवचक्रवर्तीला देवांगनाप्रमाणें सुंदर अशा पुष्कळ स्त्रिया नाहींत काय ? आहेतच. फक्त हा जो अन्याय घडून आला आहे तो मात्र सहन करण्यास तो समर्थ नाहीं. अर्थात् त्याची मागणी पहिली असतां आपण त्या स्वयंप्रभेशीं लग्न लावलें हा आपण अन्याय केला आहे. चक्रवर्तीचे मन थोडासा देखिल अन्याय सहन करण्यास समर्थ नाहीं. व आपण तर मोठा अन्याय केला आहे तो त्याला कसा सहन होईल बरें ? १७ चक्रवर्तीची प्रार्थना करून जें नाश न पावणारें व निरुपम सुख आपणांस भोगावयास मिळेल. तसलें सुख स्वयंप्रभेनें आपल्या चंचल डोळ्यांच्या सविलास पाहण्यानेंही मिळणार नाहीं. कोठून मिळेल सांगा ? १८ ज्यानें आपलीं इंद्रियें ताब्यांत ठेविलीं आहेत त्याचा इतराकडून पराभव-अपमान होणें शक्य नाहीं. पुरुषांचे अपमान रहित जे जगणें आहे तेंच स्वाभिमानी माणसांना पसंत आहे. १९ जोपर्यंत मनुष्य इंद्रियांच्या ताब्यांत जात नाहीं तोपर्यंतच तो ज्ञानी समजावा. तोपर्यंतच तो न्याय अन्याय समजतो व तोपर्यंतच तो उन्नत असा स्वाभिमान धारण करूं शकतो २० जो पुरुष भार्यारूपी जाळ्यानें वेष्टित झाला आहे तो अतिशय उन्नत दशेस पोहोचला असला तरी ही इतर लोक त्याला जिंकू शकतात. ज्याला वेलींनीं वेटाळी घातली आहेत अशा मोठ्या वृक्षावर लहान मुलगाही चढू शकत नाहीं काय ?

इंद्रियार्थरतिरापदां पदं कस्य वा तनुमतो न जायते ॥
धीमतामिति वदन्निव श्रुतौ मूर्च्छति द्विरदडिंडिमध्वनिः ॥ २१ ॥
प्रीतिमल्पसुखकारणेन मा नीनशस्त्वमधिपे नभःस्पृशां ॥
जायते तव कलत्रमीदृशं तादृशो न पुनरर्जितः सुहृत् ॥ २२ ॥

त्वद्विवाहमवगम्य दुर्जयं त्वा प्रहंतुमचिरेण खेचरान् ॥
उत्थितान्स्वयमवारयत्प्रभुस्तद्धि संगतफलं महात्मनां ॥ २३ ॥
प्रापयात्मसचिवैः स्वयंप्रभां प्रीतये सह मया तदंतिकं ॥
सर्वदान्यवनितासु निःस्पृहः स स्वयं दिशति ते न किं प्रियां ॥२४॥
वाचमेवमभिधाय सस्फुरां जोषमासितमथ स्पशं रिपोः ॥
नोदितो निगदति स्म भारतीं विष्णुना सविनयं दृशा बलः ॥२५॥

अर्थशास्त्रविहितेन वर्त्मना साधितेष्टमिदमन्यदुर्वचं ॥
ऊर्जितं गदितुमुत्सहेत कस्त्वत्परः मदसि वाक्यमीदृशं ॥२६॥
अश्वकंठमपहाय कः सतां वल्लभो नयपरश्च कथ्यते ॥
तादृशोऽपि खलु वेत्ति न क्रियां लौकिकीं जगति कः समस्तवित् ॥

योऽवरिष्ट भुवि कन्यकां नरस्तद्वरः खलु स एव किं भवेत् ॥
हेतुरत्र ननु दैवमिष्यते तन्न लंघयति कोऽपि शक्तिमान् ॥ २८ ॥

युक्तिहीनमिति कर्तुमुद्यतस्त्वत्पतिः किमु न साधुना त्वया ॥
वारितो मतिमता बुधोऽप्यहो निश्चिनोत्यसदपि प्रभोर्मतं ॥२९॥
कस्य वा बहुविधं मनोरमं वस्तु पूर्वसुकृतान्न जायते ॥
किं स एव बलिना नु नाथ्यते संमता न हि सतामियं क्रिया ॥३०॥

२१ कोणत्या शरीरधारी प्राण्याला पंचेंद्रियांच्या पदार्थावरील आसक्तीनें संकटांचे माहेर घर बनविलें नाहीं बरें? अर्थात् सर्व पंचेंद्रिय सुखांच्या पंजांत फसून दुःखी होतातच. ही गोष्ट व्यक्त करण्याकरितांच जणु हत्तीवरील नगाऱ्याचा ध्वनि विद्वानांच्या कानावर येऊन आदळत असतो. २२ थोड्याशा सुखाचें कारण असलेल्या स्वयंप्रभेमुळें विद्याधरांचा अधिप—चक्रवर्ति अशा त्या अश्वग्रीवाच्या प्रीतीचा आपण नाश करूं नका, पुनः आपणास स्वयंप्रभेसारखी सुंदर भायको

मिळूं शकेल पण चक्रवर्तीसारखा तेजस्वी मित्र मात्र मिळणार नाहीं. २३ हे प्रभो! जेव्हां आपला विवाह झाला ही गोष्ट ऐकण्यांत आली तेव्हां तत्काल दुर्जय अशा आपणाला ठार मारण्यासाठीं उद्युक्त झालेल्या विद्याधरांना स्वतः चक्रवर्तीनें परावृत्त केलें. हें सर्व महापुरुषांच्या संगतीचें फल आहे. अर्थात् चक्रवर्ती नेहमी सत्पुरुषांच्या सहवासांत राहात असल्यामुळे त्यानें आपणांस मारूं दिलें नाहीं. वास्तव हे राजन्! माझ्या बरोबर आपल्या सचिवासह स्वयंप्रभेला आपण चक्रवर्तीकडे पाठऊन द्या. ह्मणजे तो फार खुष होईल. चक्रवर्ती परस्त्रियांविषयीं पूर्ण निःस्पृह आहे ह्मणून तो स्वतः आपणांकडे आपली प्रिया पाठऊन देणार नाहीं काय ? २५ या प्रमाणें हृदयास स्फुरण आणणारें भाषण बोलून तो अश्वग्रीव चक्रवर्तीचा दूत मौन धारण करून बसला. नंतर त्रिपृष्ठ नारायणानें मोठ्या विनयानें आपल्या नेत्र संकेतानें सूचना केला गेलेल्या विजयबलभद्रानें पुढें लिहिल्याप्रमाणें भाषण केलें. २६ नीतिशास्त्रांत सांगितलेल्या मार्गानें-उपायानें ज्यांत आपली इष्ट वस्तु साध्य केली आहे असे जोरदार भाषण हे दूता ! तुझ्या शिवाय दुसरा कोण बरें सभेंत बोलूं शकेल? हें तुझें भाषण 'दुर्वच' आहे अर्थात् दुसऱ्याला बोलतां येण्यासारखें नाही. या शब्दाचा दुसरा अर्थ असा आहे की, हें तुझें भाषण दुर्वच-अर्थात् दुःखाला देणारें आहे व 'असाविष्ट' आहे. अर्थात् या तुझ्या भाषणांत इष्ट वस्तूची प्राप्ति होईल असा कांहीच अभिप्राय नाहीं अर्थात तूं मूर्खाप्रमाणे कांहीं तरी बडबडला आहेस. २७ अश्वग्रीवाशिवाय या जगांत सत्पुरुषांना प्रिय व नीतितत्पर कोण आहे. असें असतांहि लोक व्यवहार काय आहे हें तो जाणत नाहीं. अथवा जगांत सर्व जाणणारा कोण आहे बरें ? २८ या जगांत जो मनुष्य कन्येला वरतो तोच तिचा पति होय. तोच तिचा पति कां व्हावा याला उत्तर हे आहे कीं, त्याचें दैवच या गोष्टीला कारण आहे. त्या दैवाचें उल्लंघन कोणताही शक्तिमान करूं शकत नाहीं. २९ परंतु तुझा मालक हें अयोग्य कार्य करण्यास तयार झालेला आहे वास्तव बुद्धिमान असूनही तूं या अयोग्य कार्यापासून त्याला कां परावृत्त करीत नाहींस? अथवा आश्चर्य हें आहे कीं, विद्वान लोक ही मालकाचें अयोग्य कृत्य देखिल योग्यच आहे असें मानतात. ३० पूर्वी केलेल्या पुण्योदयानें कोणाला बरें नानाप्रकारच्या सुंदर वस्तु मिळत नाहींत? असें असतांही शक्तिमान मनुष्यांनीं त्याच्या वस्तूंची कां इच्छा करावी बरें? असलें अयोग्य कार्य सत्पुरुषांना मान्य असत नाहीं. हलकट माणसांचेंच असलें कार्य असतें.

युक्तसंगममवेक्ष्य दुर्जनः कुप्यति स्वयमकारणं परं ॥
चंद्रिकां नभसि वीक्ष्य निर्मलां कः परो भषति मंडलाद्विना ॥३१॥
यो विवेकरहितो यथेच्छया वर्तते पथि सतामसम्मते ॥
निस्त्रपः स खलु दंड्यते न कैस्तुंगशृंगशफवर्जितः पशुः ॥ ३२ ॥
प्रार्थनाधिगतजीवितास्थितिस्तार्कुकोऽप्युचितमेव याचते ॥
ईदृशं जगति याचनाविधिं वेत्ति सग्रिगल एव नापरः ॥ ३३ ॥
श्रीः स्थिता मयि परातिशायिनी दुर्जयोऽहमिति गर्वमुद्वहन् ॥
यः परानभिभवत्यकारणं सोऽत्र जीवति कियच्चिरं नृपः ॥३४॥
द्वौ सतामभिमतौ नरोत्तमौ जन्म संसदि तयोः प्रशस्यते ॥
यो न मुह्यति भये पुरःस्थिते यस्य संपदि मनो न माद्यति ॥३५॥
साधुरब्द इव भूतिसंगमाद्विर्मलो ननु सुवृत्ततां वहन् ॥
भीषणो भवति दुर्जनः खरः प्रेतधामनि निखातशूलवत् ॥ ३६ ॥
सामजो भदविचेतनोऽपि सन् पुष्करे क्षिपति नांघ्रिमात्मनः ॥
क्षेमहीनमदमत्तमानसः किं न चापयति तं भवत्पतिः ॥ ३७ ॥
लोचनोद्गतविषानलप्रभास्पर्शदग्धसविधद्रुमश्रियः ॥
को जिघृक्षति यथेच्छया फणारत्नसूचिमुरगस्य दुर्मतिः ॥ ३८ ॥
क्षीबवारणशिरोविदारणे क्रीडनस्थितिपटीयसो हरेः ॥
निद्रया पिहितचक्षुषोऽपि किं जंबुकेन परिलुप्यते सटा ॥ ३९ ॥
न्यायहीनमिह यस्य वांछितं खेचरः स इति कथ्यते कथं ॥
जातिमात्रमानिमित्तमुन्नतेः किं प्रयाति गगने न वायसः ॥ ४० ॥

३१ हे दूता! योग्य पदार्थांचा परस्परांशीं संबंध आलेला पाहून दुर्जन मनुष्य निष्कारण अतिशय रागावतो. आकाशांत स्वच्छ चांदणें पाहून कुत्र्यावांचून विनाकारण कोण बरें भुंकतो? अर्थात् स्वयंप्रभा व निःस्पृह नारायणाला अनुरूप संबंध पाहून चक्रवर्तीच्या पोटांत दुखूं लागलें आहे.

३२, जो मनुष्य विवेक सोडून देऊन सज्जनांना पसंत नसलेल्या मार्गांत स्वच्छंदपणे निर्लज्ज बनून वागू लागतो. तो लांब शिंगें व खूर यांनीं रहित असलेला असा एक पशूच आहे असें समजून त्याला कोण बरें शिक्षा करणार नाहीत? सर्वच करतील.

३३ याचना करूनच जो आपले नेहमीं पोट भरतो असा याचक देखिल स्वतःला शोभेल अशीच याचना करितो. परतु अशा तऱ्हेची याचना [ त्रिपृष्ठ नारायणाची पत्नी मला पाहिजे म्हणून याचना करणारा—मला अश्वग्रीवच आढळून आला. दुसरा नाहीं. असली याचना करणें हें यालाच समजतें. इतरांना समजत नाही. ३४ माझ्याजवळ इतरापेक्षां अतिशय संपत्ति आहे. मी दुर्जय आहे असा गर्व बाळगणारा राजा जर व्यर्थ दुसऱ्यांना त्रास देऊ लागेल तर किती दिवसपर्यंत तो या जगांत वाचेल बरें ? शेराला सव्वाशेर भेटून लौकरच त्याचा अवश्य नाश होतो. ३५ भय पुढें दत्त म्हणून उभें राहिलें असतांही जो घाबरून जात नाही व संपत्तीच्या लाभामुळे ज्याचें मन उन्मत्त बनत नाहीं अशीं दोन उत्कृष्ट माणसेंच सत्पुरुषांना मान्य आहेत व त्या दोघांचाच जन्म सभेंत प्रशंसिला जातो. ३५ सुवृत्तता धारण करणरा- अर्थात् सदाचार धारण करणारा सज्जन भूतिसंगम झाला असतां—संपत्ति प्राप्त झाली असतां सुवृत्तपणाला—गोलपणाला धारण करणारा व भूतिसंगमाला—राखेच्या सहवासाला प्राप्त झालेल्या दर्पणाप्रमाणें निर्मलच होतो—निर्दोषच होतो. परंतु दुष्ट व क्रूर मनुष्य स्मशानांत पुरलेल्या तीक्ष्ण सुळाप्रमाणें भयंकर असतो. ३६ मदानें अगदीं उन्मत्त बनलेला असाही हत्ती आपल्या सोंडेच्या अग्रभावर स्वतः पाय देत नाहीं, मग पुण्यहीन व मदानें उन्मत्त बनलेल्या तुमच्या चक्रवर्तीला एवढी देखिल गोष्ट समजू नये काय ? ३७ डोळ्यांतून निघालेल्या विषाग्नीच्या प्रभेनें ज्यानें जवळच्या वृक्षांच्या शोभेला जाळून खाक केलें आहे अशा भयंकर सर्पाच्या फणावरील मणि सहज रीतीनें कोण दुर्बुद्धि मनुष्य काढून घेण्याची इच्छा करतो बरें? अर्थात् स्वयंप्रभा ही विषारी सर्पाच्या फणावरील मण्यासारखी आहे. तिला स्वीकारण्याची इच्छा करणारा चक्रवर्ती अवश्य मृत्युमुखीं पडेल असें हे दूता ! तूं समज. ३९ उन्मत्त हत्तीचीं गंडस्थळें फोडण्याच्या लीलेमध्यें निपुण असलेल्या सिंहानें झोपेनें जरी आपले डोळे मिटले असले तरी अशा अवस्थेंतही कोल्हा त्याच्या मानेचे केस कुरतडू शकेल काय ? अर्थात् कुरतडू शकणार नाही. याचप्रमाणें सिंह सदृश पराक्रमी अशा त्रिपृष्टनारायणाची पत्नी—स्वयंप्रभा अश्वग्रीवाकडून हरली जाणें शक्य नाही. ४० नीति मार्गाला सोडून असलेली परस्त्री हरणाची इच्छा ज्याच्या मनांत आहे त्याला खेचर—विद्याधर तरी कसें म्हणावें बरें ? फक्त विद्याधरांच्या कुळांत जन्म घेणें हें उन्नतीस कारण नाहीं. कारण

कावळे देखिल आकाशांतून जात नाहींत काय ? अर्थात् आकाशांतून जातां येणें एवढेंच विद्याधरांचें लक्षण नव्हे. जो विद्याधर सदाचाराने युक्त आहे तोच विद्याधर होय.

इत्युदीर्य विरते वचः परं तेजसान्वितमनुत्तरं बले ॥
पीठिकामभिमुखं वचोहरः प्रेर्य वाचमिति धीरमादद ॥ ४१ ॥
* तन्न चित्रमिह बुद्धिदुर्विधो नात्मनीनमवगच्छति स्वयं ॥
एतदद्भुतमहो विचेतनो यत्परोक्तमपि नाभिनंदति ॥ ४२ ॥
क्षीरमेव रसनावशीकृतः पातुमिच्छति बिडालशावकः ॥
नेक्षते ह्यवधिदुःसहं घनं दंडपातमवसादनक्षमं ॥ ४३ ॥
स स्वयं कथमिवात्मपौरुषं स्मापयत्यनुचितं महात्मनां ॥
यो न जातुचिदरातिमाहवे वीक्षते विधुतखड्गभासुरं ॥ ४४ ॥
किं वचोऽनुसदृशः पराक्रमः शक्यते महति कर्तुमाहवे ॥
गर्जति श्रुतिभयंकरं यथा किं तथा जलधरः प्रवर्षति ॥ ४५ ॥
अन्यथा निजवधूजनालये कथ्यते रणकथा यथेच्छया ॥
अन्यथैव वरवीरवैरिणां स्थीयते ननु पुरो रणाजिरे ॥ ४६ ॥
कस्य वा भवति कः सखा रणे क्षीबवारणघटाभिराकुले ॥
दृश्यते जगति सर्वसंगतं प्राणसंगतमथैकमद्भुतं ॥ ४७ ॥
स्तब्धमुत्खनति किं न मूलतः पादपं तटरुहं नदीरयः ॥
वेतसः प्रणमनाद्विवर्धते चाटुरेव कुरुते हि जीवितं ॥ ४८ ॥
भूभृतामुपरि येन शात्रवः स्थापितः सुहृदपि स्वतेजसा ॥
साधुतापदमधिष्ठितावुभावुत्तमः खलु न तादृशः परः ॥ ४९ ॥
यस्य चापरवशंकया रिपुस्त्रस्तधीः किमधुनापि मुह्यति ॥
निष्ठुरं ध्वनति नूतने घने नो दने हरिणशावकैः समं ॥ ५० ॥

---

* टिप्पणीः— विविनक्ति न बुद्धिदुर्विध स्वयमेव स्वहितं पृथग्जन ॥
यदुदीरितमप्यद पैरैर्न विजानाति तदद्भुतं महत् ॥ ३९ ॥
शिशुपालवधे ( माघकाव्ये ) षोडशसर्गे अस्य सदृशोऽयं श्लोक ।

४१-या प्रमाणें- तेजस्वी, व ज्याचें उत्तर कोणी देऊं शकत नाहीं-असें उत्कृष्ट भाषण करून विजयवलभद्र थांबले असतां सिंहासनाकडे तोंड करून व आपल्या वाणीला प्रेरणा करून दूतानें गंभीरपणानें पुढें लिहिल्याप्रमाणें भाषण केलें. ४२ बुद्धीचा दुष्काळ ज्याला आहे असा मनुष्य आपलें हित कशांत आहे हें स्वतः जाणीत नाहीं यांत आश्चर्य नाहीं. परंतु हें आश्चर्य आहे की, अज्ञानी माणूस दुसऱ्याचें वचन देखिल पसंत करीत नाहीं! ४३ जिभेच्या स्वादाला वळी पडून मांजराचें पिल्लूं दूधच पिण्याची इच्छा करीत असते परंतु अतिशय दुःखद व नाश करण्यास समर्थ असलेला लठ्ठ बडगा आपल्या अंगावर पडत असलेला तें पाहात नाहीं! ४४ ज्याला चमकणाऱ्या तरवारीनें तेजस्वी दिसणारा शत्रु कधीं पाहण्याचा प्रसंग आला नाहीं त्यानें आपला शूरपणा महात्म्यांच्या पुढें स्वतःच्या तोंडानें सांगणें कसें योग्य आहे? ४५ बोलण्याप्रमाणें महायुद्धामध्यें पराक्रम करणें शक्य आहे काय? मेघ कानाला भय उत्पन्न करणारी गर्जना करीत असतो परंतु तितकीच जोराची जलवृष्टि करीत असतो काय? ४६ युद्धामध्यें अतिशय वीर अशा शत्रूपुढें युद्ध करीत उभा राहणे वेगळे व अंतःपुरांत आपल्या स्त्रियापुढें आपल्या पराक्रमाच्या स्वच्छंदपणें गप्पा झोडणें हें वेगळे असते! ४७ उन्मत्त हत्तींच्या समूहांनी व्याप्त झालेल्या युद्धामध्ये कोण कुणाचा मित्र असतो वरें? अशावेळी आपले प्राण वचावले म्हणजे आपण सर्व मिळविल्यासारखें होतें ही गोष्ट जगांत सर्वत्र अशीच आढळून येते. अर्थात् आपण ज्या चक्रवर्तीशीं आम्ही युद्ध करूं म्हणून गप्पा झोडीत आहात त्या व्यर्थ आहेत. ४८ तटावर उगवलेल्या व गर्वानें ताठपणा न सोडणाऱ्या वृक्षाला नदीचा वेग मुळापासून उपडून टाकीत नाहीं काय? परंतु वेत नदीच्या वेगापुढें नम्रता धारण करितो म्हणून तो वाढूं लागतो. या जगांत खुशामत करणे, नम्रतेनें वागणें हाच जगण्याचा उपाय आहे. यास्तव चक्रवर्तीशीं आपण नम्र राहणें हेंच कल्याणकारक आहे. आमच्या चक्रवर्तीनें शत्रूला वश करून त्याला आपल्या तेजानें सर्व राजावर स्थापिलें. अर्थात् सर्व राजापेक्षां त्याला अधिक वैभवसंपन्न वनविलें. याचप्रमाणें मित्रालाही वैभवसंपन्न करून या उभयतांना सज्जनांच्या पदवीवर चढविलें. आमच्या चक्रवर्तीसारखा उत्तम मनुष्य या जगांत दुसरा नाहीं. असें असतां आपण त्याच्याशीं युद्ध करण्याचा प्रसंग आणिला आहे हें बरें केलें नाहीं. ५० आमच्या चक्रवर्तीच्या धनुष्याच्या ध्वनीनें शत्रु इतके भयग्रस्त झाले आहेत की, ते अद्यापि देखिल जंगलामध्यें भयंकर मेघगर्जना होत असतां हा चक्रवर्तीच्या धनुष्याचाच शब्द होत आहे असें समजून हरिणांच्या पिल्लांबरोबर अतिशय थरथर कांपत असतात.

दर्भसूचिदलितांगुलिक्षरद्रक्तयावकविराजितांघ्रयः ॥
पूर्णबाष्पनयना भयाकुला भर्तृहस्तधृतवामपाणयः ॥ ५१ ॥
संचरंति परितो दवानलं तस्य शत्रुवनिताः स्खलत्पदं ॥
वेधसा पुनरपि प्रवर्तितोद्वाहसंपद इवाधुना वने ॥५२॥ युग्मं॥
रूढवंशगहनांधकारितं भग्नशालवलयं समन्ततः ॥
वन्यनागपरिभग्नतोरणं स्तंभदंतुरितगोपुराजिरं ॥ ५३ ॥
अंशुकायितफणींद्रकंचुकच्छेदभासुरितशालभंजिकं ॥
सिंहशावकनखांकुशाहतिक्षुण्णचित्रगजराजमस्तकं ॥ ५४ ॥
कुट्टिमेषु सलिलाभिशंकयोदन्यता मृगगणेन मर्दितं ॥
वानरैः करतलैरशंकितं वाद्यमानपरिभिन्नपुष्करं ॥ ५५ ॥
यौवनोद्धतपुलिंदसुंदरीसेवितैकशयनीयवेदिकं ॥
पंजरच्युतशुकैः ससारिकैः पठ्यमाननरनाथमंगलं ॥ ५६ ॥
तस्य शत्रुभवनं विलोकयन्नीदृशं पथिकपेटको वने ॥
त्रस्तचित्तमितरेतरं भयादप्रतीक्ष्य सहसातिगच्छति ॥५७॥ कु.
कांचनप्रधिविनिर्गतानलज्वालया जटिलिताष्टदिङ्मुखं ॥
गुह्यकैर्विहितरक्षमक्षयं वज्रतुंबमिनबिंबभासुरं ॥ ५८ ॥
उन्नतं दशशतारसंयुतं साधिताखिलनरेंद्रखेचरं ॥
तस्य चक्रमरिचक्रमर्दनं किं न वेत्सि पुरुपुण्यसंपदः ॥५९॥ यु.
व्याहरंतमिति दूतमुद्धतं तं निवार्य पुरुषोत्तमः स्वयं ॥
तस्य नोऽपि निकषो रणादृते नान्य इत्यमुचदाजिनिश्चयः ॥६०॥

५१ दर्भांच्या अग्रभागांनीं फाटलेल्या बोटांतून वाहणाऱ्या रक्तानें ज्यांचे पाय मेंदी लावल्याप्रमाणें शोभत आहेतः ज्यांच्या डोळ्यांतून पाणी वाहात असून ज्या भयभीत झाल्या आहेत, पतीच्या हाताकडून ज्यांचा डावा हात पकडला गेला आहे अशा शत्रुस्त्रिया अडखळणाऱ्या पावलांनी वनांत पेटलेल्या अग्नीच्या सभोंवती फिरत असतां त्यावेळीं त्या वनामध्ये ब्रह्मदेवाकडून ज्यांचें पुनः जणु लग्न लावले

जात आहे अशा शोभतात. ( विवाहाच्या वेळीं वराचा हात धरून कन्येला अग्नीच्या सभोवती सात प्रदक्षिणा घालाव्या लागतात. तोच प्रकार पुनः या शत्रुस्त्रियांचा आज होत असल्यामुळें जणु पुनः यांचें लग्न होत असल्याप्रमाणे वाटते.) ५३–५७ वाटसरूंचा समूह भीतीनें एक दुसऱ्याची मार्ग प्रतीक्षा न करितां धावरून लौकर लौकर जगलांत निघून जातो कारण अश्वग्रीव चक्रवर्तीनें शत्रूंच्या शहरांची केलेली भयंकर स्थिति पाहून त्यांना भय वाटत असे. शत्रु पळून गेल्यामुळें त्यांच्या शहरांत पुष्कळ वेलींचें वन उगवलें होतें त्यामुळें तेथें दाट अंधार पडला होता, चोहीकडचा तट पडलेला होता. रानटी हत्ती शहरांत घुसून त्यांनी दरवाज्यावरील तोरणे तोडून टाकिली होतीं. वेशीचा प्रदेश मोडून पडलेल्या खांबांनी भरून गेला होता. पातळ वस्त्राप्रमाणें भासणाऱ्या सापांच्या कांतींनी वेशीच्या वर असलेल्या पुतळ्या शोभत होत्या; तेथें सिंहाच्या वज्रांच्या नखरूपी अकुशांच्या आघातानें चित्रांतील हत्तींचीं मस्तकें तुटून पडलेली दिसत होती रत्नांच्या जमीनीत पाण्याच्या शंकेने तान्हेलेल्या पशूंनी पायांचा आघात केल्यामुळें ती सगळी उकरली गेली होती. तेथें निर्भय होऊन आपल्या हातांनी वानरांनीं मृदंग वाजऊन ते फोडून टाकिले होते. तारुण्याने मत्त झालेल्या भिल्लस्त्रिया जेथें बिछाना अंथरलेला आहे अशा ओझ्यावर निजत असत. पिंजऱ्यांतून सुटून बाहेर आलेले पोपट व सारिका जेथें राजांची मंगलस्तुति गात आहेत अशा रीतीची शत्रूंच्या नगरांची परिस्थिती पाहून वाटसरांना भय वाटत असे ५८–५९ ज्याची पुण्यरूपी संपत्ति फार मोठी आहे अशा या अश्वग्रीवाच्या चक्र रत्नाचें यक्ष रक्षण करीत आहेत. हे रत्न सूर्याप्रमाणे तेजस्वी आहे, याला हजार आरे आहेत, याचा तुंबा वज्रमय आहे. याच्या सुवर्णमय तटांतून निघणाऱ्या अग्नीच्या ठिणग्यांनी आठ ही दिशा प्रकाशित झाल्या आहेत. या रत्नाचा नाश होत नाहीं. याच्या साह्यानें अश्वग्रीवानें सर्व राजांना व विद्याधरांना जिंकिलें आहे. शत्रु समूहाचें मर्दन करणाऱ्या या त्याच्या चक्ररत्नाला तूं जाणत नाहींस काय? १६० याप्रमाणें उद्धटपणानें भाषण करणाऱ्या त्या दूताला आपलें भाषण पुरें करावयास सांगून त्रिपृष्ठ नारायणानें स्पष्ट त्याला सांगितलें की, आतां त्याची व आमची परीक्षा युद्धावांचून होणे शक्य नाहीं व माझा त्याच्याशी लढण्याचा पक्का निश्चय आहे मी तो सोडणार नाही असे तूं त्याला जाऊन कळव.

तस्य सान्नहनिकोऽथ वारिजः शांखिकेन नदति स्म पूरितः ।
आज्ञया प्रतिनिनादिताखिलक्ष्माभृदीशकटकोरुगव्हरः ॥१६१॥

केकिनां जलभरानतांबुदध्वानशंकिमनसां सुखावहः ॥
व्यानशे समरपुष्करध्वनिर्दिङ्मुखानि सुभटान्प्रबोधयन् ॥६२॥
सर्वतो जयजयेति सैनिकास्तद्ध्वनिं समभिनंद्य बन्दिभिः ॥
स्तूयमाननिजनामकीर्तयः प्रारभंत रभसेन दंशितुं ॥ ६३ ॥
गच्छति प्रधनसंम्मदोदयात्स्फीततां वपुषि चेतसा समं ॥
कश्चिदात्मकवचे न सम्ममौ तानितेऽपि मुहुरात्मकिंकरैः॥६४॥
लोहजालमलिनीलमुद्वहन् लालयन्नसिलतां स्फुरत्प्रभां ॥
कश्चिदाप समतां तडिद्वतो भूगतस्य नववारिवाहिनः ॥६५॥
वारणे कलकलाकुलीकृते क्षीबतां द्विगुणमुद्वहत्यपि ॥
शारिमाशु नयविन्द्यवेशयत्संभ्रमेऽपि कुशलो न मुह्यति ॥६६॥
आबभौ गुणविनम्रमुन्नतं भंगवर्जितमनिंद्यवंशजं ॥
कश्चिदेत्य धनुरात्मनः समं न श्रिये किमनुरूपसंगमः ॥ ६७ ॥
सत्वरं जवमितानधिष्ठिता वर्मिता हरिणरंहसो हरीन् ॥
प्रासभासुरकरा निषादिनो मेनिरे सफलमात्मदोहदम् ॥ ६८ ॥
युक्तयुग्यतुरगाः सकेतनाः स्यंदना विधृतचित्रहेतयः ॥
धूर्गतैः कवचितैस्तु निन्यिरे स्वामिवासभवनाजिरं प्रति ।६९।
अंगरागसुमनोंबरादिभिः पूर्वमेव निजसेवकान्नृपाः ॥
आत्महस्तकमलैरपूजयंस्तद्धि मारयति तान्न चापरम् ॥७०॥

६१ त्रिपृष्ठ नारायणाच्या आज्ञेनें शंख वाजविण्यासाठीं नेमिलेल्या मनुष्यानें युद्धाची तयारी करण्याची सूचना देणारा शंख फुंकला. त्यावेळीं त्याच्या ध्वनीनें पर्वताचे सगळे कडे व दऱ्या प्रतिध्वनित झाल्या.

६२ पाण्याने खालीं लवलेल्या मेघांच्या गर्जनेची शंका घेणाऱ्या मोरांना सुखदायक असलेल्या नगाऱ्यांच्या ध्वनीने शूर योध्यांना युद्धाची सूचना देऊन सर्व दिशांची तोंडें व्यापून टाकिलीं. अर्थात नगाऱ्यांचा ध्वनि सर्वत्र पसरला.

६३ भाट लोकांकडून नामोच्चारासह ज्यांची कीर्ति वर्णिली जात आहे अशा योद्ध्यांनीं 'जय जय' असा शब्द उच्चारून नगाऱ्याच्या ध्वनीचें स्वागत केलें व

गडबडीनें चिलखत घालण्यास प्रारंभ केला. अर्थात् युद्धाच्या तयारीला ते लागले. ६४ एका योद्ध्याला युद्धाविषयीं अतिशय आनंद वाटू लागल्यामुळें त्याच्या अंतःकरणाबरोबर त्याचें शरीरही त्या आनंदानें भरून तें अतिशय लठ्ठ झालें त्यामुळें नोकरांनीं त्याचें चिलखत ताणून धरलें असतांही त्यांत तो माऊं शकला नाहीं. ६५ भुंग्याप्रमाणें काळ्या रंगाचें चिलखत अंगांत घालून हातानें चमचमणारी चंचल तरवार फिरविणारा कोणी एक योद्धा विजेने सहित होऊन नवीन पाण्यानें लवलेल्या मेघाप्रमाणें भासू लागला. ६६ योद्ध्यांच्या गोंगाटानें गोंधळून जाऊन ज्यानें दुप्पट मस्ती करावयास सुरवात केली आहे अशा हत्तीवरही महातानें न घाबरतां अंबारी चढविलीच. बरोबरच आहे कीं, जे निपुण असतात ते घाबरण्याच्या प्रसंगींही गोंधळून जात नाहींत. त्यांचें चातुर्य त्यावेळी व्यक्त होतेंच ६७ कोणी एक योद्धा गुणविनम्र—धैर्य औदार्य वगैरे गुणांनीं नम्र, पक्षीं दोरीनें नम्र, उन्नत—उंच, भंगवर्जित—अपमान रहित पक्षी न तुटलेलें, अनिंद्य वंशज—उत्तम वंशांत उत्पन्न झालेला, पक्षीं उत्तम वेळूपासून उत्पन्न झालेलें अशा स्वतःप्रमाणें असलेलें धनुष्य प्राप्त करून घेऊन फार फार शोभू लागला. बरोबरच आहे की अनुरूप पदार्थाचा संयोग शोभेला कारण होत नाहीं काय? अवश्य होतोच. ६८ हरिणाप्रमाणें वेगानें, धावणाऱ्या घोड्यावर आरूढ झालेले, चिलखत अंगावर चढऊन, ज्यांनी चमकणारा भाला हातांत घेतला आहे असे घोडेस्वार आज आपली युद्धाची इच्छा सफल होणार असे मानू लागले. ६९ ज्यांच्या जोकडांना घोडे जुंपले आहेत, नानाप्रकारची हत्यारें ज्यांत ठेविलीं आहेत असे ध्वजांनीं युक्त असलेले रथ जूवर बसलेल्या व अंगावर चिलखत घातलेल्या सैनिकांनी आपल्या मालकाच्या डेऱ्याकडे नेले. ७० उटी, फुलांचे हार, वस्त्रें वगैरेंनीं प्रथमतः आपल्या शूर नोकरांचा त्यांच्या मालकांनीं—राजांनीं आपल्या हातरूपी कमलांनी चांगला आदरसत्कार केला. खरोखर पाहिलें असतां हा सत्कारच मारतो. दुसरें कोणी मारीत नाहीं. अर्थात् अशा सन्मानानें शूर नोकर-स्वामिकार्यार्थ प्राण देण्यासही मागें पुढे पाहात नाहींत व कृतघ्न बनत नाहींत.

आत्तचित्रकवचा यशोधना बिभ्रतोऽभिमतमस्त्रमात्मनः ॥
भूभृतामभिमुखं त्वरावतां तस्थुराहवरसोद्धता भटाः ॥ ७१ ॥
निर्ययुर्बहलगैरिकारुणा संध्ययान्वितघनानुकारिणः ॥
दन्तिनो धृतवधावधाक्रियैर्वीरयोधपुरुषैरधिष्ठिताः ॥ ७२ ॥
बद्धचारुकवचैर्महाभटैर्वेष्टितः प्रहतसामरानकः ॥
आरुरोह करिणं प्रजापतिः कल्पितं सपदि सर्वमंगलं ॥ ७३ ॥

खेचरैः कवचितैरुदायुधैरन्वितो धृततनुत्रभासुरः ॥
सार्वभौममधिरुह्य निर्ययावग्रतः शिखिजटी मदच्युतं ॥ ७४ ॥
दानिनं विपुलवंशमूर्जितं शिक्षया पटुमभीरुमुन्नतं ॥
अर्ककीर्तिरिभमात्मनः समं दंशितो व्यलगदाजिलंपटः ॥७५॥
वज्रसारमिदमेव मद्वपुर्दंशनेन किमिति प्रतिक्षणं ॥
वर्म नीतमपि सत्पुरोधसा निर्भयेन विजयेन नाददे ॥ ७६ ॥
कुंदवीध्रतनुरंजनत्विषं कालमेघमिभमुन्मदं बलः ॥
राजति स्म नितरामधिष्ठितः कालमेघमिव पूर्णचंद्रमाः ॥७७॥
रक्षितुर्भवनमंडलस्य मे रक्षणे सति कथं नु पौरुषं ॥
इत्यभीरुरभिमानगौरवादामुचत्कवचमादिकेशवः ॥ ७८ ॥
शारदांबरसमद्युतिर्महावारणं हिमगिरिं हिमत्विषं ॥
अध्यतिष्ठदुरगारिकेतनो राजताद्रिमिव नीलनीरदः ॥ ७९ ॥
तं परीत्य सकलाः समंततो देवताविधृतचित्रहेतयः ॥
तस्थुरंबरतले परंतपं प्रातरर्कमिव दीप्तिसंपदः ॥ ८० ॥
उच्चचाल बलमाज्ञया ततस्तस्य केतनविचुंबितांबरं ॥
प्रत्यनीकरणतूर्यनिःस्वनैराहवार्थमिव शब्दितं तदा ॥ ८१ ॥

७१ कीर्तीलाच धन समजणारे, नानाप्रकारचीं चिलखतें ज्यांनीं अंगांत घातलीं आहेत असे व आपणास आवडणारीं भाला, तरवार वगैरे शस्त्रं धारण करणारे अनेक शूर योद्धे त्वरेनें निघालेल्या राजांच्या पुढें वीररसानें उद्धत झालेले असे होत्साते उभे राहिले. ७२ पुष्कळशा गेरूनें तांबडे दिसत असलेले हत्ती संध्येनें युक्त असलेल्या मेघाप्रमाणें दिसत असत. वधक्रिया व अवधक्रिया करणारे वीर योद्धे ज्यावर बसलेले होते असे ते हत्तीही युद्धासाठीं निघाले ७३ ज्यांनीं युद्धाचा नगारा वाजविला आहे असे प्राजपति महाराजही सर्व मंगल नांवाच्या शृंगारलेल्या हत्तीवर चढले व कवच ज्यांनीं आंगांत घातलें आहे अशा महाशूर योद्ध्यांनीं वेष्टित होऊन युद्धासाठीं तत्काळ निघाले, ७४ चिलखत घातलेल्या व ज्यांनीं आपलीं शस्त्रें वर धरलीं आहेत अशा विद्याधर योद्ध्यांनीं वेष्टिलेले, धारण केलेल्या चिलखतानें

उज्ज्वल दिसणारे ज्वलनजटी महाराज ज्यापासून मद वाहात आहे अशा सार्वभौम नांवाच्या हत्तीवर चढून युद्धासाठीं पुढें निघाले. ७५ ज्वलनजटी महाराजांचा पुत्र अर्ककीर्तिही स्वतः प्रमाणेंच दानी–दान देणारा–पक्षीं मस्तीचे पाणी ज्यापासून वाहात आहे असा उन्नत वंशामध्यें उत्पन्न झालेला, पक्षीं ज्याच्या पाठीचा कणा उंच आहे असा, ऊर्जित–वैभवशाली, शिक्षणानें निपुण, निर्भय, व उन्नतावस्थेला पोहोचलेल्या असा हत्तीवर चढून व चिलखत आंगांत घालून युद्धासाठीं निघाला. ७६ माझे हें शरीर वज्राप्रमाणें बळकट आहे यास्तव मला नेहमीं चिलखताची काय अवश्यकता आहे असा विचार करून पुरोहितानें चिलखत आणिलें असतांही निर्भय अशा विजय बलिभद्राने त्याचा स्वीकार केला नाहीं. ७७ कुंदपुष्पाप्रमाणें शुभ्र शरीराचा धारक बलभद्रानें अंजनाप्रमाणें काळ्या कांतीच्या उन्मत्त हत्तीवर अरोहण केले. त्यावेळी तो काळ्या मेघावर आरोहण केलेल्या पूर्ण चंद्राप्रमाणें फार शोभूं लागला. या सगळ्या जगाचें रक्षण करणाऱ्या माझें चिलखताकडून जर रक्षण होत असेल तर मग माझा पराक्रम तो काय ! अशा विपुल अभिमानानें निर्भय अशा आदिनारायण त्रिपृष्ट कुमारानें चिलखताचा त्याग केला.७९ज्याच्या ध्वजेवर गरुडाचें चिन्ह आहे असा, शरत्कालच्या आकाशाप्रमाणें नीलवर्णाचा आदिनारायण शुभ्रकांतीच्या हिमगिरि नांवाच्या हत्तीवर चढला. त्यावेळी चांदीच्या पर्वतावर ( विजयार्ध पर्वतावर ) चढलेल्या नील मेघाप्रमाणे तो शोभूं लागला. ८०नाना प्रकारचीं शस्त्रें धारण केलेल्या या नारायणाच्या सभोंवती सर्व देवता आकाशांत उभा राहिल्या. त्यावेळीं त्या प्रात कालीं सूर्याच्या सभोंवतीं असलेल्या त्याच्या किरण संपत्ति जशा शोभतात तशा शोभूं लागल्या. ८१ नंतर आदिनारायणाच्या आज्ञेनें आपल्या ध्वजांनीं ज्यांनीं आकाशाला स्पर्श केला आहे असें तें सैन्य युद्धासाठीं चालूं लागले. त्यावेळीं तें सर्व सैन्य शत्रूच्या वाद्यांच्या ध्वनींनीं जणु बोलावलें गेल्याप्रमाणें शोभूं लागलें.

प्रेपिता प्रतिनियाचितुं तदा विष्णुना प्रथममेव देवता ॥
प्रांजलिः प्रतिनिवृत्य तत्क्षणादित्युवाच विदितावलोकनी ॥८२॥
तेनाथ कल्पितसमस्तबलेन वेगादभ्युत्थितं बलवता हयकंधरेण ॥
अंगीकृतप्रतिभटैः खचराधिनाथैरामुक्तरत्नकवचैः सह निर्विशंकं ॥८३॥

छिन्नाः समस्ता भवतो महिम्ना प्रागेव विद्याः खचरेश्वराणां ॥
तान् लूनपक्षानिव पक्षिराजान्को वा न गृण्हाति रणे मनुष्यः ।८४।
उपकर्णमरातिसैन्यवार्तां विररामेत्यभिधाय तस्य विद्या ॥
स्वकरद्वितयेन पुष्पवृष्टिं विकिरंती शिरसि भ्रमन्मदालिं ॥ ८५ ॥

अमोघमुखमुन्नतं मुशलमद्भुतं चंद्रिकां ॥
गदां च युधि विद्विषां भयविधायिनी देवता ॥
हलेन सह बिभ्रताऽभजत भूरिदिव्यश्रियं ॥
जयाय विजयं स्वयं तमपराजितेनार्जितं ॥ ८६ ॥
आमंद्रध्वनि पांचजन्यममलं शंखं गदा कौमुदी ॥
दिव्यामोघमुखी च शक्तिरनघं शार्ङ्गं धनुर्नंदकः ॥
खड्गः कौस्तुभरत्नमंशुजटिलं यक्षाधिपे रक्षिते– ॥
रेभिः श्रीजयसंपदां पदमभूदग्रेसरैरच्युतः ॥ ८७ ॥

इत्यसगकृते श्रीवर्धमानचरिते दिव्यायुधागमनो नामाष्टमः सर्गः ।

८२ श्री त्रिपृष्ठ नारायणानें शत्रूकडील सैन्याची परिस्थिति पाहण्याकरितां प्रथमतःच अवलोकनी नांवाची प्रसिद्ध विद्या पाठविली होती. तिनें तत्क्षणात् परत येऊन हात जोडून याप्रमाणे हकीकत सांगितली. "हे नाथ, बलवान अश्वग्रीवानें मोठ्या जोरांत आपल्या सैन्याची तयारी केली आहे. व ज्यांनीं शत्रांचा स्वीकार केला आहे अर्थात् शत्रूशी दोन हात करावयास जे नेहमीं तयार असतात अशा रत्नमय चिखलताला धारण करणाऱ्या अनेक विद्याधर राजांना बरोबर घेऊन तो युद्धासाठीं तयार झाला आहे. ८४ हे प्रभो! आपल्या पुण्यप्रभावानें विद्याधर राजांच्या सर्व विद्यांचा पूर्वीच नाश होऊन चुकला आहे. ज्याचे पंख तुटले आहेत अशा पक्षिराजाप्रमाणे–गरुडाप्रमाणें त्यांची आतां स्थिति झाली आहे. यास्तव कोणता मनुष्य त्यांना रणामध्ये पकडू शकणार नाहीं बरें ? ८५ याप्रमाणें त्या अवलोकनी विद्येने त्रिपृष्ठ नारायणाच्या कानाजवळ येऊन शत्रुसैन्याची हकीकत सांगितली व जिच्या सभोंवती उन्मत्त भुंगे फिरत आहेत अशी पुष्पवृष्टि आपल्या दोन हातांनीं नारायणाच्या मस्तकावर करून ती विद्या विराम पावली. ८६ अपराजित मंत्रानें प्राप्त करून घेतलेल्या विजय बन्ध-

भद्राला जय मिळावा म्हणून ती देवता विपुल दिव्य संपत्तीला धारण करणाऱ्या हलनांवाच्या दिव्य आयुधाबरोबर उंच व आश्चर्यकारक असें अमोघमुख नांवाचें मुसल रत्न, चंद्रिका नांवाचा रत्नहार, व युद्धांत शत्रूंना भय दाखविणारी गदा यांची सेवा करूं लागली. अर्थात् मुशल, गदा, रत्नमाला व हल ही चार रत्नें त्या देवतेनें विजयबलभद्राला दिली. ८७ गंभीर ध्वनि करणारा, अतिशय निर्मल पांचजन्य नांवाचा शंख, कौमुदी नांवाची गदा, अमोघमुखी नांवाची शक्ति, शार्ङ्ग नांवाचें उत्तम धनुष्य, नंदक नांवाचा खड्ग, किरण समूहांनीं व्याप्त असें कौस्तुभ रत्न यांचें रक्षण यक्ष करीत असतात. या मुख्य दिव्य रत्नांनीं श्री त्रिपृष्ठ नारायण लक्ष्मी, जय व राज्यसंपत्ति यांचें स्थान बनला.

याप्रमाणें श्री असग कविकृत श्रीवर्धमानचरितामध्यें दिव्यायुधागमन नांवाचा आठवा परिच्छेद संपला.

# नवमः सर्गः

अथैक्षत क्ष्मारजसा परीतां चक्रीवदंगेरुहधूसरेण ॥
पताकिनीमश्वगलस्य विष्णुः स्वतेजसा तां मलिनीकृतां वा ॥१॥
गजा जगर्जुः पटहाः प्रणेदुर्बलद्वयस्यापि जिहेषुरश्वाः ॥
निवृत्य यातेत्यभिधाय भीतान्धीरान्रणायेव तदाह्वयंतः ॥ २ ॥
खुराभिघातप्रभवो हयानां पांशुर्नवांभोधरजालसांद्रः ॥
अग्रेऽभवत्तद्बलयोर्महीयान्निवारयन्युद्धमिव स्वधाम्ना ॥ ३ ॥
मौर्वीनिनादानितरेतराणां वित्रासितेभाश्वविभीतपत्तीन् ॥
आकर्ण्य हृष्टांगरुहैर्विदंध्रे योधैः परो वीररसानुरागः ॥ ४ ॥
पत्तिं पदातिस्तुरगं तुरंगो रथं रथस्थो द्विरदं मदेभः
अवाप कोपेन विनापि हन्तुं सेवामतो नेच्छति पापभीरुः ॥ ५ ॥
रजोवितानैर्नवकाशशुभ्रैः शुभ्रीकृताः श्मश्रुशिरोरुहेषु ॥
मृत्योरिदं योग्यमितीव मत्वा वृद्धत्वमीयुर्युधिनो युवानः ॥ ६ ॥
धनुर्विमुक्ता निशिताः पृषत्का दूरस्थितानामपि वर्मितेषु ॥
अंगेषु तस्थुर्न महीतले वा गुणच्युतः को लभते प्रतिष्ठाम् ॥ ७ ॥
अन्योन्यमाहूय विनापि वैरं भटा भटाञ्जघ्नुरुदारसत्वाः ॥
स्वामिप्रसादस्य विनिःक्रयाय प्राणव्ययं वांछति को न धीरः ॥८॥
अनंतरंगः स्वनृपस्य कश्चिद्ददाह चित्तं निजवल्लभानां ॥
अग्रेसरत्वं प्रतिपद्य धावन्नरातिशस्त्रैरवदारितोऽपि ॥ ९ ॥

१ या नंतर गाढवाच्या केसाप्रमाणें मळकट असलेल्या जमीनीच्या धुराळ्यानें व्याप्त झालेली अश्वग्रीव चक्रवर्तीची सेना जणु स्वतःच्या तेजानें ती मलिन झाली आहे अशी त्रिपृष्ठ नारायणानें पाहिली. २युद्धाच्या प्रारंभी दोन्ही बाजूंच्या सैन्याचे हत्ती गर्जना करूं लागले. नगारे वाजूं लागले, घोडे खिकाळूं लागले: जणु काय ते भ्याड लोकांना 'तुम्ही आतां येथून परतून जा' व शूर लोकांना 'तुम्ही युद्धासाठीं या' असें सांगत होते! ३ पावसाळ्यांतील मेघसमूहाप्रमाणें दाट, घोड्यांच्या टापांच्या आघातापासून उत्पन्न झालेला मोठा धुळीचा लोट आपल्या सामर्थ्यानें दोन्ही सैन्याचे होणारें युद्ध बंद करण्याकरितां जणु त्यांच्या पुढें झाला. ४ हत्ती, घोडे व पायदळ यांना भय उत्पन्न करणारा एकमेकांच्या धनुष्याच्या दोरीचा टंकार ऐकून योद्धयांचीं अंगे आनंदानें स्फुरण पाऊन त्यांवर रोमांच उभे राहिले व त्यांनीं या चिन्हानें आपली वीररसावर उत्कट प्रीति धारण केली. अर्थात् व्यक्त केली.

५ पायदळ-पायदळाला, घोडे-घोड्याला, अर्थात घोडेस्वार-घोडेस्वाराला रथी-रथीला व उन्मत्त हत्ती उन्मत्त हत्तीला क्रोध न येतांही एकमेकांना ठार मारण्यासाठीं जाऊन भिडले. म्हणूनच पापापासून भिणारे लोक नोकरीची इच्छा करीत नसतात.कारण मालकाच्या आज्ञेमुळें नोकरांना चांगली व वाईट सर्व प्रकारची कार्यें करावीं लागतात. ६ नवीन काश पुष्पाप्रमाणें पांढऱ्या धुळीच्या समुदायानें वीर पुरुषांची दाढी, मिशा व डोक्यावरचे केस हे सर्व पांढरे दिसूं लागलें. मरणाला हीच अवस्था योग्य आहे असें जाणून त्या वीर पुरुषांनीं जणु वृद्धावस्था धारण केली होती! ७. धनुष्यापासून सुटलेले तीक्ष्ण बाण दूर असलेल्या वीर पुरुषांच्या चिलखतानें युक्त असलेल्या अवयवांवर घुसून बसले नाहीत व जमिनीवरही रुतून बसले नाहीत अर्थात ते पडले. बरोबरच आहे कीं जो गुणच्युत झाला म्हणजे सम्यग्ज्ञानादि गुणरहित झाला त्याची प्रतिष्ठा-आदर सत्कार कसा होणार? याच प्रमाणे गुणच्युत-धनुष्याच्या दोरीपासून सुटलेला बाणही स्थिर कसा राहूं शकेल ?

८. अतिशय पराक्रमी वीर पुरुष वैर नसतांही एकमेकांना बोलाऊन युद्धांत ठार मारूं लागले. बरोबरच आहे कीं,आपल्या मालकानें आपल्यावर खुश व्हावें म्हणून कोणता धीर मनुष्य आपल्या प्राणांचा व्यय करणें इच्छीत नाही बरें? ९. ज्याच्यावरून राजाची मर्जी उतरली आहे असा कोणी एक वीर शत्रूंनी शस्त्रांनी ज्याचा देह विदीर्ण केला आहे असा होऊनही आपल्या आवडत्या माणसांचा पुढारी बनून शत्रूवर लढण्यासाठीं धावला. त्यामुळे त्याच्या प्रिय माणसांचें चित्त फार दु.खी झालें.

छिन्नोऽपि जंघाद्वितये परेण खड्गप्रहारैर्न पपात शूरः ॥
अखंडितं चापमिवात्मसत्वमालम्ब्य तस्थौ घनवंशजातम् ॥ १० ॥
आकर्णमाकृष्य धनुर्निशातो योधेन बाणो घनमुष्टिमुक्तः ॥
विभिद्य वर्मापि भटं जघान न साधयेत्किं खलु सुप्रयुक्तः ॥ ११ ॥
यावन्निषादी मदवारणस्य दंतच्छदं नाक्षिपति क्षणेन ॥
तावत्पृषत्कैः प्रभिदंति योधास्तमेकपातैर्नितरामसीव्यन् ॥ १२ ॥
मदानिलाय प्रतिसामजस्य क्रुध्यत्करेण स्वयमेव नागः ॥
अपास्य वक्त्रावरणं प्रयातः प्रोलंघ्य यंतारमपि प्रचंडः ॥ १३ ॥
* कुंभेषु मग्नैर्निजबर्हवर्ज्यैर्विरेजिरे शंकुचयैरिभेंद्राः ॥
आरावहीनैः शिखिनां समूहैरारूढकूटा इव गंडशैलाः ॥ १४ ॥
श्वेतातपत्राणि नरेश्वराणां नामाक्षरांकैर्विशिखैरनेकैः ॥
योधप्रधाना लुलुवुः परे स्वं शिक्षाविशेषं युधि दर्शयन्तः ॥ १५ ॥
धृत्वा चिरं युद्धधुरां मृतानां तेजस्विनां क्षत्रियपुंगवानां ॥
अश्रावयन्नामकुलं च नग्ना व्यावृत्य शूरैरवलोकितानां ॥ १६ ॥
खड्गप्रहारैर्दलितादिभानां कुंभस्थलादुच्छलितैः समन्तात् ॥
मुक्ताफलौघैर्निचिता दिवापि तारांकितेवाभवदम्बरश्रीः ॥ १७ ॥
समीपगैरप्यविभाव्यमानसंधानमोक्षातिशया विरेजुः ॥
आलेख्ययोधा इव योधमुख्याः सदावकृष्टोन्नतचारुचापाः ॥ १८ ॥

१० एका शूर पुरुषाच्या दोन्ही पिंडऱ्या शत्रूनें कापून टाकिल्या तरी तो खालीं पडला नाहीं. तो घनवंशजात—उत्तम वंशांत उत्पन्न झालेलें आपल्या अखंडित धैर्याचा उत्तम वेळू पासून जन्मलेल्या व न तुटलेल्या अशा धनुष्याप्रमाणें आश्रय घेऊन तसाच उभा राहिला. ११ धनुष्य कानापर्यंत ओढून योद्ध्यानें आपल्या दृढ

---

* टिप्पणीः— भल्लैः प्रतिद्विरदमल्लधनुर्विमुक्तैः कुंभेषु मग्नशिखरैर्व्यलसन्गजेंद्राः ॥
आरावहीनवदनैः शिखिना समूहैरारूढतुंगशिखरा इव शैलवर्गाः ॥२९॥
जीवंधरचम्पवा दशमा लेबं । हा श्लोक समानार्थक आहे.

मुठीपासून सोडलेल्या बाणांनीं शत्रूचें चिलखत तोडून त्याला ठार मारलें. बरोबरच आहे कीं, जी गोष्ट आपण काळजी पुरःसर करितो ती कोणतें कार्य सिद्ध करून देत नाहीं बरें ? १२ एक महात आपल्या हत्तीच्या तोंडाला शत्रूंचे बाण लागूं नयेत म्हणून त्याच्यावर अच्छादन घालीत आहे तोंच योद्ध्यांनीं बाण फेंकून ते तोडून टाकिलें व त्यालाही एक सारखें बाण फेंकून अगदीं खिळून टाकिलें.

१३. शत्रूपक्षाकडील उन्मत्त हत्तीच्या मदाच्या वाऱ्यानें ज्याचें मन क्षुब्ध झालें आहे अशा एका हत्तीनें आपल्या सोंडेनें स्वतःच आपल्या तोंडा-वरचें अच्छादन काढून फेंकून दिलें व महाताला ही न जुमानतां क्रुद्ध होऊन तो धांवत सुटला. १४. गंडस्थळांत बुडालेल्या व ज्यांच्या मागें पिसें नाहींत अशा बाणांनीं मोठे हत्ती ज्यांच्या अग्रभागावर शब्द न करणारे मयूरसमूह चढलेले आहेत अशा पर्वताच्या लहान टेकड्याप्रमाणें शोभूं लागले. १५ युद्धांत आपलें विशिष्ट चातुर्य दाखवून शत्रुपक्षीय मुख्य योद्ध्यांनीं आपल्या नांवाचीं अक्षरें ज्यावर खोदलेलीं आहेत अशा बाणांनीं राजे लोकांचीं पांढरीं छत्रें तोडून टाकिलीं.

१६ युद्धाची जबाबदारी पुष्कळ वेळपर्यंत धारण करून जे लढले अशा क्षत्रियामध्यें श्रेष्ठ असलेल्या तेजस्वी पुरुषांना ते मरत असतां शूर पुरुषांनीं वळून पाहिलें. अर्थात् अशा पुरुषांविषयीं शूर शत्रूच्या मनांतही आदर उत्पन्न झाला. व भाट लोकांनीही त्यांच्या नांवाचें व वंशांचें वर्णन सर्वांना ऐकविलें.

१७ तरवारीच्या प्रहारांनीं फुटलेल्या हत्तींच्या गंडस्थळातून चोंहीकडे वर उडालेल्या मोत्यांच्या समुदायानें दिवसा देखिल आकाश नक्षत्रांनीं युक्त असल्याप्रमाणें शोभूं लागलें. १८ जेव्हां मुख्य मुख्य योद्धे लढूं लागले तेव्हां ते धनुष्याला बाण केव्हां जोडतात व केव्हां सोडतात हें जवळ असलेल्या लोकांना देखिल समजेनासें झालें. त्यामुळें ताणलें आहे उंच व सुंदर धनुष्य ज्यांनीं असे ते शूर पुरुष नेहमीं चित्रांत काढलेल्या योद्ध्याप्रमाणे दिसूं लागले व शोभूं लागले.

छिन्नेऽपि हस्ते सुभटासिघातैर्विहस्ततामाप तथा न दंती ॥
अदंतचेष्टान्निजदंतयुग्मे गमे यथा शत्रुगजं जिघांसुः ॥ १९ ॥
कुंदावदातस्तुरगोऽश्ववारे प्रासप्रहारैः पतितेऽपि तिष्ठन् ॥
तदंतिके तस्य पराक्रमेण पुंजीकृतो वर्ण इव व्यराजत् ॥ २० ॥
मर्मप्रहाराकुलितोऽपि कश्चित्प्राणान्दधौ तावदनूनसत्वः ॥
शक्नोषि किं प्राणितुमार्द्रभावाद्यावन्न वाणीमिति वक्ति नाथः ॥२१॥

छिन्नं च चक्रेण शिरः करेण वामेन संधार्य रुषा परीतः ॥
स्वसंमुखं कश्चिदरिं जघान कोपो हि शौर्यस्य परः सहायः ॥२२॥
परेण भल्लेन विलूगनव्यां धनुर्लतां स्वाभिमतां हि कश्चित् ॥
मुमोच जायामिव चारुवंशां कृताभियोगां विगुणो हि हेय ॥२३॥
घनास्रपंकेषु निमग्नचक्रान्रथांस्तुरंगाः शरदारितांगाः ॥
ऊहुः कथंचिद्‌द्विगुणीकृतांघ्रिप्रेंरवद्दला घुर्घुरशब्दघोणाः ॥ २४ ॥
गृद्ध्रो भुजं कस्य चिदाजिरंगादामूललूनं गगने गृहीत्वा ॥
कृतावदानस्य जयध्वजं वा वीरस्य बभ्राम समंततोऽपि ॥२५॥
वामांघ्रिमादाय करेण गाढमाक्रम्य पादेन च दक्षिणांघ्रिं ॥
विपाटयामास भटं मदेभः क्रुद्धः पुरस्थं सहसा निपात्य ॥ २६ ॥
* आदाय हस्तेन भटो गजेन क्षिप्तोऽपि खे खेलरुचिः कृपाण्या ॥
तत्कुंभपीठं प्रहरन्विरेजे ततःपतन्संभ्रमहीनचित्तः ॥२७॥

१९ शत्रूच्या हत्तीला ठार मारण्याची इच्छा करणारा एक हत्ती वीर पुरुषाच्या तरवारीच्या प्रहारानें आपली सोंड तुटली असतांही खिन्न झाला नाहीं पण आपले दोनही दांत तुटून गेल्यामुळें दांतांनीं ठार मारण्याचें कामच बंद पडलें म्हणून अगदीं खिन्न झाला. २० एक घोडेस्वार बर्चीच्या प्रहारांनीं खालीं पडला असतांही त्याचा कुंदपुष्पाप्रमाणें पांढरा असलेला घोडा त्याच्या जवळून हालला नाहीं. तो घोडा त्यावेळीं घोडेस्वाराच्या पराक्रमानें एकत्र केलेल्या त्याच्या कीर्तीप्रमाणे शोभू लागला। २१ मर्मस्थळीं लागलेल्या प्रहारानें व्याकुळ होऊन ही एका अतिशय शूर योद्ध्यानें त्याच्या मालकानें दयाळू होऊन ‘ अरे वीरा ! तूं अद्यापि जगण्यास समर्थ आहेस काय ? असें जोपर्यंत म्हटलें नाहीं तोपर्यंत प्राण धारण केलें. २२ शत्रूनें कापलेलें डोकें आपल्या डाव्या हातानें धरून रागानें लालबुंद झालेल्या कोणी एका योद्ध्यानें आपल्या समोर असलेल्या शत्रूला ठार मारलें. त्रो-

---

* टिप्पणीः-- कश्चिद्गजः प्रतिभटं चरणे गृहीत्वा सम्भ्रामयन्दिवि रुषा परुषप्रचारः ॥
चिक्षेप दूरतरमूर्ध्वमयं च मानी प्रागेत्य कुम्भयुगलीमसिना बिभेद ॥४९॥
जीवंधरचंप्वा दशमो लबः। समानार्थक श्लोक.

मुठीपासून सोडलेल्या बाणांनीं शत्रूचें चिलखत तोडून त्याला ठार मारलें. बरोबरच आहे कीं, जी गोष्ट आपण काळजी पुरःसर करितो ती कोणतें कार्य सिद्ध करून देत नाहीं बरे ? १२ एक महात आपल्या हत्तीच्या तोंडाला शत्रूंचे बाण लागूं नयेत म्हणून त्याच्यावर अच्छादन घालीत आहे तोंच योद्ध्यांनीं बाण फेकून तें तोडून टाकिलें व त्यालाही एक सारखे बाण फेंकून अगदीं खिळून टाकिलें.

१३. शत्रूपक्षाकडील उन्मत्त हत्तीच्या मदाच्या वाऱ्यानें ज्याचें मन क्षुब्ध झालें आहे अशा एका हत्तीनें आपल्या सोंडेनें स्वतःच आपल्या तोंडावरचें अच्छादन काढून फेकून दिलें व महातालाही न जुमानतां क्रुद्ध होऊन तो धांवत सुटला. १४. गंडस्थळांत बुडालेल्या व ज्यांच्या मागें पिसे नाहींत अशा बाणांनीं मोठे हत्ती ज्यांच्या अग्रभागावर शद्ध न करणारे मयूरसमूह चढलेले आहेत अशा पर्वताच्या लहान टेकड्याप्रमाणें शोभूं लागले. १५ युद्धांत आपलें विशिष्ट चातुर्य दाखवून शत्रुपक्षीय मुख्य योद्ध्यांनीं आपल्या नांवाचीं अक्षरें ज्यावर खोदलेलीं आहेत अशा बाणांनीं राजे लोकांचीं पांढरीं छत्रें तोडून टाकिलीं.

१६ युद्धाची जबाबदारी पुष्कळ वेळपर्यंत धारण करून जे लढले अशा क्षत्रियामध्ये श्रेष्ठ असलेल्या तेजस्वी पुरुषांना ते मरत असतां शूर पुरुषांनीं वळून पाहिलें. अर्थात् अशा पुरुषांविषयी शूर शत्रूच्या मनांतही आदर उत्पन्न झाला. व भाट लोकांनीही त्यांच्या नांवाचें व वंशांचें वर्णन सर्वांना ऐकविलें.

१७ तरवारीच्या प्रहारांनी फुटलेल्या हत्तींच्या गंडस्थळांतून चोंहीकडे वर उडालेल्या मोत्यांच्या समुदायानें दिवसा देखिल आकाश नक्षत्रांनी युक्त असल्याप्रमाणें शोभूं लागलें. १८ जेव्हां मुख्य मुख्य योद्धे लढूं लागले तेव्हां ते धनुष्याला बाण केव्हां जोडतात व केव्हां सोडतात हें जवळ असलेल्या लोकांना देखिल समजेनासे झाले. त्यामुळें ताणले आहे उंच व सुंदर धनुष्य ज्यांनीं असे ते शूर पुरुष नेहमी चित्रांत काढलेल्या योद्ध्याप्रमाणे दिसूं लागले व शोभूं लागले.

छिन्नेऽपि हस्ते सुभटासिघातैर्विहस्ततामाप तथा न दंती ॥
अदंतचेष्टान्निजदंतयुग्मे अग्रे यथा शत्रुगजं जिघांसुः ॥ १९ ॥
कुंदावदातस्तुरगोऽश्ववारे प्रासप्रहारैः पतितेऽपि तिष्ठन् ॥
तदंतिके तस्य पराक्रमेण पुंजीकृतो वर्ण इव व्यराजत् ॥ २० ॥
मर्मप्रहाराकुलितोऽपि कश्चित्प्राणान्दधौ तावदनूनसत्वः ॥
शक्नोषि किं प्राणितुमार्द्रभावाद्यावन्न वाणीमिति वक्ति नाथः ॥२१॥

छिन्नं च चक्रेण शिरः करेण वामेन संधार्य रुषा परीतः ॥
स्वसंमुखं कश्चिदरिं जघान कोपो हि शौर्यस्य परः सहायः ॥२२॥
परेण भल्लेन विलूगनव्यां धनुर्लतां स्वाभिमतां हि कश्चित् ॥
मुमोच जायामिव चारुवंशां कृताभियोगां विगुणो हि हेय ॥२३॥
घनास्रपंकेषु निमग्नचक्रान्रथांस्तुरंगाः शरदारितांगाः ॥
ऊहुः कथंचिद्द्विगुणीकृतांघ्रिप्रेरवद्धला घुर्घुरशब्दघोणाः ॥ २४ ॥
गृध्रो भुजं कस्य चिदाजिरंगादामूललूनं गगने गृहीत्वा ॥
कृतावदानस्य जयध्वजं वा वीरस्य बभ्राम समंततोऽपि ॥२५॥
वामांघ्रिमादाय करेण गाढमाक्रम्य पादेन च दक्षिणांघ्रिं ॥
विपाटयामास भटं मदेभः क्रुद्धः पुरस्स्थं सहसा निपात्य ॥ २६ ॥
* आदाय हस्तेन भटो गजेन क्षिप्तोऽपि खे खेलरुचिः कृपाण्या ॥
तत्कुंभपीठं प्रहरन्विरेजे ततःपतन्संभ्रमहीनचित्तः ॥२७॥

१९ शत्रूच्या हत्तीला ठार मारण्याची इच्छा करणारा एक हत्ती वीर पुरुषाच्या तरवारीच्या प्रहारानें आपली सोंड तुटली असतांही खिन्न झाला नाहीं पण आपले दोनही दांत तुटून गेल्यामुळें दांतांनीं ठार मारण्याचें कामच बंद पडलें म्हणून अगदीं खिन्न झाला. २० एक घोडेस्वार बर्चीच्या प्रहारांनीं खालीं पडला असतांही त्याचा कुंदपुष्पाप्रमाणें पांढरा असलेला घोडा त्याच्या जवळून हालला नाहीं. तो घोडा त्यावेळीं घोडेस्वाराच्या पराक्रमानें एकत्र केलेल्या त्याच्या कीर्तीप्रमाणें शोभू लागला। २१ मर्मस्थळीं लागलेल्या प्रहारानें व्याकुळ होऊन ही एका अतिशय शूर योद्ध्यानें त्याच्या मालकानें दयाळू होऊन ' अरे वीरा ! तूं अद्यापि जगण्यास समर्थ आहेस काय ? असें जोपर्यंत म्हटलें नाहीं तोपर्यंत प्राण धारण केलें. २२ शत्रूनें कापलेलें डोकें आपल्या डाव्या हातानें धरून रागानें लालबुंद झालेल्या कोणी एका योद्ध्यानें आपल्या समोर असलेल्या शत्रूला ठार मारलें. बरो-

---

* टिप्पणीः-- कश्चिद्गजः प्रतिभटं चरणे गृहीत्वा सम्भ्रामयन्दिवि रुषा परुषप्रचारः ॥
चिक्षेप दूरतरमूर्ध्वमयं च मानी द्रागेत्य कुम्भयुगलीमसिना बिभेद ॥४९॥
जीवंधरचंपू दशमो लंबः। समानार्थक श्लोक.

बरच आहे कीं, क्रोध हाच पराक्रमाला मुख्य मदत करीत असतो. २३ जसें एखादा मनुष्य चारुवंशा–उत्तम वंशामध्यें जन्मलेली परंतु परपुरुषाशी जिचा संयोग झाला आहे अशा स्त्रीचा त्याग करितो तसें एका योद्ध्यानें शत्रूनें जिची दोरी भाल्यानें तोडून टाकली आहे अशी धनुर्लता स्वतःला प्रिय व चारुवंशा–उत्तम वेळूपासून बनलेली असतांही टाकून दिली. बरोबरच आहे कीं, दुर्गुणी मनुष्य जसा त्यागण्या योग्य असतो तसें विगुण-दोरीनें राहित धनुष्य टाकणेंच योग्य होय. २४ ज्यांचें शरीर बाणांनीं जखमी झालें आहे. ज्यांच्या पायांतली शक्ति नष्ट झाल्यामुळें लटपटणारे व ज्यांची मान थरथर कांपत असून ज्यांच्या नाकांतून घुरघुर शब्द एकसारखा होत आहे अशा घोड्यांनीं ज्यांचीं चाकें रक्ताच्या दाट चिखलांत रुतलीं आहेत असे रथ त्यांतून मोठ्या कष्टानें ओढून नेले. २५ युद्धभूमीमध्यें एका वीराचा हात मुळापासून तुटून पडलेला होता. तो घेऊन एक गिधाड आकाशांत चोहींकडे फिरूं लागलें. त्यावेळीं मर्दुमकीचें काम करणाऱ्या समोर असलेल्या योद्ध्याला खालीं पाडून त्याची जयपताका घेऊन जणु तें सर्वत्र फिरू लागलें आहे असें दिसत होतें! २६ एका उन्मत्त व रागावलेल्या हत्तीनें एका वीराचा डावा पाय आपल्या सोंडेने मजबूत धरून व उजवा पाय आपल्या पायाखालीं दाबून ठेऊन त्याला खालीं पाडून फाडून टाकिलें.

२७ एका हत्तीनें आपल्या सोंडेनें एका शूर पुरुषाला आकाशांत फेंकून दिलें असतां क्रीडेमध्यें प्रेम असलेला तो शूर आकाशांतून खालीं पडतांना बिलकुल घाबरला नाहीं. उलट तो हत्तीच्या गंडस्थळावर पडून तेथें तरवारीनें प्रहार करूं लागल्यामुळें जास्ती शोभूं लागला.

विवृत्तहस्तोज्झितशीकरौघैरिभा निरासुः शरदारितानां ॥
आधोरणानां व्रणमोहखेदं को निर्दयः संश्रयिणां विपत्तौ ॥२८॥
योधा विरेजुः शरपूरितांगाः सुनिश्चलानामुपरि द्विपानां ॥
तापेन विश्लेषितपत्रशोभास्त्वक्सारगुल्मा इव पर्वताग्रे ॥ २९ ॥
आमूललूनायतहस्तदेशाच्श्च्योतत्कदुष्णास्रमहाप्रवाहः ॥
रेजे गजस्तुंग इवांजनाद्रिः सानोः पतद्गैरिकनिर्झरांकः ॥ ३० ॥
मूर्च्छामपास्य व्रणदुःखजातां हंतुं प्रवृत्ताः पुनरप्यरातीन् ॥
महाभटास्ताञ्जगृहुः कथंचित्तत्संग्रहं को न करोति धीरः ॥ ३१ ॥

निरीक्ष्य शूरं व्रणविव्हलांगं तेजस्विनं हन्तुमपीहमानं ॥
जघान कश्चित्कृपया न साधुर्न दुःखितं हन्ति महानुभावः ॥३२॥
गूढप्रहाराकुलितो मुखेन कश्चिद्वमन्संततमस्त्रधारां ॥
मध्येरणं शिक्षितमिंद्रजालं नराधिपानां प्रथयान्निवासीत् ॥ ३३ ॥
उरःस्थले कस्य चिदप्यसह्या शक्तिः पतंती न जहार शक्तिं ॥
मनस्विनामाहवलालसानां तन्नास्ति यद्दर्पविनाशहेतुः ॥ ३४ ॥
इंदीवरश्यामरुचिः पतंती दंतोज्ज्वला चारुपयोधरोरूः ॥
वक्षस्यहो खड्गलता चकार प्रियेव धीरं सुखमीलिताक्षं ॥ ३५ ॥
अरातिना प्रत्युरसं विभिन्नः कुंतेन कश्चित्तदनु प्रधावन् ॥
ददंश तं दुःसहमग्रकण्ठे वंशानुगः क्रुद्ध इव द्विजिव्हः ॥ ३६ ॥

२८ ज्यांचे अवयव बाणांनीं जखमी झाले आहेत असे महात जखमांच्या वेदनेनें मूर्छित झाले असतां वर केलेल्या सोंडपासून सोडलेल्या बारीक जलबिंदु संमूहांनीं हत्तींनीं त्यांचा खेद दूर केला. बरोबरच आहे कीं, विपत्तीच्या वेळीं आश्रयाला आलेल्या विषयीं कोणाचें अंतःकरण निर्दयी बनेल बरें ? २९ जसें उन्हाळ्यांत ज्यांचीं पानें गळून गेलीं आहेत अशीं बांबूंचीं बेटें पर्वतांच्या शिखरावर जशीं शोभतात तसे ज्यांचे सर्व शरीर बाणांनीं भरून गेले आहे असे योद्धे निश्चल अशा हत्तींच्या वर शोभू लागले! ३० लांब सोंड मूळभागापासून तुटून पडल्यामुळें ज्याच्या देहांतून कोमट रक्ताचा महाप्रवाह वाहू लागला आहे असा एक उंच हत्ती ज्याच्या शिखरावरून कावेचा झरा खालीं पडत आहे अशा अंजन पर्वताप्रमाणें शोभू लागला! ३१ जखमेच्या वेदनांनीं आलेली मूर्च्छा दूर सारून कित्येक महायोद्धे पुनः शत्रूंना मारण्यासाठीं प्रवृत्त झाले. तें पाहून त्यांना कित्येकांनीं मोठ्या कष्टानें आवरून धरिलें. बरोबर आहे कीं अशा कार्यासाठीं प्राण देणाऱ्या मनुष्यांचा कोण बरें संग्रह करीत नाहीं ? ३२ जखमांनीं ज्याचें सर्व अंग भरलें आहे असा कोणी एक शूर तेजस्वी मनुष्य आपल्या शत्रूला मारण्याच्या विचारांत होता. परंतु शत्रूनें हें जाणून देखिल दयार्द्रभावानें त्याला मारिलें नाहीं. बरोबरच आहे कीं, जे महापुरुष असतात ते दुःखितांचा नाश करीत नसतात. ३३ गुप्त मारानें व्याकुळ होऊन कोणी एक वीर पुरुष

तोंडानें एक सारखी रक्ताची धारा ओकूं लागला. तेव्हा तो स्वतः शिकलेली इंद्रजाल विद्या जणु युद्धभूमीमध्यें सर्व राजा समक्ष प्रगट करीत आहे असा भासू लागला! ३४ एका वीराच्या छातीवर शक्ति नांवाच्या शस्त्राचा मोठा असह्य आघात झाला. तथापि ती शक्ती त्याच्या शर्क्तीचा नाश करूं शकली नाहीं. बरोबरच आहे कीं, युद्धाविषयीं ज्यांच्या मनांत अदम्य उत्साह असतो अशा तेजस्वी वीरांचा गर्व नाश करण्यास या जगांत कोणताही पदार्थ समर्थ नाहीं. ३५ नील कमलाप्रमाणें जिच्या देहाची कांति आहे, जिचें दांत अतिशय निर्मल आहेत व जिचे स्तन आणि मांड्या सुंदर आहेत अशी स्त्री आपल्या पतीच्या छातीवर पडून त्याला जशी सुखानें डोळे मिटावयास लाविते त्याप्रमाणे निळ्या कमलाप्रमाणे निळसर कांतीची,हस्तिदंताच्या मुठीची,सुंदर पाण्याला—तेजस्वी पणाला धारण करणारी मोठी खड्गलता—तरवार शत्रूच्या छातीवर पडून तिनें त्याला सुखानें डोळे मिटावयास लाविलें अर्थात् तिनें त्याला ठार मारिलें. एका शत्रूनें एका वीर पुरुषाचें वक्षःस्थल आपल्या भाल्यानें विदीर्ण केलें तेव्हां जसा रागावलेला सर्प आपल्या पूर्वजांचें अनुसरण करून दंश करितो तसें शत्रूच्या पाठीमागें लागलेल्या त्या वीरानें क्रुद्ध होऊन आपल्या वंशाचें अनुसरण करून त्याचा गळा पकडून अतिशय तीव्र असा चावा घेतला. अर्थात् त्याने त्याचें नरडें फोडलें !

परेण सद्यो निजकौशलेन हस्तीकृता संयति खड्गधेनुः ॥
मृत्योरभूत्कारणमात्मभर्तुर्दुष्टेव वेश्या धनमुष्टिशाह्या ॥ ३७ ॥
पपात कश्चिद्विवशो न बाणैरयोमयैः कीलितरागबंधः ॥
तुरंगमादुत्पततोऽपि सादी दौस्थ्यं न हि स्थेमपरिष्कृतानां ॥३८॥
* छिन्नो परो दक्षिणबाहुदंडे धृत्वा परेणासिलतां करेण ॥
जघान शत्रुं प्रहरंतमग्रे विपत्सु वामोऽप्युपयोगमेति ॥ ३९ ॥
शरक्षतांगोऽपि तुरंगवर्यो जवं न पूर्वं विजहौ न शिक्षां ॥

---

* टिप्पणीः— छिन्नेपि दक्षिणभुजे करवालवल्लीं वामे करे विचलयन्रिपुमाससादी॥
वीरस्य तस्य रिपुखंडन केलिकायामक्षीणशक्तिरगमत्साहि दक्षिणत्वं ॥९९॥
जीवंधरचम्पवा दशमो लंब. समानार्थक श्लोक ।

नैवाश्ववारस्य विधेयतां च समो हि जात्यो विधुरे सुखे वा ।४०।
कंठे निबद्धारुणचामरौघः शून्यासनः सम्मुखमाशु धावन् ॥
विभ्रंशयन्दन्तिघटां न नाम्ना हरिस्तदासीक्रिययापि वाजी ॥४१॥
इतस्ततोऽधावत लोहबाणैर्विदारितांगोऽपि हयो जवेन ॥
निजाधिनाथस्य मृतस्य सद्यः प्रकाशयन्शौर्यमिवाजिरंगे ॥ ४२ ॥
अरातिना मूर्धनि मुद्गरेण प्रताडितो लोहमयेन कश्चित् ॥
मुमोच भूमौ विवशोऽपि नांगमहार्यधैर्यप्रसरो हि धीरः ॥ ४३ ॥
अभेद्यमप्यावरणं विभिद्य प्राणान्भटस्याशु जहार बाणः ॥
फलेन शातेन विवर्जितोऽपि पूर्णे दिने को न हिनस्ति सत्वान् ४४
रक्षन् शरेभ्यः पतिमात्मगात्रैः कश्चित्समंतादसमानसत्वः ॥
भस्मीचकारात्मतनुं क्षणेन सुनिश्चितः किं न करोति शूरः ॥ ४५॥

३७ पूर्वीच्या मालकानें लहानशी तरवार मुठींत आवळून न धरल्यामुळें तत्काल ती शत्रूनें स्वतःच्या चातुर्यानें आपल्या हस्तगत करून घेतली. त्यामुळें ती पहिल्या मालकाच्या मुठींत ज राहिल्यामुळें दुसऱ्याच्या स्वाधीन झालेली दुष्ट वेश्या जशी आपल्या पहिल्या मालकाच्या मृत्युला कारण होते तशी युद्धामध्यें पहिल्या वीराच्या नाशाला कारण झाली ३८ कोणी एक घोडेस्वार घोड्यावर सर्पासनानें मजबूत बसला होता. लोखंडाच्या बाणांचा शत्रूकडून वर्षाव होत असतांही व घोडा उड्या मारीत असतांनाही घाबरून तो त्यावरून पडला नाहीं. बरोबरच आहे कीं, जे दृढतेनें युक्त असतात त्यांच्या ठिकाणीं घाबरेपणा कसा असू शकेल बरें ! ३९ एका वीराचा उजवा हात कापला गेला तरी त्यानें आपल्या दुसऱ्या हातांत–डाव्या हातांत तरवार धारण केली व प्रहार करीत असलेल्या शत्रूला ठार मारिले. विपत्तीच्या वेळी डावा हातही उपयोगी पडतो अथवा प्रतिकूल माणसेंहि विपत्तीच्या वेळीं अनुकूल होतातच. ४० एक श्रेष्ठ घोडा बाणांनीं जखमी झाला होता तरीही त्यानें आपला पूर्वीचा वेग व आपलें शिक्षण सोडलें नाहीं व तो आपल्या घोडेस्वराच्या ताब्यांत पूर्वीप्रमाणेंच राहिला. बरोबर आहे की, उत्तम जातीचे प्राणी सुखाच्या व दुःखाच्या प्रसंगी समानच असतात. विकार पावत नाहींत. ४१ ज्याच्या गळ्यांत लाल रंगाच्या पुष्कळ चवऱ्या बांधलेल्या आहेत व घोडेस्वरानें जो रहित झाला आहे असा एक घोडा मोठ्या वेगानें समोर धावत गेला व त्यानें हत्तीच्या समुदायाला ही

घोडेकडे पळविलें. त्यावेळीं नांवानेच हरि असलेला तो घोडा आपल्या कर्तव्यानें ही हरि झाला. तात्पर्यः— हरि शब्दाचे सिंह व घोडा असे दोन अर्थ आहेत. या घोड्याच्या गळ्यांत लाल चामर बांधले असल्यामुळें व मोठ्या वेगानें हा धावत सुटला होता म्हणून त्याला पाहून हत्तींना हा सिंह आहे अशी भ्रांति उत्पन्न झाली व ते पळत सुटले.यामुळें घोड्याला कोशांत हरि असें नांव आहे ते अन्वर्थक झालें. ४२ लोखंडाच्या बाणांनीं ज्याचे अवयव विदीर्ण झाले आहेत असाही एक घोडा मोठ्या वेगानें इकडून तिकडे धाऊं लागला. जणू नुकतेंच मरून पडलेल्या मालकाचा शूरपणा प्रगट करण्याकरितांच तो युद्धभूमीमध्यें पळत होता ! ४३ शत्रूने लोखंडाच्या मुद्गराने ज्याच्या मस्तकावर आघात केला आहे अशा एका वीरानें दुःखी होऊनही आपलें अंग जमीनीवर टाकिलें नाहीं. बरोबरच आहे की, धीर पुरुषाचें धैर्य कोणाकडूनही हरण केलें जात नाहीं. किंवा त्याचें धैर्य कृत्रिम नसतें. तें स्वाभाविकच असतें. ४४ तीक्ष्ण अग्राने रहित अशा ही बाणानें एका वीराच्या अभेद्य चिलखताला तोडून त्याचे तत्काल प्राण घेतले. बरोबरच आहे की, ज्याचे आयुष्याचे दिवस भरले आहेत अशा प्राण्यास कोण मारूं शकत नाहीं बरें?

कुलाभिमानं विपुलां च लज्जां स्वामिप्रसादं निजपौरुषं च ॥
मत्वा व्रणैराञ्चितमूर्तयोऽपि निपेतुरन्योन्यमवेक्ष्य शूराः ॥ ४६ ॥
दंतैश्च गात्रैः करिणां करैश्च छिन्नैरनेकैः पतितैर्ध्वजैश्च ॥
रथैश्च भग्नाक्षधुरैर्निकीर्णं बभूव दुर्गं समराजिरं तत् ॥ ४७ ॥
प्रपीय रक्तासवमाशु मत्ता नरांत्रमालाकुलकंठदेशाः ॥
परं कबंधैः सह यातुधानाःशवान्वहंतो ननृतुर्यथेष्टम् ॥ ४८ ॥
नदाच्छिवास्यारणिलब्धजन्मा ददाह वीराञ्शरपंजरस्थान् ॥
मृतान्समस्तान्कृपयेव वन्हिः को वा न गृण्हाति कृतावदानान् ।४९।
तयोर्ध्वजिन्योरतिदर्पभाजामिभाश्वपादातरथोत्कराणां ॥
अन्योन्यमुद्दिश्य रणः समंतादासीत्कृतांतोदरपूरणाय ॥ ५० ॥
मंत्री हरिश्मश्रुरथैकवीरो बलस्य नेता रथमंडलस्थः ॥
धन्वी प्रतिद्वंद्विबलं वियच्च संछादयामास समं शरौघैः ॥ ५१ ॥
लुलाव मौर्वीभिरमा शिरांसि भल्लैर्भटानां करिणां घटाभिः ॥
महारथव्यूहविशेषबंधं सम्मं विभेदामघटं यथांबु ॥ ५२ ॥

ध्वजा निपेतुः समभातपत्रैर्वितत्रसुः शून्यहयाश्च नागैः ॥
तस्मिन्विमुंचत्युरुबाणवृष्टिं नेशुर्दिशो भास्करदीप्तिभिश्च ॥ ५३ ॥
नितांतशुद्धैरतिशुद्धवृत्तः शरैरनेकैः स बलानि विष्णोः ॥
करैरिवेंदुः कमलानि नक्तं निनाय संकोचमितस्ततोऽपि ॥ ५४ ॥

४५ आपल्या मालकाचें सर्व बाजूंनीं शत्रूंच्या बाणापासून रक्षण करणाऱ्या कोणा एका उपमा रहित पराक्रमी पुरुषाने आपले शरीर क्षणांत नष्ट केलें. अर्थात मालकाच्या रक्षणार्थ त्यानें आपला देह शत्रूंच्या बाणांना बळी दिला. बरोबरच आहे कीं, दृढनिश्चयी शूर मनुष्य काय करूं शकत नाहीं बरें ? ४६ वंशाभिमान, मोठी अब्रू, मालकाची कृपादृष्टि, व स्वतःचा पराक्रम, या सर्व गोष्टींचा विचार करून जखमांनीं आपलें सर्व शरीर भरून गेलें असतांही शूर पुरुष एकमेकांना पाहून लढू लागले. ४७ हत्तींच्या दातांनीं, शरीरांनीं, व सोंडांनीं तुटलेल्या अनेक पताकांनीं, ज्यांचीं जोकडें व कणे मोडून पडले आहेत अशा रथांनीं व्यापून गेलेले तें रणांगण जाण्या येण्याला अडचणीचें होऊन बसलें. ४८ ज्यांनीं आपल्या गळयांत मनुष्यांचीं आंतडीं घातलीं आहेत, रक्तरूपी मद्य प्राशन करून जे उन्मत्त बनले आहेत, असे राक्षस मढीं घेऊन रुंडासह यथेष्ट क्रीडा करू लागले. अर्थात् नाचू लागले. ४९ ओरडणाऱ्या कोल्ह्याच्या मुखरूपी अरणीपासून उत्पन्न झालेल्या अग्नीने शरशय्येवर पडलेल्या सर्व वीर पुरुषांना जणु दयार्द्र होऊन जाळून टाकिलें. बरोबरच आहे कीं, ज्यांनीं उत्तम कार्ये केलीं आहेत अशांचा कोण संग्रह करीत नाहीं बरें ? ५० त्या दोन सैन्यामधील अत्यंत उन्मत्त बनलेले हत्ती, घोडे, पायदळ आणि रथ यांच्या समुदायांचे एकमेकांना उद्देशून सर्व बाजूंनीं यमाचे पोट भरावें ह्मणून भयंकर युद्ध झालें! ५१ यानंतर रथसमूहाच्या मध्यभागीं सैन्यांचा नेता अर्थात् सेनापति, उत्तम धनुर्धारी अद्वितीय वीर अशा हरिश्मश्रु नांवाच्या अश्वग्रीवाच्या प्रधानानें शत्रु अशा त्रिपृष्ठ नारायणाचें सर्व सैन्य व आकाश यांना एकदम आपल्या बाणसमूहांनीं व्यापून टाकिले ५२ या हरिश्मश्रु सेनापतीने आपल्या भाल्याच्या साह्यानें शूरांच्या धनुष्यांच्या दोरीसह त्यांची मस्तकें तोडून टाकिलीं. हा फार जोरानें बाणवृष्टि करीत असतां छत्रासह ध्वज पडले. हत्तीसह घोडेस्वारांनीं रहित असलेले घोडे भीतीनें पळत सुटले व सूर्याच्या किरणांसह दिशा धुंद झाल्या. अर्थात् त्यानें इतकी बाणवृष्टि केली की, चोहीकडे अंधार पडला! ५४ अतिशय स्वच्छ व गोलाकृति चंद्र आपल्या निर्मल किरणांनीं रात्री चोहीकडे कमलें संकुचित करितो त्याप्रमाणें उज्ज्वल अनेक बाणांनी निर्मल आचरणांचा धारक अशा सेनापतीनें शत्रूंचे पुष्कळ सैन्य संकुचित केलें. अर्थात् ठार मारिलें.

तन्वंतमित्थं निजबाहुवीर्यं तं वीक्ष्य भीमं प्रधनाय भीमः ॥
निरस्तभीराजुहुवे शरेण त्रिपृष्ठसेनापतिरुद्धृतेन ॥ ५५ ॥
रथेन तस्याभिमुखं स गत्वा जवानिलायामितकेतनेन ॥
मनोजवाश्वेन तमाशु बाणैर्विव्याध चापध्वनिनादिताशः ॥ ५६ ॥
शिलीमुखांस्तस्य लुलाव भीमः शरैर्धनुर्वेदविदंतराले ॥
अलक्ष्यसंधानविमोक्षकालः सदावतंसीकृतचारुमौर्वी ॥ ५७ ॥
चिच्छेद वेगात्सह केतुयष्ट्या सितार्द्धचंद्रेण शरासनं सः ॥
ततः स मंत्री कणयेन भीमं शक्त्या च वक्षस्यदयं जघान ॥५८॥
चापं विहायासिलतां गृहीत्वा रथात्समुत्प्लुत्य रथं तदीयं ॥
ललाटपट्टेऽसिवरं प्रपात्य जग्राह भीमस्तमुदारसत्वः ॥ ५९ ॥
शतायुधः शत्रुशतायुधौघैर्विपाटितोरःस्थललक्ष्यदेहः ॥
जित्वा रणे धूमशिखं विरेजे प्रसाधनं भूमिभृतां हि शौर्यं ॥ ६० ॥
अनन्यसाधारणबाहुवीर्यं व्यजेष्ट युद्धेऽशनिघोषमुग्रं ॥
यथार्थतां शत्रुजिदात्मनाम प्रतापवान्नेतुमिव क्षणेन ॥ ६१ ॥
अकंपनं कंपितसर्वसैन्यं निपातयामास जयः शरौघैः ॥
तुरंगकंठस्य जयध्वजं वा पुरस्सरं संयति खेचराणां ॥ ६२ ॥
जित्वार्ककीर्तिःसकलां च सेनां पुरो बभूवे हरिकंधरेण ॥
विमुंचताकृष्टशरासनेन नाराचवृष्टिं पिहितांतरिक्षां ॥ ६३ ॥
सावज्ञमालोक्य तमर्ककीर्तिरादाय चापं दृढमप्यभीरुः ॥
आरोपयामास विना प्रयत्नान्न संभ्रमत्याजिमुखे हि शूरः ॥ ६४ ॥

५५ आपल्या बाहूंच्या द्वारें याप्रमाणे भयंकर पराक्रम करणाऱ्या त्या हरि-श्मश्रु सेनापतीला भीम नांवाच्या निर्भय त्रिपृष्ठाच्या सेनापतीनें भात्यातून काढलेल्या बाणांच्या द्वारे युद्ध करण्यासाठीं बोलाविलें ५६ मनाच्या वेगापेक्षांही अधिक वेगाचे घोडे ज्याला जुंपले आहेत, वेगाच्या वाऱ्यानें ज्यांच्या ध्वजाचें वस्त्र लांबट झालें आहे अशा रथाच्या द्वारे भीम सेनापतिच्या जवळ जाऊन हरिश्मश्रूनें धनुष्याच्या टंकारानें सर्व दिशा शब्दमय केल्या व बाणांनीं त्याला तत्काल विद्ध केलें ५७ ज्याची बाण जोडण्याची व सोडण्याची वेळ समजत नाहीं, ज्याच्या धनुष्याची सुंदर दोरी नेहमीं सुशोभितच असते (अर्थात् जी ताणलेली

दिसत नाहीं ) धनुर्विद्येची ज्याला चांगली माहिती झाली आहे अशा भीम सेनापतीनें हरिश्मश्रु सेनापतीचें बाण येत असतांना आपल्या बाणांनीं मध्येंच तोडून टाकिले. ५८ यानंतर त्या भीम सेनापतीनें तीक्ष्ण अर्द्धचंद्र बाणानें अश्वग्रीवाच्या सेनापतीच्या जयध्वजासह त्याचें धनुष्य वेगानें तोडून टाकिलें यामुळे रागावलेल्या हरिश्मश्रूनें बाणानें व शक्ति नांवाच्या शस्त्रानें निर्दयपणें त्यास छातीवर आघात केले. ५९ त्यावेळीं उदार पराक्रमी भीमानें धनुष्य सोडून हातांत तरवार घेतली. आपल्या रथांतून त्याच्या रथांत उडी मारली व त्याच्या कपाळावर आपल्या तरवारीचा आघात करून त्याला पकडलें. ६० शेंकडो शत्रूंच्या शस्त्रसमूहांनीं जखमा झालेल्या छातीवरून ज्यांचा देह ओळखला जात आहे अशा शतायुध राजानें रणांत धूमाशिख विद्याधराला जिंकिलें ह्मणून तो फार शोभू लागला.बरोबरच आहे कीं, क्षत्रियांचा शौर्यच अलंकार होय. ६१ ज्याच्या ठिकाणीं इतरामध्यें आढळून न येणारें असामान्य बाहुबल आहे अशा उग्र अशनिघोष विद्याधराला शत्रुजित् या नांवाला जणु सार्थक करणारा अशा पराक्रमी शत्रुजित् राजानें तत्काल युद्धामध्यें जिंकिलें. ६२ युद्धामध्यें सर्व विद्याधरांचा पुढारी, जणु अश्वग्रीवाचा जयध्वज, ज्याने सर्व शत्रुसैन्याला भीतीनें कंप उत्पन्न केला आहे अशा अकंपन विद्याधर राजाला जय या नांवाच्या राजानें बाणांच्या समुदायांनीं ठार मारले. ६३ धनुष्य ताणून आकाशाला अच्छादून टाकणारी बाणवृष्टि करणाऱ्या हरिकंधर विद्याधराने अर्ककीर्तीचे सर्व सैन्य जिंकिलें व अर्ककीर्तीच्या पुढें येऊन तो उभा राहिला ६४ निर्भय अशा अर्ककीर्तीनें त्याच्याकडे तुच्छ दृष्टीनें पाहिले व दृढ असें हि धनुष्य घेऊन ते त्यानें लीलेनें सज्य केलें. बरोबरच आहे कीं, युद्धाचें तोंड लागलें असतां शूर पुरुष भीतीनें घाबरून जात नाहीं. त्यावेळीं तो अवश्य शौर्य दाखवितोच.

संधाय वेगेन शरं प्रभावादाकृष्य चापं तरसा मुमोच ॥
एको यथापंक्तिगुणक्रमेण प्राप्नोत्यसंख्यानमिषुस्तथासौ ॥ ६५ ॥
तस्यालुनात्केतनवंशयष्टिं सद्वंशलक्ष्मीलतया स सार्द्धम् ॥
आमूलतःसंततपक्षबाणैर्बाणैः स्वनामाक्षरमुद्रितांगैः ॥ ६६ ॥
क्रुधा तदीये हरिकंधरोऽपि लीलोपधाने विजयैकलक्ष्म्याः ॥
भुजे निशातं निचखान रोपं वामेतरे चंचलकंकपक्षं ॥ ६७ ॥
एकेन तस्यायतमार्गणेन छित्वातपत्रं कदलीध्वजं च ॥
अन्येन चूडामणिमुन्मयूखमुन्मूलयामास किरीटकूटात् ॥ ६८ ॥

तस्यार्ककीर्तिर्धनुषोऽग्रकोटिं चिच्छेद भल्लेन बलोद्धतस्य ॥
विहाय तत्सोऽपि निरस्तभीतिः प्रासेन तं प्राहरदाजिशौंडं ॥६९॥
विदार्य नाराचपरंपराभिर्वेगेन तं सन्नहनेन सार्द्धं ॥
तदार्ककीर्तिः शुशुभे नितांतं हत्वा रिपुं को न विभाति युद्धे ॥७०॥
अन्यैरजय्यं युधि कामदेवं प्रजापतिर्वीतभयो विजिग्ये ॥
पुरा तपस्यन्भुवि कामदेवं प्रजापतिस्तीर्थकृतामिवाद्यः ॥ ७१ ॥
बभंज दर्पं शशिशेखरस्य स्वबाहुवीर्यातिशयेन युद्धे ॥
जयाशयामा हयकंधरस्य विना प्रयासेन पितार्ककीर्तेः ॥ ७२ ॥
नभश्चरान्सप्तशतं विजित्य चित्रांगदादीन्विजयी विराजन् ॥
पुरःस्थितं नीलरथं मदांधमालोकयामास हरिर्यथेभं ॥ ७३ ॥
अभीयतुस्तौ प्रधनाय वीरावन्योन्यमत्यूर्जितसत्वयुक्तौ ॥
पूर्वापरौ वारिनिधी यथांते कल्पस्य कल्पामरनाथकल्पौ ॥ ७४ ॥

६५ आपल्या सामर्थ्यानें अर्ककीर्तीने धनुष्याला बाण जोडून तो वेगानें सोडून दिला असतां पंक्तिनें गुणित क्रम होऊन असंख्यातपणाला पावला. अर्थात् विद्येच्या प्रभावानें एका बाणाची दोन, चार, आठ, सोळा अशी संख्या वाढत ती असंख्याता पर्यंत पोहोचली ! ६६ या अर्ककीर्ति राजपुत्रानें हरिकंठाच्या सद्वंशलक्ष्मी रूपी वेलीबरोबरच उत्तम वेळू पासून बनलेल्या त्याच्या जयपताकेलाही ज्यांना पंख लाविले आहेत व ज्यांच्यावर आपलें नांव खोदलें आहे अशा बाणांनी मूळासगट उपटून टाकिलें ६७ विजयरूपी अद्वितीय लक्ष्मीला लीलेनें मान टेकून निजण्याच्या उशीप्रमाणें असलेल्या त्या राजपुत्राच्या उजव्या बाहूवर कंकपक्षाच्या चंचल पंखानें युक्त असलेला तीक्ष्ण बाण हरिकंधराने रागानें मारला ६८ एका लांब बाणाने अर्ककीर्तीचे छत्र व जयध्वज त्यानें तोडून टाकिलें व दुसऱ्या बाणाने किरीटाच्या शिखरांतून ज्याचे किरण चोहीकडे पसरले आहेत असा चुडामणि त्यानें उपटून काढिला ६९ अर्ककीर्तीनें हि सामर्थ्यानें उद्धट बनलेल्या हरिकंठाच्या धनुष्याचा अग्र भाग भाला फेकून मोडून टाकिला तेव्हां हरिकंठानें हि निर्भय होऊन ते धनुष्य टाकून दिलें व युद्धामध्यें प्रवीण

असलेल्या त्या अर्ककीर्तीवर भाल्यानें प्रहार केला. ७० त्यावेळीं अर्ककीर्तीनें बाणांची खूप वृष्टि करून हरिकंठाचें अंग त्याच्या चिलखतासह विदारिलें त्यामुळें तो फार शोभू लागला. बरोबरच आहे कीं, कोणता शूर पुरुष युद्धामध्यें शत्रूला मारून शोभत नाहीं बरे ? ७१ या पृथ्वीतलावर प्राचीन कालीं तीर्थकरामध्यें प्रथम असलेले सर्वप्रजांचे नाथ अशा आदिनाथ भगवंतांनीं जसें तपश्चरणाच्या द्वारें इतरांना अजिंक्य कामदेवाला—मदनाला जिंकिलें होतें तसें प्रजापति राजानें ही निर्भय होऊन इतर राजाकडून जिंकला जाण्यास अशक्य अशा कामदेव नांवाच्या विद्याधराला युद्धामध्यें जिंकिलें ७२ अर्ककीर्ति राजपुत्राच्या पित्यानें अर्थात् ज्वलनजटी राजानें प्रयासावांचून युद्धामध्यें आपल्या बाहूच्या विपुल समर्थ्यानें अश्वग्रीव चक्रवर्तीच्या विजयेच्छे बरोबरच शशिशेखर विद्याधर राजाचा गर्व नष्ट केला ७३ चित्रांगद वगैरे सातशे विद्याधर राजांना जिंकून शोभणाऱ्या विजय बलिभद्रानें पुढें आलेल्या उन्मत्त हत्तीला जसा सिंह क्रूर दृष्टीनें पाहतो तसें पुढें आलेल्या उन्मत्त नीलरथ विद्याधराला पाहिलें ७४ जसे कल्पकालाच्या शेवटीं अत्यूर्जितसत्व युक्त अर्थात् विपुल शक्तींचे धारक अशा जलचर प्राण्यांनी युक्त असलेले पूर्व समुद्र व पश्चिम समुद्र एकमेकावर उसळतात तसे अतिशय उत्कृष्ट पराक्रमानें युक्त असलेले व स्वर्गीय देवांच्या इंद्राप्रमाणे भासणारे ते नीलरथ व विजय बलभद्र हे दोघे वीर एकमेकावर लढण्यासाठीं हल्ला करूं लागले.

**बलाधिकस्यापि बलस्य पूर्वं वक्षो विशालं गदया जघान ॥**
**शिक्षाविशेषं प्रथयन्ननेकं विद्याधरः स्वं करणक्रियाभिः ॥ ७५ ॥**
**गदाप्रहारेण बलोऽपि तस्य प्रपद्य रन्ध्रं मुकुटं शिरस्तः ॥**
**निपातयामास रुषा प्रगर्जन्निरम्मदेनेव घनोऽद्रिकूटं ॥ ७६ ॥**
***परिच्युतैस्तन्मुकुटादनेकैर्मुक्ताफलैराजिधरा रराज ॥**
**कीर्णेव विद्याधरराजलक्ष्म्या बाष्पाम्बुबिंदुप्रकरैः क्षणार्द्धं ॥ ७७ ॥**

---

* टिप्पणीः— तदीयमुकुटोद्धतैरमितमौक्तिकैः पातितै रराज समराजिरं पतित—
भूमिभृन्मस्तकम् ॥
कलिंगवसुधापतिप्रथितराजलक्ष्म्यास्तदा विकीर्णमिव
विस्तृतैर्नयनबाष्पाबिंदूत्करैः ॥ ७६ ॥
जीवंधरचम्पाः दशमःसर्गः, समानार्थकः श्लोकोऽयं॥

बलद्वयं वीक्ष्य तयोरचिंत्यं बलं च धैर्यं युधि कौशलं च ॥
कश्चानयोर्जेष्यति नेति ताम्यन्संदेहदोलां मनसा रुरोह ॥ ७८ ॥
प्रादुर्बभूव स्वसमानसत्वे बलस्य तत्रैव बलं च शौर्यं ॥
विजेतुरप्यन्यनभश्चराणां प्रतिद्विपे धीर इवेभभर्तुः ॥ ७९ ॥
स्वसाध्यमन्यस्य बलेन युद्धे हलायुधो नीलरथं हलेन ॥
निनाय तं गोचरमाशु मृत्योर्मत्ताद्विपं क्रुद्ध इव द्विपारिः ॥ ८० ॥
इति प्रधानान्प्रहतानथान्यैर्नभश्चरान्वीक्ष्य तुरंगकंठः ॥
करेण सारं धनुराललंबे वामेन शौर्यं मनसा च धीरः ॥ ८१ ॥
विहाय सर्वानितरान्बलादीन् क्व स क्व स प्राज्यबलस्त्रिपृष्ठः ॥
पृच्छन्निति प्राक्तनजन्मकोपात्तस्थौ पुरस्तस्य गजाधिरूढः ॥८२॥
अमानवाकारमुदीक्ष्य लक्ष्म्या योग्यो ममायं रिपुरेव नान्यः ॥
अमन्यतेत्यश्वगलस्त्रिपृष्टं गुणाधिके कस्य न पक्षपातः ॥ ८३ ॥
सुदुर्निवारान्विविधान्विधिज्ञो विद्यामयान्वज्रफलान्समंतात् ॥
शराननेकान्विससर्ज चक्री चक्रीकृतोत्तुंगधनुर्गुणेन ॥ ८४ ॥

७५ स्वतःला अनेकरूप करण्याच्या क्रियांनीं आपलें विशिष्ट शिक्षण प्रगट करणाऱ्या नीलरथानें आपल्या पेक्षां सामर्थ्यानें अधिक असलेल्या अशा ही बलभद्राच्या विशाल वक्षःस्थलावर गदेने प्रथम प्रहार केला. ७६ जसें गर्जना करणारा मेघ विजेच्या कडकडाटाने पर्वतांचें शिखर पाडतो तसें विजय बलभद्राने गर्जना करून क्रोधानें संधि साधून नीलरथाच्या मस्तकावरील मुकुट गदेच्या आघाताने खाली पाडला. ७७ त्यावेळी त्या मुकुटापासून गळालेल्या अनेक मोत्यांच्या समूहांनीं ती रणभूमि क्षणार्ध पर्यंत विद्याधरराजलक्ष्मीच्या डोळ्यांतून निघालेल्या अश्रुजलसमूहांनीं व्याप्त झाल्याप्रमाणें शोभू लागली. ७८ या उभयतांचे विचार करण्यास अशक्य असें युद्ध चातुर्य, बल व धैर्य पाहून या उभयतामध्यें कोणाचा तरी जय होईल कीं नाहीं याचा विचार करण्यांत थकलेलें तें दोन्ही बाजूचें सैन्य आपल्या मनाच्या द्वारें संशय रूपी झोक्यावर चढलें ७९ आपल्या बरोबरीचे सामर्थ्य धारण करणाऱ्या त्या नीलरथावर इतर विद्या-

धरांना जिंकणाऱ्या विजय बलभद्रानें आपलें सामर्थ्य व पराक्रम प्रगट केले. जसें मोठा हत्ती शत्रुभूत धैर्यवान हत्तीवर आपले सामर्थ्य व पराक्रम प्रगट करितो ८० जसा रागावलेला सिंह मत्त हत्तीला तत्काल मृत्युमुखीं टाकितो त्या प्रमाणें इतरांना अजिंक्य असलेल्या नलिरथाला क्रुद्ध बलभद्रानें युद्धामध्यें हल नांवाच्या दिव्यायुधानें शीघ्र मारून टाकिलें. ८१ या प्रमाणें शत्रूंनी आपले मुख्य मुख्य विद्याधर राजे मारून टाकिलेले पाहून धीर अश्वग्रीवानें आपल्या डाव्या हातानें सारयुक्त धनुष्य धारण केलें व मनानें उत्कृष्ट धैर्य धारण केलें. ८२ बलभद्र, ज्वलनजटी, प्रजापति वगैरे राजांना वगळून 'तो उत्कृष्ट शक्तीला धारण करणारा त्रिपृष्ट कोठे आहे कोठें आहे?' असें पूर्व जन्माच्या कोपानें विचारीत हत्तीवर आरूढ होऊन त्रिपृष्ठाच्या पुढें येऊन उभा राहिला ८३ त्या दिव्य आकृतीला धारण करणाऱ्या त्रिपृष्टाला पाहून हाच माझा शत्रु लक्ष्मीला योग्य आहे, अन्य नाहीं असे अश्वग्रीवानें मनांत मानिलें. बरोबर आहे गुणांनीं अधिक असलेल्या मनुष्यावर कोणाचा पक्षपात होत नाहीं वरें ? ८४ रोकण्यास अशक्य असलेले, वज्राच्या अग्रभागांनीं युक्त असलेले विद्यामय नाना प्रकारचे अनेक बाण ते सोडण्याची विधि जाणणाऱ्या चक्रवर्तीनें चक्राप्रमाणें गोल वाकविलेल्या मोठ्या धनुष्याच्या दोरीनें साह्य घेऊन चोहींकडे सोडले.

अथांतराले पुरुषोत्तमेन ते खंडिताः शार्ङ्गधनुर्विमुक्तैः ॥
शराःशरैः पुष्पमया बभूवुर्गुणाय भंगोऽपि सतः परेषां ॥ ८५ ॥

एकीकृतक्ष्मातलवायुमार्गा विनिर्ममे चक्रभृता तमिस्रा ॥
चिच्छेद तां कौस्तुभरत्नदीप्तिर्विष्णोर्जितोष्मांशुकठोररश्मिः ॥८६॥

समंततो दृष्टिविषाग्निरेपाकल्माषिताशान्विसृजन्स सर्पान् ॥
पक्षानिलोन्मूलितपादपेन निराकरोत्तान्गरुडेन कृष्णः ॥ ८७ ॥

गर्जन्मृगेन्द्रैः स्थिरतुंगशृंगैः शैलैरसौ व्योम रुरोध कृत्स्नं ॥
बिभेद वेगेन हरिः क्रुधा तान्वज्रेण वज्रायुधसन्निभश्रीः ॥ ८८ ॥

अनिंधनेन ज्वलनेन धीरस्ततस्तार स व्योम धरातलं च ॥
निर्वापयामास तमाशु विष्णुर्विद्यामयांभोदविसृष्टतोयैः ॥८९॥

उल्कासहस्रज्वलितांतरिक्षां सुदुर्निवाराममुचत्स शक्तिं ॥
उरःस्थले सा पुरुषोत्तमस्य स्फुरत्करा हारलता बभूव ॥ ९० ॥

इत्येवं विफलितसर्वशस्त्रसारो दुर्वारस्तुरगगलः करेण चक्रं ॥
आदाय ज्वलनशिखापरीतधारं स्मेरास्यो हरिमिति
निर्भयं बभाषे ॥ ९१ ॥

विफलयति मनोरथांस्तवेदं कुलिशधरोऽपि सहो न पातुमस्मात् ॥
निजमतिमथवा मम प्रणामे कुरु परमात्मनि वा परत्र हेतौ ॥९२॥

भीरोर्भीतिकरं त्वदीयवचनं नैवोन्नतानामिदं ॥
वन्येभध्वनितं परं मृगशिशोः संत्रासकं किं हरेः ? ॥
चक्रं तेन कुलालचक्रसदृशं मन्येत कः सत्ववान् ॥
शौर्यं वाचि न कर्मणि स्थितमिति प्रत्याह तं केशवः ॥ ९३ ॥

८५ यानंतर अश्वग्रीवानें सोडलेले सर्व बाण नारायणाने आपल्या शार्ङ्ग नांवाच्या धनुष्यापासून सोडलेल्या बाणांनी मध्येच तोडून टाकिले. ते सर्व बाण नारायणास पुष्पासारखे वाटले. बरोबरच आहे कीं दुसऱ्यांचा भंग देखिल सत्पुरुषांच्या हितासच कारण होतो अर्थात् कोणी जर सज्जनाचा कोणत्या रीतीनें अपमानादिक केला तर त्यापासून त्यांचें नुकसान न होतां फायदाच होतो. ८६ नंतर चक्रवर्तीनें पृथ्वी व आकाश यांना एकरूप करून सोडणारी अंधारी रात्र उत्पन्न केली. परंतु सूर्याच्या कठोर किरणास जिंकणाऱ्या त्रिपृष्ट नारायणाच्या कौस्तुभ रत्नाच्या कांतीनें ती रात्र तत्काल नाहींशी केली ८७ या अश्वग्रीवाने ज्यांच्या दृष्टींतून निघालेल्या विषाग्नीच्या ज्वालांनी सगळे आकाश व्याप्त झाले होते असे सर्प चोहींकडे उत्पन्न केले परंतु आपल्या पंखाच्या वाऱ्यानें ज्यानें वृक्ष उपटून टाकिले आहेत अशा गरुडाच्याद्वारें त्रिपृष्टनारायणानें त्यांना नाहींसे करून टाकिले ८८ ज्यांच्यावर सिंह गर्जना करीत आहेत अशा स्थिर व उंच शिखरांनी युक्त असलेल्या पर्वतांनीं या चक्रवर्तीनें सर्व आकाश व्यापून टाकिलें परंतु इंद्राप्रमाणें ज्याचें ऐश्वर्य आहे अशा या त्रिपृष्ट नारायणानें क्रुद्ध होऊन वज्राच्या

साह्यानें त्यांचा शीघ्र नाश करून टाकिला ८९ लांकडांच्या अभावीं ही उत्पन्न केलेल्या अग्नीनें धीर अशा चक्रवर्तीनें आकाश व पृथ्वीतल दोन्ही व्यापून टाकिलें. त्यावेळीं नारायणानें मायामयी मेघ उत्पन्न करून त्यांच्या पाण्यांनीं तो अग्नि शांत केला. ९० निघणाऱ्या हजारो स्फुलिंगांनीं जिनें सर्व आकाश प्रकाशमय करून सोडलें आहे व निवारण करण्यास अशक्य असलेली अशी शक्तिविद्या चक्रवर्तीनें नारायणाच्या अंगावर सोडली परंतु ती त्याच्या वक्षःस्थलावर ज्यांच्यातून किरण निघत आहेत असा हार बनली. ९१ या प्रमाणें ज्याच्या सर्व शस्त्रास्त्रांचें सामर्थ्य व्यर्थ झाले आहे अशा त्या रोकण्यास अशक्य असलेल्या अश्वग्रीवानें अग्नीच्या ज्वालांनीं ज्याची धार वेढलेली आहे असें चक्र हातांत घेतलें व थोडेसें हंसरें तोंड करून निर्भय रीतीनें तो विष्णुला पुढें लिहिल्याप्रमाणें बोलला. ९२ "हे त्रिपृष्ठा! हें चक्ररत्न तुझ्या सर्व मनोरथांना आज व्यर्थ करीत आहे. इंद्र देखिल तुझें यापासून रक्षण करण्यास समर्थ नाहीं. यास्तव मला नमस्कार करण्यांत तूं आपली बुद्धि लाव किंवा परलोकीं कल्याण व्हावें अशी इच्छा असेल तर श्रीजिनेश्वराच्या ठिकाणीं आपल्या बुद्धिचा उपयोग करून घे." ९३हें त्याचें भाषण ऐकून नारायण त्यास ह्मणाला कीं, "हे शत्रो! तुझें हें भाषण भ्याड लोकांना भय उत्पन्न करणारें आहे उन्नतांना यापासून कांहींच भय वाटत नाहीं. रानटी हत्तीची गर्जना ही हरिणाच्या पाडसास भीति दाखविते सिंहाला ती भय दाखविते काय? तुझें हें चक्र कुंभाराच्या चाकाप्रमाणें आहे याच्या योगानें कोणता मनुष्य स्वतःला पराक्रमी समजेल? पराक्रम हा बोलण्यांत नसतो तो कृतींत असतो."

श्रुत्वा तदीयवचनं सभयावनीशैरालोक्यमानममुचत्तरसा स चक्रं ॥
तत्प्राप दक्षिणकरं मृगराजशत्रोराज्ञापयेति निगदन्मुहुरुद्यदर्चिः ९४

एतत्ते चक्रमुग्रं प्रथितरिपुशिरश्छेदरक्तारुणांगं ॥
विद्धन्यस्य प्रतापादखिलमहितले पूर्णकामो ह्यभूस्त्वं ॥
तत्प्राप्तं मे कराग्रं कृतसुकृतवशात्तत्फलं चेह मत्वा ॥
पूज्यं ते मेंऽघ्रियुग्मं भटनिवहतया तिष्ठ वाग्रेऽस्य धैर्यात् ॥९५॥

दृष्ट्वा तन्निजहस्तसंस्थितमुरुज्वालोल्लसन्नेमिकं
निर्धूमज्वलनं यथा हयगलं तं विष्णुरूचे पुनः ॥

सप्तिग्रीव ! ममाशु पादपतने शिष्यत्वमालम्ब्य
श्रेयोर्थं मुनिपुंगवस्य तव नो वीक्षेऽन्यथा जीवितं ॥९६॥

ऊचे तं तु विहस्य नीरधिमना जिष्णुं हयग्रीवकः
चक्रेण त्वमनेन गर्वितमतिर्नालातचक्रेण वा
भूतो नालयमायुधैरविवरं पूर्णं न मे किं महत् ॥
नीचा वाथ न कुर्वते खलु खलं लब्ध्वा धृतिं किंतनां ॥९७॥

तिष्ठाग्रे किमु भाषितेन बहुना त्वं याहि मृत्योर्मुखं ॥
ह्यन्यस्त्रीसुरताभिलापजफलं भुक्त्वाद्य मूढांतरे
किंवा ये परदारसंगमसुखव्यासक्तचित्तास्तु ते
जीवंति क्षितिपे प्रसाधितारिपौ सत्येव कालं चिरं ॥९८॥

भुक्तोत्सृष्टं मदीयं क्रमयुगलरजस्तुल्यमत्यंतरागात् ॥
प्राप्येदं लोष्ठखंडं खलदलसदृशं गर्वितस्त्वं विमूढः ॥
क्षुद्राणां वातितुष्टिर्भवति भुवि परा सिक्थमात्रेऽपि लब्धे ॥
काचिच्चेद्वास्ति शक्तिस्तव खलु हृदये शीघ्रमेतत्क्षिप त्वं ॥९९॥

९४ हें नारायणाचे भाषण ऐकून भयभीत झालेल्या सर्व राजाकडून पाहिलें जाणारें व ज्याच्यांतून ज्वाला निघत आहे असें तें चक्र चक्रवर्तीनें मोठ्या वेगानें नारायणावर फेकिलें. तें नारायणाच्या उजव्या हातावर जणु मला आपण आज्ञा करा असें म्हणत येऊन बसलें.त्यावेळी नारायण-त्यास म्हणाला की,"हे बुद्धिमंता प्रसिद्ध शत्रूंच्या मस्तकाला छेदून त्याच्या रक्तानें ज्याचे आरे लाल झाले आहेत असें हें भयंकर चक्र माझ्या हातांत आज आलें आहे. या चक्राच्या सामर्थ्यानें तूं या भूतलावर सर्व इच्छांनीं पूर्ण झाला आहेस. अर्थात् तुझ्या सर्व इच्छा या चक्रानें तुला पूर्ण करून घेता आल्या आहेत. मला माझ्या पूर्व पुण्याचें फल म्हणून हें चक्र प्राप्त झालें आहे असें मानून तू शूर पुरुषासह माझ्या पायांची पूजा कर अथवा या चक्राच्या पुढें धैर्यानें उभा रहा. ९६ ज्याची धाव मोठ्या ज्वालांनी शोभत आहे व धुरानें रहित असलेल्या अग्निप्रमाणे उज्ज्वल असें ते चक्र

आपल्या हातांत आलेलें पाहून पुनः नारायणानें अश्वग्रीवाला याप्रमाणें ह्मटलें:- "हे अश्वग्रीवा, तूं माझ्या पायां पडून माझा नोकर हो अथवा स्व-कल्याणाकरितां मुनिश्रेष्ठांचा शिष्य हो. या शिवाय तुला जगण्याचा दुसरा उपाय मला दिसत नाहीं." ९७ हें नारायणाचें भाषण ऐकून समुद्राप्रमाणें गंभीर असा अश्वग्रीव त्याला हसून याप्रमाणें बोलला:—"अग्नीच्या चक्राप्रमाणें असलेल्या या चक्रानें तुला गर्व उत्पन्न झाला आहे. माझें मोठें शस्त्रगृह अनेक प्रकारच्या शस्त्रांनीं अगदी पूर्ण भरून गेलें आहे. अथवा जे नीच, दरिद्री असतात ते पेंडी सारखा तुच्छ पदार्थ मिळाला असतांही संतुष्ट होत नाहींत काय?" ९८ "हे अश्वग्रीवा ! पुष्कळ बडबड करूं नको, पुढें उभा रहा. आज या युद्धांत परस्त्रीच्या संभोगाचा अभिलाप करण्यापासून जें फल मिळतें त्याचा उपभोग घेऊन नियमानें मृत्यूच्या तोंडी जाऊन पड. जे पुरुष परस्त्रीच्या सहवाससुखांत आसक्त झालेले आहेत ते ज्यानें सर्व शत्रूंना जिंकिलें आहे असा राजा जिवंत असतां पुष्कळ काळापर्यंत कसे जिवंत राहूं शकतील ?" ९९ या भाषणानंतर अश्वग्रीव पुनः नारायणास या प्रमाणें बोलला. "हे नारायणा, हें माझें चक्र मी भोगून त्यागलें आहे. हें माझ्या दोन पायाच्या धुळीप्रमाणें मी तुच्छ समजतों. परंतु तूं मूढ आहेस. तूं अतिशय लुब्ध होऊन ढेकळाप्रमाणें किंवा पेंडीच्या तुकड्याप्रमाणें हें प्राप्त करून घेऊन गर्विष्ठ बनला आहेस. बरोबरच आहे कीं, भाताचें एक शीत मिळालें तरी ही क्षुद्र माणसांना फार आनंद होत असतो. अरे नारायणा, जर तुझें हृदयांत कांहीं सामर्थ्य असेल तर हें चक्र तूं लौकर फेक."

चक्रं प्राप्य स विष्णुरेवमवदन्मत्पादयोस्त्वं नमः<br>
प्राग्वत्ते विभवं करोमि कुमुदं जह्या वृथा मानसं ॥<br>
इत्युक्ते हयकंधरेण परुषं निर्भर्त्सितस्तत्क्षणात्<br>
तत्क्रुद्ध्वास्य शिरो गृहाण स इति क्षिप्रं हरिः प्रैक्षिपत् ॥ १०० ॥

अवलंब्य हरेस्तदा तदाज्ञां विनिवृत्त्याशु रथांगमाजिरंगे ॥<br>
समपातयदश्वकंधरस्य स्फुरदर्चिर्मुकुटं शिरः शिरोधेः ॥ १०१ ॥

हत्वैनं हयकंधरं निजरिपुं चक्रेण घोरानल—<br>
ज्वालापल्लवितेन तेन न तथा रेजे पुरोवर्तिना ॥

वैराशंसनसंपदं सह नृपैः पश्यन्नभोलंघिना-
मावद्धाभययाचनांजलिभृतां चक्रेण विष्णुर्यथा ॥ १०२ ॥

इत्यसगकृते श्रीवर्द्धमानचरित्रे महाकाव्ये त्रिपृष्ठविजयो
नाम नवमः सर्गः ॥

१०० चक्ररत्नाची प्राप्ति झाल्यानें पुनः नारायण अश्वग्रीवाला याप्रमाणे म्हणाला:--"हे अश्वग्रीवा, तूं व्यर्थ अंतःकरणांतील खोटा गर्व सोडून दे. माझ्या पायांना नमस्कार कर. म्हणजे पूर्वीप्रमाणे मी तुला वैभवसंपन्न बनवीन." असे भाषण केल्या बरोबर अश्वग्रीवाने त्याची फार निर्भर्त्सना केली. त्यामुळे नारायणाला फार क्रोध आला व त्याने या अश्वग्रीवाचें मस्तक ग्रहण कर म्हणून तें चक्ररत्न शीघ्र त्याच्यावर फेकिलें.

१०१ नारायणाच्या आज्ञेचें अवलंबन करून ते चक्ररत्न युद्धभूमिमध्ये पुन शीघ्र परतून त्यानें ज्याच्यातून किरण बाहेर पडत आहेत अशा मुकुटानें युक्त असलेलें अश्वग्रीवाचे मस्तक त्याच्या मानेवरून तत्काळ खालीं पाडले.

१०२ अभयदान मागण्यासाठीं ज्यांनी हात जोडले आहेत अशा विद्याधरांच्या समुदायाने वैर सूचित करणाऱ्या संपत्तीला पाहात असतांना जसा तो त्रिपृष्ट शोभला तसा आपला शत्रु जो अश्वग्रीव त्याला युद्धामध्यें ठार मारून धारेपासून निघालेल्या अग्निज्वालेनें पालवी फुटल्याप्रमाणे दिसणाऱ्या चक्र रत्नानें शोभला नाहीं.

या प्रमाणें असग कवीनें रचिलेल्या श्री वर्द्धमान चरित नांवाच्या महाकाव्यांत त्रिपृष्ट विजय नांवाचा नववा सर्ग समाप्त झाला.

अथाभिषिक्तो विजयेन केशवः समं नरेन्द्रैः सकलैश्च खेचरैः ॥
पुरा समभ्यर्च्य जिनं सपर्यया स चक्रमानर्च यथोक्तया पुनः ॥१॥
प्रणामतुष्टैर्गुरुभिः ससंभ्रमैरुदीरिताशीरभिपूज्य राजकम् ॥
पुरस्सरीभूतरथांगमंगलो हरिःप्रतस्थे दशदिग्जिगीषया ॥ २ ॥
दिशं महेंद्रस्य महेंद्रसन्निभः पुरा वशीकृत्य निजेन तेजसा ॥
रराज देवं विनमय्य मागधं परार्द्धतद्दत्तविचित्रभूषणैः ॥ ३ ॥
ततो वरार्दिं तनुमच्युतो नतं सुरं प्रभासं च परानपि क्रमात् ॥
उपागतान्द्वीपपतीनुपायनैरतिष्ठिपत्तान्निज एव धामनि ॥ ४ ॥
स भारतार्द्धं परिसम्मितैर्दिनैर्विधाय सर्वं करदं यथेच्छया ॥
ततः पुरं पोदनमुच्छ्रितध्वजं विवेश पौरैः परिवार्य पूरितः ॥ ५ ॥
हरेरुदीचीमवसद्वानायकां प्रसादतः श्रेणिमवाप्य वांछितां ॥
अभूत्कृतार्थो रथनूपुरेश्वरो न वर्धते कः पुरुषोत्तमाश्रितः ॥ ६ ॥
अयं पतिर्वो विजयार्द्धवासिनां वहध्वमस्यैव निदेशमादरात् ॥
इतीरयित्वा सह तेन खेचरान्मुमोच सम्भान्य यथाक्रमं विभुः ॥७॥
यथावदापृछ्य ततः प्रजापतिं नभश्चरेंद्रस्य पुरैव पादयोः ॥
पपात सम्राट् सह सीरपाणिना सतां हि लक्ष्म्या विनयो वितीर्यते ॥८॥
प्रणामपर्यस्तकिरीटकोटिना निपीडयंतं शिरसा पदद्वये ॥
मुदार्ककीर्तिं परिरभ्य तावुभौ स्वचेतसा तं विससर्जतुः समं ॥९॥

ययौ तनूजामनुशिष्य पद्धतिं परां सतीनां सह वायुवेगया ॥
प्रमृज्य तच्चक्षुरुदश्रु पाणिना नभश्चरेंद्रो मुहुरात्तनोऽप्यसौ ॥१०॥

१ यानंतर सर्व मांडलिक राजे व सर्व विद्याधर यांनी विजय बलभद्रासह केशवाचा—त्रिपृष्ठ नारायणाचा राज्याभिषेक केला. अभिषेकविधीनंतर श्रीजिनेंद्राची केशवानें प्रथम पूजा करून नंतर शास्त्रोक्त पद्धतीनें चक्ररत्नाची पूजा केली. २ केशवानें जेव्हां वडील माणसांना नमस्कार केला तेव्हां त्यांनी मोठ्या आदरानें त्यास आशीर्वाद दिला. यानंतर केशवानें सर्व राजसमूहाचा आदर सत्कार केला. ज्याला चक्रवाक पक्षाचा शुभशकुन झाला आहे अथवा कल्याणप्रद चक्ररत्न ज्याच्यापुढें झालें आहे असा तो केशव दहादिशा जिंकण्याच्या इच्छेनें निघाला. ३ इंद्रासारखें ऐश्वर्य ज्याचें आहे. अशा त्या केशवाने प्रथमतः आपल्या पराक्रमानें इंद्राची दिशा अर्थात् पूर्व दिशा जिंकून मागध नांवाच्या देवाला त्यानें नम्र केले अर्थात् नमस्कार करावयास लाविलें व त्यानें दिलेल्या अमूल्य नाना प्रकारच्या अलंकारांनी तो शोभू लागला ४ यानंतर क्रमानें वरतनु, व प्रभास नांवाच्या देवांसही त्याने नम्र केले व नजराणा घेऊन आलेल्या सर्व द्वीपांच्या राजांना आपल्या पराक्रमाच्या स्वाधीन केलें ५ थोडक्याच दिवसांनीं केशवानें अर्धे भरत क्षेत्र कर देणारें केलें व ज्यामध्ये चोहोकडे जयध्वजा उभा केल्या आहेत अशा आपल्या नगरांत नगरवासी लोकांनी वेष्टिलेला होऊन इच्छानुसार पोदनपुर शहरांत प्रवेश केला. ६ जिचा अधिपति मरण पावला आहे अशा इच्छिलेल्या उत्तर श्रेणीचे राज्य केशवाच्या कृपेने रथनूपुर शहराचा राजा जो ज्वलनजटी त्याला मिळालें त्यामुळे तो कृतार्थ झाला. बरोबरच आहे कीं ज्यानें पुरुषोत्तमाचा—केशवाचा आश्रय घेतला आहे असा कोणता मनुष्य उन्नतावस्थेला पोहोचणार नाहीं बरें ? ७ " हे विद्याधरांनो ! हा ज्वलनजटी विजयार्ध पर्वतावर राहणाऱ्या तुम्हा विद्याधरांचा पति आहे. याचीच आज्ञा तुम्ही आदरानें आपल्या मस्तकावर धारण करा" असें बोलून त्या ज्वलनजटीसह त्या विद्याधरांचा यथाक्रम आदर करून त्यांचें त्यानें विसर्जन केलें. ८ प्रजापति महाराजांना जाण्याबद्दल परवानगी विचारणाऱ्या विद्याधरांचा अधिपती अशा ज्वलनजटी राजाच्या चरणांना अर्ध चक्रवर्ती केशवानें बलभद्रासह नमस्कार केला. बरोबर आहे. सत्पुरुषांना लक्ष्मी विनय अर्पण करीत असते ९ वाकते वेळीं नम्र

३ संगम नांवाच्या देवानें हजार फणांनीं भयंकर दिसणारें असें सर्पाचें रूप विक्रि-
येनें धारण करून वडाचा बुधा त्याच्या सर्व फांद्यासह वेढून टाकिला. त्यावेळीं त्या
भयंकर सर्पाला पाहून सर्व लहान मुलें पटापट खालीं पडूं लागलीं. तेव्हां प्रभु लीलेनें
त्या सर्पाच्या मस्तकावर आपले दोन पाय ठेऊन निर्भयपणें झाडावरून जमिनीवर उत-
रले. बरोबरच आहे की, वीर पुरुषाला जगांत भय उत्पन्न करणारें कांहीं कारण उरत
नाहीं. प्रभूचा निर्भयपणा पाहून देवाचें अन्तःकरण आनंदित झालें. त्यानें आपलें रूप प्रगट
करून व सुवर्णकलशाच्या पाण्यानें प्रभूंचा अभिषेक करून त्यांचें महावीर असें नांव
ठेविलें. पृष्ठ. ३५६.

झालेल्या किरीटाच्या अग्रभागानें युक्त अशा आपल्या मस्तकानें चरणद्वयास पीडित करणाऱ्या अर्थात् नमस्कार करणाऱ्या अर्ककीर्तीला बलभद्र आणि केशव यांनीं अन्तःकरणपूर्वक आनंदानें आलिंगन देऊन विसर्जन केलें १० नभश्चरेंद्र अर्थात् विद्याधरपति ज्वलनजटी राजानें आपलें व आपल्या कन्येचें स्वयप्रभेचें पाण्यानें भरलेले दोन डोळे आपल्या हातांनीं पुसून व तिला पतिव्रता स्त्रियांच्या वागण्याच्या पद्धतीचा उत्कृष्ट उपदेश करून आपल्या वायुवेगाराणीसह आपल्या रथनूपुर शहरास प्रयाण केलें.

नरेश्वरैः षोडशभिः समन्वितो हरिः सहस्रैः कमनीयमूर्तिभिः ॥
वधूभिरप्यष्टसहस्रसम्मितैः सुरैश्च नित्यं विरराज किंकरैः ॥११॥
निरीक्ष्य साम्राज्यमिति प्रजापतिः सुतस्य तस्य स्वमनोऽनुवर्तिनः॥
स्वबंधुवर्गैः सह पिप्रिये परं मनोरथेभ्योऽप्यतिरिक्तभूतिभिः ॥१२॥

स भूपतीनां च नभोविलंघिनां नखप्रभालीं मुकुटेषु पादयोः ॥
दिगंतरेष्विद्रुमरीचिनिर्मलां निधाय कीर्तिं च शशास मेदिनीं ॥१३॥

स्वपादानम्रान्सचिवस्य शिक्षया सपत्नबालानवलोक्य केशवः ॥
परानुकंपामकरोद्दयार्द्रधीर्दयालवो हि प्रणतेषु साधवः ॥ १४ ॥
अकालमृत्युर्न बभूव देहिनां मनोरथानामगतिर्न कश्चन ॥
अकृष्टपच्यांचितशस्यशालिनी तदीयपुण्येन धरापि सा सदा॥१५॥

सुखाय सर्वत्र सदा शरीरिणां ववौ तदिच्छामनुवर्तयन्मरुत् ॥
महीरजःक्षालनमात्रमंबुदाः सुगंधितोयं ववृषुर्दिने दिने ॥ १६ ॥
उपास्त सर्वर्तुगणो निरंतरं निजद्रुमाणां प्रसवैश्च वीरुधां ॥
समंतमन्योऽन्यविरोधवानपि प्रभुत्वमाश्चर्यकरं हि चक्रिणः॥ १७॥

सुराज्ञि यस्मिन्परिपाति मेदिनीमनूनवृत्तेषु समुन्नतात्मसु ॥
मृगेक्षणानामुरुयौवनश्रियां कुचेषु काठिन्यमभूच्च सोष्मता ॥१८॥
अवाप्तसाधुश्रवणेषु सायतिं दधत्सु कान्ति धवलेषु केवलं ॥
परिप्लवत्वं नयनेषु योषितामलक्ष्यतान्तर्मलिनत्वमप्यलं ॥ १९ ॥

११ हा त्रिपृष्ट केशव सोळा हजार मांडलिक राजे व सोळा हजार सुंदर स्त्रिया व नोकर असलेल्या आठ हजार देवांनीं नेहमी फार शोभू लागला. ११ आपल्या मनाला अनुकूल अशा रीतीनें वागणाऱ्या आपल्या मुलाचें हें उत्कृष्ट राज्य पाहून व मनांत इच्छिल्या पेक्षांही अधिक प्राप्त झालेलें ऐश्वर्य बघून प्रजापति महाराज आपल्या बंधुवर्गासह फार खुप झाले. १३ त्रिपृष्टकेशव आकाशांतून गमन करणाऱ्या विद्याधरांच्या मुकुटावर आपल्या दोन पायांच्या नखकांतीचा समूह ठेवून व दहा दिशांच्या मध्यभागांत चंद्राप्रमाणें निर्मल अशी कीर्ति ठेवून सर्व पृथ्वीचें राज्य करूं लागला. १४ प्रधानजीच्या उपदेशानें आपल्या चरणास नमस्कार करणाऱ्या शत्रूंच्या मुलांना पाहून दयेनें ज्याची बुद्धि ओली झाली आहे अशा त्रिपृष्ठानें त्यांच्यावर फार दया केली. बरोबरच आहे कीं, सज्जन नम्र झालेल्यावर दयाच करीत असतात. त्रिपृष्ठाच्या राज्यांत अकालीं मरण नव्हतें व सर्वांचें मनोरथ पूर्ण होत असत. याच्या पुण्यानें सर्व पृथ्वी न नांगरतांच पिकणाऱ्या धान्यांनीं नेहमीं भरलेली होती. १६ या राजाच्या इच्छेला अनुसरून वागणारा वारा सर्व ठिकाणी नेहमीं प्राण्यांना सुख देणारा असा वाहात होता. व दररोज मेघ जमीनीवरचा धुराळा उडविण्या पुरत्या सुगंधित पाण्याची वृष्टि करीत असत. १७ परस्परांशीं विरोध ठेवणारे असेही सर्व ऋतु आपल्या वृक्षांच्या व वेलींच्या पुष्पांनी नेहमी सर्वबाजूनें त्या चक्रवर्ती त्रिपृष्टाची सेवा करू लागले. यावरूच चक्रवर्तीचें प्रभुत्व आश्चर्यकारक होते. १८ उत्तम राजा असलेला हा चक्रवर्ती पृथ्वीचें पालन करीत असतां भर तारुण्याने शोभत असलेल्या स्त्रियांच्या गोल पूर्ण भरलेले, उंच अर्थात् पुष्ट असलेले, अशा स्तनांच्या ठिकाणींच कठिणपणा व उष्णपणा होता. परतु अनूनवृत्त–सदाचार परिपूर्ण व समुन्नत अशा सज्जनांच्या ठिकाणीं कठिणपणा–अर्थात् अंत:करणें कठोर असणें, व सोष्मता–उतावीळपणा किंवा क्रोध असणें या गोष्टी नव्हत्या. १९ उत्ताम अशा कानापर्यंत प्राप्त झालेले, दीर्घपणासह उज्वलपणा धारण करणारे अशा स्त्रियांच्या पांढऱ्या डोळ्यामध्येंच फक्त चचलपणा व आंत अधिक काळेपणा होता. परंतु जे अवाप्तसाधुश्रवण अर्थात् मिळविली आहे उत्ताम मुनींची संगाति ज्यांनीं अशा धवल–उत्ताम सत्पुरुपाच्या ठिकाणी–निर्मळ मनांच्या सज्जनांच्या ठिकाणीं परिप्लवत्व–चचलपणा अन्तर्मलिनत्व म्हणजे आंतून काळेपणा–कपटी स्वभाव हे दुर्गुण मुळींच नसत.

सदांतरार्द्रेषु धरासु वर्षणाद्रजोविकारप्रसरापहारिषु ॥
अजायताभ्रेषु विचित्ररूपता निरर्थकं गर्जितमप्यकारणं ॥ २० ॥
अलंघनीयस्थितिमत्सु भूतले प्रशस्तवंशेषु वहत्सु तुंगतां ॥
धराधरेष्वेव सदा विपक्षिता बभूव दुर्मार्गगतिश्च निश्चिता ॥२१॥
अनूनसत्वा बहुरत्नशालिनो महाशया धीरतया समन्विताः ॥
सुदुःप्रवेशां स्थितिमूहुरर्थिनां प्रसिद्धदुर्गाहतयांबुराशयः ॥ २२ ॥
कलाधरेषु क्षणदाकरेऽभवत्प्रदोषसंगक्षयवृद्धिवक्रता ॥
महोत्पले श्रीनिलयेषु च क्षितौ जलस्थितिर्मित्रबलाद्विजृंभणं ॥२३॥
सुतिप्रियश्चारुफलेषु पादपो मधुप्रियोऽलिः सुमनोऽनुवर्तिषु ॥
दुरासदोऽभूदहिरेव भोगिषु स्फुरद्द्विजिव्हात्मतया मनीषिभिः २४

२० सदांतरार्द्र म्हणजे नेहमी पाण्यानें ओथंबलेले व धरासु वर्षण अर्थात् पृथ्वीवर पाण्याची वृष्टि करून रजोविकारप्रसरापहार करणारे अर्थात् सर्व धूळ व अस्वच्छ पणा दूर करणाऱ्या अशा मेघामध्येच फक्त त्या ठिकाणीं विचित्ररूपता, निरर्थक व निष्कारण गर्जना करणें ह्या गोष्टी आढळून येत असत. लोक देखील नेहमी अंत-रार्द्र होते—दयाळु होते. गरीब लोकांना सुवर्षण करीत होते—दान देत होते रजो-विकारांचा अर्थात् पापाचे विकार जे रागद्वेष त्यांचा अपहार—नाश करीत होते. परंतु ते विचित्ररूपाचे नव्हते अर्थात् एक रूपाचे निष्कपटी होते. निरर्थक व विनाकारण-गर्जना करीत नव्हते म्हणजे कार्यप्रसंगीं योग्य शौर्य व भाषण करीत असत. २१ या भूतलावर पर्वतच अलंघनीयस्थितिमान् होते—उल्लंघता न येण्याजोगे होते व प्रशस्तवंश होते अर्थात् उन्नत वेळूंच्या बेटांनीं युक्त होते. व तुंगता त्यांनीं धारण केली होती अर्थात् अतिशय उंच होते. त्यांच्या ठिकाणींच विपक्षिता पंख-रहित पणा व दुर्मार्गगति वाईट मार्गाचा खाच खळग्यांच्या मार्गाचा प्रवेश होता. या त्रिपृष्ट चक्रवर्तीच्या राज्यांतील लोक अलंघनीयस्थितीचे होते—मर्यादा न उल्लंघणारे होते. प्रशस्तवंशामध्यें—कुलामध्ये जन्मलेले होते व ते आपली तुंगता मोठेपणा कायम ठेवीत असत. पण ते विपक्षतेला विशिष्ट पक्षाला—उत्तम राजाला धारण करीत असून दुर्मार्गगतिचे नव्हते पापमार्गानें वागणारे नव्हते. २२ या राजाच्या राज्यांतील समुद्र अनूनसत्व— विपुल जलचर प्राण्यांना धारण करणारे

बहुरत्नशाली व महाशय–विस्तीर्ण आणि धीरतया–गंभीरपणानें युक्त होते परंतु प्रसिद्ध असे दुर्ग्राह–क्रूर मगर वगैरेंनीं युक्त असल्यामुळें अर्थी लोकांना व्यापारी सुदुष्प्रवेश्य होते परंतु या राज्यांतील श्रीमंत लोक अनूनसत्व–पुष्कळ औदार्य गुणधारक, पुष्कळ रत्नांनीं युक्त, महाशय–उत्तम विचाराचे व धीरपणानें युक्त होते.परंतु दुर्ग्राही दुराग्रही नसल्यामुळें याचक लोक तेथें प्रवेश करीत असत.२३ कला धारण करणाऱ्यांपैकीं चंद्रामध्येंच प्रदोष संसर्ग– रात्रीचा संसर्ग होणें, क्षय, वृद्धि वांकडेपणा हे दोष होते. तेथील कला जाणणारे लोकांत हे दोष नव्हते तसेंच तेथें लक्ष्मीचें निवासस्थान बनलेल्यामध्यें कमलच फक्त या भूतलावर जलास्थिती युक्त–पाण्यामध्यें राहणारे, व मित्रबलाद्विजृंभण अर्थात् सूर्यापासून विकास पावणें या स्वभावांनीं युक्त होते. तेथील लोक जडास्थिती–मूर्खांच्या संबंधानें युक्त व मित्राच्या सामर्थ्यानें उच्छृंखल बनलेले नव्हते. २४ चारुफलविपर्या– सुंदर फलाविषयीं सुविप्रिय–अगदीं प्रतिकुल फक्त वृक्षच होता. अर्थात् तो सु– उत्तमरीतीनें–विप्रिय–पक्ष्यांना आवडता होता. झाडाला उत्तम फळें आली असतां तो पक्षांचा आवडता बनतो. तेथील लोक सुंदर असें जें पुण्यफल त्याविषयीं सुविप्रिय–प्रतिकूल नव्हते. सुमनोनुवर्ती अर्थात् विद्वानांचे अनुसरण करणाऱ्यामध्यें कोणी मधुप्रिय–दारू ज्याला प्रिय आहे असा नव्हता. फक्त सुमनोनुवर्ती–फुलांना अनुसरणाऱ्यामध्यें मधुप्रिय -मकरंद ज्याला आवडतो असा फक्त अलि–भृंग होता. भोगि लोकांत--विलासी लोकांत विद्वान लोकांना कोणीही द्विजिव्हात्मतया दोन जिभांनीं युक्त अर्थात् चहाडखोर आढळून आला नाहीं परंतु भोगि लोकांत–सर्पसमूहांत मात्र द्विजिव्हता दोन जिभांनीं युक्त असणें ही अवस्था विद्वान लोकांना आढळून आली.

बभार हारो गुणवत्सु केवलं सुवृत्तमुक्तात्मकतामनारतं ॥
सदा परेषां मणिमेखलागुणः सुजातरूपेषु कलत्रमग्रहीत् ॥ २५ ॥

प्रियावियोगव्यथया कृशीकृतो निशासु कोको भुवि कामुकेष्वभूत् ।
ननाम मध्यः कुचभारपीडितो नितंबिनीनां न च दुर्बलःपरः ।२६।

इति प्रजासु प्रतिवासरं परां स्थितिं वितन्वन्विगतोरुसंभ्रमः ॥
ररक्ष रत्नाकरवारिमेखलां वसुंधरामेकपुरीमिवाच्युतः ॥ २७ ॥

असूत कालेन यथाक्रमं सुतौ स्वयंप्रभा कन्यकया सहैकया ॥
सुकोशदंडौ सममायतश्रिया धरेव तस्य प्रमदाय वल्लभा ॥ २८ ॥
परंतपः श्रीविजयोऽग्रजः सुतस्ततः कनीयान्विजयो यशोधनः ॥
प्रभोत्तरज्योतिरभिख्यया सती सुता च रेजे मृगशावलोचना ।२९।
पितुर्गुणांस्तावनुचक्रतुः सुतौ वपुर्विशेषेण समं समंततः ॥
विजित्य कांत्या तनुजा स्वमातरं बभूव शीलेन समा च केवलं ३०
नरेंद्रविद्यासु गजाधिरोहणे तुरंगपृष्ठे च समस्तहेतिषु ॥
अवापतुस्तौ नितरां च कौशलं कलासु सर्वासु च सापि कन्यका ३१
अथैकदा दूतमुखान्नभःस्पृशां निशम्य नाथं तपसि प्रतिष्ठितं ॥
प्रजापतिस्तत्क्षणमित्यचिंतयद्विधाय बुद्धिं विषयेषु निस्पृहाम् ।३२।
स एव धन्यो रथनूपुरेश्वरो मतिश्च तस्यैव हितानुबंधिनी ॥
सुखेन तृष्णामयवज्रपंजराद्विनिर्ययौ यो दुरतिक्रमादपि ॥ ३३ ॥

२५ गुणवानामध्यें फक्त हारच नेहमीं सुवृत्तात्मक होता अर्थात गोल व मोत्यांच्या समूहांनीं युक्त होता. इतर कोणी तेथें सुवृत्तमुक्तात्मक अर्थात् उत्तम अचरणानें रहित नव्हता. सुजातरूप—अर्थात नग्नरूप धारण करणाऱ्या मुनिमध्यें फक्त मेखलागुण अर्थात् कंबरपट्टा तोच नेहमीं उत्कृष्ट स्त्रियांची कंबर ग्रहण करीत असें अर्थात् सुजातरूप सोन्याच्या दागिन्यामध्यें फक्त रत्नाचा बनलेला कंबर पट्टा स्त्रिया आपल्या कंबरेत घालीत असत. २६ कामुक लोकामध्यें फक्त रात्रीं कोकपक्षीच प्रिया वियोग व्यथेनें युक्त होता अर्थात् त्यालाच फक्त आपल्या मादीचा विरह रात्रीं होऊन कृशपणा प्राप्त होत असे. या राजाच्या राज्यांत दुसरा कोणी दुर्बल झाला नव्हता. २७ याप्रमाणें प्रजेमध्यें प्रत्येक दिवशीं उत्कृष्ट स्थिति करणारा व शत्रूच्या मोठ्या भ्रमापासून रहित असलेला तो त्रिपृष्ठ नारायण समुद्राचें पाणी हेच जिचा कमरपट्टा आहे अशा संपूर्ण पृथ्वीचें एका नगराप्रमाणें रक्षण करु लागला. २८ स्वयंप्रभेला कांहीं काल लोटल्यावर दोन मुलगे व एक कन्या झाली. जणु पृथ्वीनें राजाला आनंदित करण्याकरितां विपुल लक्ष्मीसह कोश व दंड

उत्पन्न केले. २९ राजाच्या वडिल मुलाचें नांव श्री विजय असें होते व तो परंतप म्हणजे शत्रूंना त्रस्त करून सोडणारा होता. धाकट्या मुलाचे विजय असें नांव होते व तो यशरूपी धनानें युक्त होता. मुलीचे ज्योतिःप्रभा असे नांव होते व हरिणाप्रमाणें तिचे डोळे असल्यामुळें ती फार शोभत असे. ३० शरीराच्या सौंदर्यासह त्या उभय पुत्रांनी आपल्या बापाच्या गुणांचे पूर्ण अनुकरण केले. व सौंदर्याच्या बाबतीत ज्योतिःप्रभेने आपल्या मातेला जिंकिलें होतें. पण शीलानें मात्र ती आईच्या बरोबरीची होती. ३१ राजविद्येत—नीतिशास्त्रांत, हत्तीवर चढणें, घोड्यावर चढणें, व सर्व प्रकारच्या शस्त्रास्त्रामध्यें त्या दोन मुलांनीं पूर्ण प्राविण्य मिळाविलें होते. व कन्येने हि सर्व प्रकारच्या कलामध्यें चातुर्य प्राप्त करून घेतले होतें. ३२ एकेवेळी दूताच्या तोंडून विद्याधराचा अधिपति ज्वलनजटी हा दीक्षा घेऊन तपश्चरणामध्ये लीन झाला आहे ही हकीकत ऐकून प्रजापति महाराजांची बुद्धि पंचेंद्रिय विषयामध्ये निःस्पृह झाली तेव्हां याप्रमाणे ते विचार करू लागले. ३३ सहज रीतीनें ज्यांतून निघणे फार कठिण आहे अशा आशारूपी पिंजऱ्यांतून ज्या अर्थी रथनूपुराधिपति ज्वलनजटी मुक्त झाला त्या अर्थी तोच खरोखर धन्य झाला असे मी समजतो व त्याचीच बुद्धि हिताला अनुसरणारी आहे असे मी मानितो.

अशेषभावाः क्षणभंगुरा न किं किमस्ति लेशोऽपि सुखस्य संसृतौ।
तथापि जीवः स्वहिते न वर्तते करोत्यकार्यं बत बोधदुर्विधः ।३४।

यथा यथायुर्गलति प्रतिक्षणं तथा तथा प्राणितुमेव वांछति ॥
असक्तमात्मा विषयैर्वशीकृतो न जायते तृप्तिरथास्य तैरपि ॥३५॥

* नदीसहस्रैरिव यादसांपतिस्तनूनपादिंधनसंचयैरिव ॥
चिराय संतुष्यति कामघस्मरो न कामभोगैः पुरुषो हि जातुचित् ।३६।

---

* टिप्पणीः—दहनस्तृणकाष्ठसंचयैरपि तृप्येदुदधिर्नदीशतैः ॥
न तु कामसुखैः पुमानहो बलवता खलु कापि कर्मणः ॥ ७२ ॥

चंद्रप्रभचरिते प्रथमसर्गे—समानार्थकः श्लोक. ॥

इमे मम प्राणसमाः सनाभयः सुतोऽयमिष्टः सुहृदेष वल्लभः ॥
इयं च भार्या धनमेतदित्यहो विचेतनस्ताम्यति चिंतयन्मुधा ॥३७॥
शुभाशुभं कर्मफलं समश्नुते ध्रुवं पुमान्प्राक्तनमेक एव हि ॥
अतःस्वतोऽन्यःस्वजनःपरोऽपि वा न विद्यते कश्चन देहधारिणाम्॥३८
किमिंद्रियार्थैः पुरुषो न विस्रसा प्रहीयते कालवशादुपागतः ॥
इदं तु चित्रं न जहाति तान्स्वयं समुज्झितोऽपि प्रसभं जरातुरः॥३९॥
असक्तमादौ मधुरं मनोहरं विपाककाले बहुदुःखकारणं ॥
उशन्ति सन्तो विषयोद्भवं सुखं सुपक्वकिंपाकफलाशनं यथा ॥४०॥
सचेतनः स्थातुमिहोत्सहेत को वृथैव ताम्यन् विषयेच्छया गृहे ॥
सुदुस्तरस्यापि जिनेंद्रशासने भवांबुधेरुत्तरणप्लवे सति ॥ ४१ ॥
निवृत्तरागप्रसरस्य यत्सुखं शमात्मकं शाश्वतमात्मनि स्थितं ॥
दुरंतमोहानलतप्तचेतसः किमस्ति तस्यैकलवोऽपि रागिणः ॥४२॥
जिनोदितं धर्ममवेत्य तत्वतः समीहते यो विषयान्निषेवितुं ॥
पिबत्यसौ जीविततृष्णया विषं विहाय पाणावमृतं विचेतनः ॥४३॥

३४ जगांतील सर्व पदार्थ क्षणांत नाश पावणारे नाहींत काय? या संसारात वास्तविक विचार करून पाहिला असतां सुखाचा लेश देखील आहे काय? तरी देखील ज्ञानहीन जीव आपल्या हिताकडे वळत नाहीं. मात्र अकार्य करीत आहे. हें आश्चर्य आहे. ३५ हा आत्मा प्रत्येक क्षणीं जसें जसे याचें आयुष्य कमी होत चाललें आहे. तसें तसे जगण्याचीच इच्छा करीत आहे. हा पंचेंद्रियांच्या विषयांनीं–स्त्री वगैरे पदार्थांनी अधिक पराधीन करून सोडला आहे. या पदार्थांचा हा नेहमी उपभोग घेत आहे. तथापि याची तृप्ति होतच नाहीं. जसा समुद्र हजारो नद्यांच्या पाण्यांनी तृप्त होत नाहीं. लांकडांच्या समुदायानी जशी अग्नीची तृप्ति होत नाहीं तशी कामपीडित झालेल्या या आत्म्याला केव्हांही कामभोगांनी तृप्ति होत नाहीं. ३७ हे माझे बंधु प्राणासारखे प्रिय आहेत. हा माझा मुलगा मला फार आवडतो. हा माझा आवडता मित्र आहे. ही माझी बायको, हे माझे धन आहे, असा विचार करणारा हा मूर्ख आत्मा व्यर्थ दुःखित

पावत आहे. ३८ या आत्म्यानें पूर्व जन्मीं जें शुभ किंवा अशुभ कर्म केलेलें असतें त्याचें फल या एकट्यालाच अवश्य भोगावें लागतें. वास्तव या देहधारक आत्म्याला स्वतःपेक्षां दुसरा स्वजन-बंधु नाहीं व स्वतःपेक्षां पर-शत्रु ही नाहीं. स्वतः हा आत्मा आपलें धर्माचरणानें कल्याण करून घेईल तर हा आत्माच स्वतःच बंधु आहे. व अधर्माचरण करील-विषयी बनेल तर हाच स्वतःचा शत्रू आहे. ३९ कालवश होऊन हे इंद्रियभोग्य पदार्थ आपण होऊन या आत्म्याचा स्वाभाविक रीतीनें त्याग करीत नाहींत काय? अवश्य त्याग करितातच, परंतु वृद्धावस्थेनें अगदीं विकळ झालेला असा ही हा आत्मा त्यांवि-षयाकडून सोडला गेला असतांही त्यांना सोडूं इच्छित नाहीं. हें मात्र आश्चर्य आहे. ४० पंचेंद्रियांच्या विषयापासून उत्पन्न झालेलें सुख प्रथमतः अधिक मनोहर व मधुर वाटतें परंतु परिणामीं पुष्कळ दुःखाला कारण आहे. यास्तव या सुखाला सत्पुरुष किंपाक फळाच्या भक्षणाची उपमा देतात. तें फळ नयन मनो-हर व गोड असतें. परंतु त्याचा परिणाम प्राणहारक असतो. ४१ संसारसमुद्र अगाध असल्यामुळे तरून जाण्यास कठिण आहे. परंतु जिनशासन-जिनाची उपदेशरूपी नौका हीच यांतून तरून जाण्याचा उपाय आहे. असें असतां या विषयेच्छेला बळी पडून व्यर्थच दुःखी बनून घरामध्यें राहाण्याला कोण बुद्धि-मान मनुष्य उत्सुक होईल बरें? ४२ ज्यांचे रागद्वेष नष्ट झाले आहेत अशा आत्म्याच्या ठिकाणीं शांति स्वरूपाचें जें अविनाशी सुख उत्पन्न होतें त्या सुखाचा एक थेंब देखिल दुःखदायक मोहरूपी अग्नीनें ज्याचें मन सदैव होरपळत आहे अशा सराग पुरुषाला प्राप्त होत असतो काय? केव्हांही नाहीं. ४३ श्रीजिनेश्वराच्या धर्माचें परमार्थ रीतीनें स्वरूप जाणून जो आत्मा पुनः विषयांचा उपभोग घेण्याची इच्छा ठेवितो तो मूर्ख मनुष्य हातांतील अमृताचा त्याग करून जगण्याच्या इच्छेनें विषप्राशन करितो असें समजावें.

जरागृहीतं नवयौवनं यथा निवर्तते नैव पुनः कदाचन ॥
तथायुरारोग्यमपि प्रतिक्षणं विलुप्यमानं नियतेन मृत्युना ॥४४॥

अवाप्य सम्यक्त्वमतीव दुर्लभं पुनर्भवक्लेशविनाशनक्षमं ॥
वहेत कोऽन्योऽहमिव प्रमत्तधीः मुनिःफलं जन्म विना तपस्यया४५

निराकरोत्यक्षबलं बलीयसी जरा न यावत्सकलं च देहतः ॥
करोमि तावत्परिशेषमायुषस्तपस्ययाहं सफलं यथोक्तया ॥ ४६ ॥
चिरं विचिंत्यैवमुदारधीरतः सुतौ समाहूय तदा प्रजापतिः ॥
मुदाववादः क इति? स्वपादयोर्नताववादीदिति रामकेशवौ॥४७॥
इयं भवद्भिः स्थितिराजवंजवी पुरःसरैः किं विदिता न धीमताम् ॥
उषःसुरेंद्रायुधमेघविद्युतां विनश्वरी श्रीरिव तत्क्षणांतरे ॥ ४८ ॥
समागमाः सापगमा विभूतयो विपन्निमित्ता वपुरामयात्मकं ॥
सुदुःखमूलं सुखमाशु यौवनं विलीयते जन्म च मृत्युकारणं ।४९
अनात्मनीने कुशलःक्रियाविधौ निसर्गतोऽयं स्वहिते जडः पुमान्॥
द्वयं यदीयं विपरीतमात्मनो भवेत्तदा मुक्तिरवाप्यते न कैः ॥५०॥
अनेकसंख्यासु कुयोनिषु भ्रमन्ननादिकालं कथमप्यदभ्रिरात् ॥
अयं जनः प्राप्य नृजन्म दुर्लभं प्रधानमिक्ष्वाकुकुलं समासदत् ॥५१
समग्रपंचेंद्रियशक्तिसंयुतः कुलाग्रणीस्तत्र कुशाग्रधीरहं ॥
हिताहितज्ञः समभूवमीशिता वसुंधरायाश्च समुद्रवाससः ॥५२॥
महात्मनां सीररथांगधारिणां सदा वशौ प्राग्रहरौ च मे सुतौ ॥
युवामभूतां खलु जन्मनः फलं किमस्त्यतोऽन्यद्भुवि पुण्यशालिनः ५३

४४ म्हातारपणानें पछाडलेलें नवयौवन जसें पुनः केव्हांही परतत नाहीं तसें प्रत्येकक्षणीं मृत्यूकडून आरोग्य व आयुष्य हें निश्चयानें लुटलें जात आहे. हें परत मिळण्याची आशा केव्हां ही करणे योग्य नाहीं. ४५ संसाराचें दुःख नाहींसें करण्यांत समर्थ असें अतिशय दुर्लभ सम्यग्दर्शन प्राप्त करून घेऊन उन्मत्त बुद्धीचा माझ्या सारखा दुसरा कोणता मनुष्य हा जन्म तपश्चरणा वांचून निष्फळ धारण करील बरें? ४६ जोपर्यंत या देहापासून जबरदस्त असें म्हातारपण इंद्रियांच्या शक्तीला हांकालून देत नाहीं तोपर्यंतच उरलेलें आयुष्य शास्त्रोक्त पद्धतीने मी तपश्चरण करून सफळ करीन अर्थात् मोक्षलाभ करून घेईन. याप्रमाणें बराच वेळ विचार करून उदार बुद्धीच्या प्रजापति महाराजांनीं दर्पानें ही हकीकत सांगण्याच्या इच्छेने आपल्या दोन मुलांना बोलाविलें. बलभद्र व केशव

या दोन मुलांनीं महाराजांच्या चरणांना नमस्कार केल्यावर ते त्या दोन पुत्रांना पुढें लिहिल्याप्रमाणें बोलू लागले. ४८"प्रातःकालचा लालिमा, इन्द्रधनुष्य, मेघ व वीज याप्रमाणें ही सर्व संसारांतील संपत्तींची स्थिति आहे. ही तत्क्षणांत नाश पावते. आपण दोघे विद्वानामध्यें अग्रेसर आहात. आपणास हें माहीत नाहीं असें नाहीं. ४९ पुत्र, मित्र, भार्या वगैरेचा संयोग नाश पावणारा आहे. संपत्ति ही विपत्तींचें कारण आहे. शरीर हें रोगाचें घर आहे. सांसारिक सौख्य हें दुःखाचें मूळ आहे. यौवन नाशवंत आहे व जन्म हा मृत्यूला कारण आहे. ५० हा मूर्ख आत्मा ज्या कार्याच्या करण्यानें याचें अकल्याण होतें असेंच कार्य करीत असतो व याचें करणें स्वाभाविक होऊन बसलें आहे. स्वहिताच्या कार्यामध्यें याची बुद्धि अगदीं जड होऊन बसली आहे. हिताहिताविषयीं असा विपरीतपणा होऊन बसल्यामुळें त्याला मुक्ति कोणत्या कारणामुळें होईल ? अर्थात् हा कल्याणकारक कामें करील व आयोग्य कामें सोडून देईल तर त्याला चांगल्या कारणांनीं मुक्ति कां प्राप्त होणार नाहीं ? अवश्य होईल. ५१ मी अनादिकालापासून असंख्यात कुयोनींत फिरलों आहे. मला मनुष्यजन्म फार दिवसांनीं प्राप्त होऊन त्यांत श्रेष्ठ अशा ह्या इक्ष्वाकु वंशाची प्राप्ति झाली आहे. ५२ मी पांच इंद्रियांच्या शक्तीनें परिपूर्ण इक्ष्वाकु वंशांचा पुढारी पुरुष, तीव्र बुद्धियुक्त आणि हिताहित जाणणारा झालों आहे. व समुद्ररूपी वस्त्र जिनें धारण केलें आहे अशा या पृथ्वीचा अधिपति झालों आहे. ५३ महात्मा असे बलभद्र व नारायण यांच्या पैकीं पाहिले, कोणाच्याही स्वाधीन न राहाणारे असे तुम्ही दोघे माझे पुत्र आहात यास्तव पुण्यशाली अशा माझ्या जन्माचें या भूतलावर या शिवाय वेगळें आणखी कोणतें फळ आहे सांगा बरें ?

अपत्यवक्त्रांबुजवीक्षणावधीश्चिरंतनानां गृहवासवासिनां ॥
ननु प्रसिद्धादिजिनेंद्रसंततेः कुलस्थितिःसा विफलीकृता मया ५४
अतोऽनुगच्छाम्यधुनापि पावनीं दिगंबराणां पदवीं यथाक्रमं ॥
विमुक्तिसौख्यस्पृहयैव वामहं निराकरोमि प्रणयं च दुस्त्यजं॥५५॥
निगद्य पुत्राविति पुत्रवत्सलः प्रजापतिस्तन्मुकुटांशुरज्जुभि : ॥
निबद्धपादोऽपि ययौ तपोवनं निबंधनं नास्ति हि भव्यचेतसां ५६

प्रणम्य पादौ वशिनामधीशितुर्यथार्थनाम्नः पिहितास्त्रवस्य सः ॥
नरेश्वरैः सप्तशतैः परां दधौ धुरं मुनीनां सह शांतमानसैः ॥५७॥
यथोक्तमार्गेण सुदुश्चरं परं तपो विधायाप्रतिमं प्रजापतिः ॥
निरस्य कर्माष्टकपाशबंधनं जगाम सिद्धिं निरुपद्रवश्रियं ॥५८॥
अथान्यदा यौवनसंपदा सुतां विगाह्यमानामवलोक्य माधवः ॥
ततास कोऽस्याः सदृशो भवेद्भुवा वरो वरीयानिति चिंतयन्मुहुः ५९
स्वयं परिच्छेत्तुमपारयन्नयं नयप्रवीणैः सचिवैः समन्वितः ॥
उपह्वरे कृत्यविनिश्चयेच्छया प्रणम्य संकर्षणमित्यभाषत ॥ ६० ॥
पितुः समक्षेऽपि भवान्धुरंधरः कुलस्य नस्तद्विगमे विशेषतः ॥
करोति लोकस्य रविप्रभेव ते तमोपहा धीः सकलार्थदर्शिनी॥६१॥
अतः समाचक्ष्व विचिंत्य तत्त्वतो भवत्सुतायाः सदृशं मसार्य तं ॥
कुलेन रूपेण कलागुणादिभिः पतिं नरेंद्रेषु नभश्चरेषु च ॥६२॥
उदीरितायामिति वाचि चाक्रिणा ततो हलीत्थं निजगाद भारतीं
मरीचिभिः कुंदसितैर्द्विजन्मनां प्रवृद्धहारांशुपिनद्धकंधरः ॥६३

५४ श्रीआदिनाथ भगवंताच्या वंशपरंपरेंत उत्पन्न झालेले जे प्राचीन गृहवासी श्रावक राजे होते ते मुलाच्या मुखकमलाचें दर्शनापर्यंतच घरांमध्यें राहत होते अशी या इक्ष्वाकु वंशाची आजपर्यंत प्रसिद्धी आहे. परंतु या पद्धतीला मी विफल केलें अर्थात् मोडून टाकिलें ५५ यास्तव आतां कां होईना मी दिगंबर मुनींच्या पवित्र मार्गाचें क्रमानुसार अनुसरण करितो. तुमच्या दोघांविषयीं माझ्या अंतःकरणांत न तुटणारा असा स्नेह आहे पण मोक्षसुखाच्या इच्छेनें तुमचा तो स्नेह आज मी सोडून देत आहे. " ५६ पुत्राविषयीं प्रेमळ अशा प्रजापति महाराजांनीं याप्रमाणें भाषण केलें व त्यांच्या मुकुटांच्या किरणरूपी दोरखंडांनीं ज्यांचे पाय बांधले गेले आहेत असेहि ते प्रजापति महाराज तपोवनाला निघून गेले. बरोबरच आहे कीं, ज्यांना मोक्षप्राप्ति लौकरच होणार आहे अशा भव्यजीवांच्या मनःप्रवृत्तीला कोण बरें रोकूं शकतो? कोणी ही रोकूं शकत नाहीं. ५७ वनामध्यें जितेंद्रिय मुनिसमुदायांत पुढारी व पिहितास्त्रव कर्माच्या शुभ व अशुभ

आस्रवास रोकणारे असें यथार्थ नांव धारण करणाऱ्या मुनीश्वराच्या दोन पायास वंदन करून शांत अंतःकरणाच्या ७०० शे राजांसह मुनीश्वरांच्या अग्रपदवीस प्रजापति महाराजानें धारण केलें ५८ आगमांत सांगितलेल्या पद्धतीस अनुसरून अतिशय कठिण व उपमारहित असें तपश्चरण प्रजापति महाराजांनीं करून ज्ञानावरणादि आठही कर्मांच्या जाळ्याचें बंधन तोडून टाकिलें व दुःखाचा लेशही जिच्यांत नाहीं, अनंत ज्ञानादि संपत्तीने युक्त असलेल्या मुक्तीस ते प्राप्त झाले. ५९ इकडे कांहीं दिवस गेल्यावर ज्योतिःप्रभा कन्या तारुण्याच्या संपत्तीने युक्त झालेली आहे असे त्रिपृष्ठ नारायणाच्या दृष्टीस पडले. तेव्हां कांतीने हिच्या जोडीचा श्रेष्ठ असा पति होण्यास कोणता राजपुत्र योग्य आहे. असा वारंवार तो विचार करू लागला. या विचारानें त्याच्या अंतःकरणांत खिन्नता उत्पन्न झाली. ६० जेव्हां स्वतःच्या बुद्धीने निर्णय करण्यास त्रिपृष्ठ नारायण असमर्थ झाला तेव्हां राजनी-तीमध्यें प्रवीण असलेल्या प्रधानांसह एकांत ठिकाणी या कृत्याचा निर्णय करून घेण्याच्या इच्छेने बलभद्राला नमस्कार करून तो या प्रमाणें बोलला ६१–आपले वडिल प्रजापति महाराजांच्या समक्षही आपणच सर्व वंशाचा भार धारण केला होता व त्यांच्या अभावीं ही आपणच विशेष रीतीनें वंशाचें ओझें धारण करीत आहात. जसें सूर्याची कांति अंधाराचा नाश करिते. तसे आपली बुद्धि सूर्यकांति प्रमाणे अज्ञान रूपी अंधाराचा नाश करून सर्व पदार्थांच्या स्वरूपाचा परमार्थरीतीनें निर्णय करून देत असते. ६२ यास्तव हे आर्या! हे पूज्या! परमार्थ रीतीनें विचार करून विद्याधर राजे व भूमिगोचरी राजे यामध्ये कुलानें गुण व ऐश्वर्य वगैरेंनीं आपल्या ज्योतिःप्रभा कन्येला योग्य असा पति कोण आहे. हें मला सांगा" ६३ याप्रमाणे त्रिपृष्ठ नारायणाने भाषण केल्यानंतर कुंदपुष्पाप्रमाणें पांढऱ्या दंत किरणांनीं ज्याचे किरण अधिक वाढले आहेत अशा हारांच्या कांतीने ज्यानें आपला गळा आच्छादित केला आहे अशा बलभद्रानें पुढे लिहिल्या प्रमाणें बोलण्यास सुरवात केली

पतिः कनीयानपि यः श्रियाधिको महात्मनां नात्र वयः समीक्ष्यते॥
भवादृशानामत एव नो भवान् गतिश्च चक्षुश्च कुलप्रदीपकः ॥ ६४॥
यथा न नक्षत्रमुदीक्ष्यते परं नभस्तले चंद्रकलासमाकृति ॥
तथैव न क्षत्रमपीह भारते भवत्सुताया न समास्ति रूपतः॥ ६५॥

चिरं स्वबुद्ध्या परिचिंत्य यत्नतो वयं दिशामो यदि तामनिंदिताम् ॥
नृपेषु कस्मैचिदतोऽपि किं तयोः समोऽनुरागो भवतीति निश्चयः ।६६।
न रूपमात्रं न कला न यौवनं भवेन्न सौभाग्यनिमित्तमाकृतिः ॥
प्रियेषु यत्प्रेमनिबंधनोचितं गुणांतरं तत्पृथगेव योषितां ॥ ६७ ॥
अतोऽनुरूपं स्वयमेव कन्यका वरं वृणीतां स्वधिया स्वयंवरे ॥
चिरं प्रवृत्तो नितरामयं विधिर्विधिश्च साफल्यमुपैतु तत्कृतः ॥६८॥
विचार्य कार्यांतरमित्युदारधीरुदीर्य रामो विरराम मंत्रिभिः ॥
समं तथेति प्रतिपद्य तद्विभुः स्वयंवरं दिक्षु चरैरघोषयत् ॥ ६९ ॥
अथार्ककीर्तिः स्वमतं निशम्य तत्सुतं गृहीत्वामिततेजसं स तं ॥
सुतां सुतारां च मनोरमाकृतिं सहाययौ पोदनमंबरेचरैः ॥ ७० ॥
अवाप्य राज्ञां शिबिरैः समंततः प्रवेशवेशेषु परिष्कृतं पुरं ॥
स्वयंवरोद्वाहसमुच्छ्रितैर्ध्वजैः स संकुलं राजकुलं समासदत् ॥७१॥
ससंभ्रमं प्रत्युदितौ बलाच्युतौ विलोक्य कक्षावलितोरणाद्बहिः ॥
ननाम साम्राज्यकृतोः क्रमद्वयं पुरा स ताभ्यां परिरंभणार्चितः ।७२।
तमर्ककीर्तेस्तनयं निरीक्ष्य तौ स्वपादनम्रं कमनीयतावधिं ॥
सुतां च कांत्या जितनागकन्यकां बभूवतुर्विस्मयनिश्चलेक्षणौ ।७३।

६४ जो वयानें लहान असूनही संपत्तीनें अधिक आहे तोच कुलाचा-वंशाचा मुख्य पुरुष मानला जातो. जे आपल्या सारखे महान पुरुष असतात त्यांच्या वयाकडे पहाण्याचें कारण नाहीं. यास्तव तूंच आमचा आधार आहेस, नेत्र आहेस व कुलामध्यें दीपासारखा आहे. ६५ जसे आकाशांत चंद्राच्या कलेसारखें दुसरें नक्षत्र आढळून येत नाही तसें हे बंधो! तुझ्या मुलीला तिच्या रूपास योग्य असा एकही राजकुमार या भरतक्षेत्रांत आढळून येत नाहीं. ६६ पुष्कळ वेळपर्यंत आपल्या बुद्धीने विचार करूनही मोठ्या प्रयत्नानें या निर्दोष कन्येला आम्ही राजसमूहामध्ये एखाद्याला अर्पण केली तरी त्या पतिपत्नीमध्यें समान प्रेम होईल असा निश्चय करतां येणे शक्य नाहीं. ६७ सौभाग्याला निमित्तकारण फक्त रूपच

किंवा कला अथवा तारुण्य किंवा उत्तम आकृति असतें असें नाहीं. स्त्रियांचें पतीमध्यें प्रेमाला कारण योग्य असे जे दुसरे गुण सांगितले आहेत अर्थात् ज्या गुणांनीं पतीवर प्रेम उत्पन्न होतें ते गुण रूप, तारुण्य, वगैरेपेक्षां भिन्नच आहेत. ६८ यास्तव स्वयंवरामध्यें ही कन्या आपल्या बुद्धीला अनुसरून स्वतःला अनुरूप अशा वराला वरो. ही स्वयंवराची पद्धति चिरकालापासून चालत आली आहे. यास्तव त्या स्वयंवराचा विधि आज सफल होवो. ६९ याप्रमाणें याचा व इतर कार्यांचा विचार करून व तद्विषयक भाषण बोलून उदारबुद्धीच्या बलभद्रानें स्तब्धपणा धारण केला. मंत्रिगणासह त्रिपृष्टनारायणाने ही आपली गोष्ट ठीक आहे असें म्हणून स्वीकारली व सर्व दिशामध्यें स्वयंवराची हकीकत दूतांच्या द्वारें प्रसिद्ध करविली. ७० ही स्वयंवराची हकीकत अर्ककीर्तीच्याही कानीं पडली तेव्हां अमिततेज नांवाच्या आपल्या मुलाला व सुतारा नांवाच्या सुंदर आकृतीच्या आपल्या मुलीला बरोबर घेऊन विद्याधरासह तो पोदनपुर शहरास आला. ७१ राजे लोकांच्या शिबिरासह शहरांत प्रवेश करण्याच्या ठिकाणीं सर्वत्र शोभा केली होती. स्वयंवरोत्सवासाठीं चोहीकडे ध्वजा उभ्या केल्या होत्या अशा उत्सवानें युक्त असलेल्या शहराला प्रथम प्राप्त होऊन नंतर उंच अशा ध्वजांनीं व्याप्त झालेल्य राजवाड्याकडे तो अर्ककीर्ति प्राप्त झाला. ७२ राजवाड्याला अनेक चौक होते व त्यांना तोरणें लावलेलीं होतीं. या चौकाच्या बाहेर आदरानें आलेल्या ऐश्वर्यशाली बलभद्र व नारायणाला पाहून आदराने साम्राज्य चालविणाऱ्यांच्या या दोघांच्या चरणाला अर्ककीर्तीनें त्यांनीं आलिंगन देऊन आदर करण्याच्या पूर्वी नमस्कार केला. ७३ आपल्या पायांना नमस्कार करणाऱ्या आणि सौंदर्याच्या श्रेष्टच्या सीमेला पोहोंचलेल्या अमिततेज नांवाच्या अर्ककीर्तीच्या मुलाला व आपल्या कांतीनें नाग कन्यकेला जिंकणाऱ्या त्याच्या मुलीला पाहून बलभद्र व त्रिपृष्ट आश्चर्यानें निश्चल झाले आहेत डोळे ज्यांचे असे झाले अर्थात् अर्ककीर्तीच्या या मुलगा व मुलीच्या रूपाला पाहून त्यांना फार आश्चर्य वाटले.

कुलध्वजः श्रीविजयः स्वसातुलं समं ववंदे विजयेन तत्क्षणं ॥
विलोक्य तौ सोप्यभवन्मुदाकुलः सुखं किमन्यान्निजबंधुदर्शनात्॥७४॥
पुरस्सरीभूतबलाच्युतस्ततः प्रविश्य राजालयमुत्सवाकुलं ॥
स्वयंप्रभां पादनतां च सस्नुषां यथोचिताशीर्वचनैरपूजयत् ॥७५॥

तदा सुतारामिततेजसौ समं निरीक्ष्य पादावनतौ स्वयंप्रभा ॥
मनोरथेनात्मसुतद्वये तौ नियोजयामास विना स्वयंवरं ॥ ७६ ॥
स्वमातृसंकल्पवशीकृतेव सा निबद्धभावामिततेजसि ध्रुवं॥
अभूत्सुता चक्रधरस्य योषितां मनो विजानाति हि पूर्ववल्लभं॥७७॥
सुतारया श्रीविजयस्य मानसं समाददे तेन तदीयमप्यलं ॥
विजीहितापांगनिरीक्षितैर्मुहुर्भवांतरस्नेहरसो हि तादृशः ॥७८॥
अथान्हि शुद्धे सुविशुद्धलक्षणैः सखीजनैः कल्पितसर्वमंगला ॥
स्वयंवरस्थानमगादुडुप्रभा मनोरथान्व्यर्थयितुं महीभुजां ॥ ७९ ॥
अतीत्य सर्वान्विधिना वयस्यया निवेदितान्राजसुतान् क्रमेण सा॥
न्हिया परावृत्य मुखं व्यसंजयच्चिराय कंठेऽमिततेजसःस्वयं ॥८०॥
ततः सुतारा प्रविहाय पार्थिवान्स्वयंवरे श्रीविजयस्य बंधुरं ॥
बबंध गाढं कुसुमस्रजा गलं मनोजपाशेन मनोऽप्यलक्षितं ॥ ८१ ॥
कृत्वा यथोचितमथात्मजयोर्विवाहमन्योन्यशृंखलितबंधुतयातितुष्टः॥
स्वस्रा बलेन हरिणा च नमस्खरेंद्रो मुक्ताश्चिरात्कथमपि स्वपुरं जगाम॥
साम्राज्यमित्थमनुभूय चिरं निजेष्टैराकृष्टधीरातितरां विषयैर्मनोज्ञैः॥
शार्ङ्गायुधो निजनिदानवशेन रौद्रध्यानेन जीवितविपर्ययमाप मुग्धः॥

७४ इक्ष्वाकुवंशाला ध्वजासारखा असलेल्या श्रीविजय नांवाच्या त्रिपृष्ठनारायणाच्या वडिल मुलानें आपल्या विजय नांवाच्या धाकट्या भावासह तत्काल आपल्या मामाला ( अर्ककीर्तीला ) नमस्कार केला. त्या उभयतांना पाहून अर्ककीर्तीला फार आनंद झाला. बरोबरच आहे कीं, आपल्या प्रेमळ नातेवाईकांच्या दर्शनापेक्षां या जगांत दुसरें सुखकारक काय आहे ? कांहींच नाहीं. ज्याच्या पुढें बलभद्र व नारायण जात आहेत अशा त्या अर्ककीर्तिनें उत्सवानें युक्त असलेल्या राजवाड्यांत प्रवेश करून तेथें पाया पडलेल्या स्वयंप्रभेला व आपल्या भावी स्नुषेला (सुनेला) अर्थात् ज्योतिःप्रभेला आशीर्वादाच्या शब्दांनीं आदरिलें. ७६ त्यावेळीं सुतारा व अमिततेज या उभयतांनीं स्वयंप्रभेच्या चरणांना नमस्कार

केला. या उभयतांना पाहून तिनें आपला मुलगा व मुलगी या उभयतांना हे दोघेजण पत्नी व पति होण्याला योग्य आहेत असें स्वयंवर विधि झाला नाहीं तोच तिनें मनाच्या विचारांनीं ठरऊन टाकिलें. ७७ आपल्या मातेच्या विचाराच्या जणु आधीन झाल्याप्रमाणे त्रिपृष्ट नारायणाची कन्या ज्योतिःप्रभाही अमित तेजावर अतिशय अनुरक्त झाली. बरोबरच आहे कीं, स्त्रियाचें मन पूर्वजन्मी आपला पति कोण होता हें ओळखीत असतें. ७८ एकमेकांकडे वारवार कटाक्षपातांनी पाहणे हीच किंमत देऊन सुतारेने श्रीविजयाचें मन व श्रीविजयाने सुतारेचें मन ग्रहण केलें. बरोबरच आहे कीं, पूर्वजन्माचा प्रेमरस असाच अनिर्वचनीय असतो. ७९ या नंतर उत्तम दिवशीं उत्तम लक्षणांनीं युक्त असलेल्या मैत्रिणींनीं जिचा सर्व मंगलविधि केलेला आहे अशी ती ज्योतिःप्रभा राजकन्या सर्व राजे लोकांच्या मनोरथांना व्यर्थ करण्यासाठीं स्वयंवरस्थानीं गेली. ८० विधिपूर्वक मैत्रिणीनें ज्यांचीं नांवें सांगितली आहेत अशा सर्व राजपुत्रांना क्रमाने ओलांडून व लाजेनें आपलें मुख फिरऊन ज्योतिःप्रभेनें कायमचीच अमिततेजाच्या गळ्यांत माळ घातली. ८१ यानंतर स्वयंवर मंडपांत सुतारेनें राजाना सोडून श्रीविजय राजाचा सुंदर गळा पुष्पमालेनें बांधला. अर्थात् त्याच्या गळ्यांत माला घातली. व मदनाच्या पाशानें न दिसणारें मन देखिल त्याचे तिनें बांधून टाकिलें. ८२ याप्रमाणें आपल्या दोन्हीं मुलामुलींचें योग्यरीतीनें लग्न करून एकमेकांचें नातें दृढ झाल्यामुळें आनंदित झालेल्या त्या अर्ककीर्तीला बलभद्र नारायण व स्वयंप्रभा यांनीं फार दिवसांनी मोठ्या कष्टाने परवानगी दिली. तेंव्हां तो आपल्या नगरास ( रथनूपुरास ) गेला. ८३ याप्रमाणें दीर्घकालपर्यंत साम्राज्याचा उपभोग घेऊन मनोमोहक अशा आवडत्या विषयांनीं ज्याची बुद्धि आकर्षित झाली आहे असा तो शार्ङ्गधनुष्यधारक त्रिपृष्ट निदानवश होऊन रौद्रध्यानानें निजलेला असा होत्साता जगण्याच्या विपरीत अवस्थेला प्राप्त झाला। अर्थात् मरण पावला.

अथ तत्क्षणमेव पीतवासा नरकं सप्तममध्युवास पापात् ॥
अविचिंत्यदुरंतघोरदुःखं त्रिगुणैकादशसागरोपमायुः ॥ ८४ ॥

तदीय यशोऽवशेषमात्रं बलदेवः सुचिरं विमुक्तकंठः ॥
विलप्य रुदन् स्वयं स्वधीरैर्वचोऽपि प्रबोधितो निशम्य ॥८५॥

सजलनयनैर्वृद्धव्रातैर्भवस्थितिशंसिभिः
स्थविरसचिवैः सार्द्धं कृच्छ्राच्चिरं प्रतिबोधितः ॥
कथमपि जहौ शोकं मत्वा स्वयं च हलायुधः ॥
स्थितिमशरणां संसारस्य प्रतिक्षणभंगुरां ॥ ८६ ॥
स्वयंप्रभामनुमरणार्थमुद्यतां बलस्तदा स्वयमुपसांत्वनोदितैः ॥
इदं पुनर्भवशतहेतुरात्मनो निरर्थकं व्यवसितमित्यवारयत् ॥ ८७ ॥
प्रसाधनमपश्चिमं कुशलशिल्पिभिः कल्पितं ॥
प्रमृज्य नयनद्वयं विगलदश्रुलेशं मुहुः ॥
अशेत हरिरुद्वहन्बहिरबोधनिद्रावशाद् ॥
विभावसुशिखाकलापनवपल्लवस्रस्तरे ॥ ८८ ॥
राज्यश्रियं श्रीविजयाय दत्वा हलायुधः संसृतिदुःखभीरुः ॥
सुवर्णकुंभं प्रणिपत्य दीक्षां नृपैः सहस्रैः सहितः प्रपेदे ॥ ८९ ॥
हत्वा घातिचतुष्टयं हलधरो रत्नत्रयास्त्रश्रिया ॥
पश्यन्केवललोचनेन युगपत्त्रैलोक्यवस्तुस्थितिं ॥
भव्यानामभयप्रदानरसिको भूत्वा पुनर्निष्ठितः ॥
सिद्धानां सुखसंपदामभजत स्थानं परं शाश्वतं ॥ ९० ॥

इत्यसगकृते श्रीवर्द्धमानचरिते बलदेवसिद्धिगमनो नाम दशमःसर्गः

८४ यानंतर जेथें तेहतीस सागरोपम आयुष्य आहे व जेथील दुःखांचा विचार करता येत नाहीं व ज्यांचा शेवट फार दुःखावह आहे अशा सातव्या नरकामध्यें पापोदयानें त्रिपृष्ठ नारायण तत्काळ उत्पन्न झाला. ८५ त्रिपृष्ठ आतां फक्त ज्याचे यशच बाकी उरलें आहे अशा अवस्थेला पोहोचला आहे असें जाणून लक्ष्यांत घेऊन बलदेवानें पुष्कळ दिवसपर्यंत कंठ मोकळा करून फार शोक केला त्याचा तो शोक ऐकून समता-रागद्वेषरहितावस्थेला प्राप्त झालेले मुनि देखिल हळहळु लागले ८५ संसाराचें स्वरूप दाखवून देणारे व ज्यांच्या डोळ्यांत पाणी आलें आहे अशा वृद्ध लोकांनीं वृद्ध मंत्रिगणांना बरोबर घेऊन मोठ्या कष्टानें त्याला फार

वेळ उपदेश केला आहे अशा बलभद्र विजयानें वस्तुस्वरूप जाणून व संसाराची प्रत्येक क्षणीं नाश पावणारी व जिचा कोणीही रक्षक नाहीं अशी परिस्थिति जाणून कष्टानें शोक त्यागिला. ८६ स्वयंप्रभा जेव्हां आपल्या पतिच्या मरणानंतर मरावयास तयार झाली तेव्हां ' हें मरणें-सती जाणें आत्म्याचें शेकडों भवाला बाढविणारें व्यर्थ कार्य आहे, असें सांत्वनपर उपदेशाच्या वचनांनीं बलभद्रानें सांगितलें व तिला या कार्यापासून त्यानें रोकिलें. ८८ ज्य-पासून थोडेंथोडें अश्रु वाहात आहे असे दोन डोळे वारंवार पुसून कुशल कारा गिराकडून तयार करविला गेलेला उत्कृष्ट वेष धारण करून अज्ञानरूपी झोंपेच्या अर्थात् मृत्यूच्या स्वाधीन झाल्यामुळें ज्याला बाह्यपदार्थाचें बिलकुल ज्ञान होत नाहीं असा हरि अग्नीच्या ज्वालासमूहरूपी पानांच्या बिछान्यावर निद्रा घेऊं लागला. ८९ सांसारिक दुःखापासून भयभीत झालेल्या विजयबलभद्रानें श्रीविजयाला राज्यलक्ष्मी अर्पण केली. स्वतः त्यानें सुवर्ण कुंभमुनीश्वराला नमस्कार करून हजारो राजांनीं सहित होऊन दीक्षेचा स्वीकार केला. ९० रत्नत्रयरूप हत्याराच्या कांतीनें अर्थात् धारेनें ज्ञानावरणादिक चार घातिकर्मांचा घात करून व केवल ज्ञानरूपी डोळ्यानें एकदम सर्व तिन्ही लोकांच्या वस्तूचें स्वरूप पाहून-जाणून बलभद्रांनीं भव्यांना अभयदान देण्याचे कार्य- अर्थात् संसारदुःखांतून सोडविण्याचें काम आवडीने केलें व शेवटीं सर्व योगांचा नाश करून सिद्धांचें सुखसंपत्तीचें कायमचें उत्कृष्ट ठिकाण असलेला मोक्ष प्राप्त करून घेतला.

* या प्रमाणें असगकविकृत श्रीवर्धमानचरित काव्यांतलि बलदेव सिद्धि-गमनाचे वर्णनाचा हा दहावा सर्ग समाप्त झाला *

# एकादशः सर्गः

अथ नरकभवे विचित्रदुःखं चिरमनुभूय विनिर्गतः कथंचित् ॥
पुनरिह भरते रथांगपाणिः सुमहति सिंहगिरौ बभूव सिंहः ॥ १ ॥
शमविरहितमानसो निसर्गात्प्रथमकषायकषायरंजनेन ॥
यम इव कुपितो विना निमित्तं समदगजानवधीत्क्षुधाविहीनः ॥२॥
प्रतिरवपरिपूरिताद्रिरंध्रं करिकलभा ध्वनितं निशम्य तस्य ॥
विदालितहृदयाः प्रियैरकांडे सममसुभिश्च निरासिरे स्वयूथैः ॥ ३ ॥
मृगकुलमपहाय तं नगेंद्रं सकलमगादपरं वनं विबाधं ॥
करिरिपुनखकोटिलुप्तशेषं व्रजति सदा निरुपद्रवं हि सर्वः ॥ ४ ॥

१ यानंतर नरकभवांत फार दिवसपर्यंत नानाप्रकारचीं दुःखें भोगून मोठ्या कष्टानें कसा तरी निघालेला तो त्रिपृष्ठ नारायण या भरतक्षेत्रांत सिंहगिरि नांवाच्या मोठ्या पर्वतावर पुनः सिंह होऊन जन्मला. २ या सिंहाच्या ठिकाणीं अनंतानुबंधि कषायांचा तेल्या रंग गाढ बसल्यामुळें याचें अंतःकरण शांतभावानें बिलकुल रहित झालें होतें. भूक नसतांही हा यमाप्रमाणें क्रुद्ध होऊन विनाकारण उन्मत्त हत्तींचा वध करीत असे. ३ प्रतिध्वनीनें पर्वताच्या गुहा भरून टाकणारी त्याची गर्जना ऐकून हत्तींच्या लहान लहान पिलांचें हृदय फुटून जात असे व तीं आपला कळप सोडून पळत असत. एवढेंच नव्हे तर त्यांना आपले प्राण देखिल गमवून बसावे लागत असे. ४ या सिंहाच्या नखाग्रांनीं नाश पाऊन उरलेले सर्व प्राणी त्या सिंहागिरि पर्वताचा त्याग करून बाधारहित अशा दुसऱ्या जंगलांत निघून गेले. बरोबरच आहे कीं, सर्वप्राणी निरुपद्रवस्थानींच जात असतात. ५ नेहमी पाप

अविरतदुरिताशयानुबंधाद्विगतदयो निजजीवितव्यपाये ॥
पुनरपि नरकं जगाम सिंहो प्रथममसत्फलमेतदेव जन्तोः ॥ ५ ॥
नरकगतिमुपागतो हरिर्यः स हि मृगनाथ! भवानिति प्रतीहि ॥
अथ नरकभवे यदुग्रदुःखं शृणु तनुमान्समुपैति तत्प्रवक्ष्ये ॥ ६ ॥
सपदि वपुरवाप्य हुंडसंस्थं कृमिकुलजालचितं च पूतिगंधि ॥
पतति दुरुपपादकप्रदेशाच्छरवदधोवदनः स वज्रवन्हौ ॥ ७ ॥
अतिनिशितविचित्रहेतिहस्तो भयतरलं प्रविलोक्य नारकौघः ॥
दह पच विशसोद्धधान नानाविधमिति वक्ति करोत्यरं तथैव ॥८॥
गतिरियमशुभप्रदा च का वा दुरितमकारि मया पुरा किमुग्रं ॥
अहमपि क इति क्षणं विचिंत्य तदनु विभंगमवाप्य वेत्ति सर्वं ॥९॥
हुतभुजि परितापयंति चंडा मुखमवदार्य च पाययान्ति धूमं ॥
बहुविधमथ पीलयंति यंत्रैश्चटिति परिस्फुटितास्थिघोररावं ॥१०॥

क्रूरण्याच्याच विचारामुळें त्याच्या मनांतून दयेनें पलायन केलें होतें असा तो सिंह आयुष्य संपल्यावर पुनः पहिल्या नरकाला गेला. प्राण्याला वाईट कृत्याचें हेंच फळ मिळत असतें. ६ हे सिंहा, जो प्रथम नरकांत जन्मलेला होता तोच सिंह तूं आहेस हें ध्यानांत आण. हे सिंहा, नरकभावामध्यें जें उग्र दुःख प्राण्याला भोगावें लागतें त्याचें वर्णन मी करितो तें तूं ऐक ७ नरकामध्यें जन्म झाल्यावर तत्काल हुंडक संस्थानाचें, किड्यांच्या समुदायांनीं अतिशय भरलेलें, अतिशय घाणेरडें, असें शरीर प्राप्त करून घेऊन उत्पन्न होण्याच्या वाईट प्रदेशांतून बाणाप्रमाणें खालीं तोंड करून वज्राच्या अग्नींत जाऊन पडतो. ८ अत्यंत तीक्ष्ण व नानाप्रकारचीं शस्त्रें ज्याच्या जवळ आहेत असा नारकी लोकांचा समूह भीतीनें थरथर कांपत असलेल्या नारकी जीवास पाहून याला जाळा, शिजवा, ठार मारा, बांधा अशीं नाना प्रकारचीं कटुवाक्यें बोलतात व तसेंच करतातही. ९ तेथें उत्पन्न झालेला नारकी प्रथमतः ही अति अशुभदायक अशी कोणती गती आहे? मी पूर्वी कोणतें अति उग्रपाप केलें होतें? व मी देखील कोण आहे असा क्षणपर्यंत विचार करितो. व नंतर विभंगावधिज्ञान प्राप्त करून घेऊन सर्व पूर्व परिस्थिति जाणून घेतो. तेथें निर्दयना-

विलपति करुणं कृतार्तनादः करजनिवेशितशातवज्रसूचिः ॥
वृकनिवहविलुप्यमानदेहो व्रजति विचेतनतामनेकवारम् ॥ ११ ॥
तटपविसिकताविभिन्नपादः सहजतृषा परिशुष्कतालुकंठः ॥
करिमकरकरासिखंडितोऽपि प्रविशति वैतरणीं विषांबु पातुं ॥१२॥
उभयतटनिविष्टनारकौघैर्मुहुरुपरुध्य स तत्र गाह्यमानः ॥
कथमपि समवाप्य रंध्रमार्तो गिरिमधिरोहति वज्रदावदीप्तं ॥१३॥
हरिकरिशयुपुंडरीककंकप्रभृतिभिरेत्य विलुप्यमानदेहः ॥
भृशमसुखमवाप्य तत्र निम्नं तरुगहनं प्रतियाति विश्रमार्थं ॥१४॥
बहुविधनिशिताश्रपत्रमोक्षैस्तरुनिवहैः प्रविदारितं तदंगं ॥
व्रणशतनिवहाचितं दशंति भ्रमरगणैःसह दुष्टचंडकीटाः ॥१५॥

रकी अग्निमध्यें नारक्याला संतप्त करितात. मुख फाडून धूर प्यावयास लावितात, नानाप्रकारें यंत्रांनीं पिळून काढितात. त्यावेळीं फुटत असलेल्या हाडकांचा घोर शब्द होत असतो. ११ त्या नारक्याच्या हातांच्या नखांत इतर नारकी वज्राच्या सुया टोचित असतात. त्यावेळीं तो दीन नारकी जीव करुणा येईल अशा रीतीनें दुःखानें स्वर काढून रडत असतो. लांडगे त्याचा देह खाऊन टाकीत असतां तो वारवार मूर्च्छित होतो.

१२ नदीच्या किनाऱ्याला असलेल्या वज्राच्या वाळूनें ज्याचे पाय फाटून गेले आहेत, स्वाभाविक तहानेनें ज्याचा गळा व टाळू सुकून गेलीं आहेत; जो हत्ती, मगर यांनी व नारकी यांच्या हातांतील तरवारीनें विदीर्ण केला गेला आहे असा तो नारकी जीव वैतरणीनदीमध्यें पाणी पिण्यासाठीं प्रवेश करितो. १३ त्यावेळीं त्या नदीच्या दोन्ही किनाऱ्यावर बसलेल्या नारकी जीवांच्या समुदायाकडून तो अडविला जातो व नदीमध्यें बलात्कारानें तो बुडाविला जातो. त्यावेळीं कशी तरी संधि साधून तो दुःखी नारकी तेथून सुटून वज्राग्नीनें तप्त झालेल्या पर्वतावर चढतो. १४ तेथेंही सिंह, हत्ती, अजगर व वाघ, गिधाड वगैरे प्राणी येऊन त्याचा देह खाऊन टाकितात. त्या ठिकाणीं त्याला फार त्रास होतो म्हणून तो विसावा घेण्यासाठीं नानाप्रकारच्या दाट झाडांच्या समूहाकडे धांवत जातो. १५ तेथें नानाप्रकारच्या तीक्ष्णशस्त्रासमान असलेल्या पानांचा वर्षाव करून

अतिपरुषरवैः श्रुतिं तुदंतो दहनशिखावलिदग्धपक्ष्ममालं ॥
असितबलिभुजः खनंति तुंडैः कुलिशमयैर्नयनद्वयं तदीयं ॥१६॥
विदलितवदनं तमूषिकांतर्धृतविषवारिचये निवेश्य केचित् ॥
घनशितमुखमुद्गरप्रहारैरजरदवेन पचंति चूर्णयंतः ॥ १७ ॥
बहुविधपरिवर्तनाक्रियाभिः स्थपुटशिलासु निपात्य चूर्णयन्ति ॥
प्रतितनुकरपत्रकेण यंत्रे महति निधाय विदारयंति केचित् ॥१८॥
घनदहनपरीतवज्रमूषाच्युतपरितप्तमयोरसं प्रपाय ॥
विगलितरसनो विभिन्नतालु स्मरति स मद्यरतेः फलानि तत्र॥१९॥
सरभसपरिरंभणेन भग्नो घनमुरसि स्तनवज्रमुद्गराग्रैः ॥
ज्वलदनलमयीभिरंगनाभिर्ध्रुवमवगच्छति तत्र कामदोषान् ॥२०॥

-झाडांचे समुदाय त्याचे सर्व अवयव फाडतात. शेंकडो जखमांनीं युक्त झालेल्या त्याच्या अंगावर सुंगे व दुष्ट असे प्रचंड किडे धाऊन येतात आणि ते त्यास चावतात. १६ अतिशय कठोर शब्दांनी कानाला दुःख देणारे, असे काळे कावळे आपल्या वज्राच्या मुखांनीं त्या नारक्याचे दोन डोळे जेव्हां तोडण्याचा प्रयत्न करितात त्यावेळीं त्याच्या डोळ्यांतून निघालेल्या अग्नीच्या ज्वालांनीं त्यांचे पंखही जळून जातात. १७ ज्याचें मुख विदीर्ण झालें आहे अशा त्या नारक्याला जिच्यांत विषारी पाणी भरलें आहे अशा कढईमध्यें बसऊन अतिशय तीक्ष्ण ज्यांचीं तोंडें आहेत अशा मुद्गरांनीं प्रहार करुन इतर नारकी त्याचा चुरा करुन टाकितात व तीव्र अग्नीने त्याला शिजावितात. १८ तसेंच ओवडधोवड शिलेवर आपटून कुस्क-रणें, वर उचलणें, फिरविणें वगैरे क्रियांनीं कित्येक नारकी त्या दीन नारक्याचें चूर्ण करितात. व मोठ्या यंत्रामध्यें त्याला ठेऊन त्याचे सर्व अवयव करवतानें कापतात. १९ तीव्र अग्नीनें वेढलेल्या मुशीत तयार झालेला लोखंडाचा गरम रस त्याला कित्येक नारकी पाजतात त्यावेळीं त्याची जीभ गळून पडते व टाळु फुटून जाते. तेव्हां मद्यासक्तीच्या फलांची त्याला तेथें आठवण होतें. २० जळत असले-ल्या अग्नींनी व्याप्त झालेल्या स्त्रीच्या आकृतीच्या पुतळ्यांशीं शीघ्र आलिंगन देण्यापा-सून व वक्षस्थलीं स्तनाच्या ऐवजीं वज्राच्या मुद्गराच्या आघातांनीं अतिशय विदीर्ण झालेला तो नारकी तीव्र कामविकाराच्या दोषांचें स्वरुप त्यावेळीं

अविमहिषमदेभकुक्कुटानां सपदि वहन्वपुरग्रतोऽसुराणां ॥
अरुणितनयनो रुषा सहान्यैः श्रमविवशोऽपि स युध्यते प्रकामं ।२१।
करचरणयुगैर्विवर्जितोऽपि द्रुतमधिरोहति शाल्मलं भिया सः ॥
विधुरितहृदयोम्बरीषमायामयकरतर्जनिकाग्रतर्जनेन ॥ २२ ॥
सुखमिदमिति यद्यदात्मबुद्ध्या ध्रुवमवधार्य करोति तत्तदाशु ॥
जनयति खलु तस्य भूरि दुःखं न हि कणिकापि सुखस्य नारकाणां २३
इति नरकभवाद्विचित्रदुःखात्पुनरभवस्त्वमिह द्विपारिरेत्य ॥
अधिवसति चिरं कुयोनिमध्यं ननु तनुमान् घनबद्धदृष्टिमोहः ॥२४॥
इति परिकथिता भवावलिस्ते विदितभवस्य मृगेंद्र ! सप्रपंचा ॥
प्रकटमथ मयाभिधास्यमानं विमलधिया हितमात्मनः शृणु त्वं ॥२५॥

जाणतो अर्थात् पूर्वजन्मीं मी वेश्या किंवा परस्त्री यांच्याशीं गमन केलें होतें त्याचेंच हें फळ आहे असें त्याला चांगलें समजतें. त्याची खात्री होतें. २१ बकरा, रेडा, मत्त हत्ती, कोंवडा वगैरेंचीं आकृति धारण करून असुरांच्या पुढें रागानें डोळे लाल करून इतर नारक्यावरोबर आतिशय थकून गेला तरी तो नारकी पुष्कळ वेळपर्यंत युद्ध करतो. २२ अंबरीष जातीच्या असुरांच्या मायामयी हाताच्या अंगठ्या जवळच्या बोटानें निर्भर्त्सना केल्यामुळें उत्पन्न झालेल्या भीतीनें तो नारकी हातापायांनीं रहितही असून शीघ्र सावरीच्या वृक्षावर चढतो.

२३ तो नारकी जीव जी जी गोष्ट सुखदायक समजून करितो ती ती गोष्ट त्याला निश्चयानें पुष्कळ दुःखच उत्पन्न करीत असते. खरोखर नारक्यांना सुखाचा लेशही मिळत नसतो २४ याप्रमाणें जेथें विचित्र दुःखें भरलेलीं आहेत अशा नरकभवापासून मुक्त होऊन तू येथें सिंह झाला आहेस. बरोबरच आहे. कीं, ज्याला दर्शन मोहनीय कर्माचा अर्थात मिथ्यात्वकर्माचा तीव्र बंध पडला आहे असा प्राणी चिरकालपर्यंत कुयोनीमध्यें भ्रमण करीत फिरत असतो. २५ याप्रमाणें हे मृगेंद्रा ! ज्याला पूर्वभवाचे ज्ञान जातिस्मरणानें झालें आहे अशा तुला विस्तारानें मी तुझ्या अनेक जन्माचें वर्णन सांगितले आहे. आतां मी निर्मळ बुद्धीनें तुझें हित कशानें होईल तें सांगतों. तूं स्पष्ट रीतीनें ऐक. २६ हा आत्मा अविरति

अविरतिसहितैः कषाययोगैरविमलदृष्टितया प्रमाददोषैः
परिणमति निरंतरं सहात्मा भवति ततः परिणामतोऽस्य बंधः ।२६।
गतिषु गतिमुपैति बंधदोषाद्भवति गतेर्वपुरिंद्रियाणि तस्मात् ॥
ननु विषयरतिश्चिराय तेभ्यो विषयरतेः पुनरेव सर्वदोषाः ॥ २७॥
भवसलिलनिधौ पुनः पुनश्च भ्रमणविधिः पुरुषस्य जायतेऽयं ॥
इति परिकथितो जिनैरनादिर्व्ययरहितोऽव्ययसंयुतोऽस्य बंधः॥२८॥
व्यपनय मनसः कषायदोषान्प्रशमरतो भव सर्वथा मृगेंद्र ! ॥
जिनपतिविहिते मते कुरुष्व प्रणयमपास्य च कापथानुबंधं॥ २९ ॥
स्वसदृशानवगम्य सर्वसत्वान् जहिहि वधाभिरतिंस्त्रिगुप्तिगुप्तः ॥
जनयति स कथं परोपतापं ध्रुवमवयन्नभिषंगमात्मनो यः ॥ ३० ॥

कषाय, प्रमाद व योग यांच्यासह व मिथ्यादर्शनासह हा आत्मा नेहमी परिणत होत असतो ह्मणून त्या परिणामाळ्ळें याला बंध होत असतो. २७ या कर्मबंधामुळें या आत्म्याला एका गतीपासून दुसऱ्या गतींत जावें लागते. गतिकर्मापासून शरीराची रचना होते व त्यापासून इंद्रियें उत्पन्न होतात. व इंद्रियापासून विषयाविषयीं प्रेम वाढतें व या प्रेमापासून पुनः सर्व दोषांची उत्पत्ति होत असते २७ या संसारसमुद्रांत पुनः पुन या दोषामुळे आत्म्याचें भ्रमण होत असतें. ह्या संसारांत जीवाला कर्मबंध अनादि व सांत असा दोन तऱ्हेचा आहे असें जिनांनीं सांगितलें आहे. कर्म वृक्षबीज न्यायानें सतत जीवाच्या मागें लागलें आहे ह्मणून त्याचा अनादिबंध आहे. व एक कर्म जीवाशीं बंध पावतें त्याच्या दृष्टीनें सादिबंध आहे. २९ हे सिंहा, तू मनापासुन कषायांचे दोष संपूर्णपणें काढून टाक व पूर्णपणें रागद्वेषरहित अशा अवस्थेत लीन हो कुमार्गाचा संबंध सोडून दे व जिनेश्वरांनीं सांगितलेल्या मतामध्यें प्रेम कर. ३० हे मृगराज ! सर्व प्राणिमात्रांना तू आपल्यासारखेच समज अर्थात तुला जसें दुःख व्हावेसें वाटत नाहीं तसेंच त्यांनाही दुःख होऊ नये असेंच वाटतें. यास्तव आपल्या प्रमाणेंच इतरांनाही मानून आपलें मन, वचन व शरीर हीं ताब्यांत ठेव आणि त्यांचा वध करण्याची लालसा सोडून दे. जो प्राणी स्वतःच्या दुःखाची खात्रीनें जाणीव ठेवतो तो दुसऱ्याला कसा बरें त्रास देईल.

अनियतमथ बंधकारणं स्वपरभवं विषमं सदा सबाधं ॥
हरिवर! समवाप्सिंद्रियैर्यत्सुखमवगच्छ तदेव दुःखमुग्रं ॥ ३१ ॥
नवविवरसमन्वितं निसर्गादशुचि सदार्तवशुक्रसंभवत्वात् ॥
विविधमलयुतं क्षयि त्रिदोषं विविधशिरावलिजालकेन नद्धं ॥ ३२ ॥
निजतनुतरचर्मवर्मगूढं बहुविधरोगसहस्रवासगेहं ॥
कृमिकुलनिचितं च पूतिगंधि स्थिरविकटास्थिकृतैकयंत्रकल्पं ॥३३॥
बहुविधपरितापहेतुभूतं वपुरिदमीदृशमित्यवेत्य तस्मात् ॥
अपनय नितरां ममत्वबुद्धिं कथमवयन्न निजे मतिं विधत्से ॥त्रिकलं॥
शिवसुखमपुनर्भवं विबाधं निरुपममात्मभवं निरक्षमाप्तुं ॥
यदि तव मतिरस्ति सन्मृगारे! त्यज खलु बाह्यमथांतरं च संगं ।३५।

३१ हे सिंहश्रेष्ठा, इंद्रियांच्या द्वारें प्राण्यास जें सुख मिळतें तें अनिश्चित आहे. ह्मणजे एकसारखें एक रूपाचें असत नाहीं. कमीजास्त होत असतें, कर्मबंधाला कारण आहे; स्वतः व इतर अन्नादिक पदार्थ यापासून उत्पन्न होतें. तें विषम आहे व त्यामध्यें पुष्कळ अडथळे उत्पन्न होतात. व परिणामीं नरकादिगतीचें दुःख यापासून उत्पन्न होतें ह्मणून अतिशय उग्र आहे. ३२ हें शरीर नऊ छिद्रांनीं सहित आहे, स्वाभाविकपणेंच अपवित्र आहे, कारण हें रक्त व वीर्य यापासून उत्पन्न होत असतें. रक्त, पू, मज्जा वगैरे मलांनीं हें भरलेलें आहे, नाशवत आहे. वात, पित्त आणि कफ या दोषांनीं सहित असून नानाप्रकारच्या शिरा व स्नायु यांच्या जाळ्यानें हें मढविलेलें आहे.

३३ हें शरीर स्वतःच्या अधिक पातळ अशा कातडेरूपी चिलखतानें आच्छादिलें आहे. नानाप्रकारच्या हजारो रोगांचें हें राहण्याचें ठिकाण आहे.

---

* टिप्पणीः—सपरं बाधासहियं विच्छिण्णं बंधकारणं विसमं ॥
जं इंदियेहिं लद्धं तं सोक्खं दुक्खमेव तहा ॥ ७६ ॥
सपरं बाधासहितं विच्छिन्नं बंधकारणं विषमं ॥
यदिंद्रियैर्लब्धं तत्सौख्यं दुःखमेव तथा ॥ ७६ ॥
प्रवचनसारे समानार्थकश्लोकः

गृहधनवपुरादिकः समग्रो भवति स बाह्यपरिग्रहो दुरंतः ॥
बहुविधमथ रागलोभकोपप्रभृतिमवांतरसंगमित्यवेहि ॥ ३६ ॥
इति कुरु मनसि त्वमक्षयश्रीरवगमदर्शनलक्षणोऽहमात्मा ॥
मम पुनरितरे च सर्वभावा विदितससागमलक्षणा विभिन्नाः ॥३७॥
यदि निवससि संयमोन्नताद्रौ प्रविमलदृष्टिगुहोदरे परिन्नन् ॥
उपशमनखरैः कषायनागांस्त्वमसि तदा खलु सिंह! भव्यसिंहः ॥३८॥
हिततरमिह नास्ति किंचिदन्यज्जिनवचनादिति विद्धि निश्चयेन ॥
बहुविधघनकर्मपाशमोक्षो भवति यतः पुरुषस्य तेन सर्वः ॥ ३९ ॥
जिनवचनरसायनं दुरापं श्रुतियुगलांजलिना निपीयमानं ॥
विषयविषतृषामपास्य दूरं कमिह करोत्यजरामरं न भव्यम् ॥४०॥

हें किड्यांच्या समूहानें नेहमीं भरलेलें असतें. घाणेरडें असून रुधिर व वाकड्या तिकड्या हाडांनीं बनविलेलें, एका यंत्रासारखें आहे. ३४ असलें हें शरीर नानाप्रकारच्या संतापाला कारण आहे असें जाणून याच्यावरील ममत्वबुद्धि पूर्णपणें काढून टाक. ज्याला हें शरीर कसें आहे हें चांगलें समजलें आहे तो आपल्या आत्म्याकडे आपल्या बुद्धीला योजीत नाहीं काय? अर्थात् अवश्य योजितोच. ३५ हे उत्तम सिंहा! तुला मोक्षाचें बाधारहित, आत्म्यापासूनच उत्पन्न झालेलें, अतींद्रिय सुख मिळावें अशी जर इच्छा असेल तर तूं अंतरंग व बहिरंग अशा दोन्ही प्रकारच्या परिग्रहांचा त्याग कर. ३६ घर, धन, शरीर वगैरे सगळ्या पदार्थांला बाह्य परिग्रह म्हणतात. हा परिग्रह शेवटीं दुःख देणारा आहे. व राग, लोभ, कोप, माया, मिथ्यात्व, हास्य वगैरे पुष्कळ प्रकारचा अंतरंग परिग्रह आहे असें तूं जाण- ३७ त्याचप्रमाणें माझा आत्मा अनंत संपत्तीनें युक्त, अनंतज्ञान व दर्शन या लक्षणांचा धारक आहे असें तूं मनांत समज. इतर सर्व शरीर वगैरे पदार्थ मला संयोगानें प्राप्त झाले आहेत. अर्थात् कर्मोदयामुळें शरीरादिकांशीं माझा संबंध घडून आला आहे. वास्तविक पाहिलें असतां हे पदार्थ माझ्यापासून अगदीं वेगळे आहेत. ३८ हे सिंहा! संयमरूपी उंच पर्वतावरील निर्मलसम्यग्दर्शनरूपी गुहेंत शांत परिणामरूपी तीव्र नखांनीं कषायरूपी हत्तींना ठार मारणारा होऊन तूं जर राहशील तर तूं खरोखरच भव्यसिंह होशील. अर्थात् सर्व भव्यामध्यें अतिशय

शकलय खलु मार्दवेन मानं हरिवर ! कोपमपि क्षमाबलेन ॥
प्रतिसमयमथार्जवेन मायां प्रशमय शौचजलेन लोभवन्हिम् ॥४१॥
शमरतहृदयः परैरजय्याद्यदि न बिभेषि परीषहप्रपंचात् ॥
धवलयति तदा त्वदीयशौर्यं त्रिभुवनमेकपदे यशोमहिम्ना॥ ४२ ॥
अनुपमसुखसिद्धिहेतुभूतं गुरुषु सदा कुरु पंचसु प्रणामं ॥
भवसलिलनिधेः सुदुस्तरस्य प्लव इति तं कृतबुद्धयो वदन्ति॥४३॥
अपनय नितरां त्रिशल्यदोषान्खलु परिरक्ष सदा व्रतानि पंच ॥
त्यज वपुषि परां ममत्वबुद्धिं कुरु करुणार्द्रमनारतं स्वचित्तं ॥४४॥

श्रेष्ठपणास पावशील. ३९ या जगांत जिनेश्वराच्या दिव्य उपदेशापेक्षां अधिक हित करणारा असा दुसरा कोणताही पदार्थ नाहीं हें तूं निश्चयानें समज. कारण यानेंच आत्म्याची नानाप्रकाच्या दाट कर्मांच्या पाशापासून पूर्णपणें सुटका होते. ४० हें जिनेश्वराचें वचन अपूर्व रसायनौषध आहे व फार दुर्लभ आहे. हें रसायन कानरूपी ओंजळींनीं प्राशन केलें असतां विषयरूपी विषाच्या भक्षणानें उत्पन्न झालेल्या तहानेचा पूर्णनाश करून कोणत्या भव्य प्राण्याला अजर व अमर अर्थात् मुक्त बनावित नाहीं बरें ? अवश्य बनावितेंच. ४१ हे श्रेष्ठ सिंहा ? तूं मनाच्या विनय परिणामांनीं मान–गर्वाचा नाश कर. क्षमेच्या सामर्थ्यानें कोपास नाहींसें कर. प्रत्येक समयीं कपटरहित परिणामांनीं माया काढून टाक व निःस्पृहपणारूपी पाण्यानें लोभरूपी अग्नि विझवून टाक. ४२ हे सिंह श्रेष्ठा ! तूं आपलें हृदय शांत अवस्थेंत अर्थात् रागद्वेष रहित अशा अवस्थेंत लीन कर व इतरांकडून अजिंक्य अशा क्षुधा तृषा वगैरे परीषाना तूं जर भिणार नाहींस तर तुझा हा पराक्रम तुझ्या विपुल कीर्तीनें हें सर्व त्रैलोक्य धवल करून सोडलि अर्थात् तुझी कीर्ति सर्वत्र वाढेल. व तूं खरा पराक्रमी म्हणून तुझी प्रसिद्धि होईल.

४३ हे सिंहश्रेष्ठा ! तूं नेहमीं पंचपरमेष्टींना नमस्कार कर. हा नमस्कार दुस्तर असा संसार समुद्र तरून जाण्यास नांवेसारखा आहे व उपमारहित अशा सुखांची प्राप्ति करून देण्यास कारणीभूत आहे असें उत्तम कार्य करण्यांत आपल्या बुद्धिचा उपयोग करणारे सज्जन लोक हाणतात. ४४ हे मृगराज ! तूं माया, मिथ्यात्व व निदान या तीन दोषांना त्यागून नेहमी उत्तम रीतीनें पांच अणुव्र-

अवगमनमपाकरोत्यविद्यां क्षपयति कर्म तपो यमो रुणद्धि ॥
समुदितमपवर्गहेतुभूतं त्रितयमिति प्रतियाहि दर्शनेन ॥ ४५ ॥
तद भवति यथा परा विशुद्धिर्मनसि तथा नितरां कुरु प्रयत्नं ॥
अथ विदितहितैकमासमात्रं स्फुटमवगच्छ निजायुषः स्थितिं च ४६
त्रिकरणविधिना स्वपापयोगं सकलमपोह्य मृगेंद्र ! यावदायुः ॥
अनशनमुपलब्धबोधिलाभो विमलसमाधिसमाप्तये विधत्स्व ॥४७॥
गतभय ! दशमे भवाद्भवेऽस्मात्त्वमिह भविष्यसि भारते जिनेंद्रः॥
इति परिकथितं जिनेशिना नः सकलमिदं कमलाधरेण नाम्ना ।४८।
शमरत ! वयमागता भवंतं खलु परिबोधयितुं तदीयवाक्यात् ॥
ननु मुनिहृदयं सुनिःस्पृहं च स्पृहयति भव्यजनप्रबोधनाय ॥४९॥

तांचें रक्षण कर. शरीरावरील तीव्र प्रेमबुद्धीचा नेहमीं त्याग कर व आपलें अंतःकरण दयेच्या ओलाव्यानें नेहमी युक्त राहू देत जा. ४५ सम्यग्ज्ञान अज्ञान अर्थात् मिथ्या ज्ञानाचा नाश करितें. तपश्चरण कर्मांचा नाश करितें. चारित्र कर्माला आत्म्यामध्यें प्रवेश करु देत नाही. या तीन गोष्टी सम्यग्दर्शनानें युक्त झाल्या ह्मणजे मोक्षप्राप्तिस कारण होतात असे समज. अर्थात् सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, सम्यक्चारित्र व तप अशा चार गोष्टींचें आराधन करण्यानें मोक्ष प्राप्त होतो असें समज. ४६ हे मृगेंद्रा ! तुझ्या मनामध्यें ज्या उपायांनीं परिणामांची उत्कृष्ट निर्मलता प्राप्त होईल त्या उपायांचें अवलंबन करण्यांत तूं अतिशय प्रयत्न कर. आपलें हित जाणलेल्या हे सिंहा ! तूं आपल्या आयुष्याची स्थिति आतां एक महिनाच उरलेली आहे असे स्पष्ट जाण. ४७ हे मृगेंद्रा ! मन, वचन व शरीर यांच्या द्वारे सर्व पापांच्या संबंधाला सोडून दे अर्थात् या तिहींच्या द्वारें तूं पापकार्य करणें सोडून दे. रत्नत्रयाचा लाभ ज्यास झाला आहे असा तूं निर्मलसल्लेखनाव्रत पूर्ण करण्याकरितां आहारांचा पूर्ण त्याग कर. अर्थात् एक महिनापर्यंत उपवास धारण करून शांतमनाने प्राणत्याग कर. ४८ हे निर्भय सिंहा ! या सिंहभवापासून दहाव्या भवात तूं या भरतक्षेत्रांत तीर्थंकर ( महावीर तीर्थंकर ) होणार आहेस. हें सर्व वृत्त आह्मास कमलाधर नांवाच्या जिनेश्वरांनी सांगितले आहे. ४९ शांतभवानेंत रत असलेल्या हे सिंहा ! आह्मी त्यांच्या उपदेशावरून तुला खरोखरच

इति चिरमनुशिष्य तत्वमार्गं मुनिरुदगाद्गमनाय निश्चितार्थं ॥
स्वचरणविनतं स्पृशन्कराग्रैः शिरसि मुहुर्मुहुरादरेण सिंहं ॥ ५० ॥
चिरमिभरिपुणा निरीक्ष्यमाणौ प्रणयभवाश्रुकणाविलेक्षणेन ॥
जलधरपदवीं समाश्रयेतां प्रतिपदवीं गमनाय चारणौ तौ ॥ ५१ ॥
अथ मुनियुगले व्यतीत्य तस्मिन्पवनरयेण गते स्वदृष्टिमार्गं ॥
भृशमरतिमियाय राजसिंहो जनयति सद्विरहो न कस्य वाधिं ॥५२॥
मुनिविरहशुचा समं स्वचित्तादनतिचिरेण निरस्य सर्वसंगं ॥
तदमलचरणांकपावनायामनशनमास्त मृगाधिपः शिलायां ॥ ५३ ॥
निहितवपुरेकपार्श्ववृत्त्या दृषदि चचाल न दंडवन्मृगेंद्रः ॥
यतिगुणगणभावनासु सक्तः प्रतिसमयं च बभूव शुद्धलेश्यः ॥५४॥

उपदेश द्यावयास येथें आलों आहोत. मुनीचें हृदय निःस्पृह असतें परंतु तें भव्यजनांना उपदेश देण्याविषयीं त्यांना सन्मार्गांत आणण्याविषयीं आतुर झालेलें असतें. ५० या प्रमाणें आपल्या पायाजवळ नम्र होऊन बसलेल्या सिंहाला मस्तकावर मोठ्या प्रेमानें वारंवार स्पर्श करणारे ते मुनि (अमितकीर्ति नावाचे चारण मुनि) ज्यामध्यें पदार्थनिर्णय झालेला आहे असा उपदेशमार्ग बराच वेळ सांगून जाण्यासाठीं निघाले. ५१ प्रेमानें उत्पन्न झालेल्या अश्रुकणांनीं भरलेल्या नेत्रानें बराच वेळपर्यंत सिंहाकडून पाहिले गेलेले दोघे चारण मुनि आपल्या स्थानीं जाण्यासाठीं आकाशांत निघून गेले. ५२ तें मुनियुग्म वाऱ्याच्या वेगाप्रमाणें सिंहाच्या दृष्टीच्या मार्गांतून निघून गेले असतां सिंहाला फार खेद झाला. बरोबरच आहे कीं, सत्पुरुषांचा विरह कोणाला मानसिक व्यथा उत्पन्न करीत नाहीं बरें ? ५३ सिंहानें आपल्या हृदयांतून मुनिविरहानें उत्पन्न झालेल्या शोकासह लौकरच सर्वसंगाचा—परिग्रहांचाही त्याग केला. व मुनीश्वरांच्या निर्मल चरणांनीं पवित्र बनलेल्या शिलेवर भोजनाचा त्याग करून शांतचित्तानें तो बसला. ५४ तो सिंह मुनि जेथें बसले होते त्या शिलेवर काठीसारखा एका अंगांवर आपलें शरीर ठेऊन निश्चल पडून राहिला. मुनिवरांच्या गुण समुदायाचें चिंतन करण्यांत गढून गेला व प्रत्येक समयीं शुद्ध लेश्येचा होत चालला. अर्थात् उत्तरोत्तर त्याच्या परिणामांत निर्मलता वाढत चालली. ५५ अधिक गरम हवेच्या आघातानें त्याचें

खरतरपवनाभिघातरूक्षं रविकिरणोल्मुकतापतः समंतात् ॥
स्फुटितमपि वपुर्व्यथां न चक्रे मनसि हरेःखलु तादृशो हि धीरः॥५५॥
दवानिभमुखदंशमक्षिकौघैर्मशकचयैरपि मर्मसु प्रदष्टः ॥
समभृत शमसंवरानुगागं द्विगुणतरं मनसा व्यपेतकंपः ॥५६॥
मृतमृगपतिशंकया मदांधैः करिपतिभिः प्रविलुप्तकेशरोऽपि ॥
अकृत स हृदये परां तितिक्षां तदवगतेर्ननु सत्फलं मुमुक्षोः ॥५७॥
क्षणमपि विवशस्तृषा क्षुधा वा द्विरदरिपुर्न बभूव मुक्तदेहः ॥
धृतकवचितधीरमानसस्य प्रशमरतिर्न सुधायते किमेका ॥ ५८ ॥
प्रतिदिवसमगात्तनुत्वमंगैः सह बहिरंतरवस्थितैः कषायैः
हृदि निहितजिनेंद्रभक्तिभारादिव नितरां शिथिलीकृतप्रमादः॥५९॥

शरीर रूक्ष बनलें अर्थात् पूर्वीची उज्ज्वलता शरीरावर राहिली नाहीं. सूर्याच्या अग्निज्वालेप्रमाणें असलेल्या किरणाच्या संतापानें त्याचें शरीर सर्वत्र फुटले होतें. तथापि त्यापासून त्याच्या मनांत कांहींच दुःख उत्पन्न झालें नाहीं. खरोखर तो सिंह अनिर्वचनीय धैर्यवान होता. ५६ अग्निप्रमाणें लालभडक ज्यांचीं तोंडे आहेत असे डांस, मधमाशा व चिलटे यांच्या समुदायांनीं ज्याला मर्मस्थळीं दंश केला आहे असाही तो सिंह निश्चल झाला व त्याने आपल्या मनाने शांतभावना व संवर हे दुप्पट धारण केले ५७ मदोन्मत्त अशा मोठ्या हत्तींनीं हा मेलेला सिंह असावा या शंकेनें याची आयाळ उपटून काढिली तरी देखिल या सिंहानें मनांत उत्कृष्ट क्षमा धारण केली. बरोबरच आहे की, मोक्षाची इच्छा करणाऱ्या जीवाच्या ज्ञानाचें क्षमा धारण करणें हेंच उत्तम फल आहे. ५८ ज्यानें देहावरचें प्रेम त्यागिलें आहे असा तो सिंह क्षणभर देखिल भुकेनें व तहानेनें व्याकुल झाला नाहीं. बरोबरच आहे कीं, धैर्यरूपी चिलखत धारण करणाऱ्याच्या धीर मनाला अद्वितीय असे शांतभावनेचें पेम अमृतासारखें होत नाहीं काय ? ५९ हा सिंह प्रत्येक दिवशीं मनामध्यें असलेल्या क्रोधादि कषायासह आपल्या शरीराच्या बाह्य अवयवांनी कृश होत चालला. व हृदयात ठेविलेल्या जिनेश्वराच्या भक्तीच्या ओझ्यामुळें जणु त्यानें प्रमादाला कायमची रजा दिली होती. ६० शांतिरूपी दरीच्या मध्यभागीं विराजमान झालेल्या या सिंहाला तीव्र असा थंडगार वारा रात्रीच्या वेळीं बाधा देत नसे. उप-

रजनिषु हिममारुतो बबाधे शमविवरोदरवर्तिनं न चंडः ॥
निरुपमघनसंवरस्य शीतं न हि विदधाति तनीयसीं च पीडां॥६०॥
खरनखदशनैः शिवाशृगालैर्मृतकधिया परिभक्षितो निशासु ॥
क्षणमपि न जहौ परं समाधिं न हि विधुरेऽपि विमुह्यति क्षमावान्॥६१॥
दिनकरकरजालतापयोगात्प्रतिदिवसं हिमपिंडवन्महीयान् ॥
शशिकरधवलो विलीयते स्म द्विरदरिपुः प्रशमे निधाय चित्तं ॥६२॥
इति मासमेकमचलक्रियया समुपोषितो भवभयाकुलितः ॥
जिनशासनानुगतधीर्विजहे दुरितैः स दूरमसुभिश्च हरिः ॥ ६३ ॥
सौधर्मकल्पमथ धर्मफलेन गत्वा सद्यो मनोरमवपुः स मनोहरेऽभूत्।
देवो हरिध्वज इति प्रथितो विमाने सम्यक्त्वशुद्धिरथवा न सुखाय केषां ॥ ६४ ॥
प्रत्युत्थितो जयजयेति वदद्भिरुच्चैरानंदवाद्यकुशलैः परिवारदेवैः ॥

मारहित व पुष्कळ अशा संवरानें युक्त असलेल्या या सिंहाला थंडी थोडीशीहि पीडा कशी देऊं शकेल? ६१ हा सिंह रात्रीं तीक्ष्ण नखें व दांत ज्यांना आहेत अशा कोल्हिणी व कोल्हे यांच्याकडून हें मेत आहे अशा बुद्धीनें खाल्ला जात असे. तथापि हा आपली शांतवृत्ति एक क्षणपर्यंत देखील सोडीत नसे. बरोबरच आहे कीं, संकट प्रसंगीं देखिल क्षमावान् व्यक्ति घाबरत नसते. शांततेपासून भ्रष्ट होत नसते. ६२ चंद्राच्या किरणाप्रमाणें शुभ्रवर्णाचा, स्तुतीस पात्र असा तो सिंह प्रत्येक दिवशीं शांतपरिणामांत आपलें मन लाऊन सूर्याच्या किरणसमूहाच्या संतापामुळें बर्फाच्या गोळ्याप्रमाणें वितळून गेला ६३ श्री जिनेश्वराच्या उपदेशाकडे ज्याची बुद्धि लागली आहे व संसाराच्या भयापासून ज्याचें मन व्याकुल झालें आहे अशा त्या सिंहानें निश्चल होऊन एक महिनापर्यंत उपवास केला व पापासहित प्राणत्याग केला.

६४ यानंतर तो सिंह धर्माचरणाच्या फलानें तत्काल सौधर्म स्वर्गांत जन्मून मनोहर नांवाच्या विमानांत सुंदर शरीराचा धारक 'हरिध्वज' नांवाचा प्रसिद्ध देव झाला. बरोबरच आहे कीं, सम्यक्त्वाची निर्मलता कोणाला बरें सुख देण्याला कारण होत नाहीं? अर्थात् सर्वांनाच होतें. ६५ मोठ्यानें जेथें जय जय असे शब्द

दिव्यांगनाभिरभिमंगलधारिणीभिः कोऽहं किमेतदिति चिंतयति स्म धीरः ॥ ६५ ॥

ज्ञात्वा क्षणादवधिना सकलं स्ववृत्तं तस्मात्स तन्मुनियुगं सह तैः समेत्य ॥

अभ्यर्च्य हैमकलशैश्च मुहुः प्रणामैरित्यब्रवीत्प्रमदनिर्भरचित्तवृत्तिः ॥ ६६ ॥

योऽभ्युद्धृतो दुरितखंजनतो भवद्भिर्बद्ध्वा घनं हितकथोरुवरत्रिकाभिः ॥

सोऽहं हरिः सुरवरोऽस्मि सुरेंद्रकल्पः कस्योन्नतिं न कुरुते भुवि साधुवाक्यं ॥ ६७ ॥

अनाप्तपूर्वं भवतां प्रसादात्सम्यक्त्वमासाद्य यथावदेतत् ॥

त्रैलोक्यचूडामणिशेखरत्वं प्रयातवान्संप्रति निर्वृतोऽस्मि ॥ ६८ ॥

बोलणारे, आनंद वाद्यें वाजविण्यांत कुशल असलेले अशा परिवार देवांनीं व मंगलवस्तु हातांत धारण करणाऱ्या स्वर्गीय सुंदर देवांगनांनीं युक्त असा तो उठलेला धीरदेव ' मी कोण व हें काय आहे, असा विचार करूं लागला. ६६ यानंतर थोड्याच वेळेनें अवधिज्ञानानें आपली पूर्वजन्माची सर्व हकीकत जाणून त्या सर्व परिवार देवासह तो हरिध्वज देव स्वर्गापासून त्या मुनिद्वयाकडे ( अमितकीर्ति व अमितप्रभ ) येऊन सुवर्णकुंभांनीं व वारंवार नमस्कार करण्यानें त्यांचें पूजन करून आनंदानें ज्याचें अंतःकरण भरून गेलें आहे असा होत्साता पुढें लिहिल्याप्रमाणें बोलू लागला ६७ मुनिश्रेष्ठहो ! ज्याला आपण हितोपदेशरूपी जाड दोरखंडांनीं पापरूपी गाळांतून वर काढिलें तोच सिंह मी सध्या देवेंद्रतुल्य असा महर्द्धिक देव झालों आहे. बरोबर आहे कीं, सत्पुरुषांचा उपदेश कोणाची उन्नति करीत नाहीं बरें ? सर्वांची करितो. ६८ हे मुनिराज ! आपल्या कृपेनें पूर्वीं कधीं प्राप्त न झालेलें असें हें सम्यग्दर्शन यथार्थ रीतीनें प्राप्त करून घेऊन मी त्रैलोक्यचूडामणींच्या किरीटपणाला प्राप्त होऊन आतां मुक्त झालों आहे. अर्थात् आतां मुक्तिलाभ होणें फार दूर नाहीं ६९ ज्यांत ज्ञातारपणारूपी लाटा आहेत, जन्मरूपी पाण्यानें भरलेला, मरणरूपी मगर ज्यामध्यें आहे असा, मोठा

जरावीचीभंगो जननसलिलो मृत्युमकरो ।
महामोहावर्तो गदनिवहफेनैः शबलितः ॥
मया संसाराब्धिर्भवदमलवाक्यप्लवभृता ॥
समुत्तीर्णः किंचित्प्रभवनतटीशेषमचिरात् ॥ ६९ ॥

इत्थं निगद्य विबुधःस पुनःपुनश्च संपूज्य तौ यतिवृषौ प्रययौ स्वधाम॥
विन्यस्य मूर्ध्नि सुचिराय तदंघ्रिधूलिं रक्षार्थभूतिमिव संसृतियातुधान्याः ॥ ७० ॥

शरदुडुपतिरश्मिश्रीमुषा हारयष्ट्या सह हृदयविभागे बद्धसम्यक्त्वसंपत् ॥
अभिमतसुरसौख्यं निर्विशन्नप्रमत्तो जिनपतिपदपूजां तत्र कुर्वन्नुवास ॥ ७१ ॥

इत्यसगकृते श्रीवर्द्धमानचरिते सिंहप्रायोपगमनं नामैकादशः सर्गः

मोह हाच भोवरा ज्यांत आहे असा, नानाप्रकारचे रोगरूपी फेसानें युक्त असलेला असा संसाररूपी समुद्र हे मुनिराज! आपल्या उपदेशरूपी नांवेचा आश्रय घेणाऱ्या मजकडून तरला गेला आहे. आतां कांहीं जन्म घेणें हाच कोणी किनारा तो मात्र उरला आहे. तोही मी लौकरच तरून जाईन. ७० याप्रमाणें बोलून व पुनः पुनः त्या दोन श्रेष्ठ चारण मुनिराजांची पूजा करून व संसाररूपी पिशाचापासून स्वतःचें पुष्कळवेळपर्यंत रक्षण करण्याकरितां जणु त्यांच्या चरणाची धूळ आपल्या मस्तकावर धारण करून तो देव आपल्या ठिकाणीं निघून गेला. ७१ शरत्कालाच्या चंद्र किरणाची शोभा हरण करणाऱ्या रत्नहारासह ज्यानें आपल्या हृदयावर सम्यक्त्व संपत्ति धारण केली आहे असा व प्रमादरहित होऊन दररोज जिनेश्वराच्या चरणांची पूजा करणारा तो देव आपल्याला आवडत्या अशा दिव्य सुखांचा अनुभव घेत तेथें—स्वर्गामध्यें राहूं लागला.

* याप्रमाणें असगकविकृत श्रीवर्द्धमान चरित्रामध्यें सिंहाच्या प्रायोपगमनाचें वर्णन करणारा अकरावा सर्ग संपला. *

# द्वादशः सर्गः

अथास्ति कच्छाविषयः प्रतीतो द्वीपे द्वितीये कुरुभूमिकल्पः ॥
प्राच्यां दिशि प्राच्यसुरालयस्य सीतापगोदक्तटभागलग्नः ॥ १ ॥
रौप्यो गिरिस्तत्र नभश्चराणां धाम स्वधाम्ना विजितान्यशैलः ॥
पंचाधिका विंशतिरूर्ध्वमाना च्छतं च तिर्यग्वरयोजनानाम् ॥ २ ॥
यः काशशुभ्रैः शिखरैरदभ्रैरभ्रंकषाग्रैर्हसतीव नाकं ॥
वाग्गोचरातीतसुरूपसंपद्विद्याधरावाससदावलिप्तः ॥ ३ ॥
यत्रात्तधौतासिमयूखरेखाश्यामायिताशेषशरीरशोभाः ॥
इतस्ततो यान्त्यभिसारिकाःखे दिवा तमिस्रा इव मूर्तिमत्यः ॥ ४ ॥
कान्तोऽपि यत्कूटतटो निकामं न सेव्यते दिव्यवधूजनेन ॥

१ दुसऱ्या धातकीखंड नांवाच्या द्वीपांत देवकुरु भोगभूमीप्रमाणे प्रसिद्धीस आलेला कच्छ नांवाचा देश आहे. हा देश पूर्व मेरुपर्वताच्या पूर्व दिशेस सीता नदीच्या उत्तर किनाऱ्याच्या एका भागावर वसलेला आहे. २ या देशांत विद्याधरांचें निवासस्थान असलेला विजयार्ध या नांवाचा एक रुप्याचा पर्वत आहे. यानें आपल्या कांतीनें इतर पर्वतांच्या शोभेला जिंकिलें होतें. हा पर्वत मोठ्या योजनांच्या[1] प्रमाणानें पंचवीस योजनें उंच व शंभर योजनें रुंद असा आहे. ३ शब्दांनीं ज्याचें वर्णन करणें अशक्य आहे अशा रूपसंपत्तीला धारण करणाऱ्या विद्याधरांचें मी निवासस्थान आहे अशा गर्वानें फुगलेला हा पर्वत मेघांचे विदारण करणाऱ्या अग्रभागांना धारण करणारे व काश पुष्पाप्रमाणें श्वेतवर्णाच्या अनेक मोठ्या शिखरांनीं जणु स्वर्गाला हंसतच आहे असें वाटतें. ४ जेथें जवळ घेतलेल्या स्वच्छ–पाणी

---

टिप्पणीः– १ दोन हजार कोसाचें एक योजन. यास महायोजन म्हणतात

अनन्यसाम्यामवलोक्य कान्तिं विद्याधरीणामतिलज्जितेन ॥ ५ ॥
विद्यानुभावेन परेण केल्यास्तिरोहितांगीरपि यत्र रामाः ॥
श्वासानिलामोदहृता स्वनाथान्भृंगावली सूचयति प्रमूढान् ॥ ६ ॥
न हीयते यत्र सरोवराणां विकाशसंपत्कुमुदोत्करेण ॥
तीरस्थमुक्तोपलसांद्रदीप्तिज्योत्स्नापरीतेन सदा दिवापि ॥ ७ ॥
स्वधामभिः कुंददलावदातैरुत्सारयन्यः परितस्तमिस्रां ॥
सृजन्निवाभाति सितेतरासु ज्योत्स्नामपूर्वामपि शर्वरीषु ॥ ८ ॥
श्रेण्यामपाच्यामथ तत्र हैमप्राकारहर्म्याट्टविराजितत्वात् ॥
अन्वर्थनामास्ति पुरं पुराणां ललामकं हेमपुरं पुराणं ॥ ९ ॥

दिलेल्या तरवारीच्या किरणांच्या रेषांनीं ज्यांच्या सर्व शरीरांचें सौंदर्य निळसर दिसत आहे अशा अभिसारिका स्त्रिया ( जारानें बोलाविलेल्या ठिकाणीं जाणाऱ्या स्त्रिया ) या पर्वतावर इकडे तिकडे आकाशांतून हिंडत असतांना त्या जणु दिवसा मूर्तिमत ह्या अंधारी रात्रीच आहेत अशा भासत असत. ५ या पर्वताचा शिखरतट अतिशय रमणीय असूनही त्याच्यावर देवांगना विहार करीत नसत. याचें कारण हें होतें कीं, तेथील विद्याधरस्त्रियांचें ज्याची कोणीही बरोबरी करू शकणार नाहीं असें सौंदर्य पाहून त्या अतिशय लज्जित झाल्या होत्या. ६ विद्येच्या उत्कृष्ट प्रभावानें विद्याधर स्त्रिया क्रीडाप्रसंगीं आपलें शरीर अदृश्य करीत असत. परंतु त्यांच्या श्वासवायूच्या सुगंधानें आकर्षिलेला भुंग्यांचा समुदाय गोंधळून गेलेल्या त्यांच्या पतींना त्या कोठें आहेत हें सूचवित असत. ७ या पर्वतावरील सरोवरांच्या रात्रीं विकासपावणाऱ्या कमलसमूहानें दिवसा देखिल आपल्या विकास संपत्तीचा त्याग केला नाहीं. याचें कारण हें होतें की, तीरावर असलेल्या मौक्तिकपाषाणाच्या दाट कांतीरूपी ज्योत्स्नेने तीं कमलें व्याप्त झालीं होतीं. मौक्तिकपाषाणांची कांति चंद्रकिरणाप्रमाणें असल्यामुळें नेहमीं तेथें तीं कमलें प्रफुल्लित राहात असत. ८ कुंदपुष्पांच्या कळ्याप्रमाणे असलेल्या स्वतःच्या कांतींनीं चोहोंकडून दाट अशा अंधारी रात्रींना हटविणारा हा पर्वत कृष्णपक्षाच्या रात्रीं देखिल जणु अपूर्व चांदण्याची शोभा उत्पन्न करणारा असा शोभत असे. ९ या पर्वताच्या दक्षिण श्रेणीवर सोन्याचा तट, सोन्याचीं घरे व सज्जे यांनीं शोभत

निसर्गवैमल्यगुणेषु यस्मिन् रत्नोपलेष्वेव परं खरत्वं ॥
संलक्ष्यतेऽन्तर्मलिनत्वमिंदोः कलावतां पक्षवतां च मध्ये ॥ १० ॥
त्यागान्वितो यत्र सदा विरूपः परं बुधानां कुलमप्रमाणं ॥
भवत्यनिष्टो यतिरेव योगक्रियासु दक्षः परलोकभीरुः ॥ ११ ॥
यत्रांगनानां वदनारविंदे निश्वासलोभेन पतन्मुदालिः ॥
कराहतो हस्तमपि प्रहृष्टो रक्तोत्पलाशंकिमनाः परैति ॥ १२ ॥
तस्याभवत्पालयिता विनीतो राजा प्रजापालनलब्धकीर्तिः ॥
पुरस्य वीरः कनकप्रभनामा पुरःसरो नीतिविदां सतां च ॥ १३ ॥

असलेले, सर्व नगरामध्यें तिलकभूत असें हेमपुर या सार्थक नांवाचे प्राचीन शहर होतें. १० या शहरांत स्वाभाविक निर्मलगुण धारण करणाऱ्यामध्यें फक्त रत्नपाषाणामध्येंच 'खरत्व' कठोरता होती. कलावान-गायन नृत्यादिकला जाणणारे, पक्षीं सोळा कलांनी युक्त, पक्षवान् जाति, कुल वगैरेंचा पक्ष धारण करणारे, पक्षीं शुक्ल व कृष्ण पक्ष यांनी युक्त अशामध्ये फक्त चंद्राच्या ठिकाणींच कलंक आढळून येत असे.

११ या हेमपुर शहरांत त्यागान्वित-दान देणारे लोक नेहमी विरूप असत ह्मणजे कुरूप होते. याचा विरोध परिहार असाः-नेहमीं दान देत असल्यामुळे ते विरूप अर्थात् द्रव्यानें रहित होते. तसेंच तेथील विद्वानांचा समुदाय अप्रमाण अर्थात् अविश्वस्त होता. या विरोधाचा परिहार असा-तेथें विद्वानांचे प्रमाणच नव्हते अर्थात् तेथें अगणित विद्वान होते. तेथें अनिष्ट फक्त यतिराजच होते अर्थात् इष्ट अशा पंचेंद्रियांच्या विषयसुखापासून ते रहित होते परलोकापासून भिणारेच फक्त योगक्रियेमध्यें -ध्यान करण्यामध्यें दक्ष होते अर्थात् ध्यानामध्यें दक्ष असणारे मुनिवर्यच फक्त परलोकभीरु नारकादि जन्मापासून भीत होते. तेथील गृहस्थ वर्ग परलोक-शत्रुसमूह त्यापासून भय बाळगीत नसे १२ येथे स्त्रियांच्या मुखकमलावर सुगंधिश्वासाच्या लोभानें आनंदयुक्त होऊन पडणारा भुंगा जेव्हां स्त्रियांकडून हातानें दूर केला जात असे तेव्हां हा हातच तांबडे कमल आहे अशी शंका त्याच्या मनांत उत्पन्न होऊन तो आनंदित होऊन त्याच्या सभोंवती घिरट्या घालीत असे १३ या हेमपुरशहराचें रक्षण करणारा, पराक्रमी, सत्पुरुष व नीतिज्ञ लोकांचा पुढारी. व प्रजेचें पालन करण्यानें ज्याला कीर्तिलाभ झालेला आहे

सुनिश्चलातिष्ठदसौ यदीये शरन्नभःश्यामरुचौ जयश्रीः ॥
विदारयेन्मामपि संचलन्ती धारा शितास्येति भियेव खड्गे ॥ १४ ॥
भयात्परिम्लानमुखानि पुंसां पश्यत्ययं शौर्यनिधिर्न युद्धे ॥
इतीव मत्वा पुरतो यदीयः प्रोत्सारयामास रिपून्प्रतापः ॥ १५ ॥
नित्योदयो भूमिभृतां शिरःस्सु विन्यस्तपादः कमलैकनाथः ॥
यस्तिग्मरश्मेः सदृशोऽपि धात्रीं प्रल्हादयामास करैरतिग्मैः ॥१६॥
अनूनशीलाभरणैकभूषा विश्रामभूमिः कमनीयतायाः ॥
महीपतेस्तस्य बभूव देवी ख्यातान्वया या कनकादिमाला ॥ १७॥
सौधर्मकल्पादवतीर्य पुत्रः पित्रोस्तयोः संमदमादधानः ॥
अनल्पकांतिद्युतिसत्वयुक्तो हरिध्वजोऽभूत्कनकध्वजाख्यः ॥ १८ ॥

असा कनकाभ नांवाचा सुशिक्षित राजा होता. १४ या राजाच्या शरत्कालाच्या आकाशाप्रमाणें नीलवर्णाच्या खड्गामध्यें असलेली याची तीक्ष्ण धार " मी जर चंचल बनल्ये तर मला देखिल ती कापून काढील " ह्मणून जणू भीतीनें राजलक्ष्मी निश्चल होऊन राहिली. १५ हा शौर्याचा सांठा असलेला राजा भीतीनें ज्यांचीं तोंडें सुकून गेलीं आहेत अशा मनुष्यांचें युद्धामध्यें दर्शन घेत नसतो असें समजून जणू याचा प्रताप त्यांना या राजापासून दूर सारीत असे. १६ नेहमीं उदयानें युक्त, भूमिभृतांच्या-पर्वतांच्या मस्तकावर पाद-किरण ठेवणारा, राजाच्या पक्षीं राजांच्या मस्तकावर आपले पाय ठेवणारा, कमलैकनाथ-कमलांचा स्वामी, राजपक्षीं कमलेचा-लक्ष्मीचा पतिः असा तो राजा सूर्यासारखा असूनही आपल्या सौम्य अशा करांनीं प्रजेला आनंदित करीत होता. सूर्य आपल्या करांनीं-किरणांनीं पृथ्वीला संतप्त करीत असतो. परंतु हा कनकाभ राजा आपल्या करांनीं टॅक्स-राजग्राह्य भाग यानें आनंदित करीत असे १७ या राजाला प्रसिद्ध वंशांत उत्पन्न झालेली कनकमाला नांवाची राणी होती. ही पूर्णावस्थेला पोहोंचलेल्या पातिव्रत्यरूपी अद्वितीय अलंकारांनी भूषित झालेली व सौंदर्याचें विश्रांतिस्थान अशी होती. १८ विपुलकांति, प्रभाव व पराक्रम या गुणांनीं युक्त असा तो हरिध्वज नांवाचा देव सौधर्म स्वर्गांतून येऊन या उभय माता-पित्यांना आनंदित करणारा कनकध्वज नांवाचा मुलगा होऊन जन्मला.

अकारयच्चारुजिनाधिपानामनारतं गर्भगतोऽपि मातुः ॥
यो दौहृदायासपदेन पूजां सम्यक्त्वशुद्धिं प्रथयन्निव स्वां ॥ १९ ॥
यस्मिन्प्रसूते ववृधे कुलश्रीश्चंद्रोदये प्रत्यहमंबुराशेः ॥
वेलेव चूतद्रुमपुष्पसंपत्पुष्पाकरस्येव च संनिधाने ॥ २० ॥
विगाह्यमाना युगपच्चतस्रो नरेंद्रविद्याः सहसा विरेजुः ॥
विशुद्धया तस्य धिया निसर्गाद्दिशोऽपि कीर्त्या कमनीयमूर्तेः ॥२१॥
यो यौवनश्रीनिलयैकपद्मोऽप्यनूनधैर्यः स्ववशं निनाय ॥
अरातिषड्वर्गमनन्यसाध्यं विद्यागणं च प्रथितप्रभावः ॥ २२ ॥
यदृच्छया यांतमुदीक्ष्य पौराः सुनिश्चलाक्षा इति यं प्रदध्युः ॥
किं मूर्तिमानेष स चित्तजन्मा किं रूपकांतेरवधिस्त्रिलोक्याः ॥२३॥

१९ ज्यावेळीं हा मातेच्या गर्भामध्यें होता तेव्हां डोहाळ्याच्या पीडेच्या निमित्तानें आपल्या मातेकडून जिनेश्वराची नेहमी त्यानें पूजा करविली. या त्याच्या कृतीवरून जणु त्यानें स्वतःच्या सम्यग्दर्शनाची प्रसिद्धी करविली. २० चंद्राच्या उदयानें जसा समुद्राचा किनारा भरतीनें युक्त होतो अथवा वसंत ऋतूच्या आगमनानें जसा आम्रवृक्षाला मोहोर येतो त्याप्रमाणें हा जेव्हां जन्माला आला तेव्हां दररोज राजाच्या वंशाची लक्ष्मी–राजलक्ष्मी वृद्धिंगत होऊं लागली.

२१ या कनकप्रभ राजपुत्राच्या निर्मलबुद्धीच्या द्वारें ज्यांचा अभ्यास केला गेला आहे अशा चार राजविद्या एकदम फार शोभूं लागल्या व स्वाभाविक सुंदर शरीराच्या या राजपुत्राच्या कीर्तीनें दिशा देखिल फार सुंदर दिसूं लागल्या. २२ हा कनकप्रभ राजपुत्र तारुण्यरूपी लक्ष्मीला राहण्यासाठीं अद्वितीय कमलासारखा होता. तथापि याचें ठिकाणीं पूर्ण धैर्य वास करीत होतें. यानें इतरांना जिंकतां न येणाऱ्या अशा काम, क्रोध, लोभ, मद, मान व हर्ष या सहा शत्रूंना वश केलें होतें. तसेंच हा मोठा प्रभावशाली होता म्हणून याला प्रज्ञप्ति वगैरे अनेक विद्याही सिद्ध झाल्या होत्या. २३ हा राजपुत्र जेव्हां कोठेंतरी साहजिक रीतीनें थाटमाट न करितां जाण्यास निघाला असतां नगरवासी लोकांचे नेत्र याच्याकडे टक लाऊन पाहात असत व त्यावेळीं लोक हा मूर्तिमंत मदन आहे काय ? किंवा त्रैलोक्याच्या रूपसौंदर्याची हा सीमाच बनला आहे काय ? असा

निपत्य यस्मिन्पुरसुंदरीणामिंदीवरश्रीरुचिरा सतृष्णा ॥
कटाक्षसंपन्न चचाल मग्ना सुदुर्बला गौरिव खंजनांते ॥ २४ ॥
आकृष्टवान्खेचरकन्यकानां चेतांसि यस्तासु निरादरोऽपि ॥
वपुर्विशेषेण निजेन राजन्नयांस्ययस्कांत इव प्रतीतः ॥ २५ ॥
अमेयगंभीरगुणस्य दूरादधिज्यचापः प्रतिपाल्य रंध्रं ॥
यस्यास्त कंभूर्धनिनो निशीथे सुजाग्रतो भीरुरिवैकचौरः ॥ २६ ॥
पितुर्निदेशात्कनकप्रभायाः स्फुरत्प्रभायाः समवाप्य योगं ॥
रराज संतापहरः प्रजानां स विद्युता वा नववारिवाहः ॥ २७ ॥
परस्परं तौ स्ववशं निकामं वधूवरौ निन्यतुरात्मकान्त्या ॥
प्रियेषु यत्प्रेमरसावहत्त्वं तच्चारुताया हि फलं प्रधानं ॥ २८ ॥

विचार करीत असत. २४ जशी गाळामध्यें फसलेली अशक्त गाय तेथून हालूं शकत नाही, त्याप्रमाणें या शहरांतील सुंदर स्त्रियांची नीलकमलाच्या कांतिप्रमाणें सुंदर असलेली व लुब्ध बनलेली कटाक्षसंपत्ति या राजपुत्रावर पडून तेथेंच ती निश्चल होत असे. तेथून निघण्यास ती असमर्थ होत असे. २५ स्वतःच्या विशिष्ट शरीराच्या कांतीनें शोभणाऱ्या या राजपुत्रानें विद्याधरांच्या सुंदर कन्यामध्यें निरदर होऊन देखिल लोहचुंबकमणि जसें लोखंडास इच्छा नसतांही आकर्षण करितो त्याप्रमाणें त्यांचीं मनें आपल्याकडे ओढून घेतलीं. अर्थात् याला पाहिल्या बरोबर अनेक विद्याधर कन्यांना हा आपला पति व्हावा असें वाटूं लागलें २६ जसें अर्धरात्रीं एखादा चोर श्रीमंत मनुष्य जागा असेल तर भीतियुक्त होऊन तो केव्हां निजेल याची वाट पाहात त्याच्यापासून दूर बसत असतो. त्याप्रमाणें ज्याचे अपरिमित व गंभीर गुण आहेत अशा या विवेकयुक्त राजपुत्रापासून दूर राहून व आपलें धनुष्य सज्ज करून मदन स्वतःच्या प्रवेशाकरितां वाट पहात बसला होता. २७ जिच्या देहापासून सौंदर्यकांति बाहेर पडत आहे अशा कनकप्रभा नांवाच्या विद्याधर कन्येशीं हा कनकध्वज राजपुत्र बापाच्या परवानगीनें संबंध पाऊन अर्थात् विवाह करून जसा लोकांचा संताप दूर करणारा नवीन मेघ विजेशी संयोग पाऊन शोभतो तसा प्रजेला संताप रहित करणारा होतसाता शोभूं लागला. २८ स्वतःच्या सौंदर्यानें त्या पतिपत्नींनीं एकमेकांस अगदीं वश करून घेतलें. बरोबरच आहे कीं आवडत्या

स्थातुं निमेषार्धमपि प्रतीतावन्योन्यमुन्मुच्य न शेकतुस्तौ ॥
अनूनलावण्यविशेषलक्ष्मीं वेलां समुद्राविव धारयन्तौ ॥ २९ ॥
लतालये नंदनकाननांते प्रवालशय्यामधिशय्य कान्तां ॥
प्रसादयन्कोपविवर्तितांगीं रेमे मनाक्प्रस्फुरिताधरौष्ठीं ॥ ३० ॥
जवानिलाकृष्टपयोधरेण गत्वा विमानेन तया समेतः ॥
आनर्च माल्यादिभिरादृतात्मा जिनालयान्मंदरसानुभाजः ॥ ३१ ॥
अथैकदा संसृतिवासभीतस्तस्मै स राज्यं कनकध्वजाय ॥
प्रदाय राजा सुमतेः समीपे जग्राह दीक्षां विजिताक्षवृत्तिः ॥ ३२ ॥
अनन्यलभ्यामपि राज्यलक्ष्मीमवाप्य नौद्धत्यमवाप धीरः ॥
तथाहि लोके महतां विभूतिर्महीयसी नापि विकारहेतुः ॥ ३३ ॥

वस्तूवर नेहमीं प्रेम उत्पन्न करणे हेंच सौंदर्याचें मुख्य फल आहे. २९ जसे दोन समुद्र पूर्ण खारटपणाच्या विशेष शोभेला धारण करणाऱ्या आपल्या तटांचा क्षणमात्रही त्याग करीत नाहींत तसे परिपूर्ण सौंदर्य लक्ष्मीला धारण करणारे हे प्रसिद्ध पतिपत्नी एकमेकाला सोडून अर्धाक्षणपर्यंत देखिल वेगळे राहू शकत नसत ३० हा राजपुत्र नंदन वनामध्यें कोंवळ्या पल्लवांच्या शय्येवर निजऊन जिचा खालचा ओठ थोडासा स्फुरण पावत आहे व जिनें कोपानें आपलें शरीर वळविलें आहे अशा आपल्या पत्नीला प्रसन्न करुन तिच्याशीं रममाण होत असे.

३१ वेगापासून उत्पन्न झालेल्या वाऱ्यानें मेघांना आकर्षण करुन घेणाऱ्या विमानांत आपल्या पत्नीसह बसून तो राजपुत्र मंदर पर्वतावर जात असे व तेथें असलेल्या जिनमंदिरांची पुष्प वगैरे अष्टद्रव्यांनीं आदरयुक्त होऊन पूजा करीत असे. ३२ एके वेळीं संसार वासापासून भ्यालेल्या कनकाभ राजानें या कनक-ध्वजाला राज्य दिलें व सुमति नांवाच्या मुनीश्वराजवळ ज्यानें आपलीं इंद्रियें ताव्यांत ठेविलीं आहेत असा होऊन दीक्षा घेतली. ३३ या कनकध्वजाला इतरांना मिळण्यास अशक्य अशी राज्यलक्ष्मी मिळाली होती. तथापि हा गंभीर असल्यामुळें याच्या ठिकाणीं उद्धतपणा उत्पन्न झाला नाहीं. बरोबरच आहे कीं, सत्पुरुषांना मोठें वैभव मिळालें तरी तें त्यांना विकार उत्पन्न करण्यास कारण होत नाहीं ही गोष्ट जगामध्यें प्रसिद्ध आहे. २४ चंद्राच्या किरणाप्रमाणें शुभ्र अशा स्वतःच्या

चंद्रांशुशुभ्रैरपि स प्रजासु सदानुरागं स्वगुणैश्चकार ॥
निरत्ययं प्रत्यहमूर्जितश्रीरचिंत्यरूपा महतां हि वृत्तिः ॥ ३४ ॥
स चंदनस्थासकवत्सुखाय प्रीत्योन्मुखानामभवन्निकामं ॥
दूरस्थितोऽपि प्रददाह शत्रून् तपे विवस्वानिव सप्रतापः ॥ ३५ ॥
प्रजानुरागं विमलेव कीर्तिः सुयोजिता नीतिरिवेप्सितार्थं ॥
तस्यार्थवोधं धिषणेव सूनुमजीजनद्धेमरथं प्रियासौ ॥ ३६ ॥
इत्थं स सांसारिकसौख्यसारं पंचेंद्रियेष्टं भुवि निर्विवेश ॥
प्रियांगनोत्तुंगपयोधराग्रप्रमृष्टवक्षःस्थलचंदनश्रीः ॥ ३७ ॥
अथान्यदा मत्तचकोरनेत्रां कांतां स्वहस्तार्पितचारुभूषां ॥
आदाय विद्याधरराजसिंहः सुदर्शनोद्यानमियाय रंतुम् ॥ ३८ ॥

गुणांनीं या राजानें प्रजेमध्यें आरक्तपणा [पक्षीं प्रेमळपणा उत्पन्न केला.] दररोज नाश न पावतां त्याची लक्ष्मी उत्कर्षाला पोहोंचत असे. बरोबरच आहे कीं, मोठ्या लोकांचा स्वभाव अचिंत्य असतो. चंद्राचे किरण पांढरे असतात परंतु त्यांचें सौंदर्य दिवसा अस्ताला जाऊन रात्रीं वृद्धिंगत होत असतें. परतु या राजाची लक्ष्मी नेहमी उदयरूप होती व वाढतच जात होती. तसेंच याचे गुण पांढरे असून तांबडेपणा उत्पन्न करीत असत. यामुळें कवि मोठ्यांचा स्वभाव अचिंत्य असतो असें म्हणतो तें योग्य आहे. ३५ हा राजा प्रीतीनें याच्याकडे जे पाहात असत त्यांना चंदनाच्या उटीप्रमाणें अतिशय सुखदायक होता व प्रतापानें सहित असलेला हा राजा शत्रूंना ग्रीष्मऋतूंतील सूर्याप्रमाणे दूर राहूनही भाजून काढीत असे. अर्थात् अनुकूल लोकांना हा सुख देत असे. प्रतिकूलांना हा दुःखदायक होता. ३६ निर्मळ कीर्ति जशी प्रजाप्रेमाला जन्म देते. उत्तम रीतीनें योजिलेली नीति इच्छित पदार्थास प्रसवते; बुद्धि जशी पदार्थ ज्ञानाला उत्पन्न करिते तशी या नृपालाची पत्नी हेमरथ नांवाच्या मुलाला प्रसवली. ३७ प्रियपत्नीच्या उंच अशा स्तनाग्रांनीं ज्याच्या वक्षःस्थलावरची चंदनाच्या उटीची शोभा पुसली गेली आहे अशा या राजानें या भूतलावर पंचेंद्रियांना आवडत्या अशा सांसारिक सुखांच्या सारभागाचा याप्रमाणें बराच कालपर्यंत अनुभव घेतला. ३८ एकेवेळीं जिनें आपल्या हातांत उत्तम रत्नालंकार घातले आहेत, जिचे मत्त चकोरपक्षाप्रमाणें डोळे

तस्यैकदेशस्थितबालपिंडीद्रुमस्य मूले विपुलाश्मपट्टे ॥
बालातपश्रीमुषि रागमल्लं निपात्य तस्योपरि वा निपण्णम् ॥३९॥
कृशं निजांगैरकृशं तपोभिः स्थानं शमस्यैकपतिं क्षमायाः ॥
परीषहाणामवशं वशाक्षं वासांबुजं चारुचरित्रलक्ष्म्याः ॥ ४० ॥
श्रुतस्य सारार्थमिवात्तरूपं स्वयं दयाया इव साधुवादं ॥
दूरादपश्यन्मुनिमादृतात्मा स सुव्रतं सुव्रतनामधेयम् ॥४१॥कुलकं॥
निधानमासाद्य यथा दरिद्रो जात्यंधवन्नेत्रयुगस्य लाभात् ॥
यतिं तमालोक्य मुदा तदंगे निजेऽप्यमात्याविव सो बभूव ॥४२॥
उपेत्य हृष्टांगरुहैः समंतात्स सूचितान्तःकरणानुरागः ॥
पर्यस्तचूडामणिना ववंदे मूर्ध्ना मुनिं कुड्मलिताग्रहस्तः ॥ ४३ ॥

आहेत अशा आपल्या कनकप्रभा राणीला बरोबर घेऊन विद्याधर राजामध्यें श्रेष्ठ असलेला तो कनकध्वज राजा मेरु पर्वतावरील बगीचांत क्रीडा करण्यासाठीं गेला. ३९ त्या बगीच्याच्या एका भागामध्यें एका लहान अशोक वृक्षाच्या खालीं सूर्याच्या कोवळ्या उन्हाच्या शोभेला हरण करणारा अर्थात् त्या रंगाचा एक लांब रुंद पाषाण होता. त्या पाषाणावर बसलेले मुनि जणु रागरूपी पहिलवानाला खालीं पाडून त्यावर बसले आहेत असें भासत होते. अशा मुनीला या राजानें पाहिलें ४० हे मुनि आपल्या अवयवांनीं कृश होते परंतु तपानें कृश नव्हते. अर्थात् फार मोठे तपस्वी होते. शांतभावाचें स्थान होतें क्षमेचे ते अद्वितीय पति होते. ते परीषहांच्या स्वाधीन झालेले नसून इंद्रियांना त्यांनीं स्वाधीन केलें होतें; सुंदर निर्दोष चारित्र-रूपी लक्ष्मीचे ते निवासस्थान—कमलरूप होते

४१ हे मुनिराज जणु मूर्तिमंत द्वादशांगश्रुत ज्ञानाचा उत्कृष्ट अर्थ होते जणु दयेचा हे साधुवाद होते. अर्थात् दयागुणाच्या कीर्तीनें या मुनीश्वराचें स्वरूप जणु धारण केलें होतें. उत्तम महाव्रतांचे धारक अशा या सुव्रत मुनिराजाला कनकध्वज राजानें ज्याचें अंतःकरण भक्तीनें भरून गेलें आहे असा होऊन दुरून पाहिलें. ४२ खजिना सांपडला असतां जसा दरिद्र्याच्या शरीरांत आनंद मावत नाहीं, किंवा अंधळ्याला गेलेले दोन डोळे पुनः लाभले असतां जसा आनंद होतो तसा त्या मुनींना पाहून राजाला इतका आनंद झाला कीं, तो त्याच्या देहामध्यें मावणें अशक्य झालें.

अघाच्छिदा शांतविलोकितेन कर्मक्षयाशीर्वचसा च कामं ॥
अनुग्रहं तस्य चकार साधुर्भव्ये मुमुक्षोर्न हि निःस्पृहा धीः ॥४४॥
स्थित्वाग्रतस्तस्य मुनेरदूरे विद्याधरेन्द्रो निरवद्यभावः ॥
सप्रश्रयं प्रांजलिरादरेण पप्रच्छ धर्मं तमुदारधर्मम् ॥ ४५ ॥
पृष्टो मुनिस्तेन स इत्युवाच श्रेयो वचो ध्वस्तविकारवर्गं ॥
मिथ्यादृशां चित्तमपि प्रसह्य प्रल्हादयन्दर्शनमोहभाजाम् ॥ ४६ ॥
धर्मो जिनेंद्रैः सकलावबोधैरुक्तः परो जीवदयैकमूलः ॥
स्वर्गापवर्गोरुसुखस्य हेतुः स द्विप्रकारो भवति प्रतीतः ॥ ४७ ॥
सागारिकोऽणुव्रतभेदभिन्नोऽनागारिकः ख्यातमहाव्रतश्च ॥
आद्यो गृहस्थैः परिपालनीयः परं परः संयमिभिर्विविक्तैः ॥ ४८ ॥

४३ आनंद झाल्यामुळें सर्व शरीरभर उत्पन्न झालेल्या रोमांचांनीं ज्यानें आपलें अंतःकरणांतलें प्रेम सूचित केलें आहे असा तो राजा जवळ आला. त्यानें आपले दोन हात कळीसारखे केले आणि जमीनीला टेकला आहे चूडामणि ज्याचा अशा अपल्या मस्तकाने मुनीस नमस्कार केला. ४४ पापाचा नाश करणाऱ्या शांत दृष्टीनें व कर्मांचा क्षय करण्यास समर्थ असलेल्या अशीर्वादानें सुव्रत मुनिराजांनीं राजावर विपुल अनुग्रह केला. बरोबरच आहे कीं, मुनीश्वराची ही भव्यजनावर निस्पृह बुद्धि असत नाहीं- ४५ पवित्र विचाराचा तो विद्याधर राजा मोठ्या आदरानें मुनीश्वराजवळ बसला व विनयानें हात जोडून महा धर्मयुक्त असलेल्या त्या मुनीश्वरास धर्माचें स्वरूप विचारूं लागला. ४६ दर्शनमोहनीय कर्माच्या उदयानें युक्त असलेले अर्थात् मिथ्यात्वी अशाही लोकांच्या अंतःकरणाला प्रयत्नानें आनंदयुक्त करणारे ते मुनिराज जेव्हां राजाकडून विचारले गेले तेव्हां ते विकाररहित व कल्याणकारक असा उपदेश पुढें लिहिल्याप्रमाणें करूं लागले. ४७ " संपूर्ण पदार्थांचें ज्ञान ज्यांना झालें आहे अशा जिनेश्वरांनीं जीवावर दया करणें हेंच ज्यांचें मूल आहे, स्वर्ग व मोक्षाच्या मोठ्या सुखाला हेतु असलेला असा उत्कृष्ट व प्रसिद्ध धर्म दोन प्रकारचा आहे असें सांगितलें आहे. ४८ पहिला सागार धर्म आहे, तो गृहस्थांनीं पाळण्याला योग्य आहे त्यास अणुव्रत धर्म असें ह्मणतात व दुसरा अनगार धर्म आहे तो गृहस्थापासून वेगळे

भद्रानयोर्मूलमुदाहरन्ति सद्दर्शनं सर्वविदो जिनेंद्राः ॥
तत्वेषु सप्तस्वपि निश्चयेन श्रद्धानमेकं तदिति प्रतीहि ॥ ४९ ॥
हिंसानृतस्तेयत्रधूव्यवायपरिग्रहेभ्यो विरतिर्यतीनां ॥
सर्वात्मना तद्व्रतमित्युदीर्णं स्थूला निवृत्तिर्गृहमेधिनां च ॥ ५० ॥
अनादिसांसारिकचित्रदुःखप्रवेकदावानलसंक्षयाय ॥
नान्योऽस्त्युपायो नितरामस्मादतोऽत्र यत्नः पुरुषेण कार्यः॥५१॥
मिथ्यात्वयोगाविरतिप्रमादैः कषायदोषैश्च बहुप्रकारैः ॥
बध्नाति कर्माष्टविधं सदात्मा संसारवासस्य हि कर्म हेतु ॥५२॥
सद्दृष्टिसज्ज्ञानतपश्चरित्रैरुन्मूल्यते कर्मवनं समूलात् ॥
तेषु स्थितं मुक्तिवधूःपुमांसं समुत्सुकेव स्वयमभ्युपैति ॥५३॥
अज्ञानमूढः स्वपरोपतापानपीन्द्रियार्थान्सुखमित्युपास्ते ॥
सुदुःकृतान्स्वात्मविदभ्युपेतुं बिभेति तान्दृष्टिविषानिवाहीन् ॥५४॥

अशा संयमी लोकांचा-मुनीचा आहे. याला महाव्रत धर्म म्हणतात. ४९ हे भल्या गृहस्था! या दोन्ही धर्माचे मूळ सम्यग्दर्शन आहे असें सर्वज्ञ जिनेश्वर म्हणतात. सम्यग्दर्शनाशिवाय उपर्युक्त धर्माला धर्म हें नांव प्राप्त होत नाहीं. जीवादिक सात तत्वामध्यें निश्चय करून दृढ श्रद्धान करणे हें सम्यग्दर्शन आहे असें तूं समज. ५० हिंसा, खोटें भाषण, चोरी, स्त्रीसेवन, व परिग्रह यांचा पूर्णपणें त्याग करणें हे मुनीचें व्रत होय व स्थूलपणें यांचा त्याग करणें हें गृहस्थाचें व्रत होय असें शास्त्रांत सांगितलें आहे.

५१ अनादिकालापासून उत्पन्न झालेली जीं सांसारिक नानाप्रकारचीं दुःखे हींच जंगलांतील मोठ्या अग्निसारखीं आहेत. अशा दुःखांचा नाश करण्यासाठीं श्री जिनांनीं सांगितलेल्या धर्मरूपी उपायाहून दुसरा उपाय मुळीच नाहीं. यास्तव या धर्मामध्यें मनुष्यानें अवश्य प्रयत्न करावा. ५२ मिथ्यात्व, योग, अविरति, प्रमाद व कषाय या अनेक प्रकारच्या दोषांनीं हा आत्मा नेहमीं आठ प्रकारचें कर्म बांधून घेत असतो. व हीं कर्मेंच आत्म्याला संसारांत राहण्यास कारण होतात ५३ सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र आणि तप या उपायांनीं हें कर्मरूपी जंगल मुळापासून उपटून टाकितां येतें. या उपायांत स्थिर झालेल्या पुरुषाकडे

न जन्मनोऽन्यत्परमस्ति दुःखं शरीरिणां मृत्युसमं भयं च ॥
कष्टं निकामं जरसोऽनुरूपं ज्ञात्वेति संतः स्वहिते यतंते ॥५५॥
अनादिकालं भ्रमतो भवाब्धौ प्रियाप्रियत्वं सकलाः प्रयाताः ॥
जीवस्य जीवा ननु पुद्गलाश्च नोकर्मकर्मग्रहणप्रयोगात् ॥५६॥
अनेकशो यत्र मृतो न जातो न सोऽस्ति देशः सकले त्रिलोके॥
सर्वेऽपि भावा बहुशोऽनुभूता जीवेन कर्मस्थितयोऽप्यशेषाः ॥५७॥
चिराय जानन्निति सर्वसंगे न रज्यते ज्ञानविशुद्धदृष्टिः ॥
विमुक्तसंगस्तपसा समूलमुन्मुल्य कर्माण्युपयाति सिद्धिं ॥५८॥
इतीरयित्वा वचनं वचस्वी हिताय तस्योपरराम साधुः ॥
विशांपतिस्तच्च तथेति मेने प्रत्येति भव्यो हि मुमुक्षुवाक्यं ॥५९॥

मुक्तिरूपी स्त्री स्वतः जणु उत्कंठित होऊन प्राप्त होत असते. ५४ अज्ञानानें मूर्ख बनलेला जीव स्वतःला व इतरांना त्रस्त करून सोडणाऱ्या इंद्रियांना आवडणाऱ्या अशा पदार्थांना सुख समजून त्यांचीच नेहमी उपासना करीत असतो. परंतु आत्मज्ञानी पुरुष अतिशय दुःख देणाऱ्या या इंद्रियभोग्य पदार्थांना दृष्टिविष नांवाच्या सर्पाप्रमाणें जाणून त्यांचा स्वीकार करण्यास भीत असतो. ५५ प्राण्यांना जन्मासारखें दुसरें दुःख नाहीं व मृत्युसारखी दुसरी भीति नाहीं. तसेंच म्हातारपणासारखें दुसरें अतिशय कष्ट नाहीं. हें सर्व जाणून सत्पुरुष स्वतःच्या हिताविषयीं यत्न करीत असतात. ५६ अनादिकाळापासून संसारसमुद्रांत फिरणाऱ्या या आत्म्याला सर्व प्रकारचे जीव व पुद्गल प्रिय व अप्रियपणाला प्राप्त होऊन चुकले आहेत. कारण हे पदार्थ नोकर्म व कर्मरूपानें ग्रहण करण्यांत आले आहेत. ५७ या त्रैलोक्यांत असें एकही ठिकाण नाहीं कीं, जेथें या जीवानें अनेकवेळां जन्म व मरण यांचा अनुभव घेतला नसेल. या जीवानें सर्व प्रकारच्या परिणामांचा व सर्व प्रकारच्या कर्मांच्या जघन्य आणि उत्कृष्ट स्थितींचाही पुष्कळ वेळां अनुभव घेतला आहे. ५८ ज्ञानाने ज्याची दृष्टि निर्मल झाली आहे असा आत्मा हें सर्वसंसाराचें स्वरूप जाणून नेहमीं सर्व परिग्रहामध्यें आसक्त होत नाहीं. सर्व परिग्रहांचा त्याग करून व तपश्चरणानें सर्व कर्मांचा नाश करून तो मोक्षाला जातो. ” ५९ उत्तम भाषण करण्यांत निपुण असलेले ते

सांसारिकीं वृत्तिमवेत्य कष्टां निवर्त्य चित्तं विषयाभिलाषात् ॥
तपो विधातुं विधिनाचकांक्ष श्रुतस्य सारं हि तदेव पुंसः ॥६०॥
आर्द्रोत्तरीयां नयनांबुसेकैरपास्य कांतां सह राज्यलक्ष्म्या ॥
सद्यस्तदन्ते स तपोधनोऽभून्न कालहानिर्महतां हितार्थे ॥६१॥
प्रावर्ततालस्यमपास्य दूरमावश्यकासु प्रकटक्रियासु ॥
गुरोरनुज्ञामधिगम्य भेजे सदोत्तरान्साधुगुणानशेषान् ॥६२॥
ग्रीष्मे महोष्माकुलसर्वसत्वे शृंगे नगस्याभिमुखं खरांशोः ॥
शमातपत्रेण निवारितोष्णः सदाध्यतिष्ठत्प्रतिमोरुयोगः ॥६३॥
इरम्मदोद्गारिभिरुग्रनादैर्धारानिपातैः स्थगिताष्टदिक्कः ॥
विद्युद्दृशा प्रावृषि वीक्ष्यमाणो घनाघनैरास्त स वृक्षमूले ॥६४॥

मुनिराज याप्रमाणें राजाच्या हिताकरितां भाषण करून विराम पावले. राजानेंही त्यांचें तें भाषण सत्य मानिलें. बरोबरच आहे कीं, भव्य जीव मुनीश्वरांचें भाषणावर विश्वास ठेवित असतात. ६० संसाराचें हें दुःखदायक स्वरूप समजून घेऊन राजानें विषयेच्छेपासून आपल्या मनास परावृत्त केलें व शास्त्रोक्त पद्धतीनें अर्थात् दीक्षा घेऊन तप करण्याची तो इच्छा करू लागला. बरोबरच आहे कीं, पुरुषानें जो शास्त्राभ्यास केलेला असतो त्याचें हेंच सार आहे कीं, त्यानें दीक्षा घेऊन आत्म्याचें कल्याण करून घ्यावें.

६१ डोळ्यांतलि अश्रुप्रवाहांनीं जिचें वरचें वस्त्र भिजून ओलें चिंब झालें आहे अशा आपल्या कनकप्रभा पत्नीचा राज्यलक्ष्मीसह तत्काल त्याग करून तो कनकध्वज राजा सुव्रत मुनीजवळ दीक्षा घेऊन तप हेंच ज्याचें धन आहे असा मुनि बनला. बरोबर आहे कीं, जे मोठे पुरुष आहेत ते आपल्या हितकर कार्याच्या सिद्धीसाठीं वेळ गमावीत नाहींत. अर्थात् 'शुभस्य शीघ्रं' या म्हणीला अनुसरून हितकार्य लौकर करितात. ६२ या तपोधनानें आळस दूर झुगारून दिला. व सामायिक, प्रतिक्रमण वगैरे सहा आवश्यक क्रियामध्यें स्पष्ट रूपानें-आविकपणानें प्रवृत्त झाला. तसेंच आपल्या सुव्रतगुरूंची आज्ञा मिळवून त्यानें सर्व उत्तर गुणांना नेहमीं धारण केलें. ६३ अतिशय उष्णतेनें सर्व प्राण्यांना व्याकुळ करून सोडणाऱ्या ग्रीष्म ऋतूमध्यें तो कनकध्वजमुनि पर्वताच्या शिखरावर प्रखर किरणांनीं

प्रालेयपातक्षतपद्मखंडे माघे शयानो बहिरेकपार्श्वम् ॥
आयामिनीरप्यनयत्त्रियामा बलेन धीरो धृतिकंबलस्य ॥६५॥
महोपवासान्विविधानशेषान्प्रकुर्वतस्तस्य यथोक्तमार्गं ॥
ययौ तनुत्वं तनुरेव बाढं न धैर्यमौदार्यसमन्वितस्य ॥६६॥
समुद्धरिष्यामि कथं निमग्नमात्मानमस्माद्भवरवंजनांतात् ॥
संचितयन्नित्यगमत्प्रमादं न जुष्टयोगैः स वशीकृताक्षः ॥६७॥
व्यपेतशंको मुनिरस्तकांक्षो दूरीकृतात्मा विचिकित्सया च ॥
सम्यक्त्वशुद्धिं निरवद्यभावः स भावयामास यथोक्तमार्गे ॥६८॥
ज्ञानं च तस्य क्रियया निकामं यथोक्तया प्रत्यहमादृतात्मा ॥
चारित्रमप्यात्मबलानुरूपं द्विषट्प्रकारं च तपोऽन्वतिष्ठत् ॥६९॥

युक्त असलेल्या सूर्याच्या सम्मुख राग द्वेषांच्या अभावरूपी छत्रीनें उन्हाला दूर करून मोठा प्रतिमायोग नेहमी धारण करीत असे. ( सूर्यासमोर तोंड करून उन्हाळ्यांत उभा राहून ध्यान करणें यास प्रतिमायोग म्हणतात. ) ६४ विजा पाडणारे, भयंकर गर्जना करणारे, मुसळधार पाऊस पाडून आठही दिशा व्याप्त करून टाकणारे, अशा मेघांकडून वीजरूपी डोळ्यांच्या द्वारें पाहिला जाणारा तो मुनि पावसाळ्यांत झाडाखालीं ध्यानांत लीन होत असे. ६५ बर्फाचें पतनानें ज्यानें कमल समूहांचा नाश केला आहे अशा माघ महिन्यांत उघड्या मैदानांत एका अंगावर निजणारा हा धीर गंभीर मुनि धैर्यरूपी घोंगडीच्या साह्यानें हिवाळ्यांतील मोठ्या रात्री व्यतीत करीत असे. ६६ शास्त्रांत सांगितलेल्या पद्धतीप्रमाणें नानाप्रकारचें चतुर्थ, षष्ठ, अष्टम, दशम वगैरे प्रकारचे मोठमोठे उपवास करीत असतां या मुनीश्वराचें शरीरच अतिशय कृश झालें. परतु उदारता गुणानें युक्त असलेल्या याचें धैर्य कृश झालें नाहीं. ज्यानें सर्व इंद्रियें ताब्यांत ठेविलीं आहेत असा तो मुनि या ससाररूपी चिखलापासून बुडालेल्या माझ्या आत्म्याला मी कसा वर काढू शकेन असा विचार करून आवडत्या अशा प्रतिमायोग, वृक्षमूल वगैरे योगामध्यें बिलकुल प्रमाद करीत नसे. या मुनीचे मन जीवादि पदार्थांच्या स्वरूपांत निःसंशय झालें होतें. अर्थात् जिनकथित तत्वामध्यें याचें दृढ श्रद्धान होतें. पंचेंद्रिय विषयापासून उत्पन्न होणारें सुख कर्मापासून उत्पन्न होतें व पापवर्द्धक आहे असें जाणून तो त्याविषयीं निरिच्छ झालेला होता. रत्नत्रयधारक अशा भव्यांना रोगांनीं पीडिलें असतां किंवा त्यांचें घाणेरडे शरीर असेल तर त्यांच्या गुणाकडे

इत्थं धुरं विधुरवर्जितचित्तवृत्त्या धृत्वा चिरं शमवतां निजजीवितांते
सल्लेखनां विधिवदेत्य मृतोऽथ भूत्या कापिष्ठमाप्य स शुभे शुशुभे
विमाने ॥ ७० ॥

देवानंदं निजतनुरुचां संपदा साधु तन्वन् ॥
देवानंदं दधदनुपमं नाम चान्वर्थमित्थम् ॥
चक्रे रागं नयनसुभगस्तत्र दिव्यांगनानां ॥
चक्रेऽरागं जिनमपि हृदि द्वादशाब्धिप्रमायुः ॥ ७१ ॥
इत्यसगकृते वर्द्धमानचरिते कनकध्वजकापिष्ठगमनो नाम द्वादशः
सर्गः ॥

लक्ष्य देऊन हा मुनि किळस करीत नव्हता. यास्तव याचा आत्मा विचिकित्सेनें रहित अर्थात् निर्विचिकित्सित गुणाचा धारक होता. निर्मल परिणामांनीं युक्त अशा या मुनीश्वरानें शास्त्रांत सांगितलेल्या पद्धतीस अनुसरून सम्यक्त्व शुद्ध बनविलें होतें ६९ भक्तियुक्त आहे आत्मा ज्याचा असा तो मुनि शास्त्रांत सांगितलेल्या उपायांच्या द्वारें दररोज यथेच्छ ज्ञान प्राप्त करून घेत असे. यथाशक्ति चारित्र व बारा प्रकारचें तप यांचें पालन करीत असे. ७० याप्रमाणें संक्लेशरहित अशा आपल्या मनाच्या शांत परिणामांनीं पुष्कळ काळपर्यंत शमयुक्त मुनींच्या पुढारीपणाला या कनकध्वजमुनींनें धारण केलें होतें. यानंतर जेव्हां त्याचा मरणकाल जवळ आला तेव्हां शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें सल्लेखना धारण करून त्यानें प्राणत्याग केला तेव्हां याचा आत्मा कापिष्ठ स्वर्गांत जन्मून तेथील सुंदर विमानांत शोभू लागला. ७१ आपल्या शरीराच्या कांतिसंपत्तीनें देवांना अतिशय आनंदयुक्त करणारा व ‘ देवानंद ’ हें अनुपम व अर्थास अनुसरणारें नाव धारण करणारा असा तो नेत्रमनोहर देव दिव्यांगनाच्या समुदायामध्यें प्रेम करू लागला. ज्याचें आयुष्य बारा सागरोपम वर्षाचें आहे अशा त्यानें आपल्या हृदयांत रागरहित अशा जिनेश्वराला धारण केलें.

याप्रमाणें असगकविकृत वर्द्धमानचरित्रांत कनकध्वजमुनि कापिष्ठस्वर्गांत उत्पन्न झाले याचें वर्णन करणारा बारावा सर्ग समाप्त झाला.

—∿卐卐卐∿—

# त्रयोदशः सर्गः ।

श्रीमतामथ सतामधिवासो भारतेऽत्र विततोऽस्ति जनांतः ॥
नाकलोक इव मानवपुण्यैर्गां गतः स्वयमवंत्यभिधानः ॥ १ ॥
यत्र साररहिता न धरित्री पाककांतिरहितं न च सस्यं ॥
पाकसंपदपि नास्ति पुलाका सर्वकालरमणीयविशेषात् ॥ २ ॥
भूरिसारधनधान्यविहीनो नास्ति कश्चिदपि यत्र मनुष्यः ॥
द्रव्यमप्यनुपभुक्तमुपेत्य स्वेच्छया प्रणयिभिर्न निकामं ॥ ३ ॥
चारुताविरहिता न पुरंध्रिश्चारुतापि सुभगत्वविहीना ॥
यत्र नास्ति सुभगत्वमशीलं शीलमप्यविदितं न धरित्र्यां ॥ ४ ॥

१ या भरत क्षेत्रांत धनी व सत्पुरुष यांचें निवासस्थान असलेला असा एक विस्तीर्ण अवंती नांवाचा देश आहे. तो मनुष्याच्या पुण्यानें पृथ्वीतलावर अवतरलेला जणू स्वर्ग आहे असा शोभत होता. २ या देशांतील जमिनी साररहित नव्हत्या. व त्यांत उत्पन्न होणारीं धान्यें पक्वावस्था व कांतीनें रहित होतीं असें नव्हतें. पक्वावस्था देखील पोचट धान्यांनीं युक्त नव्हती. अर्थात् जेव्हां धान्य पिकत असे तेव्हां त्याचे दाणे भरीव असे उत्पन्न होत असत. यावरून हें सिद्ध होत होतें कीं, हा देश नेहमीं रमणीय होता. ३ तेथें असा एकही मनुष्य नव्हता कीं, ज्याच्याजवळ पुष्कळसें उत्कृष्ट धन—गाई, म्हशी वगैरे व धान्य नव्हतें. जें स्नेही मंडळींनीं येऊन यथेच्छ आतिशय उपभोगिलें जात नव्हतें असें द्रव्यच तेथें नव्हतें. अर्थात् तेथील लोकांच्या संपत्ति त्यांच्या स्नेही लोकांकडून यथेच्छ भोगल्या जात असत. ४ त्या देशांतील एकही स्त्री सौंदर्यानें रहित नव्हती व तें तिचें सौंदर्य सौभा-

निर्जला न सरिदस्ति जलं च स्वादुहीनमहिमं न च यत्र ॥
पीततोयमुदितैः पथिकानामस्तुतं न खलु तच्च समूहैः ॥ ५ ॥
पुष्पकांतिरहितोऽस्ति न वृक्षः पुष्पमप्यतुलसौरभहीनं ॥
यत्र सौरभमपि भ्रमरालीरक्षमं वशयितुं न नितांतम् ॥ ६ ॥
अस्ति तत्र सकलोज्ज्वलवर्णा श्रीयुताकृतिरिवोज्जयिनीति ॥
विश्रुता भुवि पुरी निजकान्त्या निर्जितान्यपुरविभ्रमसंपत् ॥ ७ ॥
या सुधाधवलितैर्वरसौधैराःस्थितोज्ज्वलविभूषणरामैः ॥
भाति मेघपदवी धवलाभ्रैः शारदैरिव चिताशतडित्कैः ॥ ८ ॥
हेमशालखचितामलरत्नज्योतिषामिव चितः पटलेन ॥
यत्र च प्रविरलातपलक्ष्मीर्लक्ष्यते ध्वजपटैः स्थगितोऽर्कः ॥ ९ ॥

ज्यानें रहित नव्हतें व सौभाग्य–भाग्यवंतपणा पातिव्रत्य गुणानें रहित नव्हता व पातिव्रत्य गुण अप्रसिद्ध नव्हता. अर्थात् सौंदर्य, सौभाग्य व पातिव्रत्य हे तीन गुण तेथील स्त्रियांत मुख्य रीतीनें राहात होते. ५ तेथील एकही नदी निर्जल–पाण्यानें रहित नव्हती व तिचें ते पाणीही स्वादरहित व गरम असें नव्हतें. अर्थात् पाणी गोड व थंडगार होतें. पाणी पिऊन ज्यांना आनंद झाला आहे अशा वाटसरांच्या समुदायाकडून त्या पाण्याची स्तुति केली गेली नाहीं असें कधीं घडून येत नसे. ६ त्या उज्जयिनी देशांतील प्रत्येक वृक्ष फुलें व कांति यांनीं रहित नव्हता. फुलें देखिल सुगंधपणाने रहित नव्हतीं व जो भुंग्यांच्या पंक्तीला अतिशय वश करण्यास समर्थ नव्हता असा सुगंधपणाही तेथें नव्हता. अर्थात् तेथील झाडें पुष्पें, टवटवीत पणा व .सुगंधपणा यांनीं युक्त होतीं. ७ या देशांत स्वतःच्या सौंदर्यानें जिनें इतर शहराची आश्चर्य उत्पन्न करणारी संपत्ति जिंकिली आहे अशी उज्जयिनी नांवाची नगरी या पृथ्वीतलावर प्रसिद्ध अशी आहे ही नगरी संपूर्ण उज्ज्वल–शुद्ध अशा ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या वर्णांतील मनुष्यांनीं युक्त व लक्ष्मीसंपन्न अशी उद्योगाप्रमाणें शोभत होती ८ ज्यांनीं दिशा व्यापून टाकिल्या असून जे विजांनीं युक्त आहेत अशा शरदृतूच्या पांढऱ्या मेघांनीं जसें आकाश शोभतें तसें उत्तम चमकणाऱ्या अलंकारांनीं सजलेल्या स्त्रिया ज्यावर उभ्या राहिलेल्या आहेत असे चुना लावल्यामुळे पांढरे दिसणाऱ्या सुंदर मोठ्या वाड्यांनीं

आहतोऽपि मुहुरब्जकराग्रैर्नोपयाति पुरतः प्रमदानां ॥
यत्र च प्रियतमो विहितागाः श्वाससौरभवशश्च षडंघ्रिः ॥ १० ॥
संपदं धनपतेरपदानां न्हेपयन्ति धनिनो भुवि यस्यां ॥
अर्थिभिः स्वयमुपेत्य समंताद्गृह्यमाणवररत्नसमूहैः ॥ ११ ॥
बालचंदनलतेव भुजंगैर्वेष्टितापि नितरां रमणीया ॥
या सदा विबुधवृंदसमता राजते सुरपुरीव पुरश्रीः ॥ १२ ॥
वज्रभूपितकरो भुवि राजा वज्रहेतिरिव यः पुरमिद्धां ॥
वज्रसारतनुरध्यवसत्तां वज्रसेन इति विश्रुतनामा ॥ १३ ॥
वक्षसि श्रियमुदीक्ष्य निषण्णामानने च सततं श्रुतदेवीं ॥
यस्य कुंदविशदा कुपितेव दिग्गता न निरवर्तत कीर्तिः ॥ १४ ॥

जी नगरी शोभत होती. ९ जेथें सोन्याच्या तटावर बसविलेल्या स्फाटिक मण्यांच्या कांतिसमूहानें जणु व्याप्त झालेला व ध्वजांच्या वस्त्रांनीं आच्छादित झालेला सूर्य ज्याची प्रकाशशोभा विरळ झालेली आहे असा शोभू लागतो. १० ज्या नगरींत स्त्रियांच्या हाताच्या बोटांनीं वारंवार ताडित झालेला अपराधी प्रियतम-आवडता पति व त्यांच्या श्वासांच्या सुगंधानें वेडावलेला भुंगा हे पुनः पुनः त्यांच्या पुढें जात नाहींत काय ? अर्थात् जाताताच. ११ या नगरींतले श्रीमंत लोक कुबेराच्या दानरहित संपत्तीला लज्जित करितात. कारण याचक लोक आपण होऊन चोहोंकडून येऊन त्यांचीं उत्कृष्ट रत्नें वगैरे संपत्तीचें ग्रहण करीत असतात. तेथील लोक अतिशय श्रीमंत असल्यामुळें ते याचक लोकांना रत्नाचे समूह देऊन टाकीत असत अशी त्यांची भूतलावर सर्वत्र प्रसिद्धी होती. १२ जशी बालचंदनलता सर्पांनीं वेष्टिलेली असूनही अतिशय रमणीय असते. किंवा जशी विबुधवृंद—देवसमूहानें वेष्टित असलेली सुरपुरी—अमरावती शोभते त्याप्रमाणें विबुधवृंदानें—विद्वानांच्या समूहानें ती उज्जयिनी नगरी शोभत असे. १३ जसा इंद्र वज्रभूषितकर—अर्थात् वज्र नांवाच्या शस्त्रानें ज्याचा हात शोभत आहे असा होत्साता स्वर्ग प्रदेशीं अमरावती नगरांत राहात असतो. तसें वज्राचिन्हानें ज्याचा हात शोभत आहे व वज्राप्रमाणें ज्याचें शरीर मजबूत आहे असा पृथ्वीवर वज्रसेन या नांवानें प्रसिद्ध झालेला राजा त्या सुंदर उज्जयिनी शहरांत राहात होता. १४ या राजाच्या वक्षःस्थला-

दूरतो विनमिताखिलशत्रुं स्वप्रतापविसरं विनिनिंद ॥
यः कदाचिदपि युद्धमपश्यन्युद्धदौहृदवशीकृतचेताः ॥१५॥
तस्य निर्मलकरस्य सुशीला नाम नाम महिषी कमनीया ॥
भूपतेरभवदव्यतिरिक्ता कौमुदीव कुमुदाकरबंधोः ॥ १६ ॥
तौ विरेजतुरनन्यसमानौ दंपती भुवि परस्परमाप्य ॥
सर्वलोकनयनोत्सवहेतू कांतियौवनगुणाविव मूर्तौ ॥ १७ ॥
स्वर्गसौख्यमनुभूय स देवः श्रीमतोरथ तयोस्तनयोऽभूत् ॥
आख्यया भुवि सतां हरिषेणो धीरधीरधिपतिः सुमनोज्ञः ॥ १८ ॥
यं कलाधरमिवाभिनवोत्थं संस्पृशन्नरपतिः सह देव्या ॥
वीक्ष्य सम्मदमियाय निकामं प्रीतये भुवि न कस्य सुपुत्रः ॥१९॥

वर लक्ष्मी वसलेली पाहून व मुखांत नेहमी सरस्वती देवी विराजमान झालेली पाहून याची कुंदपुष्पाप्रमाणें निर्मल अशी कीर्ति जणूं रागाऊन सर्व दिशांना निघून गेली. ती परत आली नाही. १५ युद्धाच्या इच्छेनें ज्याचें चित्त व्याकुळ झालें आहे अशा या राजाला कधींही युद्ध करण्याचा प्रसंग पाहण्यांत आला नाहीं ह्मणून दुरूनच ज्यानें सर्व शत्रूंना नम्र केलें आहे अशा स्वतःच्या पराक्रमाच्या समुदायाची तो निंदा करीत असे.

१६ ज्याचे किरण स्वच्छ आहेत अशा रात्रिविकासि कमल समूहाचा बंधु असलेल्या चंद्रापासून त्याची सुंदर ज्योत्स्ना जशी अभिन्न असते तशी निर्मलकर-ज्याचें कर घेणे निर्मल आहे ह्मणजे त्रासदायक नाहीं किंवा ज्याचे हात सुंदर आहेत अशा त्या वज्रसेन राजाला सुशीला नांवाची सुंदर स्त्री होती. ती त्याच्यापासून अभिन्न होती अर्थात् ती त्याची फार आवडती होती. १७ ज्यांची बरोबरी दुसरे कोणी करूं शकत नाहींत असे ते दोघे पतिपत्नी एकमेकांना प्राप्त करून घेऊन फार शोभू लागले. हे दोघेजण सर्वांच्या नेत्रांना आनंद उत्पन्न करण्या : कारण होते व मूर्तिमंत कांति व तारुण्यच जणु आहेत असे लोकांना वाटत असे. १८ लक्ष्मीसंपन्न अशा त्या उभयतांना स्वर्गसुखांचा अनुभव घेऊन तो देवानंद नांवाचा देव भूतलावर हरिषेण या नांवानें प्रसिद्ध असा मुलगा होऊन जन्मला. हा मुलगा गंभीर बुद्धीचा व सत्पुरुषांचा अधिपति होता व अतिशय सुंदर होता. १९ नुकताच ज्याचा उदय झाला आहे अशा सोळा कलांनीं पूर्ण चंद्राप्रमाणें सुंदर

लोकजीवनकरस्थितियुक्तं भूरिसारगुणवारिधिमेकं ॥
यं समीयुरवनीश्वरविद्याः सिंधवः स्वयमनिंदितसत्वम् ॥ २० ॥
एकदाथ ससुतो मुनिमुख्याद्धर्ममेकहृदयेन निशम्य ॥
भूपतिः श्रुतपयोनिधिनाम्नो निःस्पृहः समभवद्विषयेषु ॥ २१ ॥
तन्नियुज्य धरणीतलभारे पुत्रमश्रुकणिकाकुलनेत्रम् ॥
संयतोऽजनि नृपः स तदन्ते संसृतेर्भुवि बिभेति हि भव्यः ॥ २२ ॥
पूर्वजन्मनि स भावितसम्यग्दर्शनेन विमलीकृतचित्तः ॥
श्रावकव्रतमशेषमुवाह श्रीमतामविनयो हि सुदूरः ॥ २३ ॥
स्पृश्यते स दुरितेन न राज्ये संस्थितोऽपि खलु पापनिमित्ते ॥
संगमर्जितशुचिप्रकृतित्वात्पद्मवत्सरसि पंकलवेन ॥ २४ ॥

असलेल्या या राजपुत्राला राणीसह स्पर्श करणारा तो वज्रसेन राजा पाहून अतिशय आनंदित झाला. बरोबरच आहे कीं, चांगला मुलगा या जगांत कोणास आनंद-दायक असत नाहीं बरें ? २० ज्यांत पुष्कळ जलचर प्राणी आहेत, जो उत्कृष्ट गुणांच्या रत्नांनीं युक्त आहे व जो लोकजीवन चालेल अशा मर्यादेनें युक्त आहे अशा समुद्राला जशा सर्व नद्या येऊन मिळतात, तसें प्रशंसनीय पराक्रमानें युक्त, लोकांच्या उपजीविका चालविणारा, मर्यादेनें सहित व पुष्कळ आणि उत्कृष्ट अशा गुणांचा समुद्र असलेल्या या राजपुत्राकडे सर्व राजविद्या आपण होऊन येऊन मिळाल्या. २१ एकेवेळीं वज्रसेन राजा आपल्या हरिषेण पुत्रासह श्रुतसागर नांवाच्या मुख्य मुनीश्वराकडे गेला. त्यांच्यापासून एकाग्र चित्तानें धर्माचा उपदेश ऐकून त्याला पंचेंद्रियांच्या विषयामध्यें वैराग्य उत्पन्न झालें. २२ यानंतर ज्याचे डोळे अश्रूंच्या कणांनीं भरले आहेत अशा आपल्या हरिषेण पुत्राला पृथ्वीचें ओझें वाहण्याच्या कामीं नेमून राजा त्या मुनींच्या जवळ मुनि बनला. बरोबरच आहे कीं, भव्यजीव संसारापासून भीत असतातच. २३ श्रीहरिषेण राजाचें अंतःकरण पूर्वजन्मीं भाविलेल्या सम्यग्दर्शनानें निर्मळ झालेलें होतें ह्मणून त्यानें संपूर्ण श्राव-कांचीं व्रतें धारण केलीं होतीं. बरोबरच आहे कीं, जे खरे श्रीमंत असतात अर्थात् गुणानें व संपत्तीनें श्रीमंत झालेले असतात त्यांच्यापासून अविनय फार दूर राहात असतो. जसें कमल सरोवरांत असूनही निर्मलतेनें युक्त असल्यामुळें तें

शासतोऽपि चतुरंबुधिवेलामेखलां वसुमतीं मतिरस्य ॥
चित्रमेतदनुवासरमासीन्निःस्पृहेति विषमेऽपिसमस्ते ॥ २५ ॥
बिभ्रतापि नवयौवनलक्ष्मीं शांतता न खलु तेन निरासे ॥
स प्रशाम्यति न किं तरुणोपि श्रेयसे जगति यस्य हि बुद्धिः॥ २६ ॥
मंत्रिभिः परिवृतः स तु योगस्थानविद्भिरपि नाभवदुग्रः ॥
चंदनः किमु जहाति हिमत्वं सर्पवक्त्रविषवन्हियुतोऽपि ॥ २७ ॥
ऊढजानिरपि मन्मथवश्यो नो बभूव नयमार्गनदीष्णः ॥
यस्य रज्यति मनो न कलत्रे सत्यपि स्मरमये स हि धीरः॥ २८ ॥
स त्रिकालमभिपूज्य जिनेंद्रं गंधमाल्यबलिधूपवितानैः ॥
भक्तिशुद्धहृदयेन ववंदे तत्फलं हि गृहवासरतानां ॥ २९ ॥

योध्याशाही चिखलानें लिप्त होत नाहीं. तसे हा राजा पापाला कारण अशा राज्यांत राहूनही अभ्यंतर परिग्रहांनीं रहित व निर्लोभी स्वभावाचा असल्यामुळें पापांनी स्पर्शिला गेला नाहीं २५ चार समुद्राचे किनारे हेच जिचा कमरपट्टा आहे अशा समस्त पृथ्वीचें शासन करीत असतांही या राजाची बुद्धि संपूर्ण पंचेंद्रियांच्या विषयांत दररोज निःस्पृहच होत चालली हें मात्र मोठें आश्चर्य आहे.

२६ या हरिषेण राजानें नवीन तरुणपणाच्या शोभेला धारण केलें होतें तरीही त्यानें आपल्या हृदयांतून शांतपणाला हाकालून देऊन उच्छृंखलपणा धारण केला नाहीं. बरोबरच आहे कीं, ज्याची बुद्धि कल्याण मार्गाकडे लागली आहे तो मनुष्य तरुण असला तरीही शांत स्वभावाचा असत नाहीं काय? २७ शत्रूंचा नाश कसा करावा वगैरे उपाय व सैन्याची रचना वगैरे जाणणाऱ्या मंत्र्यांनीं हा हरिषेण राजा युक्त होता तथापि उग्र स्वभावाचा बनला नाहीं. बरोबरच आहे कीं, सर्पाच्या तोंडांतील विषाग्नीनें युक्त असा ही चंदनवृक्ष आपला थंड स्वभाव सोडून देतो काय? २८ नीतिमार्गांत चतुर असलेल्या या राजानें विवाह केला होता तरीही हा कामवश झाला नाहीं. मदन विकारानें पूर्ण असलेल्या पत्नीच्या ठिकाणीं ज्याचें मन अनुरक्त झालें नाहीं तोच खरा धीर होय. २९ हा राजा प्रातःकाळीं मध्यान्हकाळीं व संध्याकाळीं गंध पुष्पमाळा, नैवेद्य, धूप, या पदार्थांच्याद्वारें समूहानें भक्तियुक्त निर्मळ हृदयानें दररोज जिनेश्वरांची पूजा करून त्यांना नमस्कार करीत

आबभौ नभसि लग्नपताका चारुवर्णसुधया नु विलिप्ता ॥
तेन कारितजिनालयपंक्तिः पुण्यसंपदिव तस्य समूर्तिः ॥ ३० ॥
सन्नियम्य घनमात्मगुणौघैर्विद्विषोऽपि नयवित्सह मित्रैः ॥
राज्यमित्थमकरोच्चिरकालं सर्वदा प्रशमभूषितचेताः ॥ ३१ ॥
एकदा शमितभूतलतापं तत्प्रतापमभिवीक्ष्य सुतीक्ष्णं ॥
लज्जयेव निजदुर्णयवृत्तेः संजहार रविरातपलक्ष्मीम् ॥ ३२ ॥
तप्तमेव हि मया जगदेतद्रश्मिभिस्ततदवानलकल्पैः ॥
कष्टमित्यनुशयादिव भास्वांस्तत्क्षणं भृशमधोवदनोऽभूत् ॥ ३३ ॥
मंडलं दिनकरस्य दिनांते कुंकुमद्युति निकाममराजत् ॥
संहृतात्मकरसंहतिनीतांभोजिनीहृदयरागमयं वा ॥ ३४ ॥

असे. घरामध्यें राहण्यांत आसक्त झालेल्या लोकांना–गृहस्थांना घरांत राहण्याचें हेंच फल आहे. ३० ज्यांना सुंदर रंग दिला आहे व चुना लाविला आहे अशीं या राजानें बनाविलेलीं जिनमंदिरांची पंक्ति जणु त्याची मूर्तिमंत पुण्यसंपत्तीच आहे असें पाहणाऱ्यांना वाटत असे. यांच्या शिखरावर पताका लावल्या असल्यामुळें हीं आकाशांत फार शोभत असत. ३१ नेहमीं शांत स्वभावानें आपल्या अंतःकरणाला ज्यानें भूषित केलें आहे अशा या नीतिज्ञ राजानें आपल्या मित्रांसह आपल्या शत्रूंनाही स्वतःच्या उत्तम गुणरूपी दोऱ्यांनीं दृढ बांधून पुष्कळ दिवसपर्यंत उत्तम राज्य केले. ३२ एके वेळीं अतिशय तीक्ष्ण असूनही पृथ्वीचा संताप दूर करणारा असा या राजाचा विलक्षण प्रताप पाहून स्वतःच्या अनीतीच्या आचरणाची लाज आल्यामुळें जणु काय सूर्यानें आपली उन्हाची शोभा संकुचित केली. ३३ पसरलेल्या जंगलांतील अग्नीप्रमाणें भासणाऱ्या माझ्या स्वतःच्या किरणांनीं हें सगळे जग मी भाजून काढलें. अरेरे, ही दुःखदायक गोष्ट घडली असे ह्मणून पश्चात्तापानें जणू सूर्यानें तत्काल आपलें तोंड अतिशय खालीं केलें अर्थात् तो अस्ताला चालला. ३४ दिवससमाप्तीच्या वेळीं केशराप्रमाणें लालभडक झालेलें सूर्यमंडल संकुचित केलेल्या स्वतःच्या किरणरूपी हातांनीं आणिलेल्या कमलिनीच्या हृदयांतील प्रीतीनें जणु रचिले गेलें आहे असें शोभू लागलें. ३५ जसा एखाद्याचा मित्र वारुणीरत–दारू पिण्यामध्यें आसक्त झाला असतां तो त्याला

वारुणीरतमुदीक्ष्य पतंगं वारयन्निव तदा दिवसोऽपि ॥
तत्समीपमगमन्न निवार्यं कस्य चोत्पथमनो भुवि मित्रं ॥ ३५ ॥
आत्मनो धनमिवोरु यियासुः क्वापि कश्चन पुनर्ग्रहणाय ॥
स्वप्रियेषु निदधौ परितापं चक्रवाकमिथुनेषु विवस्वान् ॥३६॥
यांतमस्तमपहाय दिनेशं दीप्तिभिः स्थितिरकारि गृहान्ते ॥
जालमार्गपतिताभिरनाशं रत्नदीपमुपयातुमिवेद्धं ॥३७॥
आनतो मुकुलिताग्रकरश्रीर्भानुमान्बहलरागमयात्मा ॥
सादरं प्रिय इव श्लथमानो दृश्यते स्म रमणीभिरभीक्ष्णम् ॥ ३८॥
पूर्वभूतिरहितस्य कथं वा जायते जगति सम्मतिरस्मिन् ॥
स्वं रविर्वपुरितीव विदित्वागोपयद्दिवसुरस्तनगांते ॥३९॥

त्याच्याजवळ जाऊन रोकतो त्याप्रमाणें सूर्य वारुणीरत-दारू पिण्यांत आसक्त पक्षीं पश्चिम दिशेवर आसक्त झालेला पाहून जणु त्याला रोकण्यासाठींच दिवस त्याच्याकडे गेला. बरोबरच आहे कीं कुमार्गाला ज्यांचें मन लागलें आहे अशा मित्राला कोण वरें रोकीत नाहीं? सर्वच रोकतात.

३६ कोठें तरी जाण्याची इच्छा करणारा कोणी मनुष्य आपलें पुष्कळसें धन पुनः आपणास घेतां यावें ह्मणून आपल्या आवडत्या माणसाजवळ ठेवितो तसें संतापरूपी धन अस्ताला जात असतांना सूर्यानें स्वतःला प्रिय अशा चक्रवाक पक्ष्यांच्या जोडप्यामध्यें पुनः घेण्याच्या हेतूनें ठेविलें. तात्पर्य-सूर्यास्त झाला ह्मणजे चक्रवाक पक्ष्यांना विरहसंताप होतो. ३७ अस्ताला जात असलेल्या सूर्याचा त्याग करून त्याच्या प्रकाशानें झरोक्याच्या मार्गावर पडून आपला नाश होऊं नये ह्मणून प्रकाशयुक्त रत्नदीपांचा आश्रय घेण्यासाठीं जणु घरांत प्रवेश केला! ३८ जसें नम्र झालेला, जोडलेल्या हातांच्या शोभेनें युक्त असलेला, ज्याच्या अंतःकरणांत पुष्कळ प्रेम उत्पन्न झालेलें आहे असा व ज्याचा अभिमान ढिला झाला आहे अशा आपल्या पतीला स्त्रिया जशा आदरानें पाहतात तसें आनत ह्मणजे नम्र झालेला अर्थात अस्ताला चालेला, संकुचित केलेली आहे पुढच्या किरणाची शोभा ज्यानें असा व अतिशय लाल नसलेला आणि श्लथमान-ज्याची उच्चस्थिति कमी झाली आहे असा ( सूर्य अस्ताला जातांना खालीं येतो. आकाशाच्या मध्यभागीं असतो त्यावेळी तो उच असतो ) सूर्य स्त्रियांकडून सादर दृष्टीनें पाहिला गेला. ३९ जणु ज्यांनीं आपण होऊनच आपल्या शाखा खालीं वाकाविल्या आहेत

आशु संगतविहंगनिनादैः शाखिनः स्वयमिवानतशाखाः ॥
प्रोषितोऽयमिन इत्यनुतेपुः कं न तापयति मित्रवियोगः ? ॥ ४०॥
उज्झतः खलु परस्परमार्तिं चक्रवाकमिथुनस्य दुरंतां ॥
द्रष्टुमक्षमाधियेव नलिन्या पद्मचक्षुरधिकं निमिमीले ॥४१॥
* प्राज्झ्य दष्टबिसखंडमशेषं क्रंदता विपरिवृत्तमुखेन ॥
चक्रवाकमिथुनेन नितांतं मूर्च्छता विजघटे दिवसांते ॥४२॥
आबभौ नवजपारुणकांतिः पाशिनः परिगता दिशि संध्या ॥
भास्करानुगतदीप्तिवधूनां पादयावकततेः पदवीव ॥४३॥
मीलितानि कमलान्युपहातुं नेषुरेव मधुपा मधुलोलाः ॥
आपदा परिगतं सुकृतज्ञः स्वोपकारिणमपोज्झति को वा ? ॥४४॥

असे वृक्ष लौकरच येऊन बसलेल्या पक्ष्यांच्या शद्बांनीं हा सूर्य आतां प्रवासाला गेला ह्मणून शोक करूं लागले. बरोबरच आहे कीं, मित्रवियोग-सोबत्याचा विरह-पक्षीं सूर्यवियोग कोणास बरें दुःखी करीत नाहीं ? सर्वांसच दुःखी करितो. ४० ज्यांचें पूर्वीचें धन नष्ट झालें आहे अशांचा या जगांत आदर होणें कसें शक्य आहे ? हें समजूनच जणु किरणरूपी धनानें रहित झालेल्या सूर्यानें आपलें शरीर अस्तपर्वतामध्यें लपविलें. ४१ परस्परापासून वियुक्त होत असलेल्या चक्रवाक पक्ष्यांचें पराकाष्ठेचें दुःख पाहण्यास माझी बुद्धि समर्थ नाहीं असें जणु वाटूनच कमलिनीनें आपले कमलरूपी नेत्र अधिक घट्ट मिटून धरिले. ४२ चावलेले कमळाच्या देठाचे सगळे तुकडे टाकून देऊन आक्रंदन करणारें व तोंड फिरविलेलें आणि मूर्च्छित झालेलें चक्रवाक पक्षांचे जोडपें दिवस आस्ताला जाण्याच्या वेळीं एकमेकांपासून अगदीं वेगळें झालें. ४३ नुकतेंच फुललेल्या जास्वंदीच्या पुष्पाप्रमाणें लाल कांतियुक्त झालेली, पश्चिम दिशेकडे प्रगट झालेली संध्या, सूर्याच्या अनुसरलेल्या त्याच्या कांतिरूपी स्त्रियांच्या पायाला लावलेल्या लाक्षारसाच्या पंक्तींची हो जणु परंपरा आहे अशी शोभू लागली. ४४ मकरंदांत आसक्त झालेल्या भुंग्यांना संकुचित झालेल्या कमलांचा त्याग करावा

* संदष्टं विसमुत्सृज्य चक्रद्वंद्वेन मूर्च्छता ॥
परिवृत्तमुखाब्जेन तूर्णं विजघटे तदा ॥ २ ॥
जीवंधरचंप्वाः समानार्थकः श्लोकः । षष्ठो लंबः

संध्ययाप्यनुपतंगमगामि प्रोज्झ्य तत्क्षणमपूर्वदिगंतम् ॥
वल्लभं स्वमपहाय सुरक्ता सक्तिमेति न चिराय परस्मिन् ॥४५॥
गोखुरोत्थितरजोभिररोधि व्योम रासभतनूरुहधूम्रैः ॥
कोकदाहिमदनाग्निसमुद्यत्सांद्रधूम्रपटलैरिव कृत्स्नं ॥ ४६ ॥
आववौ संपदि सांद्रविनिद्रो मल्लिकामुकुलशीतलगंधः ॥
अंधयन्मधुकरैः सह मंदं मानिनीरपि दिनात्ययवायुः ॥ ४७ ॥
संफलीवचनमाशु सरागं लीलया गमितमप्युपकर्णं ॥
चूतपल्लवमिवाननशोभां चित्रमातनुत मानवतीनाम् ॥ ४८ ॥
यत्तमोऽन्हि दिननाथभयेन क्ष्माभृतां पृथुगुहासु निलीनं ॥
तेन तद्विगमतो विजजृंभे रंध्रमेत्य मलिनो हि बलीयान् ॥ ४९ ॥

अशी इच्छा झाली नाही. बरोबरच आहे कीं, चांगला कृतज्ञ मनुष्य आपल्यावर ज्यानें उपकार केला होता तो संकटांत सांपडला असतां त्याचा त्याग करित नाहीं. ४५ पश्चिम दिशेचा त्याग करून संध्येनेंही सूर्याच्या पाठोपाठच तत्काल प्रयाण केलें. बरोबरच आहे कीं, स्वपतीवर प्रेम करणारी स्त्री त्याला सोडून इतरांवर कशी आसक्त होईल ? ४६ गाढवाच्या केसाप्रमाणें धुरकट अशा गाईच्या खुरापासून वर उडालेल्या धुराळ्यानें भरून गेलेलें सर्व आकाश कोक पक्ष्यांना जाळणाऱ्या कामाग्नीपासून वर चाललेल्या दाट धुराच्या समुहांनीं जणु भरल्यासारखे भासत होतें' ४७ त्यावेळीं चांगला जागृत झालेला, मोगऱ्याच्या कळ्यांच्या थंड सुगंधानें युक्त असा सायंकालचा वारा भुंग्यांच्या समुदायाबरोबर पतीवर रुसलेल्या स्त्रियांसही अंध बनविणारा असा होतसाता अर्थात् शीघ्र त्यांना मोहयुक्त करणारा होऊन मंद मंद वाहू लागला. ४८ दूतीचें प्रेमयुक्त भाषण शीघ्र लीलेनें मानवतींच्या कानावर पडले तेव्हां आंब्याचें कोवळें पान कानावर ठेविलें असतां जशी त्यांच्या मुखाला शोभा येते तशी त्यानें शोभा आली हें आश्चर्य आहे. तात्पर्य हें कीं, दूतीच्या द्वारें आपल्या पतीचा प्रेमसंदेश त्यांना ऐकावयास मिळाल्यानें त्यांचें मुख आनंदानें उल्हसित झालें. ४९ सूर्याच्या भीतीनें जो मोठा अंधार पर्वताच्या गुहांमध्यें दडी मारून बसला होता तो सूर्याचा अस्त झाल्याबरोबर चोहीकडे व्दाढ्ढिंगत झाला. बरोबरच आहे कीं, मलिन कार्य–पापकार्य करणारा मनुष्य संधि-

अंधकारपटलेन घनेन श्यामरोचिरभवज्जगदाशं ॥
सर्वतो विदलितांजनभासा न श्रिये हि तमसा सह योगः ॥ ५०॥
भास्वतामविषयो मलिनात्मा दुर्विभाव्यगतिरुज्झितसीमा ॥
अंधकारविभवोऽभूत वृत्तिं दुर्जनस्य सुसमीकृतसर्वः ॥ ५१ ॥
दूरतोंऽधतमसं भवनेभ्यो रत्नदीपनिवहो नुदति स्म ॥
भानुना निजकरांकुरदंडः प्रेषितस्तम इव प्रणिहंतुं ॥ ५२ ॥
रक्तरागविवशीकृतचित्ताः सर्वतोऽपि कुलटा ययुराशु ॥
यातुधान्य इव संमदतोऽभिप्रेतवासमनिरूपितरूपाः ॥ ५३ ॥
पांडुतामथगतं मुखमैंद्री लंबमानतिमिरालकमूहे ॥
दीनभाववनितेव विकांता निर्यदिंदुकिरणांकुरलेशैः ॥ ५४ ॥

साधून जबरदस्त बनतोच. ५० फुटलेल्या इंद्रनील मण्याप्रमाणें ज्याची कांति आहे अशा दाट अंधकारांच्या समुदायानें सर्व जग चोहींकडून काळेभोर व भयाण दिसूं लागले. बरोबरच आहे कीं, अंधाराशीं झालेला सहवास शोभेला कारण होत नाही.५१ जसा दुर्जन मनुष्य तेजस्वी लोकांपुढें टिकून राहात नाहीं, त्याचे विचार मलि. न असतात, त्याचे प्रयत्न गुप्त असल्यामुळें समजून येत नाहींत व त्यानें लोकमर्यादेला तिलांजलि दिलेली असते आणि तो सर्वांना सारखे समजत असतो तसें अंधार ही तेजस्वी पदार्थांपुढें टिकून राहात नाहीं. तो मलिनस्वरूपी असून कोठून येतो हें समजत नाहीं. त्यानें मर्यादा सोडलेली असते अर्थात् तो अमर्याद पसरलेला असतो आणि उंच सखल पांढरे काळे अशा सर्व पदार्थांना तो समान करून टाकितो. ५२ रत्नांच्या दीपसमुदायांनीं दुरूनच घरांतून दाट अंधाराला हुसकावून लाविलें. जणु काय अंधाराला ठोकून काढण्यासाठीं सूर्यानें आपल्या किरणांकुरांना दंडाचें रूप देऊन पाठविल्याप्रमाणें ते शोभत होते. ५३ जशा पिशाचिणी आपलें स्वरूप प्रगट न करितां रक्तावरील प्रेमानें ज्यांचें चित्त पराधीन झालें आहे अशा होऊन मोठ्या आनंदानें चोहींकडून प्रेतवासस्थानीं-श्मशानीं जातात त्याप्रमाणें कुलटा स्त्रिया आपलें रूप कोणी पाहू शकणार नाहीं असा वेष घेऊन अनुरक्त झालेल्या पुरुषावरील प्रेमानें ज्यांचें मन परतंत्र बनलें आहे अशा होत्सात्या चोहींकडून मोठ्या आनंदानें अभिप्रेत वास-आपल्या आवडत्या पुरुषाच्या घरीं जाण्यासाठीं निघाल्या.

उद्यतः शशभृतो मृदुपादानुद्वहन्नुदयभूभृदराजत् ॥
उन्नतस्य विदधाति हि शोभां प्रश्रयः प्रविमले क्रियमाणः ॥५५॥
रश्मिजालमुदयांतरितस्य प्राग्विधोस्तिमिरमाशु बिभेद ॥
उद्यतः स्वसमये विजिगीषोरग्रगामि बलवत्प्रतिपक्षं ॥५६॥
प्राक्कला हिमरुचेरुदयाद्रेर्विद्रुमद्युतिरुदंशु ततोऽर्द्धम् ॥
उद्ययौ तदनु बिंबमशेषं कः क्रमादथ न याति हि वृद्धिं ? ॥५७॥
अंधकारशबरेण गृहीतां यामिनीं समवलोक्य निजेष्टां ॥
कोपपूरितधियेव नवोत्थो [illegible] [illegible]करो भृशमासीत् ॥५८॥
रागिणः खलु न सिध्यति क [illegible] [illegible]दप्यभिमतं पुरुषस्य ॥
इत्यवेत्य तुहिनांशुरिवोऽज्झद्रागमंधतमसं विनिहंतुम् ॥ ५९ ॥

५४ जशी पतिवियोगानें युक्त अशी एखादी दीन स्त्री ज्याच्यावर अंधाराप्रमाणें काळे केस विखरले आहेत अशा मुखानें युक्त असते तशी बाहेर निघालेल्या चंद्रकिरणांच्या थोड्या थोड्या अंकुरानीं युक्त झालेलें व अधार रूपी केशांनीं युक्त असें आपलें पांढरें मुख पूर्व दिशेनें धारण केलें. पति परदेशी गेल्यामुळें जिनें आपले केशांची नीट रचना केली नाहीं अशा दीन स्त्रीप्रमाणे पूर्व दिशा चंद्राचे थोडे थोडे किरण बाहेर पडत असतां दिसूं लागली. ५५ उगवत असलेले चंद्राचे कोमल पाद-किरण पक्षीं पाय आपल्या मस्तकावर धारण करणारा हा उदयपर्वत फार शोभू लागला. बरोबरच आहे कीं, निर्मल व्यक्तीविषयीं केला जाणारा आदर उन्नत पुरुषाची शोभाच वाढवीत असतो. ५६ जसें योग्यसंधि साधून दिग्विजयाला निघालेल्या राजाचें पुढें चाललेलें सैन्य प्रतिपक्षाचा नाश करितें तसें उदय पर्वताच्या आड असलेल्या चंद्राच्या किरणसमूहांनीं प्रथमतः तत्काल अंधाराचा नाश केला ५७ प्रथमतः उदय पर्वतापासून चंद्राची कळाच बाहेर पडली. तदनंतर पोवळ्याच्या कांतीचे, वरदर ज्याचें किरण पसरले आहेत असे अर्ध बिंब बाहेर पडलें. यानंतर त्याचें सगळें बिंब बाहेर पडले. बरोबरच आहे कीं, क्रमानें कोणाची बरें उन्नति होत नसतें ? ५८ अंधकाररूपी भिल्लानें आपली रात्र-रूपी आवडती स्त्री पकडली आहे असें पाहून नुकताच उगवलेला चंद्र कोपानें जणु ज्याची बुद्धि बेफाम झाली आहे असा होऊन अतिशय लालभडक दिसूं लागला.

श्वेतभानुरकृताशु विनाशं संहतस्य तमसोऽपि निकामं ।
सांद्रचंदनसमद्युतिर्बिंबः किं न साधयति मंडलशुद्धः? ॥ ६० ॥
प्राप्य पादहतिमप्यखरांशोरागतः कुमुदिनी हसति स्म ॥
सन्मुखस्य हि सुखाय न किं वा चेष्टितं प्रियतमस्य वधूनां? ॥ ६१ ॥
ज्योत्स्नया सरसचंदनपंकच्छायया जगदराजत पूर्णं ॥
कृत्स्नमक्षतजलस्थितिलक्ष्म्या वेलयेव चलदुग्धपयोधेः ॥ ६२ ॥
शीतलैरपि करैस्तुहिनांशोर्निर्वृतौ कमलिनी न च कोकः ॥
नास्ति वस्तु तदभीष्टवियोगे प्राणिनां भवति यत्प्रमदाय ॥ ६३ ॥
इंदुरश्मिभिरगाधतयांतर्वर्द्धितोत्कलिकमंबु पयोधेः ॥
क्षोभमुल्बणमनीयत दूरं मानिनीजनमनश्च निकामं ॥ ६४ ॥

५९ रागांध-प्रेमांध झालेल्या मनुष्याचें कोणतेंही इच्छित कार्य तडीस जात नाहीं असें समजून जणु चंद्राने दाट अंधाराचा नाश करण्यासाठीं आपल्या रागाला-लालपणाला सोडिलें. ६० दाट चंदनाच्या लेपाप्रमाणें पांढऱ्या कांतीच्या चंद्रानें जमाव करून उभा राहिलेल्या संपूर्ण अंधाराचा पूर्ण नाश केला. बरोबरच आहे कीं, ज्याचें मंडल शुद्ध आहे अर्थात् ज्याला देशांतील सर्व लोक अनुकूल आहेत तो कोणास बरें जिंकू शकत नाहीं? तसेंच चंद्रही मंडलशुद्ध आहे अर्थात् स्वच्छ, तेजस्वी बिंबाचा आहे म्हणून अंधकारास तो जिंकू शकला. ६१ ज्याचें किरण कोमल आहेत अशा चंद्राच्या पादाहतिला-पायांच्या लाथांना-पक्षीं किरणाच्या आघातांना प्राप्त होऊन ही कुमुदिनी-रात्रीं विकसणाऱ्या कमलांची वेली हसूं लागली अर्थात् प्रफुल्ल झाली. बरोबरच आहे कीं, प्रसन्न झालेल्या आवडत्या पतीचें कोणतें कृत्य स्त्रियांना आवडत नाहीं बरें? कधींही नाश न पावणाऱ्या अशा पाण्याच्या स्थिर शोभेनें युक्त असलेल्या किनाऱ्यानें चंचल क्षीरसमुद्र जसा शोभतो तसें सरस अशा चंदनाच्या उटीप्रमाणें स्वच्छ कांति ज्याची आहे. अशा चांदण्यानें सर्व जग पूर्ण शोभूं लागलें ६३ चंद्राच्या थंड अशाही किरणांनीं कमलिनीला व कोक पक्षांना आनंद झाला नाहीं. बरोबरच आहे कीं, आवडत्या पदार्थांचा वियोग झाल्यावर प्राण्यांना जिच्या पासून आनंद होईल अशी कोणतीही वस्तू असत नाहीं.

मित्रमेत्य सकलेंदुमनंगोऽप्याशु लोकमखिलं च विजिग्ये ॥
नूनमूनमपि वा जयलक्ष्मीरभ्युपैति समये सुसहायं ॥ ६५ ॥
विक्षिपन्कुमुदकेसररेणून्सांद्रचंदनहिमोऽपि बभूव ॥
दुःसहः प्रियविमुक्तवधूनां मन्मथानललवानिव वायुः ॥ ६६ ॥
दूरमप्यभिमतस्य निवासं खेदहीनमनयन्मदिराक्षीम् ॥
मार्गदेशनविधावतिदक्षा चंद्रिका प्रियसखीव मनोज्ञा ॥ ६७ ॥
यत्नतोऽपि रचितापि रमण्या मानसंपदचिराद्भ्रूकुटी च ॥
यूनि दृष्टिपथमीयुषि नम्रे वाससा शिथिलतां सह भेजे ॥ ६८ ॥
काचिदाशु मदिरामदमोहच्छद्मना विहितदोपसमर्पीष्टं ॥
वाच्यवर्जितामियाय सखीषु प्रेम कस्य न करोति हि मायां? ॥६९॥

६४ समुद्र हा अतिशय गंभीर असतो तथापि त्याच्या पाण्यांत चंद्राच्या किरणांनीं खूप तरग वाढविलें. त्यामुळे तें पाणी क्षोभ पाऊन फार दूरपर्यंत पसरलें. तसेंच या चंद्रकिरणांनीं पतिवर रुसलेल्या स्त्रियांच्या मनांत उत्कंठा वाढऊन तें अतिशय क्षुब्ध करून सोडलें. ६५ सकल कलांनीं युक्त असलेल्या चंद्ररूपी मित्राला प्राप्त करून घेऊन शरीररहित अशाही मदनानें तत्काल सर्व जगाला जिंकिलें. बरोबरच आहे कीं, एखादी व्यक्ति सामर्थ्यानें थोडीशी कमी असली तरी योग्य वेळीं त्याला चांगले साह्य मिळालें तर जयलक्ष्मी त्याचा आश्रय घेते. ६६ दाट चंदनाच्या उटीप्रमाणें थडगार असाही वारा कामरूपी अग्नीच्या ठिणग्याप्रमाणें वाटणाऱ्या कमलांतील केसराचें रेणु इकडे तिकडे फेंकीत असल्यामुळें तो पतिशीं वियोग पावलेल्या स्त्रियांना फार असह्य झाला. ६७ आवडत्या मैत्रीणी प्रमाणे मनाला प्रिय व पतिगृहाचा मार्ग दाखवि-ण्यास प्रवीण अशा चंद्रिकेनें (चांदणें) पतीचें घर दूर असतांही खंजन पक्ष्याप्रमाणें जिचें नेत्र स्वच्छ आहेत अशा आपल्या सखीला कांहींही त्रास न होऊ देतां तिकडे नेलें. ६८ एका स्त्रीनें पति आला असतां त्याच्याशीं अबोला धरीन व भुवया वाकड्या करून पाहीन असा विचार केला होता व आधीच तशी तयारीही करून ठेविली होती. परंतु नम्र व तरुण असा तिचा पति तिच्या दृष्टीस पडल्या बरोबर वस्त्रासह उपर्युक्त गोष्टी ढिल्या होऊन गेल्या.

वल्लभं समवलोक्य सदोषं कामिनी प्रकुपितापि पुरैव ॥
संभ्रमं न विजहावथ काचिद्योषितां खलु मनो हि निगूढं ॥७०॥
अन्यरक्तहृदयापि निकामं वारयोषिदनुरागयुतेव ॥
कामुकस्य धनिनोऽजनि वश्या कस्य वस्तु न वशीकरणाय॥७१॥
इत्थं मनोभववशीकृतकामियुग्मैः सार्धं विनिद्रकुमुदाकरनिर्मलश्रीः ॥
राजा शशांककरनिर्मलरम्यहर्म्ये कांतासखः क्षणमिव क्षणदाम-
नैषीत्॥ ७२ ॥
आलिंगयत्यथ दिशं शशिनि प्रतीचीं गत्वा शनैस्ततकरैः प्रविलो-
लतारं॥
किंचिन्निमील्य कुमुदेक्षणमाशु दूरं सा यामिनी प्रकुपितेव ययौ
विवर्तिं ॥ ७३ ॥

दारू प्याल्यानें उत्पन्न झालेला उन्मत्तपणा व बेहोशपणा या निमित्तांनीं ज्याच्या-कडून अपराध घडला आहे अशा आपल्या पतीकडे कोणी एक स्त्री आपल्या सखिसमुदायांतून उठून त्याची खरडपट्टी न काढतां शीघ्र निघून गेली. बरोबरच आहे कीं, कोणाचें प्रेम कपट करीत नाहीं बरें? ७० प्रथमतःच जिला कोप आलेला आहे अशा कोण्या एक स्त्रीनें अपराध केलेल्या आपल्या पतीला पाहून आदराची पद्धति सोडून दिली नाहीं. अर्थात् पति आल्याबरोबर ती विनयानें उठून उभी राहिली. बरोबरच आहे कीं, स्त्रियांचें मन गुप्त असतें. ७१ एका वेश्येचें एका वेगळ्याच पुरुषावर अतिशय मन बसलें होतें परंतु ती एका श्रीमत कामी पुरुषावर जणु अनुरक्त झाल्याप्रमाणें त्याला वश झाली होती. बरोबरच आहे कीं, द्रव्य हें कोणास वश करण्यास समर्थ होत नाहीं बरें? ७२ याप्रमाणें मदनाच्या स्वाधीन झालेल्या कामी जोडप्यासह प्रफुल्ल झालेल्या रात्रविकासि कमलसमूहाप्रमाणें निर्मल सौंदर्य धारण करणाऱ्या हरिषेण राजानें चंद्राच्या किरणाप्रमाणें निर्मल व सुंदर असलेल्या आपल्या वाड्यांत आपल्या स्त्रीसह रात्र एका क्षणाप्रमाणें व्यतीत केली. ७३ जसें एखादा मनुष्य हळूच हात पसरून जिच्या डोळ्यांतील बाहुल्या चंचल झाल्या आहेत अशा स्त्रीला आलिंगन देत असतां त्याची स्त्री आपले कमलासा-रखे डोळे थोडेसे मिटून क्रोधाने त्याच्यापासून तत्काळ दूर निघून जाते, तसें

अभ्यास्य वासभवनाजिरमानतारिं वैबोधिकास्तमथ बोधयितुं क्षपांते
इत्युज्ज्वलाः श्रुतिसुखस्वरमक्षतांगाः पेठुः सदा प्रतिनिनादितसौ-
धकुंजाः ॥ ७४ ॥
कंदर्पतप्तमनसामिह दंपतीनां धैर्यत्रपाविरहितानि विचेष्टितानि ॥
र्‍हीतेव वीक्ष्य रजनी रजनीकरास्यं क्वाप्यालमय्य विमुखी मुमुखा
प्रयाति ॥ ७५ ॥
प्रालेयबिंदुभिरमी नवमौक्तिकाभैः कीर्णा विभांति तरवः पतितै-
र्नभस्तः ॥
शीतत्विषो मृदुकरस्य रसार्द्रितानां स्वेदाम्भसामुरुकणैरिव तार-
काणां ॥ ७६ ॥
क्षिप्रं विहाय कुमुदानि विकाशलक्ष्म्या त्यक्तानि नाथ ! मधुपा
मधुपानलोलाः ॥
यान्त्युच्छ्वसत्कमलसौरभवासिताशं पद्माकरं ननु सगंधमुपैति सर्वः
॥ ७७ ॥

चंद्र हळू हळू आपले किरणरूपी हात पसरून चंचल नक्षत्ररूपी डोळ्यांच्या बाहु-ल्यांनीं युक्त असलेल्या पश्चिम दिशारूपी पत्नीला आलिंगन देत असतां त्याची रात्ररूपी स्त्री रात्रविकासिकमलरूपी नेत्र थोडेसे मिटवून त्याच्यावर जणु रागावून लौकर दूर निघून गेली. ७४ रात्र समाप्तीनंतर राजवाड्याच्या अंगणामध्यें बसून ज्यानें शत्रूंना वश केलें आहे अशा हरिषेण राजाला जागें करण्यासाठीं ज्यांनीं राजवाड्यांच्या आंतील प्रदेश प्रतिध्वनींनीं युक्त केले आहेत असे, उज्ज्वल वेषाला धारण करणारे, अव्यंग अवयवांचे भाट लोक कानाला मधुर लागणाऱ्या अशा स्वरांनीं गायन करूं लागले ७५ मदनानें ज्यांचीं मनें संतप्त झालीं आहेत अशा पतीपत्नींचीं धैर्य व लज्जा यांनीं रहित असलेली कृत्यें पाहून जणु लज्जित झालेली रात्र आपल्या चंद्ररूपी मुखाला खालीं घालून हे सुंदर मुखाच्या राजा ! कोठें तरी निघून जात आहे. ७६ नवीन मोत्यासारखी कांती धारण करणाऱ्या हिमबिंदूंनीं भरून गेलेले हे

४ उत्तरेकडे तोंड करून ज्यांनी सर्व कर्ममल नष्ट केला आहे अशा सिद्ध परमेष्ठींना प्रभूनी एकाग्र मनानें नमस्कार करून जणुं हा प्रगट झालेला रागभावच आहे अशा प्रकाशमान् अलकारसमूहाचा त्याग केला. पृष्ठ २५९.

यावन्न पक्षयुगलं विधुनोति कोकः श्रांतो निशाविरहजागरखिन्न-
याऽपि ॥
तावन्मुदा न समगायि न चक्रवाक्या स्निह्यत्यहो युवतिरेव चि-
राय पुंसः ॥ ७८ ॥
सद्यो विनिद्रकमलेक्षणयातिरक्तः पूर्वं प्रसारितकरः शनकैर्विवृत्य ॥
आलिंग्यते दिनकरो दिवसश्रियायं प्रातर्युवेव रिपुमानद ! मानवत्या
॥ ७९ ॥
इत्थं वचोभिरचिराय स मागधानां निद्रां विहाय शयनादुदगान्नरेंद्रः।
कंठार्पितं मदनपाशमिवातिकृच्छ्रादुन्मोचयन्भुजलताद्वितयं प्रिया-
याः ॥ ८० ॥

वृक्ष थंड कांतीनें साहित असलेल्या व कोमल किरणांनीं युक्त असलेल्या चंद्राच्या रसानें भिजून ओले झालेल्या नक्षत्रांच्या घामाचे आकाशांतून पडलेल्या थेंबांनीं जणु युक्त झाल्याप्रमाणें दिसतात. ७७ हे नाथ ! विकासलक्ष्मीनें ज्यांचा त्याग केला आहे अशा रात्र विकासि कमलांना मकरंदपानांत गढून गेलेल्या भुंग्यांनीं सोडून दिलें व ते विकसित झालेल्या दिवस विकासी कमलांच्या सुगंधानें ज्यानें सर्व प्रदेश सुगंधित केला आहे अशा सरोवराकडे जात आहेत. बरोबरच आहे कीं उत्तम सुगंधयुक्त पदार्थाकडेच सर्व जात असतात. ७८ थकलेला कोकपक्षीं आपले पंख फडफडावित आहे तोंच रात्रीच्या विरहानें व जागण्यानें खिन्न झालेल्या अशा चक्रवाकीनें येऊन आनंदानें चक्रवाक पक्ष्यांशीं समागम केला. बरोबरच आहे कीं, स्त्री हीच पुरुषावर अधिक प्रेम करीत असते. ७९ प्रफुल्लित कमलाप्रमाणें जिचे डोळे आहेत अशी एकादी रुसलेली स्त्री आपला रुसवा सोडून प्रातःकाळीं जशी पूर्वीच ज्यानें आपले हात पसरले आहेत व अतिप्रेमयुक्त अशा आपल्या पतीला थोडें मागें वळून पाहून आलिंगन देते त्याप्रमाणें शत्रूंचा अभिमान नष्ट करणाऱ्या हे राजन् ! प्रथमच ज्यानें आपले किरण हळूहळू चोहोकडे पसरले आहेत व जो आरक्त–लालभडक दिसत आहे असा हा सूर्य विकसित झालेले आहेत कमलरूपी नेत्र जिचे अशा दिवस लक्ष्मीकडून प्रातःकालीं तत्काळ आलिंगिला जात आहे.

इति तस्य मुदा नरेंद्रलक्ष्मीं दधतः श्रावकवृत्तिमप्यखंडां ॥
नरनाथपतेरनेकसंख्या ययुरब्दाः स्फटिकाश्मनिर्मलस्य ॥ ८१ ॥
मुनिपतिमवलोक्य सुप्रतिष्ठं प्रमदवने स्थितमन्यदा नरेंद्रः ॥
समजनि स तपोधनस्तपश्च प्रशमरतिश्चिरकालमाचचार ॥ ८२ ॥
स जीवितांते विधिवद्विधिज्ञः सल्लेखनामेकधिया विधाय ॥
अलंचकार क्षितिमात्मकीर्त्या मूर्त्या महाशुक्रमपि प्रतीतः ॥ ८३॥
दिव्यांगनाजनमनोहररूपसंपत्स प्रीतिवर्धनविमानमनूनमानं ॥
अध्यास्य षोडशपयोनिधिसम्मितायुः प्रीतिंकरोऽरमत तत्र वि-
चित्रसौख्यम् ॥ ८४ ॥

❀ इत्यसगकृते श्रीवर्धमानचरिते हरिषेणमहाशुक्रगमनो नाम त्रयोदशः सर्गः ॥ ❀

८० याप्रमाणें स्तुति पाठकांचें प्रातःकालीं जागृत करण्याच्या भाषणांनी अर्थात् भाषणें ऐकून राजा जागा झाला व कंठामध्यें जणु मदनाचे पाशच पडले आहेत अशा आपल्या प्रिय राणीचे दोन बाहु गळ्यांतून मोठ्या प्रयासाने काढून तो निद्रात्याग करून अंथरुणावरून उठला. ८१ स्फटिक मण्याप्रमाणे ज्यांचे अंतःकरण निर्मळ आहे अशा त्या राजाने राजलक्ष्मीला व श्रावकधर्माला अखंड रीतीनें ध रण केलें होतें. या दोनींचें पालन करित असतां या राजाचीं पुष्कळ वर्षे लोटलीं. २ एके दिवशीं प्रमदवनामध्यें सुप्रतिष्ठ मुनिपति आलेले पाहून हा राजा त्यांच्याज ळ मुनि झाला व समभावनेंत प्रेम ठेऊन त्यानें पुष्कळ काळपर्यंत तपश्चरण केलें. ८३ आयुष्याच्या अंतीं सल्लेखनेचा विधि जाणणाऱ्या या हरिषेण मुनीनें एकाग्रबुद्धीनें सल्लेखना धारण करून आपल्या कीर्तीने पृथ्वीला अलंकृत केले व प्रसिद्ध अशा यानें आपल्या शरीराच्या द्वारें महाशुक्र स्वर्गाला अलंकृत केलें. अर्थात् महाशुक्र स्वर्गांत तो अत्यंत सुंदर शरीराचा धारक असा देव होऊन जन्मला. ८४ ज्याचें प्रमाण फार मोठें आहे अशा त्या प्रीतिवर्धन नांवाच्या विमानांत ज्याचें सोळा सागर वर्षे आयुष्य आहे असा, देवांगनांच्या मनाला हरण करणाऱ्या सौंदर्यानें युक्त असलेला तो प्रीतिंकर नांवाचा देव त्या महाशुक्र स्वर्गांत नानाप्रकारच्या सुखांचा उपभोग घेत फार दिवसपर्यंत रममाण झाला.

❀ याप्रमाणें असग कविकृत श्री वर्धमान चरित महाकाव्यामध्यें हरिषेण मुनीश्वरांना महाशुक्र स्वर्गाची प्राप्ति झाली याचें वर्णन करणारा तेरावा सर्ग समाप्त झाला ❀

# चतुर्दशः सर्गः।

द्वीपेऽस्मिन्दधदपरेतरे विदेहे कच्छाख्यामथ विषयोऽस्ति नित्यरम्यः
सीतायाः सुरसरितस्तटीमुदीचीमुद्भास्य प्रकटमवस्थितः स्वका-
न्त्या ॥ १ ॥
उद्भिद्य क्षितितलमुत्थितो हि लोकः किं द्रष्टुं भुवमुत नाकिनां निवासः
आयातः स्वयमपि यस्य भूरिशोभां पश्यंतः क्षणममराश्च विस्मयंते
॥ २ ॥
तत्रास्ति त्रिजगदिवैकतामुपेतं क्षेमादिद्युतिमभिधां पुरं दधानम् ॥
सद्वृत्तिप्रकृतियुतं विविक्तवर्णैराकीर्णं तिलकनिभं वसुंधरायाः ॥३॥

१ या जंबूद्वीपामध्यें पूर्वविदेह क्षेत्रांत कच्छ या नांवाचा नेहमीं सुंदर असणारा एक देश आहे. हा देश सुरसरित्-देवनदी जी सीता नांवाची नदी तिच्या उत्तर किनाऱ्याला आपल्या कांतीनें सुशोभित करून प्रकट रूपानें राहिला आहे. २ या देशाची विपुल शोभा पाहात असतां क्षणपर्यंत देवांनाही आश्चर्य वाटत असे. पृथ्वीतलाला फोडून अधोलोक वर आला आहे काय ? किंवा स्वतः भूलोकाची शोभा पाहण्यासाठीं देवांचें निवासस्थान अर्थात् स्वर्ग हा खालीं आला आहे काय ? असे विकल्प हा देश पाहतांना देवांच्या मनांत उत्पन्न होत असत. ३ या देशांत त्रैलोक्य जणुं एकवटलें आहे असें क्षेमद्युति या नांवाला धारण करणारें शहर आहे. हें शहर सदाचार स्वभावाला धारण करणारे असे जे वेगळे वेगळे वर्ण ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शुद्र यांनीं युक्त असल्यामुळें सद्वृत्तिप्रकृतियुत-गोलाकारानें युक्त आणि विविक्तवर्णांनीं-नाना प्रकारच्या रंगांनीं युक्त अशा

तस्यासीदथ नृपतिः पुरस्य नाथो । नीतिज्ञो विनतरिपुर्धनंजयाख्यः।
येन श्रीरतिचपलाप्यकारि वश्या विद्यंते भुवि महतां न दुःकराणि
॥ ४ ॥
कल्याणी सकलकलासु दक्षबुद्धिः स्मेरास्या स्मरविजयैकवैजयन्ती।
लज्जाया हृदिव बभूव तस्य राज्ञी विख्याता मनुजपतेः प्रभावती-
ति ॥ ५ ॥
सत्स्वप्नैर्निगदितचक्रवर्तिलक्ष्मीः प्राग्देवः सुरनिलयात्ततोऽवतीर्य ॥
पुत्रोऽभूद्भुवि स तयोर्यशो महीयोमूर्तं वा प्रियपदपूर्वमित्रनामा ॥६॥
तं विद्याः प्रथममुपासिरे समस्ताः प्रत्यक्षं मतिविभवेन लोभ्यमानाः
अभ्येतुं झटिति परं समुत्सुकायाः साम्राज्यश्रिय इव दूतिकाः प्रधा-
नाः ॥ ७ ॥
सर्वेषामजनि स भाजनं गुणानां रत्नानामिव जलधिः सुनिर्मलानां॥
लावण्यं दधदपि भूरि तद्धि चित्रं माधुर्यं दिशि दिशि यत्ततान लोके
॥ ८ ॥

पृथ्वीच्या तिलकाप्रमाणें शोभत असे. ४ या शहराचा अधिपति नीतिज्ञ व शत्रूंना नम्र करणारा असा धनंजय नांवाचा राजा होता. यानें अतिशय चंचल अशी ही लक्ष्मी अगदीं मुठींत ठेविली होती. बरोबरच आहे कीं, महापराक्रमी लोकांना या जगांत दुष्कर असें कांहींच असत नाहीं ५ सगळ्या कलामध्यें जिची बुद्धि निपुण आहे अशी, नेहमी हंसत मुखाची, मदनाची अद्वितीय विजयपताका, व लज्जेचे हृदयस्थान असलेली अशी प्रभावती या नांवाची या धनंजयाला कल्याण करणारी प्रसिद्ध राणी होती ६ चांगल्या स्वप्नांचें द्वारें ज्यानें चक्रवर्तीच्या लक्ष्मीची पूर्वींच सूचना केली आहे असा तो प्रीतिंकर नांवाचा देव महाशुक्र स्वर्गांतून चवून या भूतलावर या उभयतांचें–राजाराणीचें जणु मूर्तिमंत मोठें यशच असा प्रियमित्र नांवाचा मुलगा झाला. ७ त्याच्या बुद्धिवैभवानें मोहित झालेल्या सर्व विद्या त्याची उपासना करू लागल्या. अर्थात् सर्व विद्यांची त्यास प्राप्ति झाली. लौकरच या राजपुत्राची प्राप्ति करून घेण्यास अतिशय उत्कंठित झालेल्या सार्वभौम लक्ष्मीच्या या विद्या जणु मुख्य दूती होत्या ८ जसा समुद्र निर्मल अशा

सद्वृत्तः सकलकलाधरो वितन्वन्नानंदं निजमृदुपादसेवाकानां ॥
संपूर्णो विधुरिव भूरिरूपशोभासामग्रीमभिनवयौवनेन भेजे ॥ ९ ॥
संरेजे समदवधूविलोलनेत्रैस्त्यक्तान्यैरधिगतसंमदं पतद्भिः ॥
बिभ्राणो मधुसमये प्रसूनलक्ष्मीं प्रत्यग्रामलिनिवहैरिवैकचूतः ॥१०॥
अन्यस्मिन्नहनि धनंजयो जिनेंद्रं स क्षेमंकरमुपगम्य तत्प्रणीतां ॥
धर्मं च प्रवणमना निशम्य सम्यक् संसारादविरतमतिः परं बभूव॥११॥
विन्यस्य श्रियमथ तत्र पुत्रमुख्ये तन्मूले सपदि स दीक्षितो विरेजे ॥
संसारव्यसननिरासिनी मुमुक्षोः शोभायै भवति न कस्य वा तपस्या?
॥ १२ ॥

सर्व प्रकारच्या रत्नांचा साठा असतो त्याप्रमाणें हा राजपुत्र सर्व सद्गुणांचें पात्र बनलेला होता. समुद्र पुष्कळ लावण्य-खारेपणा धारण करीत असतो. प्रत्येक दिशेमध्यें त्याचा मधुरपणा न पसरतां खारेपणाच पसरला आहे. परंतु या राजपुत्रानें भूरिलावण्य-पुष्कळ खारेपणा धारण केला आहे तरी याचें माधुर्यच सर्व दिशांत पसरलें आहे हें आश्चर्य होय. अर्थात् लावण्य ह्मणजे सौंदर्य याच्या सौंदर्याची सर्व दिशामध्यें प्रसिद्धि झाली होती. ९ सद्वृत्तगोल, सकलकलाधर सगळ्या कला-सोळा कला धारण करणारा, स्वतःच्या मृदुपादांचें-मउ किरणांचें सेवन करणारास आनंदित करणारा, असा पूर्णचंद्र जसें पूर्ण सौंदर्याला धारण करितो तसें सद्वृत्त-सदाचरणी, सकल कलाधर-चौसष्ट कलांचा धारक, व आपल्या मृदुपादांचें-मऊ पायांचें सेवन करणारास नेहमी आनंदित करणारा हा प्रियमित्र राजपुत्र नवीन तारुण्यानें पुष्कळ रूपकांतीच्या पूर्ण सामग्रीला पावला. १० वसंत ऋतुमध्यें नवीन मोहोर धारण करणारा आम्रवृक्ष, तारुण्यानें मुसमुसलेल्या स्त्रियांच्या नेत्राप्रमाणें चंचल व ज्यांनीं इतर पुष्पांचा त्याग केला आहे व जे आनंदानें येऊन पडत आहेत अशा भुंग्यांनीं जसा शोभतो तसा हा राजपुत्रही जेव्हां वसंत ऋतूंत पुष्पांच्या माळांची शोभा धारण करीत असे तेव्हां तारुण्यमदानें उन्मत्त झालेल्या स्त्रियांच्या नेत्रांनीं आपलीं इतर कामें सोडून दिलीं व आनंदानें ते या राजपुत्राकडे खिळून गेले. यामुळें हा राजपुत्र फार शोभूं लागला. ११ एके दिवशीं धनंजय राजा क्षेमंकर जिनेश्वराजवळ जाऊन त्यानें त्यांनीं केलेला धर्माचा उपदेश एकाग्रमनानें ऐकिला. त्यामुळें त्याला संसारापासून पूर्ण

दुःप्रापां सकलनृपाधिराजलक्ष्मीं प्राप्यापि प्रमदमसौ तथा न भेजे ॥
बिभ्राणः सकलमणुव्रतं यथावत्सम्यक्त्वं सहजमथोज्ज्वलं च राजा
॥ १३ ॥
तस्येयुः परमरयोऽपि सच्चरित्रैराकृष्टाः स्वयमुपगम्य किंकरत्वं ॥
शीतांशोरिव किरणाः सतां गुणौघा विश्वासं विदधति कस्य वा
न शुभ्राः ॥ १४ ॥
एकस्मिन्नथ दिवसे सभागृहस्थं विज्ञातो नरपतिमभ्युपेत्य कश्चित् ॥
संभ्रांतो नतिरहितं मुदेवमूचे को दिष्ट्या भवति सचेतनो महत्या
॥ १५ ॥
शालायाममलरुचां वरायुधानामुत्पन्नं विनतनरेन्द्रचक्र ! चक्रं ॥
दुःप्रेक्ष्यं दिनकरकोटिबिंबकल्पं यक्षाणामधिपगणेन रक्ष्यमाणं ॥१६॥

वैराग्य प्राप्त झालें. १२ यानंतर त्यानें सर्व पुत्रामध्यें मुख्य–श्रेष्ठ असलेल्या प्रिय-मित्रावर राज्यलक्ष्मी स्थापिली व स्वतः क्षेमंकर जिनेश्वराजवळ तत्काळ दीक्षा घेऊन तो फार शोभूं लागला. बरोबरच आहे की, ज्याला मोक्ष प्राप्त करून घेण्याची इच्छा आहे अशा कोणत्या मनुष्यानें घेतलेली व संसार–संकटाचा नाश करणारी तपस्या–दीक्षा कां बरें शोभेला कारण होणार नाहीं? १३ इतरांना मिळण्यास अशक्य व राजे लोकांवर हुकूत चालविणारी राजलक्ष्मी प्राप्त करून देखिल या प्रियमित्र राजाला तसा आनंद वाटला नाहीं जसा सगळीं अणुव्रतें व शास्त्रांत सांगितल्याप्रमाणे ज्यांचें स्वरूप आहे असें नैसर्गिक आणि निर्मल सम्यग्दर्शन प्राप्त केल्यानें झाला होता. अर्थात् या राजाला राज्यप्राप्तिपेक्षां अणुव्रतें व निर्मळ सम्यग्दर्शनानें अधिक आनंद झाला होता. १४ त्याचे शत्रु देखिल त्याच्या सदाचार गुणांनीं ओढले गेले यामुळें ते स्वतः येऊन त्याचे नोकर बनले. बरोबरच आहे कीं, चंद्राचे पांढरे किरण जसें सर्वांना अल्हादकारक असतात तसे सत्पुरुषांचे शुभ्र गुण–समुदाय कोणाला बरें विश्वास–आनंद उत्पन्न करीत नसतात? १५ यानंतर एके दिवशीं द्वारपालाकडून ज्याची हकीकत कळविली गेली आहे असा कोणी एक मनुष्य गडबडीनें सभेंत आला व तेथें बसलेल्या राजाला नमस्कार न करितांच आनंदानें बेहोश होऊन पुढें लिहिल्याप्रमाणें

तत्रैव स्फुरितमणिप्रभापरीतो दंडोऽभूदसिरपि शारदांबराभः ॥
प्रत्यक्षं यश इव ते मनोभिरामं पूर्णेंदुद्युतिरुचिरं सितातपत्रं ॥१७॥
संसर्पत्करनिचयेन रुद्धदिक्कश्चूलाख्यो मणिरुदपादि कोशगेहे ॥
काकिण्या सममचिरांशुराजिभासा भूपेंद्र! द्युतिविततेन चर्मणा च
॥ १८ ॥
आकृष्टः सुकृतफलेन रत्नभूता द्वारस्थाः सचिवगृहेशतक्षमुख्याः॥
सेनानीकरितुरगाश्च कन्यया मा कांक्षन्ति क्षितिप! भवत्कटाक्षपातं
॥१९॥
संजाता नवनिधयः कुबेरलक्ष्म्याः कुर्वाणा निजविभवैः सदाभिभूतिं
प्राग्जन्मप्रजनितभूरिपुण्यशक्तिः किं कासां न भवति संपदां सवित्री?
॥२०॥

बोलूं लागला. बरोबरच आहे कीं, अतिशय आनंद झाला असतां कोण वरें त्यावेळीं सचेतन–सावधान असतो? १६ स्वच्छ कांतींनीं युक्त अशा शस्त्रास्त्राच्या शाळेंत ज्यानें सर्व राजसमुदायांना नम्र केलें आहे अशा हे राजा! कोट्यवधि सूर्यबिंबा-प्रमाणें पाहण्यास अशक्य, यक्षांच्या वरच्या अधिकाऱ्याकडून जें राखिलें जातें असें चक्ररत्न उत्पन्न झालें आहे. त्याच ठिकाणीं चमकणाऱ्या मण्यांच्या कांतींनीं वेष्टि-लेलें दंडरत्न, शरत्कालच्या आकाशाप्रमाणे नीलवर्णाचें खड्गरत्न आणि हे राजा! मूर्तिमंत मनोहर असें तुझें यशच जणु असें पूर्ण चंद्राच्या कांति सारखें सुंदर पांढरें छत्र हीं रत्नेही उत्पन्न झालीं आहेत. १९ हे राजाधिराजा! कोशगृहांत–खाजिना ठेवण्याच्या घरांत पसरणाऱ्या किरण समूहानें ज्यानें सर्व दिशा भरुन टाकिल्या आहेत असें चूडामणि नांवाचें रत्न विजांच्या कांतीप्रमाणें चमकणाऱ्या काकिणी रत्नासह व ज्याची कांति पसरली आहे अशा चर्मरत्नासह उत्पन्न झालें आहे. १९ हे पृथ्वीपते, तुझ्या पुण्यफलाने आकर्षिलेले व जगांत अतिशय श्रेष्ठ असल्यामुळें रत्न या नांवाला प्राप्त झालेले सचिव, गृहपति, स्थपति हे ज्यामध्यें मुख्य आहेत असे सेनापति, हत्ती, व घोडा हे सर्व जण कन्या रत्नासह तुझ्या कटाक्षपाताची इच्छा करीत दरवाजांत उभे राहिले आहेत. २० आपल्या वैभवानें कुबेराच्या संपत्तीचा नेहमीं धिक्कार करणारे नव निधि हे राजन्! प्रगट झाले आहेत.

तेनोक्तामिति नरलोकसारभूतां संभूतामपि स निशम्य चक्रभूतिं॥
भूपेन्द्रो जन इव विस्मयं न भेजे प्राज्ञानां किमिह कुतूहलस्य हेतुः॥२१॥
प्रत्यक्षं जिनपतिमभ्युपेत्य भक्त्या सानंदं सह सकलेन राजकेन॥
संपूज्य प्रथममसौ यथोक्तमार्गैर्मार्गज्ञस्त्वथ विततान चक्रपूजां॥२२॥
षट्खंडैः कतिपयवासरैरनूनैराकीर्णं नृपखचराधिपैश्च देवैः॥
चक्रेण स्ववशमकारि तेन कृत्स्नं दुःसाध्यं न हि भुवि भूरिपुण्यभाजां
॥२३॥
द्वात्रिंशत्सकलनराधिराट्सहस्रैर्विख्यातैरपि विबुधाधिपैस्तदर्द्धैः॥
स्त्रीभिः षण्णवतिसहस्रसम्मिताभिः कांताभिः परिकरितो रराज
सम्राट्॥२४॥

बरोबरच आहे कीं, पूर्वजन्मीं उत्पन्न झालेली पुष्कळ पुण्याची शक्ति, कोणत्या संपत्तींना प्रसवणारी होत नाहीं बरें ? अर्थात् पुण्योदयानें सर्व संपत्ति मिळतातच. २१ मनुष्य लोकांत सर्वोत्कृष्ट अशा चक्ररत्न संपत्तीच्या उत्पत्तीचें त्या पुरुषानें केलेलें वर्णन ऐकून राजाला सामान्य लोकांप्रमाणें कांहीं आश्चर्य वाटलें नाहीं. बरोबरच आहे कीं या जगांत विद्वान लोकांना आश्चर्य उत्पन्न करणारी कोणती वस्तु आहे? तात्पर्य हें कीं, विद्वान लोकांना कारणांची माहिती असल्यामुळें अमुक कारणापासून अमुक कार्य उत्पन्न होतें असें त्यांना समजतें म्हणून त्यांना आश्चर्य वाटत नाहीं. २२ प्रथमतः सर्व राजसमूहासह मोठ्या आनंदानें व भक्तिनें प्रत्यक्ष जिनेन्द्राकडे जाऊन या राजाधिराजानें त्यांची पूजा केली. नंतर पद्धति जाणाऱ्या या भूपेंद्रानें शास्त्रांत सांगितलेल्या मार्गांनीं चक्ररत्नाची पूजा केली. २३ यानंतर भूगोचारी राजे आणि देव यांनीं पूर्ण भरलेला. सहा खंडांनीं युक्त असलेला कच्छ देश या राजानें चक्ररत्नाच्या साहाय्यानें थोडक्याच दिवसांत आपल्या स्वाधीन करून घेतला. बरोबरच आहे कीं या जगांत पुष्कळ पुण्य ज्यांनीं संचित केलें आहे अशा लोकांना कोणती गोष्ट असाध्य असते बरें ? कोणतीही असत नाहीं. २४ बत्तीस हजार मांडलिक राजे व प्रसिद्ध असे सोळा हजार देव आणि शहाण्णव हजार सुंदर स्त्रिया यांनीं युक्त हा सार्वभौम राजा शोभूं लागला. २५ नैसर्प, पांडु, पिंगल, काल, महाकाल, शंख, पद्म, माणव आणि सर्वरत्न असे नऊ निधि उत्तर

नैसर्पः सममथ पांडुपिंगलाभ्यां कालेन स्थितिमकरोच्च भूरिकालः ॥
शंखाख्यो निधिरपि पद्ममाणवाभ्यां कौबेर्यां दिशि नवमश्च सर्वरत्नः ॥२५॥

प्रासादान्मृदुशयनानि सोपधानान्यासंदीप्रमुखवरासनप्रपंचान् ॥
नैसर्पो वितरति संततं जनेभ्यः पर्यंकान्बहुविधजातिपट्टिकांश्च ॥२६॥

शालीनां तिलयवमाषकोद्रवाणां व्रीहीणां वरचरणकप्रियंगुकाणां ॥
सर्वेषां जनहृदयाभिवांछितानां भेदानामतिधृति पांडुकः प्रदाता ॥२७॥

प्रत्युप्तप्रविपुलरत्नराजिरश्मिश्रेणीभिः शबलितसर्वदिङ्मुखानि ॥
स्त्रीपुंसं प्रति सदृशानि भूषणानि श्रीमंति प्रतिदिशति पिंगलो जनेभ्यः ॥२८॥

सर्वर्तुप्रसवफलानि सर्वकालं चित्राणि द्रुमलतिकाक्षुपोद्भवानि ॥
निर्व्याजं वितरति वांछितानि कालः किन्न स्यात्सुकृतफलेन पुण्यभाजां ॥ २९ ॥

दिशेकडे राहत असत २६ नैसर्प नांवाचा निधि नेहमीं लोकांना राजवाडे, मऊ विछाने, उशा, नाना प्रकारचीं उत्तम आसनें, पलंग व अनेक प्रकारचीं वस्त्रें अर्पण करीत असे. २७ पांडुक नांवाचा निधि साळी, तिळ, यव, उडीद, कोद्रु, साळीचे निरनिराळे प्रकार, वरे, हरभरे, कंगणी वगैरे लोकांच्या हृदयाला आवडणाऱ्या व संतोष देणाऱ्या वस्तु देत असे २८ ज्यामध्यें बसविलेल्या नाना प्रकारच्या रत्न समूहांच्या किरण पंक्तींनी ज्यांनीं सर्व दिशा व्यापुन टाकिल्या आहेत अशीं सुंदर स्त्रीपुरुषांना योग्य अनेक प्रकारचीं आभूषणें पिंगल नांवाचा निधि लोकांना देत असे. २९ काल नांवाचा निधि झाडें, वेली, झुडपें यांचीं नानाप्रकारचीं व सर्व ऋतूंत उत्पन्न होणारीं फुलें व फळें सहज रीतीनें लोकांना देत असतो. बरोबरच आहे कीं, जे पुण्यवान् आहेत त्यांना पुण्याच्या फलानें कशाची वरें प्राप्ति होत नाहीं? ३० भूरि-काल अथवा महाकाल नांवाचा निधि लोकांना त्यांचीं आवडतीं घरें सजविण्याचे नाना प्रकारचे सुवर्णाचे पदार्थ, तांब्याचीं नानाप्रकारचीं भांडीं कुंडीं, अनेक प्रकारचीं न फुटलेलीं लोखंडाचीं उपकरणें, तत्काळ प्रयत्नानें अशीं देतो. ३१ तत-तन्तुवाद्यें,

सौवर्णं सदनपरिच्छदं विचित्रं ताम्रीयं विविधमुपस्करं च लौहं ॥
लोकेभ्यः समभिमतं ददाति यत्नान्नीरंध्रं निधिरचिराय भूरिकालः
॥ ३० ॥

वाद्यानां ततघनरंध्रनद्धभेदैर्भिन्नानां श्रुतिसुखदायिनादभाजां ॥
संघातं सृजति समीप्सिताय शंखो दुःप्रापं न हि जगतां समग्रपुण्यैः
॥ ३१ ॥

चित्राणि क्षणरुचिशक्रचापकांतिं खस्थास्तुं निजमहसा विडंवयन्ति
वासांसि स्वतिशयरत्नकंवलादिप्रावारैः सह दिशतीप्सितानि पद्मः
॥ ३२ ॥

हेतीनां निवहमनेकभेदाभिन्नं दिव्यानामनुगतलक्षणास्थितीनां ॥
दुर्भेद्यं कवचशिरःसुवर्मजातं प्रख्यातं वितरति माणवो जनेभ्यः॥३३॥
रत्नानां वियति सुरेंद्रचापलक्ष्मीमन्योन्यव्यतिकरितैर्गभस्तिजालैः ॥
कुर्वाणां जनयति संपदं समग्रां सामग्रीं सकलजनस्य सर्वरत्नः ॥३४॥

घन–झांज, टाळ वगैरे, रंध्र–पावां, सनई वगैरे आणि नद्ध–कातड्यानें मढविलेलीं वाद्यें. हीं सर्व कानाला गोड लागणाऱ्या शद्बांना जन्म देत असतात. शंख नांवाचा निधि हीं सर्व इच्छित वाद्यें लोकांना अर्पण करीत असतो. ज्यांचें पुण्य पूर्णावस्थेला पोहोंचलेलें असतें अशांना कांहीं दुर्लभ नसतें. ३२ आकाशांत असणाऱ्या इंद्रधनुष्य व वीज यांच्या कांतीला स्वतःच्या कांतीनें लज्जित करणारीं अनेक प्रकारचीं वस्त्रें व अमूल्य अशीं रत्नकंवळ वगैरे पांघरण्याचीं वस्त्रें लोकांच्या इच्छेला अनुसरुन पद्म नांवाचा निधि देतो. ३३ माणव नांवाचा निधि ज्यांचीं लक्षणें भिन्न भिन्न आहेत अशीं दिव्य नानाप्रकारचीं शस्त्रास्त्रें, प्रसिद्ध व अभेद्य असें चिलखत व शिरस्त्राण लोकांना अर्पण करीत असतो. ३४ सर्वरत्न नांवाचा निधि एकमेकांमध्यें प्रवेश करणाऱ्या रत्नांच्या किरण समुदायांनीं आकाशांत इंद्र धनुष्याची शोभा उत्पन्न करणाऱ्या संपत्तींची सर्व सामग्री लोकांसाठीं उत्पन्न करीत असतो. ३५ जसें पावसाळा नूतन जलाचा वर्षाव करणाऱ्या नूतन मेघांच्या द्वारें सर्व रीतीनें मयूरांच्या इच्छा पूर्ण करीत

लोकानामिति स मनोरथानशेषान्भूपेन्द्रो निधिभिरपूरयन्निकामं ॥
प्रत्यग्रैर्नवजलमोचिभिः समंताज्जीमूतैरिव शिखिनां तपावसानः॥३५
औद्धत्यं नवनिधिभिः प्रदीयमानैर्न द्रव्यैरपरिमितैः स संप्रपेदे ॥
तोयौघैरिव जलधिर्नदोपनीतैर्धीराणां न हि विभवो निकारहेतुः॥३६॥
अप्येवं समनुभवन्दशांगभोगान्ध्यानम्रैरमरनृपैः सदा परीतः ॥
धर्मास्थां शिथिलयति स्म न स्वचित्तान्माद्यंते न हि विभवैर्महानु-
भावाः ॥ ३७ ॥
आश्लिष्टो घनमपि राजराजलक्ष्म्या राजेंद्रः प्रशमरतिं सुखाय मेने॥
सद्दृष्टेरधिगतभूरिसंपदोऽपि श्रेयोर्थान्न हि विजहाति निर्मला धीः ३८
पूर्वाणि त्रिभिरधिकान्यशीतिलक्षाण्यानंदं सकलजनस्य चक्रनाथः॥
आतन्वान्निति स निनाय मग्नचित्तो विस्तीर्णे विषयसुखामृतांबु-
राशौ ॥३९॥

असतो. तसें या प्रियमित्र चक्रवर्तीनें या नवनिधींच्या द्वारें सर्व लोकांचे सर्व मनोरथ पूर्ण केले. ३६ जसें समुद्राला मोठ्या नद्यांकडून पुष्कळ पाण्यांचे प्रवाह नेहमीं मिळतात तथापि तो जसा उद्धट होत नाहीं, गंभीरच असतो. तसें ह्या चक्रवर्तीला नेहमा नव निधीकडून अपरिमित द्रव्य मिळत असे पण याला उद्धटपणा कसा असतो हें माहितच झालें नाहीं. बरोबरच आहे कीं, धीर गंभीर अशा माणसांना वैभव विकारास कारण होत नाहीं. ३७ नम्र झालेल्या देवांनीं व राजांनीं नेहमीं वेष्टिलेला हा चक्रवर्ती दशांग भोगांचा भोग घेत होता तथापि धर्माविषयींचें प्रेम थोडेसें देखिल आपल्या मनापासून तो कमी होऊं देत नसे. बरोबरच आहे कीं, जे महापुरुष आहेत ते ऐश्वर्यानें कधींही उन्मत्त बनत नाहींत. ३८ सार्वभौम राजलक्ष्मीनें ज्याला दृढ आलिंगन दिलें आहे अशा या प्रियमित्र चक्रवर्तीनें प्रशम–रागद्वेषांच्या अभावा मध्यें रत होणें हेंच सुखदायक आहे असें मानिलें होतें. बरोबरच आहे कीं, सम्यग्दृष्टि आत्म्याला पुष्कळ संपत्ति मिळाली तरी त्याची निर्मलबुद्धि कल्याणमार्गापासून–रत्नत्रयापासून भ्रष्ट होत नाहींच. ३९ विस्तीर्ण अशा पंचेंद्रिय–सुखरूपी अमृत–समुद्रांत ज्याचें चित्त गढून गेलें आहे अशा त्या चक्रवर्तीनें सगळ्या प्रजेला आनंदित ठेऊन ८३ लक्ष पूर्व वर्षें राज्य

अन्येद्युः प्रविमलदर्पणे स्वबिंबं संपश्यन्नृपतिः स्वकर्णमूले ॥
संलग्नं विनिगदितुं जरां भवित्रीं दूतं वा नवपलतांकुरं निदध्यौ४०
तं दृष्ट्वा मणिमुकुरं विहाय सद्यो राजेंद्रश्चिरमिति चिंतयांबभूव ॥
विश्वस्यादहमिव कोऽपरः सचेताः संसारे विषयविषैर्वशीकृतात्मा ४१
भोगार्थैः सुरनृपखेचरोपनीतैः साम्राज्ये न खलु ममापि जातु रम्ये
संतृप्तिः प्रकृतनरेषु कैव वार्ता दुःपूरो भवति तथापि लोभगर्तः॥४२॥
आकृष्टो विषयसुखैर्बुधोऽपि नूनं संसारान्न परिबिभेति भूरिदुःखात्
आत्मानं बत कुरुते दुराशयार्तं मोहांधो ननु सकलोऽपि जीवलोकः४३
ते धन्या जगति विदां त एव मुख्याः पर्याप्तं सुकृतफलं च भूरि तेषां
यैस्तृष्णाविषलतिका समूलतूलं प्रोन्मूल्य प्रतिदिशमुज्झिता सुदूरं४४

केलें. ४० एके दिवशीं स्वच्छ अशा दर्पणांत आपलें प्रतिबिंब पाहात असतांना या चक्रवर्तीला कानाजवळ पांढरा केश दिसला. जणु तो हे राजेंद्रा! आपणास आतां लौकरच वृद्धावस्था येणार आहे असें सांगण्याकरितां कानाजवळ गेला होता. ४१ तो केस पाहिल्याबरोबर भूपेंद्रानें तत्काल हातांतील दूताप्रमाणें आरसा खालीं टाकून पुढें लिहिल्याप्रमाणें विचार केला. "पंचेंद्रियांच्या विषयरूपी विषांनीं ज्याचा आत्मा वश केला आहे अशा माझ्या शिवाय या जगांत दुसरा कोणता ज्ञानी पुरुष या संसारावर विश्वास ठेवील बरें? ४२ देव, राजे, व विद्याधर यांनीं अर्पण केलेल्या व रमणीय अशा भोगांच्या पदार्थांनीं या साम्राज्यांत माझी-देखील तृप्ति झाली नाहीं. मग सामान्य माणसांची गोष्टच विचारावयास नको. खरोखर हा लोभरूपी खड्डा भरून निघणें शक्य नाही. चक्रवर्तीची संपत्ति म्हणजे ऐहिक संपत्तीची पूर्णता. पण तिनेंही माझा लोभरूपी खड्डा भरून निघाला नाहीं मग इतरांना जर असली संपत्ति मिळतच नाहीं तर त्यांचा तो लोभरूपी खड्डा भरणें शक्यच नाहीं. ४३ विषयसुखांनीं ओढलेला विद्वान मनुष्य देखील अतिशय दुःखांनीं भरलेल्या या संसारापासून भीत नाहीं. व स्वतःला तो देखील अनेक कुत्सित इच्छांनीं पीडित करितो. बरोबरच आहे कीं, जगामध्यें सगळेच संसारी जीव मोहानें आंधळे झालेले आहेत. ४४ ज्यांनीं आशारूपी विषाच्या वेलीला मुळापासून उपटून प्रत्येक दिशेला दूर फेकून दिलें. या जगांत खरोखर तेच धन्य होत. त्यानाच विद्वानांचे मुकुटमणि मानावें. आणि त्यांना पुण्याचें पूर्ण, पुष्कळ फळ प्राप्त झालें आहे असें समजावें. ४५ दुःखांच्या अथवा मृत्यूच्या मुखांतून

नो भार्या न च तनयो न बंधुवर्गः संत्रातुं व्यसनमुखादलं हि कश्चित्
तेष्वास्थां शिथिलयितुं तथापि नेच्छेत् धिङ्मूढां प्रकृतिमिमां शरीरा
भाजां ॥४५॥

संतृप्तिर्न च विषयैर्निषेव्यमाणैरक्षाणां भवति पुनस्तृषैव घोरा ॥
तृष्णार्तो हितमहितं न वेत्ति किंचित्संसारो व्यसनमयो ह्यनात्मनीनः
॥४६॥

जानाति स्वमगमपि वीक्षते शृणोति प्रत्यक्षं जननजरामृतिस्वभावं
संसारं कुशलविवर्जितं तथापि भ्रांत्यात्मा प्रशमरतो न जातु जीवः
॥४७॥

अक्षाणां वशमुपगम्य पापकार्ये संसक्तः सुखलवालिप्सया निकामं॥
नो पश्यत्यपरभवे विचित्रदुःखं जीवानामहितरतिः परं स्वभावः
॥४८॥

संपत्तिस्तडिदिव चंचला समग्रा तारुण्यं तृणगतदावदीप्तिकल्पं ॥
किं नायुर्गलति पदे पदे समस्तं निःशेषं दलितघटांबुवन्नराणां॥४९॥

याची सुटका करण्यास बायको, मुलगा, आप्त नातलग अथवा इतर कोणीहि समर्थ होत नाहींत. तरी ही हा प्राणी त्यांच्यावरील प्रेम ढिलें करावें असें इच्छित नाहीं. प्राण्यांच्या या मूर्ख स्वभावाला धिक्कार असो. ४६ कितीही विषय भोगले गेले तरी इंद्रियें तृप्त तर होतच नाहींत पण त्यांना पुनः भयंकर तहानच लागतें. या तहानेनें व्याकुळ झालेला हा प्राणी हित व अहित याचा विचार करीत नाहीं. बरोबरच आहे की, हा संसार दुःखांनीं पूर्ण भरलेला व आत्म्याचें अकल्याण करणाराच आहे ४७ हा आत्मा, हा संसार जन्म, म्हातारपणा, मरण या स्वभावांनीं युक्त हितानें रहित आहे असें प्रत्यक्ष स्वतः जाणतो, पाहतो व ऐकतोहिं तथापि भ्रांतिलाच स्वतःचें खरें स्वरूप समजून शांतिमध्यें कधींहीं आसक्त होत नाहीं.

४८ थोड्या सुखांच्या इच्छेनें हा जीव इंद्रियांच्या स्वाधीन होऊन पाप कार्यांत अतिशय गढून जातो. पुढच्या जन्मामध्यें मला नानाप्रकारचीं दुःखें भोगावीं लागतील ही गोष्टच त्याच्या ध्यानांत येत नाहीं. यावरून जीवांचें अहित-कर गोष्टीमध्यें प्रेम होणें हाच स्वभाव आहे असें कष्टानें म्हणावें लागतें ४९ सर्व प्रकारचीं संपत्ति विजेप्रमाणें चंचल आहे. तरुणपणा गवताला लागलेल्या अग्नीच्या-कांतीप्रमाणें लौकरच नष्ट होणारा आहे. फुटलेल्या घागरींतील पाण्याप्रमाणें मनुष्यांचें सगळें आयुष्य पावलों पावलीं गळून जात नाहीं काय? ५० हें शरीर घाणेरडें,

बीभत्से प्रकृतिविनश्वरे नितान्तं दुःपूरे बहुविधरोगवासगेहे ॥
विण्मूत्रक्षतजसुपूर्णभांडगेहे को विद्वान्वपुषि करोति बंधुबुद्धिं ॥५०॥
संसारस्थितिमिति चेतसा विनिंद्य क्षोणीशः स्वयमचिराय मोक्षमार्गं
जिज्ञासुर्जिनमभिवंदितुं प्रतस्थे प्रस्थानप्रहतमृदंगहूतभव्यः ॥५१॥
तेनाथो समवसृतिः प्रसन्नभव्यश्रेणीभिः परिकरिताश्रितो जिनेंद्रः॥
आसेदे सुरपदवीव तारतारमध्यस्थप्रविमलपूर्णचंद्रलक्ष्मीः ॥५२॥
अजममरममेयं केवलज्ञाननेत्रं, चतुरमरनिकायैः सेवितं प्रांजलीव्यं॥
द्विगुणितशमसंपद्भक्तिनम्रोत्तमांगः सकलनरपतीन्द्रस्तं ववंदे जिनें-
द्रम् ॥ ५३ ॥

❀ इत्यसगकृते श्रीवर्द्धमानचरिते प्रियमित्रचक्रवर्तिसंभवो नाम चतुर्दशः सर्गः ॥ ❀

स्वभावतःच नाश पावणारें. याला कितीही पदार्थ खाण्यास दिलें तरी न भरणारें, नाना रोगांचें राहण्याचें घर असलेलें, विष्टा, मूत्र, रक्त यांनीं भरलेल्या भांड्यासारखें आहे. अशा तऱ्हेच्या शरीरामध्यें कोणता विद्वान हें फार हितकर आहे अशी बुद्धि करील बरें ? अर्थात् करणार नाहीं. ५१ याप्रमाणें संसाराच्या स्थितीचा राजानें मनानें विचार केला व प्रयाणाच्या मृदंगांच्या ध्वनीनें सर्व भव्यांना ज्यानें बोलाविलें आहे असा तो मोक्षमार्गाचें स्वरूप जाणण्याच्या इच्छेनें क्षेमंकर जिनेंद्राला वंदन करण्यासाठीं शीघ्र निघाला ५२ यानंतर प्रसन्न अशा भव्य जीवांच्या समूहांनीं सर्व बाजूनें गच्च भरलेल्या समवसरणांत राजेन्द्रानें प्रवेश केला. ज्याच्या सभोंवती प्रकाशमान नक्षत्रें असून जो मध्यभागीं आहे अशा निर्मल पूर्ण चंद्रानें आकाश जसें शोभतें तसें सर्व बाजूनें भव्य जीव असून ज्यांच्या मध्यभागीं निर्मल, आनंदकारक, अनंत चतुष्टय व अष्टमहाप्रातिहार्य रूपी लक्ष्मीला धारण करणारे जिनेश बसले आहेत असें तें समवसरण फार शोभू लागलें ५३ दुप्पट झालेल्या प्रशम संपत्तीपासून उत्पन्न झालेल्या भक्तीनें ज्याचें मस्तक नम्र झालें आहे अशा राजाधिराज प्रियमित्र चक्रवर्तीनें चार प्रकारच्या देवांच्या समुदायांनीं सेवनीय व हात जोडून स्तुति करण्यास योग्य, ज्याला पुनर्जन्म व मरण नाहीं व जो अनंत गुणांनीं युक्त असल्यामुळें अमेय आहे, ज्याला केवलज्ञानरूपी डोळा आहे अशा त्या जिनेश्वराला नमस्कार केला.

याप्रमाणें असगकविरचित श्रीवर्द्धमान–चरित्रा मध्यें प्रियमित्र चक्रवर्तीच्या उत्पत्तीच्या वर्णनाचा हा चौदावा सर्ग संपला.

# पंचदशः सर्गः

पप्रच्छाथ प्रांजलिर्भक्तिनम्रः क्षोणीनाथो मोक्षमार्गं जिनेंद्रं ॥
ज्ञात्वा दौस्थ्यं संसृतेरप्रमेयं भव्यः को वा सिद्धये नोत्सहेत॥ १ ॥
सर्वान्सत्वान्भिन्नजातीन्विमुक्तेर्मार्गं भव्यान्बोधयन्नेवमूचे ॥
वाचं वाचामीशिता दिव्यनादव्याप्तास्थानं निश्चिताशेषतत्वः ॥२॥
स्यात्सम्यक्त्वं निर्मलं ज्ञानमेकं सच्चारित्रं चापरं चक्रपाणे ! ॥
मोक्षस्यैतान्येव मार्गः परोऽयं न व्यस्तानि प्राणिनः संमुमुक्षोः॥३॥
तत्वार्थानां तद्धि सम्यक्त्वमुक्तं श्रद्धानं यन्निश्चयेनावबोधः ॥
तेषामेव ज्ञानमेकं यथावत्स्याच्चारित्रं सर्वसंगेष्वसंगः ॥४॥

१ या नंतर श्रीक्षेमंकर जिनेश्वराला प्रियमित्र चक्रवर्तीनें हात जोडून व भक्तीनें नम्र होऊन मोक्षमार्गाचें स्वरूप विचारिलें. बरोबरच आहे कीं, संसारांतील अमर्याद दुःखाचें स्वरूप जाणून कोण भव्य मोक्षप्राप्तीसाठीं उत्साहयुक्त होणार नाहीं बरें? २ ज्यानें सर्व तत्वांचें स्वरूप निश्चित रूपानें जाणलें आहे, जो दिव्य ध्वनीचा अधिपति आहे असा तो क्षेमंकर जिनेश्वर देव मनुष्य व पशु या वेगळ्या वेगळ्या जातींच्या सर्व भव्यजीवांना मोक्षमार्ग दाखऊन देणारा असा होत्साता दिव्य ध्वनीनें सर्व समवसरणाला व्याप्त करून पुढें लिहिल्याप्रमाणें उपदेश करूं लागला. ३ हे चक्रवर्ती राजा, निर्मल सम्यग्दर्शन, तसेंच पूर्णज्ञान— केवलज्ञान आणि उत्कृष्ट पूर्ण चरित्र हे तीन मिळूनच मोक्षाचा मार्ग होतो. या शिवाय दुसरा मोक्ष मार्ग नाहीं. तसेंच हे तीन वेगवेगळे ही मोक्ष प्राप्त करून घेणाऱ्या प्राण्यांना मुक्तीचा मार्ग होऊं शकत नाहींत. ४ जीवादिक

जीवाजीवौ पुण्यपापास्रवाश्च प्रोक्ताः सावः संवरो निर्जरा च ॥
बंधो मोक्षश्चेति लोके जिनेंद्रैरिन्द्राभ्यर्च्यः सन्नवैते पदार्थाः ॥५॥
जीवास्तेषु द्विप्रकारेण भिन्नाः संसारस्था निर्वृतश्चेति तेषां ॥
स्यात्सामान्यं लक्षणं चोपयोगः सोऽपि द्व्यष्टाष्टार्धभेदैर्विभक्तः ॥६॥
संसारस्थास्ते त्वनेकप्रकारा नानायोनिस्थानगत्यादिभेदैः ॥
उक्ता नानादुःखदावे दुरन्ते जन्मारण्येऽनादिकालं भ्रमन्तः ॥७॥
गत्यक्षाणां स्थानभेदन शेषं सौख्यं दुःखं सर्वलोकत्रयेऽपि ॥
भावैरेभिः कीर्त्यते वीतरागैः प्राप्नोतीति व्यक्तमात्मा जिनेंद्रैः॥८॥
भावाः पंच क्षायिकाद्यादयः स्युर्जीवस्याहुस्तत्वमित्याप्ततत्वाः ॥
भेदास्तेषां द्वौ नवाष्टादशापि प्रोक्ताः सैकाविंशतिश्च त्रयोऽपि ॥९॥

सात तत्वावर श्रद्धा करणें यास सम्यग्दर्शन ह्मणतात. व या साततत्वांचें निश्चयानें ज्ञान करून घेणें हें सम्यग्ज्ञान होय अर्थात् वस्तु जशी आहे तसेच जाणणें यास सम्यग्ज्ञान ह्मणतात, पदार्थांचा निश्चय करणें ह्मणजे पदार्थ उलट न जाणणें, कमी अधिक न जाणणें, संशयरूप न जाणणें यास सम्यग्ज्ञान ह्मणतात. संपूर्ण परिग्रहापासून विरक्त असणें यास सम्यक्चारित्र ह्मणावें. ५ ज्यांची इंद्रपूजा करितात असे सर्वांचे हित करणाऱ्या जिनेश्वरांनीं जीव, अजीव, आस्रव, बंध, संवर, निर्जरा, मोक्ष, पाप, व पुण्य असे नव पदार्थ सांगितले आहेत. ६ या सात तत्वामध्यें जीव या तत्व चे संसारी व मुक्त असे दोन भेद आहेत. कर्मसहित जीवांना संसारी व कर्मरहित जीवांना मुक्त असें म्हणतात. यांचे सामान्य लक्षण उपयोग- ज्ञान व दर्शन हें आहे. या उपयोगांचे ज्ञानोपयोग व दर्शनोपयोग असे दोन भेद आहेत. पुन. ज्ञानोपयोगाचे आठ व दर्शनोपयोगाचे चार भेद आहेत. ७ संसारी जीव योनि, स्थान, गति या अनेक भेदांनीं अनेक प्रकारचे आहेत. अनेक तऱ्हेचा दुःखरूपी अग्नि ज्यांत पेटलेला आहे व ज्याचा शेवट दुःखदायक आहे अशा जन्मरूपी अरण्यांत हे संसारी जीव अनादिकालापासून भ्रमण करीत आहेत असें परमागमांत सांगितलें आहे. ८ गति, इंद्रियें, चौदा जीवसमास व औदायिकादि पांच भाव यांच्या द्वारें या सर्व त्रैलोक्यांत हा ससारी जीव सुख व दुःख यांना प्राप्त होत आहे असें वीतराग जिनेश्वर स्पष्ट सांगतात.

सम्यक्त्वं स्यात्सच्चारित्रं स चाद्यो भेदस्ताभ्यां क्षायिकस्यापि सार्द्धं
ज्ञानं लाभो दर्शनं भोगवीर्यौ ज्ञेया दानं चोपभोगश्च भेदाः ॥१०॥
अज्ञानानि त्रीणि चत्वारि सार्द्धिः संज्ञानानि त्रीण्यथो दर्शनानि ॥
मिश्रस्योक्ता लब्धयः पंच सार्द्धं ताभ्यां भेदाः संयतासंयतश्च ॥११॥
अज्ञानं च त्रीणि लिंगानि लेश्याषट्कं मिथ्यादर्शनासंयतौ च ॥
चत्वारश्च स्युः कषायास्त्वसिद्धोऽप्यष्टाधैते भव्य ! तुर्यस्य भेदाः ॥१२॥
जीवत्वं चाभव्यता भव्यता च प्रोक्ता भेदाः पंचमस्य त्रयोऽपि ॥
षष्ठश्चान्यः संनिपातोद्भवः षट्त्रिंशद्भेदांस्तस्य च प्राहुरार्याः ॥१३॥
तुल्याः सर्वे निर्वृताः संप्रणीताः सम्यक्त्वाद्यैरक्षयैः सद्गुणैस्ते ॥
उत्तीर्याप्ता दुस्तरं ये भवाब्धिं त्रैलोक्याग्रे निष्ठितार्थाः प्रतिष्ठां ॥१४॥

९ ज्यांनीं तत्वांचा निश्चय केला आहे अशा जिनेश्वरांनीं औपशमिक, क्षायिक, क्षायोपशमिक, औदयिक व पारिणामिक असे पांच भाव हे जीवाचे स्वतत्व आहेत असें सांगितलें आहे. या भावांचे पोटभेद क्रमानें दोन, नऊ, आठरा एक-वीस व तीन आहेत असें सांगितलें आहे. कर्मांचा उपशम झाल्यानें जीवाचे जे निर्मल परिणाम होतात त्यास औपशमिक भाव म्हणतात. कर्मांचा अत्यंत क्षय झाल्यानें जे भाव होतात ते क्षायिक होत. गढूळ व स्वच्छ अशा मिश्रित पाण्या-प्रमाणें होणाऱ्या भावाला क्षायोपशमिक भाव म्हणावें. कर्मोदयानें उत्पन्न होणारे औदायिक परिणाम होत. ज्यांना कर्मांचा उदय, उपशम, क्षय. व क्षयोपशम यांची अपेक्षा न लागतां आत्म्यामध्यें अनादिकालापासून असणाऱ्या भावास पारिणामिक भाव म्हणतात. याप्रमाणें यांचें स्वरूप समजावें. १० पहिल्या औपशमिकभावाचे सम्यग्दर्शन व सम्यक्चारित्र असे दोन भेद आहेत. अनंतानुबंधी कषाय व दर्शन मोहनीय यांचा उपशम झाल्यानें औपशमिक सम्यग्दर्शन होतें. चारित्रमोहनीयाचे २१ भेद आहेत. त्यांचा पूर्ण उपशम झाला असतां औपशमिकचारित्र होतें. क्षायिक भावाचे क्षायिक सम्यग्दर्शन, क्षायिक चारित्र, केवलज्ञान. केवलदर्शन, दान, लाभ, भोग, उपभोग व वीर्य असे नव भेद आहेत. सम्यग्दर्शन, व चारित्र हे दोन भाव दर्शनमोहनीय व चरित्र मोहनीय यांचा क्षय झाल्यानें प्रगट होतात. ज्ञानावरणीय व दर्शनावरणी य या दोन कर्मांचा क्षय झाला म्हणजे क्रमानें केवलज्ञान व दर्शन हे प्राप्त होतात.

धर्माधर्मौ पुद्गलाकाशकालाः सद्भिः प्रोक्ता इत्यजीवास्त्वथैते ॥
तेषां मध्ये रूपिणः पुद्गलाः स्युः कालं मुक्त्वा तेऽस्तिकायाः
सजीवाः ॥ १५ ॥
कर्ता जीवः षट्सु नान्ये प्रदेशैर्धर्माधर्मावेकजीवेन तुल्यौ ॥
वासंख्येयैः स्यादनंतप्रदेशं लोकालोकव्यापकं व्योम नाम ॥ १६ ॥
धर्माधर्मौ प्राणभृत्पुद्गलानां यानस्थानोपग्रहौ लोकमात्रौ ॥
कालो द्वेधा वर्तनालक्षणश्च स्यादाकाशं चावकाशोपकारि ॥ १७ ॥
रूपस्पर्शौ वर्णगंधौ रसश्च स्थौल्यं भेदः सौक्ष्म्यसंस्थानशब्दाः ॥
छायोद्योतावातपश्चान्धकारं बंधोऽप्येते पुद्गलानां गुणाःस्युः ॥ १८ ॥
स्कंधाः प्रोक्ता द्व्याद्यनंतप्रदेशैः संयुक्तास्ते स्यादणुश्चाप्रदेशः ॥
उत्पद्यंते भेदसंघातकाभ्यां स्कंधाः सर्वे जायतेऽणुश्च भेदात् ॥ १९ ॥

वाकीचे उरलेले अर्थात् दान, लाभ, भोग, उपभोग व वीर्य हे भाव अन्तराय कर्मांचा क्षय झाला असतां प्राप्त होतात. ११ कुमति, कुश्रुति व विभंगावधि यास अज्ञान ह्मणतात मिथ्यात्वाच्या उदयासहित मतिश्रुत व अवधि ज्ञानावरणीय या कर्मांचा क्षयोपश झाला ह्मणजे हे तीन भाव जीवास लाभतात. मति, श्रुति, अवधि, आणि मनःपर्यय हीं चार ज्ञानें त्या त्या ज्ञानावरण कर्मांच्या क्षयोपशमानें प्राप्त होतात. चक्षुर्दर्शन, अचुक्षुर्दर्शन आणि अवधिदर्शन हीं दर्शनें त्या त्या दर्शनावरण कर्मांचा क्षयोपशम झाल्यानें प्रगट होतात. दान, लाभ, भोग, उपभोग व वीर्य हे अंतराय कर्मक्षयोपशमानें जीवाला मिळतात. सम्यग्दर्शन हें दर्शनमोह कर्मांचा क्षयोपशमझाल्यानें व चारित्र चारित्रमोह कर्मांचा क्षयोपशम झाल्यानें प्राप्त होतें. संयतासंयत हें अनंतानुबंधी व अप्रत्याख्यान यांचा क्षय (उदयभावी) उपशम व प्रत्याख्यानावरण, संज्वलन आणि नोकषाय यांचा उदय या कारणांनीं प्राप्त होतें. १२ अज्ञान—ज्ञान न होणें हें ज्ञानावरणीय कर्मोदयाने होतें. स्त्रीलिंग, पुल्लिंग, नपुंसकलिंग ही तीन लिंगें जीवाला स्त्रीवेद, पुरुषवेद व नपुंसकवेद यांच्या उदयानें होतात. यास भावलिंग ह्मणतात. अंगोपांग नामकर्माच्या उदयाने जीवाला स्त्रीचा, पुरुषाचा व नपुंसकाचा आकार शरीरामध्यें प्राप्त होतो त्यास द्रव्यलिंग ह्मणतात. कृष्ण, नील कापोत, पीत पद्म व शुक्ल या सहा लेश्या होत. कषायांच्या उदयानें मन, वचन व शरीर यांचें

चलनवलन होणें हें लेश्यांचें लक्षण आहे. मिथ्यादर्शन, मिथ्यात्वकर्माच्या उदयामुळें प्राप्त होतें क्रोध, मान, माया व लोभ हे चार कषाय त्या त्या कषायांच्या उदयानें होतात. देवगति, मनुष्यगति, तिर्यंचगति. आणि नरकगति या चार गति त्या त्या नामकर्मोदयानें होतात. जसें देवगति देवगति नाम कर्मोदयानें. याचप्रमाणें इतर समजाव्यात. असिद्धत्व–सिद्ध न होणें, मोक्ष प्राप्त न होणें. हें सर्व कर्मांच्या उदयानें होतें. १३ पारिणामिक भावाचे भव्यत्व, अभव्यत्व व जीवत्व असे तीन भेद आहेत. ज्या शक्तीच्या निमित्तानें आत्म्यामध्यें सम्यग्दर्शन सम्यग्ज्ञान व चरित्र प्रगट होण्याची योग्यता असते त्यास भव्यत्व ह्मणतात. ज्या शक्तीच्या निमित्तानें हे गुण प्रगट होण्याची योग्यता नसते त्यास अभव्यत्व ह्मणतात. जीवत्व–ज्या शक्तीच्या निमित्तानें आत्मा प्राण धारण करितो त्या शक्तीस जीवत्व ह्मणतात. सहावा सांनिपातिक नांवाचा भाव आहे. त्याचे ३६ भेद आहेत असें सत्पुरुष सांगतात.

१४ सर्व मुक्तजीव सम्यग्दर्शन, केवलज्ञान वगैरे अविनाशी गुणांनीं समानच आहेत. हे मुक्तजीव दुस्तर संसार सागरांतून तरून कृतकृत्य झाले व त्रैलोक्याच्या अग्रभागावर अर्थात् सिद्धशिलेवर स्थिर झाले आहेत. १५ धर्म, अधर्म, आकाश, काल, पुद्गल हे पदार्थ अजीव आहेत अर्थात् यांत ज्ञान दर्शन हे गुण नाहींत. या पांच द्रव्यामध्यें पुद्गल हें रूपीद्रव्य आहे. अर्थात् स्पर्श, रस, गंध, वर्ण या गुणांनीं तें युक्त आहे. काल द्रव्याला सोडून व जीवासहित हीं चार द्रव्यें अस्तिकाय आहेत. जसे शरीरामध्यें हातपाय वगैरे पुष्कळ अवयव असतात तसे काल वर्जित या पांच द्रव्यामध्यें पुष्कल प्रदेश आहेत म्हणून यांना काय म्हणतात व अनादिकालापासून अनंत कालापर्यंत हे असतातच म्हणून यांना अस्ति म्हणतात. काल हा नुसता अस्ति आहे म्हणजे सदोदित राहणारा आहे, परंतु तो बहुप्रदेशी नाहीं. त्याला एकच प्रदेश आहे. हें एक प्रदेशात्मक द्रव्य आहे. यास्तव त्याला काय म्हणतां येत नाहीं. १६ या सहा द्रव्यापैकीं फक्त, जीवच कर्ता आहे अर्थात् तोच पाप व पुण्य करितो आणि त्याचें फल भोगतो. इतर द्रव्यामध्यें तीं अचेतन असल्यामुळें कर्तृत्व नसतें. एकजीव द्रव्याचे जसे असंख्यात प्रदेश आहेत तसेंच धर्म व अधर्म या द्रव्यांचेंही असंख्यात प्रदेश आहेत. पुद्गल द्रव्याचे संख्यात, असंख्यात व अनंत प्रदेश आहेत. आकाश अनंत प्रदेशांनीं युक्त आहे व लोक आणि अलोक यांमध्यें तें व्यापून राहिलें आहे. १७ धर्म व अधर्म द्रव्य हीं दोन द्रव्यें जीव व पुद्गल यांना गति व स्थिती करण्यास मदत करितात.

कर्मांगानि स्वांतवाणीविचेष्टाः प्राणापानौ जीविताजीविते च ॥
सौख्यं दुःखं चापि निर्वर्तयन्ति स्कंधा जन्तोर्मज्जतो जन्मवार्द्धौ ।२०।
कायालापस्वांतकर्मैकयोगो यः सर्वज्ञैरास्रवः स प्रणीतः ॥
द्वौ तस्योक्तौ पुण्यपापावहत्वाद्भेदौ स्यातां तौ शुभश्चाशुभश्च ॥२१॥
उक्तौ तस्य द्वावधीशौ कषायैः संयुक्तश्चासंयुतश्चेति जैनैः ॥
आद्यस्यासौ संपरायस्य भर्ता स्यादन्यस्य व्यक्तमीर्यापथाय ॥२२॥
ये क्रोधाद्यैरिंद्रियाण्यव्रतानि ज्ञेया विद्धिः पूर्वभेदाः क्रियाश्च ॥
चत्वारः स्युः पंच पंच प्रभेदात्तेषां युक्ता पंचभिर्विंशतिश्च ॥ २३ ॥

जसें लंगड्यास काठी चालण्यास मदत करिते तसे धर्मद्रव्य जीव व पुद्गलास गमन करण्यास मदत करितें. खुर्ची जशी बसण्याला मदत करिते तसें अधर्म द्रव्य जीव पुद्गलांस स्थिर होण्यास मदत करितें. ही धर्म व अधर्म द्रव्यें लोकाकाशा-प्रमाणें आहेत. अर्थात् जेवढें लोकाकाश आहे तेवढींच हीं द्रव्यें आहेत. कालद्रव्य दोन प्रकारचें-निश्चयकाल व व्यवहार काल अशा प्रकारचें आहे. द्रव्यामध्यें होणाऱ्या नवीन जुन्या वगैरे पर्यायांच्या उत्पत्तीस निश्चय काल मदत करितो. निश्चय कालाशिवाय ह्या पर्यायांची उत्पत्ति होत नाहीं. घटका, तास वगैरे व्यवहारकाल होय. आकाश द्रव्य हें जीवादिक द्रव्यांना जागा देणारें ,आहे. १८ पुद्गलामध्यें, रूप-रंग, स्पर्श, रस, गंध, स्थूलपणा भेद-तुकडे होणें, पीठ होणें, सूक्ष्मपणा, संस्थान-त्रिकोण, चतुष्कोण वगैरे आकृति, छाया-सावली, उद्योत चंद्रासारखा थंड प्रकाश, आतप-उष्ण प्रकाश, अंधार व बंध-दोन पदार्थ एकत्र मिसळणें हे गुण आहेत. १९ दोन, तीन, चार वगैरे संख्यात, असंख्यात, अनंत प्रदेशांनी स्कंधयुक्त असतात व अणुमध्यें एकच प्रदेश असतो. या शिवाय याला दुसरा प्रदेश नसतो ह्मणून यास अप्रदेशी ह्मणतात. स्कंध भेद व संघात यापासून उत्पन्न होतात. मोठा स्कंध फुटणें यास भेद ह्मणतात. हा स्कंध फुटून दोन परमाणु पर्यंत याचे अनेक लहान लहान स्कंध होऊं शकतात दोन आदि परमाणु एक रूप होणें यास संघात ह्मणतात. अणु हा भेदापासून उत्पन्न होतो अर्थात् स्कंध फुटून तो द्व्यणुका-च्या अवस्थेपर्यंत आल्यावर तेही विभक्त झाले असतां अणु बनतो २० या पुद्गल स्कंधापासून ज्ञानावरणादिक आठ कर्मे, औदारिक, वैक्रियिक वगैरे पांच प्रकारचीं शरीरें, मन, वचन प्रवृत्ति अर्थात् भाषा, श्वासोच्छ्वास, जगणें व मरणें, सुख आणि दुःख हे प्रकार या जीवाला संसार-समुद्रांत प्राप्त होतात.

तीव्रातीव्रज्ञातविज्ञातभावद्रव्योद्रेकैस्तद्विशेषोऽवगम्यः ॥
द्रव्यं विद्यात्साधनं द्विप्रकारं जीवाजीवौ तद्वदन्त्यागमज्ञाः ॥ २४ ॥
संरंभाद्यैरन्वितोऽष्टातिरिक्तं क्रोधाद्यैश्च स्याच्छतं पूर्वभेदाः ॥
सैका पंक्तिर्यः स निर्वर्तनाद्यैर्युक्तो भेदश्चेतरस्य प्रणीतः ॥ २५ ॥
स्यान्मात्सर्यं चांतरायप्रदोषौ निन्हुत्यामा सादनं चोपघातः ॥
इत्यात्मज्ञैरास्रवो देहभाजां ज्ञानस्योक्तो दर्शनस्यावृतेश्च ॥ २६ ॥

२१ शरीर, भाषण आणि मन यांच्या द्वारें आत्म्याच्या प्रदेशामध्यें चंचलता उत्पन्न होणें यास सर्वज्ञ आस्रव म्हणतात. या आस्रवाचे शुभास्रव व अशुभास्रव असे दोन भेद आहेत. शुभास्रवापासून पुण्य कर्म जीवाच्या ठिकाणीं येतें. व अशुभास्रवापासून पाप कर्म येतें. अशुभ क्रिया, अशुभ भाषण व अशुभ विचार यापासून दुःख देणारें कर्म आणि याच्याविरुद्ध क्रिया, भाषण व विचार यांनीं सुखदायक कर्म जीवाच्या ठिकाणीं येतें. २२ या योगाचे दोन स्वामी आहेत असें गणधरांनीं सांगितलें आहे. एक सकषाय व दुसरा अकषाय. क्रोधादि कषायांनीं युक्त अशा जीवाला सांपरायिक आस्रव–संसार वाढविणारे आस्रव येतात व कषाय-रहित जीवाला ज्याचे कषाय दबले आहेत किंवा क्षय पावले आहेत अशा जीवाला ईर्यापथ कर्माचे आस्रव येतात अर्थात् या कर्माच्या येण्यानें या जीवाला सुख दुःख भोगण्याचा प्रसंग येत नाहीं. कारण नुसत्या–कषायसहित नसलेल्या परिणामा-पासून कर्मबंध फलरहितच उत्पन्न होतो. वाळलेल्या भिंतींवर फेंकलेला दगड तेथें न चिकटतां खालीं पडतो त्याप्रमाणें कर्म येतें व जातें. पण फल देत नाहीं. त्या-प्रमाणें कषायरहित जीवाला नुसत्या योगानें कर्माचें आकर्षणच होतें पण त्याला स्थिरपणा येत नसल्यामुळें तें फल देत नाहीं. २३ सांपरायिक आस्रवाचे क्रोधादिक चार कषाय, पांच इंद्रियें, हिंसादिक पांच अविरति व पंचवीस क्रिया असे भेद आहेत. २४ सांपरायिक आस्रवाचे तीव्र परिणाम, मंद परिणाम, जाणून बुजून एखादें कार्य करणें, असावधानपणा, अज्ञाना आत्म्याची व देहाची शक्ति इत्यादिकांनीं या सांपरायिक आस्रवामध्यें फरक पडतो अर्थात् जें कर्म येतें त्याची कमी जास्ती स्थिति होऊन त्यापासून सुखदुःखादि फलें कमी जास्ती आत्म्याला भोगावीं लागतात. जीव आणि अजीव हीं दोन द्रव्यें या आस्रवाचे अधिकरण आहेत, असें आगमांत गणधरादिक मुनीश्वर म्हणतात. २५ जीवाधिकाराचें संरभ, समारंभ.

दुःखं शोकाक्रंदने देहभाजां तापो हिंसादेवनं पर्युपेतं ॥
एतान्यात्मान्योभयस्थानि चासद्वेद्यस्याहुः कारणान्यास्त्रवस्य ॥२७॥
कृत्स्ने भूते चानुकंपा व्रताढ्ये दानं साधं सानुरागादिना च ॥
योगः क्षांतिः शौचमित्येवमादिः सद्वेद्यस्याप्यास्त्रवस्य प्रभेदाः ॥२८॥
संघो धर्मः केवली च श्रुतं यत्सर्वज्ञोक्तं नाकिनश्चाप्यमीषां ॥
सार्वैरुक्तो वर्णवादो यतीन्द्रैर्हेतुर्जन्तोर्दृष्टिमोहास्त्रवस्य ॥ २९ ॥

आरंभ· कृत· कारित अनुमोदन, मनोयोग· वचनयोग· काययोग तसेंच क्रोध, मान माया· लोभ या सर्वांचे सामान्य रूपानें १०८ एकशें आठ भेद होतात हिंसा वगैरे कार्यामध्यें प्रमत्त बनून प्रयत्न करणें संरंभ होय. समारंभ–हिंसादिक करण्याची हत्यारें, काठ्या वगैरे सामग्री जुळविणें व आरंभ– कार्याला सुरुवात करणें. कृत-स्वतः करणें, कारित–दुसऱ्याकडून करविणें, अनुमोदन–कोणी करीत असेल तर त्यास आपला दुजोरा देणें–जसें क्रोधयुक्त होऊन स्वतः शरीराच्या द्वारें हिंसादिक कार्य करण्यामध्यें उत्साहयुक्त होणें हा पहिला भेद, उत्साहयुक्त करणें हा दुसरा भेद व उत्साहयुक्ताला स्वत ची सम्मति देणें हा तिसरा भेद अशा रीतीनें गुणाकार रूपानें १०८ भेद होतात. उत्तर भेद पुनः ४३२ चारशें बत्तीसही होतात. हे सर्व जीवाधिकारणाचे भेद आहेत. अजीवाधिकरणाचे निर्वर्तना, निक्षेप. संयोग, निसर्ग अशा रीतीनें अकरा प्रकार होतात ( यांचें विशेष स्वरूप तत्वार्थ सूत्रांत पाहावें ) २६ मात्सर्य. अंतराय. प्रदोष. निन्हव. आसादन व उपघात अशा कृत्यांनीं आत्म्याला ज्ञानावरण व दर्शनावरण कर्मांचे आस्त्रव येतात असें आत्म्याचें स्वरूप जाणणाऱ्या केवलींनीं सांगितलें आहे. मात्सर्य–कांहीं कारणामुळें शिकविण्याला योग्य देखिल ज्ञान न शिकविणें. अंतराय ज्ञानाचा उच्छेद करणें अर्थात् ज्ञानाची साधनें नाहींशीं करणें. उपघात चांगल्या ज्ञानाला हें अज्ञानच आहे किंवा हें ज्ञान अयोग्य आहे असें समजुन त्याचा नायनाट–करण्याच्या अभिप्रायाला प्रदोष ह्मणतात. निन्हव–कांहीं कारणामुळें माझ्याजवळ तें पुस्तक नाहीं. मला तें वस्तुस्वरूप माहीत नाहीं असें माहीत असतांही ह्मणणें वगैरे. प्रदोष-मोक्षाला साधन असलेल्या ज्ञानाची प्रशंसा चालली असतां आपण दुष्टाभिप्रायानें प्रशंसा न करणें. आसादन -दुसरा कोणी ज्ञान प्रसार करीत असल्यास आतांच तुह्मी हें कार्य करु नका·पुढें पाहतां येईल वगैरे सांगून शरीर आणि वचनानें त्यांचा निषेध करणें हीं ज्ञानसंबंधीं असल्यास ज्ञानावरणाचे आस्त्रव येतात. दर्श-नासंबंधीं असल्यास दर्शनावरण कर्मांचे आस्रव येतात.

तीव्रः परं यः परिणामभेदो भवेत्कषायोदयतः स बाढं ॥
चारित्रमोहास्रवहेतुरुक्तो जीवस्य जीवादिपदार्थविद्भिः ॥ ३० ॥
उत्पादनं स्वस्य परस्य चार्तेः कषायजातं यतिदूषणं वा ॥
संक्लिष्टलिंगव्रताधारणादिः कषायवेद्यास्रवकारणं स्यात् ॥ ३१ ॥
दीनातिहासो बहुविप्रलापः प्रहासशीलत्वमुशन्ति नित्यं ॥
धर्मोपहासादिकमप्युदाराः सुहास्यवेद्यास्रवकारणानि ॥ ३२ ॥
क्रीडासु चित्रासु च तत्परत्वं शीलेष्वरुच्यादिरपि व्रतेषु ॥
उशंति संतो रतिवेदनीयास्रवस्य हेतुं तनुभूषणानां ॥ ३३ ॥

वेदनीय कर्मांचे दोन भेद आहेत एक सातावेदनीय व दुसरा असतावेदनीय ज्या पासून जीवाला संसारावस्थेंत सुख मिळतें तें सातावेदनीय कर्म होय व ज्या पासून दुःख मिळतें तें असातावेदनीय कर्म होय. असातावेदनीय कर्मांचे आस्रव ज्या कारणांनीं आत्म्याच्या ठिकाणीं येतात तीं कारणें अशीः—दुःख-पीडा उत्पन्न करण्याचे विचार नेहमीं करणें, शोक- उपकार करणाऱ्या व्यक्तीच्या वियोगानें मनांत खेद वाटणें. आक्रंदनः—दुःखानें अश्रुपात करणें, रडणें. ताप निंदा, अपमान इत्यादि झाल्यामुळें दुःख होणें. हिंसा—आयुष्य, पांच इंद्रियें, मनोबल, वचनबल व कायबल आणि श्वासोच्छ्वास यांचा नाश करणें. अर्थात् प्राण्यांच्या किंवा स्वतःच्या या प्राणांचा नाश करणें ही हिंसा होय. परिदेवन संक्लेश परिणामांनीं युक्त, गुण स्मरण व त्यांच्या वर्णनानें सहित, ज्याच्यांत उपकारा-चें वर्णन आहे असें दया उत्पन्न करणारें जें रडणें त्यास परिवेदन ह्मणतात. हीं कारणें स्वतःमध्यें, अन्य व्यक्तीमध्यें व दोघांच्याही ठिकाणीं उत्पन्न केलीं असतां असाता वेदनीय कर्मांचे आस्रव येतात. २८ संपूर्ण प्राण्यावर दया करणें, व्रती लोकावर अर्थात् श्रावक आणि मुनि, आर्यिका व श्राविका या चार संघावर दया करणें, यांना दान देणें तसेंच इतरांना करुणाबुद्धीनें दान देणें, संसाराचीं कारणें जीं मिथ्यादर्शन अविरती वगैरे आहेत त्यांच्यापासून वेगळे होण्याचे उत्कृष्ट परिणाम असणे, प्राण्यांची हिंसा न करणें व इंद्रियें ताब्यांत ठेवणें, श्रावक धर्म चांगल्या रीतीनें पाळणे, मन वचन व शरीराची प्रवृत्ति—क्रिया निर्दोष, ठेवणें, क्षमा धारण करणें, लोभाचे जितके प्रकार आहेत तितक्यांचा त्याग करणें.

रतिविनाशनमन्यजनारतिप्रकटनादिकमाहुरनिंदिताः ॥
अरतिवेद्यधनास्रवकारणं दुरितशीलजनैः सह संगतिं ॥ ३४ ॥
यो मूकभावो घनमात्मशोकः परस्य शोकश्रुति निंदनादिः ॥
स शोकवेद्यास्रवकारणं स्यादित्याहुरार्या विदिताखिलार्थाः ॥३५॥

वगैरे साता वेदनीय कर्माचीं कारणें आहेत. अर्हंताची पूजा करणें, तपस्विजनांची सेवा शुश्रुषा करणें वगैरे हीं साता वेदनीय कर्माचीं कारणें आहेत. २९ संघ, जिनधर्म, केवली अरहंत, व जैनशास्त्र व देव यांच्या ठिकाणी नसत्या दोषांचें आरोपण करणे यास अवर्णवाद म्हणतात अर्थात् यांच्या शुद्ध स्वरूपाचें वर्णन न करितां तें सदोष रीतीनें वर्णन केल्यापासून दर्शन मोहनीय कर्माचें आस्रव येतात असे सर्वांचे हित करणाऱ्या मुनीश्वरांनीं सांगितले आहे केवली भगवान् आपली भूक मिटावी म्हणून भोजन करतात. शास्त्रांत मांस खावयास सांगितलें आहे असें म्हणणें, संघ हा घाणेरडा व शूद्रासारखा आहे असें म्हणणें, जिनधर्म सदोष असून त्या धर्माचें आचरण करणारे लोक असुर होतील असें बोलणें, देव मांस खातात, दारू पितात वगैरे म्हणणें हें क्रमानें केवली वगैरेंचे अवर्णवाद आहेत. ३० क्रोध, मान, माया, लोभ या कषायांच्या तीव्र उदयानें जे आत्म्याचे संक्लेशयुक्त परिणाम होतात त्यापासून चारित्र मोहनीय कर्माचे आस्रव जीवाला येतात असे जीवादि पदार्थांचे स्वरूप जाणणारे मुनीश्वर म्हणतात. ३१ स्वतःला व इतरांनाही दुःख देणें, क्रोधादिक उत्पन्न करणें, मुनींना दोष लावणें, संक्लेश परिणामांनी दीक्षा घेणे, व्रतधारण करणें ही चारित्र मोहनीय कर्माचीं कारणें होत. ३२ गरीबांची थट्टा करणें, असंबद्ध भाषण करणें. नेहमीं थट्टा करणें, धर्माचरणाची थट्टा करणें यापासून हास्यकर्माचे आस्रव येतात असे मुनीश्वर म्हणतात. ३३ नाना प्रकारच्या क्रीडा करण्यामध्यें तत्पर असणें, व्रत व शील यामध्ये प्रेम नसणें, यापासून रतिवेदनीय कर्माचे आस्रव येतात.

३४ दुसऱ्यांच्या अंतःकरणात द्वेष उत्पन्न करणें; प्रेमाचा नाश करणें. पाप करण्यांत नेहमीं तत्पर असलेल्या लोकांशीं सोबत करणें ही कृत्यें अरतिवेदनीय कर्माच्या तीव्र आस्रवाला कारण आहेत. ३५ दुसरा शोक करीत असल्यास त्याचा शोक नाहींसा न करता आपण स्वस्थ बसणें, स्वतः शोक करणें, दुसऱ्या-

अथ भयपरिणामः स्वस्य चान्यस्य नित्यं भयविसरविधायी भीति
वेद्यास्रवस्य ॥
भवति खलु निमित्तं कारणस्यानुरूपं जगति ननु कथंचिद्दृश्यते
कार्यमार्यैः ॥ ३६ ॥
साधुक्रियाचारविधौ जुगुप्सा परापवादोद्यतशीलतादिः ॥
निमित्तमाहुर्यतयो जुगुप्सावेद्यास्रवस्यास्रवदोषहीनाः ॥ ३७ ॥
असत्यवादित्वरतिं च नित्यं परातिसंधानपरत्वमेकं ॥
प्रवृद्धरागादिमपीरयन्ति स्त्रीवेदनीयास्रवहेतुमार्याः ॥ ३८ ॥
अगर्वता स्तोककषायता च स्वदारसंतोषगुणादिरीशैः ॥
सतां परिज्ञातसमस्ततत्वैः पुंवेदनीयास्रवहेतुरुक्तः ॥ ३९ ॥
सदा कषायाधिकता परेषां गुह्येंद्रियाणां व्यपरोपणं च ॥
प्राहुः परस्त्रीगमनादिकं च तृतीयवेद्यास्रवहेतुमार्याः ॥ ४० ॥

च्या शोकाच्या गोष्टी ऐकण्यांत आनंद मानणें, निंदा करणें हीं सर्व कारणें शोक वेदनीय कर्माचीं आहेत असें सर्व तत्वांना जाणणारे विद्वान ह्मणतात ३६ स्वतःचे परिणाम नेहमीं भययुक्त असणें, दुसऱ्याला नेहमीं भय दाखविणें या कारणांनीं भय उत्पन्न करणारें भीति वेदनीय कर्म उत्पन्न होतें. या जगांत कारणाला अनुसरून योग्य असेंच कार्य कथंचित् असूं शकतें असें विद्वान ऋषि ह्मणतात. ३७ मुनींच्या धार्मिक क्रियामध्यें तिटकारा असणें, दुसऱ्याची निंदा करण्यांत, त्याला अतिशय तुच्छ लेखण्यांत नेहमीं तत्पर असणें या गोष्टी आस्रवाच्या दोषापासून अलिप्त असलेले मुनीश्वर जुगुप्सा वेदनीय कर्मास्रवास कारण आहेत असें ह्मणतात ३८ नेहमीं असत्य बोलण्यांत प्रेम असणें, नेहमीं दुसऱ्यांना फसविण्यांत तल्लीन असणें, रागद्वेषादि विकार वाढत्या प्रमाणांत असणें. हीं सर्व कारणें स्त्रीवेदनीय कर्माच्या आस्रवाला कारण आहेत असें आर्य-श्रेष्ठ लोक म्हणतात. ३९ गर्व न करणें, कषाय मंद असणें, स्वस्त्रीमध्यें संतोष ठेवणें, यांनीं पुरुष वेदनीय कर्माचे आस्रव येतात असें सर्व तत्व जाणणारे व सत्पुरुषांचे पुढारी असलेले श्रीजिनेश्वर म्हणतात. ४० नेहमीं कषाय अधिक असणें, दुसऱ्यांचीं गुह्येंद्रियें कापून काढणें, परस्त्रीगमन करणें, दुसऱ्याची स्त्री उपटून आणणें वगैरे नपुंसक वेदनीयाचीं कारणें आहेत.

बह्वारंभपरिग्रहत्वमसमं हिंसाक्रियोत्पादनं ॥
रौद्रध्यानमृतिः परस्वहरणं कृष्णा च लेश्या परा ॥
गार्धक्यं विषयेषु तीव्रमुदितः स्यान्नारकस्यायुषः ॥
सार्वैरास्रवहेतुरित्यविकलज्ञानेक्षणैः प्राणिनां ॥ ४१ ॥
मायाथास्रवहेतुरित्यभिहिता तिर्यग्गतेरायुषस्तद्भेदाः परवंचनाय
पटुता निःशीलता केवलं ॥
मिथ्यात्वाहितधर्मदेशनरतिर्ध्यानं तथार्तं मृतौ लेश्ये द्वे विदुषां वरै-
स्तनुमतां नीला च कापोतकी ॥ ४२ ॥
अल्पारंभपरिग्रहत्वमुदितं मर्त्यायुषः कारणं ॥
तद्व्यासोऽल्पकषायता च मरणे संक्लेशतादिः परं ॥
भद्रत्वं प्रगुणाक्रियाव्यवहृतिः स्वाभाविकः प्रश्रयः ॥
स्यादन्यापि परा स्वभावमृदुता शीलव्रतैरुन्नता ॥ ४३ ॥

असें आर्य म्हणतात. ४१ ज्यामध्यें पुष्कळ हिंसा होते अशी शेतकी, उद्योग धंदे, युद्ध वगैरे कृत्यें करणें, परिग्रह अतिशय वाढविणें, हिंसेचीं कामें करविणें रौद्रध्यानानें मरण पावणें, दुसऱ्याचें धन हरण करणें, उत्कृष्ट कृष्णलेश्या असणें, पंचेंद्रियांच्या विषयामध्ये अतिशय हाव असणें हीं प्राण्यांना नरकायूच्या आस्रवाची कारणें आहेत असें निर्मल ज्ञानरूपी नेत्रांनीं युक्त असलेले व सर्वांचें हित करणारे केवली भगवान ह्मणतात. ४२ कपट करणें हें तिर्यंचाच्या आयुष्याचें कारण आहे. याचप्रमाणें दुसऱ्यास फसविण्यांत प्रवीण असणें, व्रतें व शील न पाळणें, मिथ्यात्वानें युक्त अशा धर्माचा उपदेश देण्यांत प्रेम ठेवणे, आर्तध्यानांत मरण पावणें; नील लेश्या व कापोत लेश्यांनीं मरण पावणें ही प्राण्यांना तिर्यग्गतीच्या आस्रवाला कारण आहेत असें विद्वच्छ्रेष्ठ आचार्यादिक मुनि ह्मणतात.

४३ ज्यामध्यें हिंसा घडते अशीं शेतकीं वगैरे कामें थोडक्या प्रमाणांत करणें, परिग्रह थोडा ठेवणें हें मनुष्यायुष्याचें कारण आहे. याचाच विस्तार असा कषाय मंद असणें, मरणसमयीं संक्लेश परिणाम नसणें अर्थात् शांतता ठेवणें, भला स्वभाव असणें किंवा स्वतः मिथ्यात्वी असूनही जिनधर्माचा द्वेष न करणें, लोकांशीं निष्कपट व्यवहार ठेवणें, स्वाभाविक विनय गुण असणें, शील व व्रतांनीं

वदंति दैवस्य सरागसंयमं सुसंयमासंयममायुषो बुधाः ॥
तपश्च बालं त्वनभीष्टनिर्जरां परं च सम्यक्त्वमुदारकारणं ॥ ४४ ॥
निगदन्त्यथ योगवक्रभूयं प्रतिसंवादनमास्रवस्य नाम्नः ॥
अशुभस्य निमित्तमागमज्ञाः शुभनाम्नः खलु तद्विपर्ययश्च ॥ ४५ ॥
सम्यक्त्वशुद्धिर्विनयाधिकत्वं शीलव्रतेष्वव्यभिचारचर्या ॥
ज्ञानोपयोगः सततं च शक्त्या त्यागस्तपस्या च परा निकामं ॥ ४६ ॥
संवेगता साधुसमाधिवैयावृत्तिक्रियाभ्युद्यतिरादरेण ॥
जिनागमाचार्यबहुश्रुतेषु भक्तिश्च वात्सल्यमपि श्रुते च ॥ ४७ ॥
आवश्यकाहानिरुशन्ति मार्गप्रभावना च प्रकटा नितान्तं ॥
एतानि चात्यद्भुततीर्थकृत्वनामास्रवस्येति निमित्तमार्याः ॥ ४८ ॥

उन्नत असणें हीं मनुष्यायुष्यांचीं कारणें होत. ४४ संसाराला वाढविणाऱ्या मिथ्यात्व, अविरति, कषाय वगैरे कारणांना दूर करण्याच्या उत्कट भावनेनें प्राणि संयम व इंद्रियसंयम पाळणें, श्रावकांचीं बारा व्रतें पाळणें, बालतप-मिथ्यादर्शनानें सहित व कायक्लेशयुक्त असें तप करणें व अकामनिर्जरा-आपली इच्छा नसतांही आपणावर संकट आलें असतां त्या प्रसंगीं शांत परिणाम ठेऊन भूक तहान वगैरे दुःखें सहन करणें हीं देवायूचीं कारणें होत. यामध्यें सम्यक्त्व व सराग संयम आणि संयमासंयम हे स्वर्गांतील देवत्व प्राप्त करून देणाऱ्या देवा यूला कारण होत व अकाम निर्जरा, बाल तप वगैरे भवनवासी, व्यंतर आणि ज्योतिषवासी या देवामध्यें उत्पन्न करणाऱ्या आयुष्याचीं कारणें होत ४५ मन वचन व शरीराची प्रवृत्ति नेहमीं कपट रूपाची ठेवणें व एखादा प्राणी स्वर्गमोक्षास कारण अशा सत्य आचरणानें वागत असल्यास त्याला त्यापासून भ्रष्ट करून अयोग्य आचरणास सत्य आचरण आहे असें भासऊन त्यामध्यें प्रवृत्त करणें यास विसंवादन ह्मणतात. अशा कारणांनीं अशुभनाम कर्माचे आस्रव येतात व या कारणाच्या उलट प्रवृत्ति ठेवण्यानें शुभनाम कर्माचे आस्रव येतात. असें शास्त्रज्ञ ह्मणतात. ४६-४८ सम्यग्दर्शन दोषरहित करून धारण करणें, रत्नत्रय व त्यांचे धारक यांचा आदरसत्कार करणें, शील व व्रतें हीं निरतीचार पाळणें, नेहमीं ज्ञानाध्ययनांत रत होणें, यथा

शून्याश्रयोद्धस द्वुरावसतिप्रवेशावन्योपरोधकरणं परसाक्षिहेतोः
भिक्षान्नशुद्धिस द्धर्मचरानुवादावेते च चौरिकमहाव्रतपंचदोषाः।५७।
स्त्रीरागादिकथाश्रुतेर्विरमणं तच्चारुतालोकन-
त्यागः पूर्वरतोत्सवस्मृतिपरित्यागौ विदामुत्तमैः ॥
वृष्येष्टादिरसस्य वर्जनमपि स्वांगप्रमोदक्रियाः ॥
प्रायः पंच च भावना निगदिता ब्रह्मव्रतस्य स्फुटम् ॥ ५८ ॥
मनोहरेष्वप्यमनोहरेषु सर्वेंद्रियाणां विषयेषु पंचसु ॥
सुरागविद्वेषविवर्जनं सतामकिंचनत्वस्य च पंच भावनाः ॥ ५९ ॥
हिंसादिषु स्फुटमिहैव परत्र चापायावद्यदर्शनमनन्यधिया निकामं ॥
संसारवासचकितेन सुभावनीयमंतर्धनं शमवतामिदमेव सारं ॥६०॥

पाहण्याचें सोडणें, पूर्वी भोगलेल्या संभोगादि सुखांच्या आठवणी न करणें, कामोत्तेजक व आवडत्या अशा पदार्थांचा त्याग करणें, आपलें शरीर सजविण्याचा त्याग करणें, अशा पांच भावना विद्वच्छ्रेष्ठांनी ब्रह्मचर्यव्रताच्या सांगितल्या आहेत. ६० पांच इंद्रियांना आवडणाऱ्या व नावडणाऱ्या अशा वस्तूमध्यें प्रेम व द्वेष न करणें या पांच भावना सत्पुरुषांच्या परिग्रहत्याग व्रतांच्या आहेत. ६० हिंसादिक पांच पापें केल्यापासून इहलोकीं व परलोकीं राजादिकापासून दंड भोगावा लागतो व पापबंधही होतो असें स्पष्ट जाणून एकाग्रबुद्धियुक्त व संसारांत फिरण्यापासून भय पावलेल्या प्राण्यांनीं या भावनांचें चिंतन करावें. तपस्वी अर्थात् शांति-प्रधान माणसांचें हें अंतरंग उत्कृष्ट धन आहे.

६१ संपूर्ण प्राणिमात्रांना दुःख होऊं नये अशा इच्छेला मैत्री म्हणतात. आपल्यापेक्षां गुणांनीं अधिक असलेल्या लोकांविषयीं मनांत आनंद व आदर मानणें यास प्रमोद म्हणतात. रोगपीडित व दुःखी लोकांविषयी दयाभाव बाळगणें व उद्धट अशा मिथ्यादृष्टिविषयीं नेहमीं उपेक्षा भाव बाळगणें. ह्या चार सामान्य भावना व्रतपालनास योग्य आहेत. व्रतधारकांनीं यांचा विचार करावा. ६२ संसारापासून भीति व वैराग्य उत्पन्न व्हावें या साठीं शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें शरीराचा स्वभाव व जगाची स्थिति नेहमीं आर्य पुरुषांनीं विचारांत घ्यावी. आतां मी बंधाचें स्वरुप संक्षेपानें सांगतों. ६३ मिथ्यात्वपरिणाम, अविरति, प्रमाद, कषाय

सर्वेषु सत्वेषु च भावनीया मैत्री प्रमोदश्च गुणाधिकेषु ॥
कारुण्यमार्तेषु च दुःखितेषु सदाऽविनेयेषु पराभ्युपेक्षा ॥ ६१ ॥
कायस्वभावो जगतः स्थितिश्च संवेगवैराग्यनिमित्तमार्यैः ॥
संचितनीयं सततं यथावत्समासतो बंधमुदाहरिष्ये ॥ ६२ ॥
मिथ्यात्वभावाविरतिप्रमादाः कषाययोगाः खलु हेतवः स्युः ॥
बंधस्य मिथ्यात्वमपि प्रतीतं प्रचक्षते सप्तविधं मुनींद्राः ॥ ६३ ॥
षडिंद्रियाणां विषयप्रभेदान्नरेंद्र ! षट्कायविकल्पतश्च ॥
द्विषाड्विधां चाविरतिं प्रतीहि तामेव चासंयममित्युशन्ति ॥ ६४ ॥
शुद्ध्यष्टकस्यांगमविद्भिरुत्तमक्षमादिकानां विषयप्रभेदतः ॥
सद्भिः प्रमादा नरनाथ ! कीर्तितास्त्वनेकभेदा इति जैनशासने६५

व योग हीं बंधाचीं कारणें आहेत. मुनीश्वरांनीं या मिथ्यात्वाचे सात भेद सांगितले आहेत ते असेः— जीव वगैरे पदार्थ सर्वथा अनित्य किंवा नित्यच समजणें यास एकान्त मिथ्यात्व ह्मणतात, जिनेश्वरांनीं सांगितलेलीं जीव, अजीव, आस्रव वगैरे सात तत्वें खरीं आहेत किंवा खोटीं आहेत अशा संशयाला सांशयिक मिथ्यात्व ह्मणतात. सर्व देव, सर्व शास्त्रें व सर्व धर्म हे समानच आहेत अशा श्रद्धेला वैनयिक मिथ्यात्व ह्मणतात. कुहेतु व कुदृष्टांतांनीं ज्यांचें मन घेरलें आहे असा प्राणी तत्व-खरें वस्तु स्वरूप समजत नाहीं. आग्रही बनतो याला दर्शन मिथ्यात्व ह्मणावें. खऱ्याला खोटें मानणें, खोटें तें खरें असें समजणें हें विपरीत मिथ्यात्व होय जन्मांध जसा चांगलें वाईट कोणतेंच रूप जाणत नाहीं तसें ज्याला तत्व अतत्व कांहींच समजत नाहीं त्याला निसर्ग मिथ्यात्वी ह्मणतात. हिंसा करण्यांत धर्म समजणें, परिग्रह युक्ताला गुरु समजणें व रागादिक विकारांनीं युक्त अशा कुदेवाला देव समजणें हें अज्ञान मिथ्यात्व होय. ६४ सहा इंद्रियांचें निरनिराळे विषय व पृथ्वी, हवा, पाणी, अग्नि आणि वनस्पति व त्रसजीव असे षट्काय जीव याविषयीं अविरति असणें ह्मणजे इंद्रियांच्या विषयापासून विरक्त न होणें व षट्काय जीवांचें रक्षण न करणें याप्रकारें अविरतीचे बारा भेद आहेत. या अविरतीसच विद्वान असंयम असेंही ह्मणतात. ६५ भाव शुद्धि—परिणाम निर्मळ असणें, कायशुद्धि—शरीरानें सावधानपूर्वक धर्म क्रिया करणें.रत्नत्रय धारकांचा यथा-

कषायभेदानथ पंचविंशतिं वदन्ति संतः सह नोकषायकैः ॥
दशत्रिभिर्योगविकल्पमेकतः परं च विद्याद्दश पंचभिर्युतम् ॥ ६६ ॥
एते पंच हि हेतवः समुदिता बंधस्य मिथ्यादृशो
मिथ्यात्वेन विना त एव गदिताः शेषास्त्रयाणामपि ॥
मिश्रः चाविरतिश्च देशविरतस्यान्ये विरत्या विना
षष्ठस्य त्रय एव केवलमिति श्रज्ञैः प्रमादादयः ॥ ६७ ॥
द्वावन्यौ क्रमतः प्रमादरहितावुक्तौ चतुर्णां पुनः
शांतक्षीणकषाययोरपि जिनस्यैकः सयोगस्य च ॥
योगो योगविवर्जितो जिनपतिर्निर्मुक्तबंधत्रयो
बंधो योगनिमित्तको हि विगमे तेषां कथं जायते ॥ ६८ ॥

योग्य विनय करणें ती विनयशुद्धि होय. ईर्यापथ शुद्धि कोणत्याही जीवांना त्रास होणार नाहीं अशा रीतीनें गमन करणें. मुनींनीं आहार कसा घ्यावा याबद्दल जे आचारशास्त्रांत नियम सांगितले आहेत त्याप्रमाणें वागणें यास भिक्षाशुद्धि ह्मणतात. प्रतिष्ठापनशुद्धि–मलमूत्र टाकणें, एकादा पदार्थ ठेवणें किंवा उचलून घेणें या गोष्टी करितांना प्राण्यांना बाधा पोहोंचणार नाहीं अशी खबरदारी घेणें, स्त्री, पशु, पापी लोक जेथें राहतात अशा स्थानीं न राहतां यांनीं रहित अशा ठिकाणीं निजणें, बसणें वगैरे क्रिया करणें यास शयनासन शुद्धि ह्मणतात आरंभ परिग्रह ज्यानें वाढेल असें भाषण न बोलतां व्रतादिकांची वाढ होईल असें भाषण बोलणें ती वाक्यशुद्धि होय. या आठ शुद्धि पाळण्यामध्यें उत्साह नसणें यास प्रमाद ह्मणतात. तसेंच उत्तम क्षमादिक दहा धर्मांचें पालन करण्यांत उत्साह नसणें यास ही प्रमाद ह्मणतात. या रीतीनें सत्पुरुषांनीं प्रमादाचे अनेक भेद–जैन शास्त्रांत सांगितले आहेत. ६६ आत्म्याच्या ज्ञानादिक गुणांचा नाश करणाऱ्यास कषाय ह्मणतात. त्यांचे पंचवीस भेद आहेत ते याप्रमाणें:-अनंतानुबंधी क्रोध, मान, माया, लोभ. अप्रत्याख्यान क्रोध, मान, माया, लोभ. प्रत्याख्यान क्रोध, मान, माया, लोभ. व संज्वलन क्रोध, मान, माया, लोभ हे सोळा भेद व नऊ नोकषाय हास्य, रति, अरति, शोक, भय, जुगुप्सा, स्त्रीवेद, पुरुषवेद, नपुंसकवेद याप्रमाणें पंचवीस कषाय आहेत,

नितरां सकषायभूयतः खलु जीवो नृप ! कर्मणः क्षमान् ॥
परभावहृतीति पुद्गलान्स तु बंधः परिकीर्तितो जिनैः ॥६९॥
प्रकृतिः स्थितिरप्युदारबोधैरनुभागश्च समासतः प्रदेशः ॥
इति तद्विधयः प्रकीर्तिता यैस्तनुभाग्जन्मवनेषु बंभ्रमीति ॥७०॥
द्वौ योगहेतू प्रकृतिप्रदेशौ बंधौ भवेतां तनुभृद्गणानां ॥
सदा परौ द्वौ च कषायहेतू स्थितिश्च राजन्ननुभागबंधः ॥७१॥
ज्ञानावृर्दृतिरिवृतिश्च वेद्यं मोहायुषी नाम च नामतोऽमी ॥
गोत्रांतरायाविति सम्यगष्टावाद्यस्य बंधस्य भवंति भेदाः ॥७२॥
प्रोक्तास्तु पंच नव च क्रमतस्तथा द्वौ षड्भिर्युता मुनिवृषैरथ विंशतिश्च ॥
द्वौ ह्याहतौ नृवर ! ससयुता च षष्टिर्द्वौ चोत्तरप्रकृतिबंधविधाश्च पंच॥७३॥

शरीर नामकर्म आणि अंगोपांग नामकर्माच्या उदयानें व मनोवर्गणा, वचनवर्गणा आणि कायवर्गणा यांच्या आश्रयानें कर्म नोकर्मांना ग्रहण करणाऱ्या जीवाच्या विशिष्ट शक्तीला भावयोग म्हणतात व या भावयोगाच्या निमित्तानें आत्मप्रदेश चंचल होणें यास द्रव्ययोग म्हणतात. या योगांचे तेरा व पंधरा असे भेद आहेत. ते याप्रमाणें:—मनोयोगाचे सत्य मनोयोग, असत्य मनोयोग, उभय मनोयोग आणि अनुभय मनोयोग. वचनयोगाचे सत्यवचनयोग, असत्यवचनयोग, उभयवचनयोग व अनुभयवचनयोग. काययोगाचे औदारिक काययोग, औदारिक मिश्रयोग, वैक्रियिक काययोग व वैक्रियिक मिश्रयोग, व कर्माणयोग या रीतीनें योगाचे तेरा भेद होतात. यामध्यें आहारकाययोग व आहारक मिश्रयोग हे दोन मिसळले असतां पंधरा भेद होतात. ६७ मिथ्यात्व, अविरति, प्रमाद, कषाय व योग या पांच कारणांनीं मिथ्यादृष्टि जीवाला—पहिल्या गुणस्थानांत असलेल्या प्राण्याला कर्मांचा बंध होतो. सासादन, व मिश्र आणि अविरत सम्यग्दृष्टी या तीन गुणस्थानांत असणाऱ्या जीवांना मिथ्यात्वाशिवाय बाकीच्या कारणांनीं कर्मबंध होत असतो. देशविरति नांवाच्या पांचव्या गुणस्थानामध्यें अविरति मिश्ररूपाची असते अर्थात् या गुणस्थानांतला जीव पापांचा कांहीं अंशानें त्याग करूं शकतो. जसें स्थावर जीवांची हिंसा त्याच्या हातून घडत असत

आद्यानां तिसृणां परा स्थितिरथो त्रिंशत्समुद्रोपमा ॥
कोटीकोट्य इति ब्रुवन्ति सुधियो धीरांतरायस्य च ॥
मोहाख्यस्य च सप्ततिर्द्विगुणिता पंक्तिश्च नाम्नस्तथा ॥
गोत्रस्य त्रिभिरायुषोऽपि सहितास्त्रिंशत्समुद्रोपमाः ॥७४॥
द्विषण्मुहूर्ता ह्यपरा स्थितिःस्याद्वेद्यस्य चाष्टावपि नामगोत्रयोः ॥
अथेतरेषां कथिता च राजन्नंतर्मुहूर्तेति समस्तवेदिभिः ॥ ७५ ॥
भावैरथानंतगुणं समस्तैःस दानकाले रसमात्महेतोः ॥
स्थानैः समुत्पादयति स्वयोग्यैः कर्मप्रदेशेष्वखिलेषु जीवः ॥७६॥
एकद्वित्रिचतुर्भिरेव विहितो बंधोऽनुभागोऽगिनां ॥
घातीनां सकलावबोधनयनैः स्थानैश्चतुर्णां जिनैः ॥ ७७ ॥

ह्मणून तो अविरत आहे व त्रसजीवांची हिंसा तो करीत नाहीं ह्मणून विरत आहे. यास्तव त्यास विरताविरत अथवा मिश्र असें ह्मणावयास हरकत नाही. सहाव्या प्रमत्त संयत गुणस्थानांत मिथ्यात्व व अविरति ही दोन कारणें नाहींशीं होतात ह्मणून तेथें तीन कारणांनींच कर्मबंध होतो. प्रमाद, कषाय व योग या कारणांनींच या गुणस्थानांत बंध होतो. ६८ अप्रमत्त संयत, अपूर्वकरण, अनिवृत्तिकरण व सूक्ष्मसांपराय या चार गुणस्थानांत कषाय व योगापासूनच बंध होतो. उपशांत मोह, क्षीणमोह, सयोग केवली या तीन गुणस्थानांत फक्त योगापासून बंध होतो. येथें कषायाचा अभाव झालेला असतो. अयोग केवली या गुणस्थानांत योगही नसतो. यामुळें या गुणस्थानांतील जिनेश्वर अयोग केवली असें ह्मटलें जातात. अविरति, प्रमाद, कषाय हे तीन नष्ट झाले तरी योगानें कर्म बंध होतो. परंतु तो ही नष्ट झाल्यावर बंध कसा होईल? मुळींच होणार नाहीं ६९ हा आत्मा कषाययुक्त झाला ह्मणजे कर्मरूप बनण्याला योग्य अशा पुद्गल वर्गणांचें ग्रहण करीत असतो. हे राजा! अशा त्याच्या कृत्याला जिनेश्वरांनीं बंध हें नांव दिलें आहे. आत्म्याच्या प्रदेशामध्यें कर्मांचे प्रदेश दूध व पाण्याप्रमाणें एकमेकांत पूर्ण मिसळून जाणें यास बंध ह्मणतात. ७० ज्यांचें ज्ञान मोठें आहे अशा केवल ज्ञान्यांनीं प्रकृति, स्थिति, अनुभाग व प्रदेश असे बंधांचे चार भेद सांगितले आहेत. या चार प्रकारच्या बंधांनीं हा आत्मा संसाररूपी जंगलामध्यें वारंवार भटकत आहे. सुखदुःख वगैरे देण्याच्या कर्मांच्या स्वभावाला प्रकृतिबंध ह्मणतात. आत्म्यामध्यें

राजन् ! द्वित्रिचतुर्भिरेकसमये स्वप्रत्ययेनाहत:
शेषाणां च भवेच्छुभाशुफलप्राप्तेः परः कारणं ॥ ७८ ॥
ज्ञानेक्षणावरणदेशघातिश्च यांति विघ्नैर्नृवेदसहिताश्चरमाः कषायाः
स्थानैश्चतुर्भिरिति सप्तदशात्रिभिश्च सप्तोत्तरं शतमुपैत्यनुभागबंधः७९
नामप्रत्ययसंयुता इति जिनैः प्रोक्ताः समं सर्वतो
योगानां सुविशेषतः समुदितः सूक्ष्माः स्थिताः पुद्गलाः ॥
एकक्षेत्रमनुप्रविश्य सकलेष्वात्मप्रदेशेषु येऽ ॥
नंतानंतघनप्रदेशसहिताः कर्मत्वमायांति ते ॥ ८० ॥
सद्वेदनीयं शुभयुक्तमायुःसन्नामगोत्रे च वदन्ति पुण्यं ॥
जिनैस्ततोऽन्यत्खलु पापमुक्तं सत्संवरं व्यक्तमथाभिधास्ये ॥ ८१ ॥

कर्म टिकून राहणे हा स्थितिबंध होय. कर्मांच्या अणूंच्या संख्येला प्रदेशबंध ह्मणतात व कर्मा पासून सुखदुःखादिकांचा अनुभव मिळणें यास अनुभाग बंध म्हणतात.७१ या चार बंधापैकीं सर्व प्राण्यांना योगापासून प्रकृतिबंध व प्रदेशबंध हे होत असतात. हे राजा ! कषायापासून स्थितिबंध आणि अनुभागबंध होतो. याप्रमाणें बंध आहे. ७२ यापैकीं प्रकृतिबंधाचे ज्ञानावरणादिक आठ भेद आहेत. ज्ञान न होऊं देणारें जें कर्म तें ज्ञानावरणीय, सामान्य पदार्थाचें स्वरूपही ज्यानें समजत नाहीं तें दर्शनावरणीय, हिताहित जाणूनही त्यामध्यें प्रवृत्ति न करू देणारें अर्थात् मोह–उत्पन्न करणारें तें मोहनीय कर्म, सुखदुःखाचा भास उत्पन्न करणारें तें वेदनीयकर्म, एकाच शरीरामध्यें कांहीं कालपर्यंत कोंडून ठेवणारें तें आयुकर्म, नानाप्रकारच्या शरीराची प्राप्ति करून देणारें तें नामकर्म, जीवाला उच्चावस्था व नीचावस्था प्राप्त करून देणारे जें कर्म त्यास गोत्र ह्मणतात व दान, लाभ, भोग, उपभोग आणि वीर्य यामध्यें विघ्न आणणाऱ्या कर्माला अंतराय कर्म ह्मणतात. असे हे प्रकृतिबंधाचे आठ भेद आहेत. ७३ ज्ञानावरणीयाचे पांच, दर्शनावरणीयाचे नउ, वेदनीयाचे दोन, मोहनीय कर्मांचे अठ्ठावीस, आयु कर्मांचे चार, नाम कर्मांचे सदुसष्ट, गोत्रकर्मांचे दोन व अंतराय कर्मांचे पाच याप्रमाणें प्रकृति बंधाचे हे उत्तरभेद मुनीश्वरांनीं वर्णिले आहेत असें समजावें. ७४ ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय व मोहनीय या तीन कर्मांचा

जिनैर्निरोधः परमास्रवाणामुदाहृतः संवर इत्यमोघैः ॥
स द्रव्यभावद्वितयेन भिन्नः स्याद्विप्रकारो मुनिभिः प्रशस्यः ॥ ८२ ॥
मुनीश्वरैः संसृतिकारणक्रियानिवृत्तिरुक्तः खलु भावसंवरः ॥
स तन्निरोधे सति कर्मपुद्गलग्रहैकविच्छित्तिरपीतरो मतः ॥ ८३ ॥
गुप्त्यन्वितैः समितिधर्मनिरंतरानुप्रेक्षापरीषहजयैः कथितश्चरित्रैः ॥
व्यक्तं जिनैः स खलु संवर एष सारः स्यान्निर्जराथ तपसेति च विश्वविद्भिः ॥ ८४ ॥
सम्यग्योगविनिग्रहो निगदितो गुप्तिस्त्रिधासौ बुधैः ॥
वाग्गुप्तिः खलु कायगुप्तिरनघा गुप्तिस्तथा चेतसः ॥

उत्कृष्ट स्थितिबंध तीस कोटी सागरोपम वर्षाची आहे. अंतरायकर्माचा ही एवढाच स्थितिबंध आहे. मोहनीय कर्माची स्थिति सत्तर कोटिकोटि सागरोपमवर्षे आहे. नाम व गोत्र या कर्मांची उत्कृष्ट स्थिति वीस कोटि सागरोपम वर्षांची आहे व आयुकर्माची उत्कृष्ट स्थिति फक्त तेहतीस सागरोपमवर्षांची आहे. ७५ वेदनीय कर्माची जघन्य स्थिति बारा मुहूर्त आहे. व नाम आणि गोत्र या कर्मांची आठ मुहूर्त आहे. याशिवाय बाकीच्या कर्मांची अंतर्मुहूर्त आहे. असें केवलज्ञान्यांनी सांगितलें आहे. ७६ जीव कर्मग्रहण करतेवेळीं आपल्या योग्य अशा स्थानांच्या द्वारें संपूर्ण कर्मप्रदेशामध्यें आत्मनिमित्तक सर्व परिणामांनी अनंत प्रकारच्या कर्मरसाला-सुखदु:खरूपी रसाला उत्पन्न करितो यासच अनुभाग बंध म्हणतात. ७७-७८ या दोन श्लोकांचा अर्थ समजत नाहीं ७९ ज्ञानावरणादिक कर्मांना बनविण्याग कारण असलेले सूक्ष्म पुद्गलपरमाणु आत्म्याच्या ठिकाणीं मन, वचन, काय या तीन प्रकारच्या विशिष्ट योगांनीं येत असतात. हे सूक्ष्म कर्मपरमाणु येऊन आत्म्याच्या संपूर्ण प्रदेशांत एकक्षेत्रावगाह होऊन राहतात अर्थात् आत्म्याच्या प्रदेशाशीं यांची एकरूपता होते. हे कर्म प्रदेश प्रतिसमयीं अनंतानंत. येतात याला जिनेश्वरांनीं प्रदेशबंध म्हटलें आहे. ८० सातावेदनीय, देवायु, मनुष्यायु व तिर्यंचायु, तीर्थकरत्व, यशस्कीर्ती वगैरे बेचाळीस नामकर्म प्रकृति, व उच्चगोत्र या कर्मप्रकृतींना पुण्यप्रकृति म्हणतात. या शिवाय बाकीच्या कर्मप्रकृति पापरूप आहेत असें श्रीजिनेश्वरांनीं सांगितलें आहे. आतां मी उत्तम अर्थात् आत्म्याकडून

ईर्यायाः समितिः परा च वचसाप्यादाननिक्षेपयोः ॥
उत्सर्गस्य च पंचमी च समितिः स्याद्‌एषणाया विधिः ॥ ८५ ॥
क्षांतिः सत्योक्तिर्मार्दवं चार्जवं च श्रेयः शौचं संयमः सत्तपश्च ॥
त्यागाकिंचन्यब्रह्मचर्याणि धर्मः प्रोक्तो विद्धिः स्याद्दशैतानि लोके८६
उशांत्यकालुष्यमथो तितिक्षां सदाप्यमित्रादिषु बाधकेषु ॥
सत्सु प्रशस्तेषु च साधुवाक्यं सत्यं यथाज्ञास्थितिसंयुतं वा॥८७॥
वदंति जात्यादिमदाभिमानप्रहीणतां मार्दवमार्जवं च ॥
अवक्रतां कायवचोमनोभिः शौचं च लोभादिनिवृत्तिरेका ॥८८॥

स्वीकारण्यास योग्य अशा संवराचें वर्णन स्पष्ट रीतीनें करितो हे राजन्! तें तूं ऐक

८१ ज्यांचें वचन व्यर्थ होत नाहीं अशा जिनेश्वरांनीं आस्रव चांगल्या तऱ्हेनें रोकला जाणें यांस संवर म्हणावें असें सांगितलें आहे. आत्म्याच्या ठिकाणीं नवीन कर्म येऊ न देणें यास संवर म्हणतात. हा द्रव्यसंवर व भावसंवर अशा प्रकारें दोन प्रकारचा आहे असें मुनीश्वरांनीं सांगितलें आहे. ८२ संसार वाढविण्यास कारण असलेल्या मिथ्यात्व, अविरति, प्रमाद, कषाय व योग यांचा आत्म्यांतून पूर्ण अभाव करणें यास भावसंवर, असें मुनीश्वर म्हणतात. हीं कारणें आत्म्यांतून काढून टाकिलीं असतां नवीन कर्मपुद्गलसमूह आत्म्यामध्यें येण्याचें बंद होतें. असें होणें यास द्रव्य संवर म्हणतात. नवीन कर्म न येणें हा द्रव्यसंवर होय व त्या कर्माला रोकण्यास योग्य असे आत्म्याचे परिणाम होणें यास भावसंवर म्हणतात. ८३ हा दोन प्रकारचा संवर आत्म्याच्या ठिकाणीं गुप्ति, समिति, धर्म, अनुप्रेक्षा, परीषहजय व चारित्र यांनीं होत असतो. असा संवर होणें हें फार उत्कृष्ट आहे कारण यानें लौकरच मोक्ष प्राप्ति होते. बारा प्रकारच्या तपांनीं कर्मांची निर्जरा–पूर्वी बांधलेलें कर्म उदयाला येऊन नाहींसें होणें–होते असें सर्व जगाला जाणणाऱ्या सर्वज्ञ जिनांनीं स्पष्ट सांगितलें आहे. ८४ उत्तम रीतीनें मन, वचन व शरीर यांची क्रिया–प्रवृत्ति रोकणें यास गुप्ति म्हणतात. ही गुप्ति तीन प्रकारची आहे. मनोगुप्ति–रागद्वेषादि-विकार मनांत उत्पन्न होऊ न देणें अथवा साम्य भावनेंत मनाला स्थिर करणें. वचन गुप्ति–कठोर, अप्रिय वगैरे भाषण न बोलणें अथवा मौन धारण करणें. कायगुप्ति–शरीरावरील ममत्व सोडून देणें अथवा उपसर्ग प्रसंगींही शरीरामध्यें

प्राणींद्रियाणां परिहार एको यः संयमं तन्निगदन्ति सन्तः ॥
कर्मक्षयार्थं परितप्यते यत्तपश्च तद्‍द्वादशभेदभिन्नं ॥ ८९ ॥
त्यागः सुशास्त्रादिकदानमिष्टं ममेदमित्याद्यभिसंधिहानिः ॥
अकिंचनत्वं गुरुमूलवासः स्याद्ब्रह्मचर्यं सुविरागता च ॥ ९० ॥
प्राज्ञाः प्राहुरनित्यताप्यशरणं जन्मैकता चान्यता
कायस्याशुचिता परा च विविधः कर्मास्रवः संवरः ॥
सम्यङ्निर्जरणं जगच्च सुवचस्तत्वं च धर्मस्थिति
र्बोधेर्दुर्लभता तथा द्विषडनुप्रेक्षा इमाः श्रेयसे ॥ ९१ ॥

हालचाल न होऊं देणें. याप्रमाणें तीन गुप्ति आहेत. समितीचे पांच भेद आहे ते याप्रमाणें –ईर्यासमिति–स्वतःच्या स्थानापासून इतर ठिकाणीं जेव्हां मुनि जातात तेव्हां सूर्याचा चांगला प्रकाश पडल्यावर पुढें चार हात जमीन पाहून व दयार्द्र अंतःकरणानें तिच्यावर सावकाश पावलें ठेवीत जातात. या कृत्यास ईर्यासमिति म्हणावें. भाषासमिति–हितकर, थोडेसें, संशयरहित बोलणे. एषणासमिति–ज्यापासून रत्नत्रयाची बाध होईल असें शुद्ध अन्न अन्तराय व उद्गमादिदोषांचा त्याग करून शुद्ध श्रावकानें विधिपूर्वक दिलेलें घेणें. आदाननिक्षेपणसमिति–स्वच्छ केलेल्या व पाहिलेल्या जमीनीवर पुस्तक, कमंडलु, फळी वगैरे ठेवणें व घेणें. व्युत्सर्गसमिति–निर्जन्तुक अशा जमिनीवर मलमूत्र–विष्ठा हे पदार्थ टाकणें. अशा या पांच समिती आहेत ८५ उत्तम क्षमा, मार्दव, आर्जव, शौच, सत्य, संयम, तप, त्याग, आकिंचन्य व ब्रह्मचर्य असे धर्माचे दहा भेद आहेत. संसारदुःखापासून जीवाला सोडऊन त्याला उत्कृष्ट इंद्रादिपदांची जो प्राप्ति करून देतो त्यास विद्वान धर्म म्हणतात. शत्रु वगैरेनीं पुष्कळ त्रास दिला तरी मनांत क्रोध उत्पन्न होऊ न देणें व सर्व त्रास सहन करणें यास क्षमा म्हणतात. मुनि व त्यांचे भक्त अर्थात् श्रावक यांच्याशीं रत्नत्रयाचा उपदेश धर्मवृद्धि व्हावी म्हणून करणें अथवा शास्त्राज्ञेला अनुसरून बोलणें, धर्ममर्यादा टिकेल असें भाषण करणें यास सत्य म्हणावें असे विद्वान म्हणतात. ८६ जात. कुल शक्ति, ऐश्वर्य, ज्ञान, आदरसत्कार, तप व शरीर या गोष्टींचा अभिमान करणें सोडून देणें यास मार्दव ह्मणतात. मन, वचन व शरीराची प्रवृत्ति सरळ,

रूपं यौवनमायुरक्षनिचयो भोगोपभोगौ वपु- ॥
वीर्यं स्वेष्टसमागमो वसुरतिः सौभाग्यभाग्योदयः ॥
नो नित्याः स्फुटमात्मनः समुदिता ज्ञानेक्षणाभ्यामृते ॥
शेषा इत्यनुचिंतयंतु सुधियः सर्वे सदानित्यतां ॥ ९२ ॥
व्याधिव्याधभयंकरे भववने मोहेद्धदावानले
हंतुं मृत्युमृगारिणा सरभसं क्रोडीकृतं रक्षितुं ॥
आत्मैणीपृथुकं जिनेंद्रवचनादस्मिन्परे नेशते
मित्राद्या इति भावयन्त्वशरणं भव्या भवोल्लंघिनः ॥ ९३ ॥

ठेवणें यास आर्जव ह्मणतात. लोभाचा त्याग करणें यास शौचधर्म ह्मणतात. ८७ त्रस आणि स्थावर अशा प्राण्यांची हिंसा होणार नाहीं अशा रीतीनें वागणें व आपलीं इंद्रियें ताब्यांत ठेवणें यास इंद्रियसंयम ह्मणतात. तसेंच कर्मांचा क्षय व्हावा ह्मणून उपवास करणें, एकदां जेवणें वगैरे जें बारा प्रकारचें तप केलें जातें त्यास सत्पुरुष तप असें ह्मणतात. ८८ शास्त्र देणें, आहार देणें, अभय देणें, व औषध देणें यास त्याग ह्मणतात. शरीरावर तसेच इतर पदार्थांवर हे माझे आहेत असा जो संकल्प उत्पन्न होतो त्याचा त्याग करणें त्यास आकिंचन्य ह्मणतात. गुरूच्या स्वाधीन होऊन राहणें व कामविकारापासून पूर्ण विरक्त होणें यांस ब्रह्मचर्य ह्मणतात. याप्रमाणें दशधर्मांचें स्वरूप आहे. ८९ अनित्यता, अशरण, संसार, एकत्व, अन्यत्व, शरीराचा अपवित्रपणा, नानाकारचे कर्मांचे आस्रव, संवर, उत्तम निर्जरा, लोकधर्मस्वाख्याततत्व व बोधिदुर्लभानुप्रेक्षा अशा या बारा अनुप्रेक्षा आत्म्याचें कल्याण करणाऱ्या आहेत. ९० सौंदर्य, तारुण्य, आयुष्य, इंद्रियांचा समुदाय, भोगोपभोगाचे पदार्थ, शरीर, शक्ति, आवडत्या पदार्थांची प्राप्ति, धन, प्रेम, सौभाग्य व भाग्योदय, या सर्व गोष्टी आत्म्याला प्राप्त झाल्या तरी नित्य नाहींत यांचा नाश होतोच. आत्म्याचें ज्ञान व दर्शन हे गुणच नित्य आहेत याप्रमाणें विद्वान लोकांनीं नेहमी पदार्थांच्या अनित्यपणाचें चिंतन करावें. ९१ या संसाररूपी वनामध्यें मोहरूपी प्रदीप्त अग्नि पसरला आहे व रोगरूपी पारधी येथें राहात असल्यामुळें हें भयंकर दिसत आहे. या ठिकाणीं मृत्युरूपी सिंहानें मोठ्या त्वरेनें आत्मारूपी हरिणीचा बच्चा पकडला आहे

संसारः खलु कर्मकारणवशाज्जीवस्य जन्मांतरा-
वाप्तिर्बंधुविपर्ययैर्बहुविधैर्गत्यक्षयोन्यादिभिः ॥
किं वा सांप्रतमेव यत्र तनयोप्यात्मात्मना भाव्यते
तस्मिन्नीदृशि कीदृशीं बत विदां संतो रतिं कुर्वते ॥ ९४ ॥
जन्मव्याधिजरावियोगमरणव्यावृत्तिदुःखोदधा-
वामज्जन्नहमेक एव नितरां सीदामि मे नापरे ॥
विद्यंते सुहृदो न चापि रिपवो न ज्ञातयः केवलं ॥
धर्मो बंधुरिहापरत्र च परामित्येकतां चिंतयेत् ॥ ९५ ॥
अन्योऽहं नितरां शरीरत इतो बंधं प्रति प्रायशः ॥
सत्यैक्येऽप्यथ लक्षणाहितभिदो भेदो ममास्त्यस्य च ॥

जिनेश्वराच्या वचनाशिवाय दुसरे मित्रादिक याचे रक्षण करूं शकत नाहींत. जिनवचन हेंच आत्म्याचें रक्षण करितें असें ससाराचें उल्लंघन करणाऱ्या भव्य जीवांनीं विचारांत आणावें ९२ मिथ्यात्वादिक कर्मरूपी कारणांनीं एकजन्म सुटून पुनः दुसरा जन्म धारण करणें यास संसार म्हणतात. गति, इंद्रियें, वगैरे प्राप्त झालेल्या अवस्था या जीवाला बंधुसारख्या वाटतात पण त्या त्याच्या शत्रु आहेत, कारण या अवस्थांनीं त्याला संसारांत फिरावें लागत आहे. या संसारांत योग्य असें काय आहे ? कारण या संसारांत हा आत्मा स्वतःहि स्वतःचा मुलगा होतो. यास्तव अशा रीतीच्या या संसारांत जाणते सत्पुरुष कसें बरें प्रेम करतील ? करणारच नाहींत- ९३ जन्म, नाना प्रकारचे रोग, म्हातारपणा, इष्ट पदार्थांचा वियोग होणें, मरण वगैरे संकटें ज्यामध्यें आहेत अशा या दुःखरूपी समुद्रांत बुडणाऱ्या मलाच अति. शय दुःख भोगावे लागतें. माझ्या दुःखांचे वाटेकरी दुसरे होऊन शकत नाहींत. या जगामध्यें माझे कोणी मित्रही नाहींत शत्रूही नाहींत व नातलगही नाहींत. फक्त धर्मच या लोकीं व परलोकीं बंधु-हितकर्ता आहे या प्रमाणें स्वतःच्या एक त्वाचें चिंतन करावें. ९४ जरी शरीराशीं माझा एकरूपणा सध्या दिसत आहे तरी तो कर्मबंध झाल्यामुळेंच तसा समजावा. वास्तविक पाहिलें तर मी व शरीर यांची लक्षणें भिन्न असल्यामुळें मी शरीरापासून वेगळा आहे. मी स्वतः ज्ञानमय आहे, नित्य आहे, व माझें शरीर अचेतन, नाशवत व इंद्रियांनीं सहित आहे. मी अतींद्रिय

आत्मा ज्ञानमयो विनाशरहितोऽप्ययं वपुर्नश्वरं ॥
साक्षं वाहमनक्ष इत्यपघनात्संचिंतयेदन्यतां ॥ ९५ ॥
अत्यंताशुचियोनिसंभवतया शश्वन्निसर्गाशुचि-
त्वङ्मात्रावृतिपूतिगंधिकुनवद्वारं कृमिभ्याकुलं ॥
विण्मूत्रप्रसवं त्रिदोषसहितं नद्धं शिराजालकैः ॥
बीभत्सं वपुरेतदित्यशुचितां मान्यः सतां मन्यताम् ॥ ९६ ॥
उक्तास्त्वास्रवहेतवः सह जिनैरक्षैः कषायादयो ॥
दुःखांभोनिधिपातिनो हि विषयास्तेषामिहामुत्र च ॥
आत्मा तद्वशगश्चतुर्गतिगुहां मृत्यूरगाध्यासिताम् ॥
अध्यास्ते ध्रुवमास्रवस्य सुधियो ध्यायंतु दोषानिति ॥ ९७ ॥

शरीर तसें नाहीं. याप्रमाणें शरीरापासून स्वतःची भिन्नता जाणून घेऊन विचार करावा. ९६ हें शरीर अत्यंत अपवित्र अशा योनिस्थानापासून उत्पन्न होतें. हें कायमचें व स्वाभाविकपणें अपवित्र आहे. हें फक्त कातड्यानें झांकलें आहे. या शरीराला जीं नऊ छिद्रें आहेत त्यांतून मळ वाहात असतो. या शरीरांत कृमि भरले आहेत. विष्ठा व मूत्र यांचें हें उत्पत्तिस्थान आहे. वात पित्त आणि कफ यांनीं सहित आहे व हें शिरांनीं जखडून बांधलें गलें आहे. बीभत्स अशा या शरीराच्या घाणेरडेपणाचा सत्पुरुषांना मान्य असलेल्या लोकांनीं विचार करावा. ९७ इंद्रियें कषाय, अव्रतें, अहिंसादिकव्रतें न पाळणें, व सम्यक्त्वादिक पंचवीस क्रिया हीं सर्व आस्रवाचीं कारणें आहेत असें जिनेश्वरांनीं सांगितलें आहे. हे इंद्रियांचे विषय जीवाला दुःखरूपी समुद्रांत टाकून देणारे आहेत. इहलोकीं व परलोकीं आत्मा त्यांच्या स्वाधीन होऊन मृत्युरूपी सर्प ज्यामध्यें राहात आहे अशा नरकादि गतिरूपी गुहेंत प्रवेश करितो. याप्रमाणें विद्वान लोकांनीं आस्रवाच्या दोषांचें मनांत चिंतन करावें. ९८ जसें समुद्रात नावेला भोंक पडलें असता ती पाण्यानें भरून जाते तसें हा आत्मा ज्यामध्यें अनंत दुःखे भरलीं आहेत अशा या जन्मांत आस्रवरूपी समुद्रात बुडून जात आहे, यास्तव मन वचन, व शरीर हीं ताब्यांत ठेऊन आस्रवाला रोकावें ह्मणजे आत्म्याचें कल्याण होतें. कारण मन वचन व शरीराच्या हालचालीला आळा बसला ह्मणजे हा आत्मा लौकरच

पोतो वारिधिमध्यगः सति जलैश्छिद्रे प्रपूर्णो यथा ॥
मज्जत्याशु तथास्रवे च पुरुषो जन्मन्यनंतासुखे ॥
तस्मादास्रवरोधनं त्रिकरणैः श्रेयो यतः संवृतो ॥
निर्वास्यत्यचिराय संवरमिति ध्यायंतु संतः परम् ॥ ९८ ॥
यत्नेनापि विशोषणादुपचितो दोषो यथा जीर्यते ॥
गाढं कर्म तथैव निर्जरयति व्यानद्धमप्याचितम् ॥
वीरः कातरदुश्चरेण तपसा रत्नत्रयालंकृतो ॥
नान्येनेति विदंतु संततमिमां भव्याः परां निर्जराम् ॥ ९९ ॥
लोकस्याथ यथा जिनोदितमधस्तिर्यक्तथोर्ध्वं परं ॥
बाहुल्यं वरसुप्रतिष्ठकनिभं संस्थां च संचिंतयेत् ॥
सर्वत्रापि च तत्र जन्ममरणे भ्रांतिं चिरायात्मनः ॥
सम्यक्त्वामृतमादरादपिबतः स्वप्नांतरेऽपि क्वचित् ॥ १०० ॥

निर्वाणपदाला प्राप्त होईल. याप्रमाणें सत्पुरुष उत्कृष्ट संवराचा नेहमीं विचार करोत. ९९ औषध घेणे वगैरे यत्नांनीं व उपवासानें जसें शरीरांत रोग उत्पन्न करणारे दोष नाश पावतात त्याप्रमाणे आत्म्याच्या ठिकाणीं पूर्वी बांधलेले व संचित झालेलें कर्म रत्नत्रयानें अलंकृत झालेले धर्मवीर धैर्यहीनाला करण्यास अशक्य असलेल्या तपश्चरणाच्या साह्यानें जीर्ण करून टाकितात. ही धर्मवीरांची कर्मनिर्जरा इतर उपायानें होणें शक्य नाहीं. याप्रमाणे भव्यानीं नेहमी निर्जरेचें असें उत्कृष्ट स्वरूप समजून घ्यावें. १०० श्रीजिनेश्वरांनीं या जगाची खाली, वर, मध्यभागीं जी कांही लांबी रुंदी सांगितली आहे ती तशी जाणून याचा आकार सुप्रतिष्ठकाप्रमाणें आहे असें चिंतन करावें. ज्यानें स्वप्नामध्यें देखील कधीं सम्यक्त्वरूपी अमृत प्राशन केलें नाहीं अशा प्राण्याला या जगांत सर्व ठिकाणीं जन्ममरण करीत भ्रमण करावें लागतें असा भव्य जीवांनीं विचार करावा. १०१ जगाचें कल्याण व्हावें म्हणून तत्व-ज्ञानरूपी नेत्राचे धारक अशा जिनेश्वरांनीं हिंसादि दोषांनीं रहित असें धर्माचें उत्कृष्ट स्वरूप प्रतिपादिलें आहे. जे सत्पुरुष या धर्मामध्यें निमग्न झाले आहेत ते या अपार संसाररूपी समुद्राला गाईच्या पावलाप्रमाणें ओलांडून जातात व जो अनंत सुखांचें ठिकाण म्हणून प्रसिद्ध आहे अशा मोक्षाला ते प्राप्त होतात. १०२ या

स्वाख्यातो जगतां हिताय परमो धर्मो जिनैरंजसा ॥
तत्वज्ञानविलोचनैर्विरहितो हिंसादिदोषैरयं ॥
संसारार्णवमप्यपारमचिरादुल्लंघ्य वा गोष्पदं ॥
ख्यातानंतसुखास्पदं परमितं तैरेव येऽस्मिन्नताः ॥ १०१ ॥
मानुष्यं खलु कर्मभूमिरुचितो देशः कुलं कल्पता ॥
दीर्घायुः स्वहिते रतिश्च कथको धर्मश्रुतिः स्वादरात् ॥
सत्स्वेतेष्वतिदुर्लभेषु नितरां बोधिः परा दुर्लभा ।
जीवस्येति विचिंतयंतु सुकृतो रत्नत्रयालंकृताः ॥ १०२ ॥
सन्मार्गाच्यवनविशिष्टनिर्जरार्थं षोढव्याः सकलपरीषहा मुनीशैः॥
कुच्छ्रेषु श्रियमपुनर्भवामुपैतुं वांछंतः स्वहितरता न हि व्यथंते ॥१०३॥

जगांत मनुष्यपणा लाभणें कठिण आहे. तो लाभला तरी कर्मभूमीमध्यें जन्म होणें त्याहीपेक्षां दुर्लभ आहे. उत्तम देशांत जन्म मिळणें याहून कठिण असून उत्तम कुलांत जन्मणें हें त्यापेक्षां दुर्लभ आहे. यापेक्षां आरोग्य, दीर्घायुष्य हीं दुर्लभ असून आत्मकल्याणाच्या बुद्धीची प्राप्ति होणें अतिशय दुर्लभ आहे. आत्महिताच्या बुद्धि बरोबर सद्गुरूची जोड मिळणें धर्मोपदेश ऐकण्यांत प्रेम असणें ह्या गोष्टी उत्तरोत्तर दुर्लभ आहेत. या सर्व गोष्टी प्राप्त झाल्या तरी रत्नत्रयांची जीवाला प्राप्ति होणें हें सर्वांत अधिक दुर्लभ आहे असें रत्नत्रय धारक पुण्यवान जीवांनीं नेहमीं मनांत चिंतावें. १०३ रत्नत्राय मार्गापासून आपण सुटूं नये म्हणून व कर्मांची विशेष निर्जरा व्हावी ह्मणून सर्व परीषह मुनीश्वरांनीं सहन करावेत. आत्मकल्याणांत नेहमीं अनुरक्त असणारे व मोक्षलक्ष्मीच्या प्राप्तीची इच्छा करणारे मुनि अशा संकटप्रसंगीं—परीषह सहन करण्याच्या प्रसंगीं बिलकुल खेद मानीत नाहींत. १०४ क्षुधावेदनीय कर्माच्या उदयानें पीडा होत असतांही आहार लाभापेक्षांही आहार न मिळाला असतां मनामध्यें खेद न मानतां आनंदच मानितो. व आहार घेतांना जो न्यायपूर्वक आहार घेतो व घेतांना अयोग्य दात्यांच्या येथें जो आहार घेत नाहीं. तसें निर्दोष आहार जो घेतो त्या मुनीश्वराचा हा क्षुधाविजय नांवाचा परीषह जाणावा. १०५ जो मुनिराज आपल्या हृदयरूपी घागरींत असलेल्या निर्मल आत्म-

क्षुद्वेदनीयोदयबाधितोऽपि लाभादलाभं बहु मन्यमानः ॥
न्यायेन योऽश्नाति हि पिंडशुद्धिं प्रशस्यते क्षुद्विजयस्तदीयः ॥१०४॥
स्वहृदयकरकस्थितेन नित्यं विमलसमाधिजलेन यः पिपासां ॥
प्रशमयति सुदुःसहां च साधुर्जयति स धीरमतिस्तृषोऽभितापम् १०५
प्रालेयवायुहतिमप्यविचिन्त्य माघे यः केवलं प्रतिनिशं बहिरेव शेते।
संज्ञानकंबलबलेन निरस्तशीतः शीतं वशी विजयते स निसर्गधीरः
॥ १०६ ॥
दवाग्निज्वालाभिर्जटिलितवने ग्रीष्मसमये
स्थितस्योग्रैर्भानोः शिखरिणि मयूखैरभिमुखं ॥
समुत्तप्तांगस्य क्षणमिह धृतेरप्यचलतः ॥
सहिष्णुत्वं तस्य प्रथयति मुनेरुष्णसहनम् ॥ १०७ ॥
दष्टोऽपि दंशमशकादिगणेन बाढं मर्मप्रदेशमुपगम्य निरंकुशेन ॥
यो योगतो न चलति क्षणमप्युदारस्तस्येह दंशमशकादिजयोऽव-
सेयः ॥ १०८ ॥

ध्यानरूपी पाण्यानें दुःसह अशी तहान शांत करितो तो श्रेष्ठ बुद्धीचा मुनि तहाने पासून होणाऱ्या दुःखाला जिंकितो १०६ जो मुनिराज माघ महिन्यांतील थंडगार वाऱ्याचा आघात विचारांत न घेतां प्रत्येक रात्रीं उघड्या मैदानांतच शयन करितो व सम्यग्ज्ञानरूपी घोंगडीच्या सामर्थ्यानें थंडीला हाकालून लावितो, स्वाभाविकच धीर असा तो जितेंद्रिय मुनीश्वर शीतपरीषहाला जिंकितो असें जाणावें. १०७ ग्रीष्मऋतूंत अग्निज्वालांनी सगळें वन व्यापून गेले असतां, पर्वतावर जो सूर्याकडे तोंड करून उभा राहतो व सूर्याच्या तीक्ष्ण किरणांनी सगळें शरीर संतप्त झाले असतां देखील जो धैर्यापासून क्षणभरही भ्रष्ट होत नाही अशा त्या मुनीश्वराचें उष्णता सहन करणें त्याच्या सहनशीलतेला प्रसिद्ध करितें १०८ ज्याला डास, ढेकूण, चिलटें मुंग्या वगैरे प्राणी चाऊन अतिशय त्रास देत असतांही—निर्भयपणें त्याच्या मर्म प्रदेशीं जाऊन त्यास पीडित असतांही, एक क्षणभर देखिल जो ध्यानापासून डळमळत नाहीं त्या उदार महात्म्याचा या लोकीं दंशमशकपरीषह जय जाणावा. १०९ नग्नता ही याचना, प्राणिहिंसा वगैरे दोषांनी रहित आहे. व ही संपूर्ण परि-

याञ्चाप्राणिवधादिदोपरहितं निःसंगतालक्षण-
मप्राप्यामपरैः समुत्सुकयितुं निर्वाणलक्ष्मीं क्षमं ॥
नाग्न्यं कातरदुर्धरं धृतवतोऽचेलव्रतं योगिनः ॥
पर्याप्तिं समुपैति तद्धि विदुषां तत्वैषिणां मंगलम् ॥ १०९ ॥
इंद्रियेष्टविषयेषु निरुत्सुकमानसः पूर्वभुक्तसुखसंपदमप्यविचिंतयन् ॥
यस्तपश्चरति दुश्चरमेकविमुक्तिधीर्मुक्तयेऽरतिपरीषहजित्स विदां वरः
॥ ११० ॥

आबाधमानासु मिथो जनीषु मनोभवाग्निप्रभवारणीषु ॥
यः कूर्मवत्संवृतचित्तमास्ते स्त्रीणां स बाधां सहते महात्मा ॥१११॥

ग्रह रहितपणाचें लक्षण आहे. ही नग्नता इतर मिथ्यात्व्यांना प्राप्त न होणाऱ्या मोक्षलक्ष्मीला मुनिकडे जाण्याविषयीं उत्सुक करण्यास समर्थ आहे. ही नग्नता भित्रीं माणसें धारण करूं शकत नाहीत. ही निर्वस्त्र नग्नताच योगिजनास रक्षण करण्यास–कुमार्गापासून परावृत्त करण्यास समर्थ आहे. खऱ्या आत्मस्वरूपाच्या लाभाची इच्छा करणाऱ्या विद्वानांचें हीच मंगल -कल्याण करिते ११० इंद्रियांच्या आवडत्या पदार्थांविषयीं ज्याचें मन पूर्ण निरुत्सुक झालें आहे, पूर्वी उपभोगिलेल्या सौख्य संपत्तीचें जो कधींही मनांत स्मरण करीत नाहीं; जो अतिशय कठिण असें तपश्चरण करितो व फक्त मुक्तीकडेच ज्याचें लक्ष लागलें आहे तो विद्वच्छ्रेष्ठ मुनिराज अरति परीषहाचा विजयी होय. १११ मदन–कामविकाररूपी अग्नि उत्पन्न करण्यास अरणि नांवाच्या लांकडाप्रमाणें असलेल्या सुंदर स्त्रिया एकांतस्थानीं त्रास देत असतां ज्यानें कासवाप्रमाणें आपली मनोवृत्ति संकुचित केली आहे तो महात्मा मुनि स्त्रीपरीषह विजयी होय. ११२ जिनमंदिर, मुनि व आपले आवडते गुरु यांना वंदन करण्यासाठीं जो देशांतरीं जातो व आपल्या संयमाला अनुकूल असा मार्ग पाहून योग्य अशा कालीं जो गमन करितो, जात असतां काटे, दगड यांच्या समुदायांनीं पाय फाटून गेलें असतांही गृहस्थाश्रमांतील नानाप्रकारच्या हत्ती घोडा, पालखी. वगैरे वाहनांची ज्याला आठवण होत नाही अशा मुनिराजाचें चर्यापरीषह जिंकणें सज्जनांना मान्य आहे. ११३ पर्वताची गुहा, पडकें घर वगैरे ठिकाणीं प्रथमतः शास्त्रोक्त पद्धतीनें येथें जीव-

नंतु चैत्ययतीन्गुरूनभिमतान्देशांतरस्यातिथेः ॥
पंथानं निजसंयमानुसदृशं काले यतेः स्वोचिते ॥
भिन्नांघ्रेरपि कंटकोपलचयैः पूर्वस्वयुग्यादिनः ॥
यानस्यास्मरतः सतामभिमतस्तस्यैव चर्याजयः ॥ ११२ ॥
भूभृद्गुहादिषु पुरा विधिवन्निरीक्ष्य वीरासनादिविधिना वसतो निकामं ॥
सर्वोपसर्गसहनस्य मुनेर्निषद्यापीडाजयो दुरितवैरिभिदोऽसेयः ॥ ११३ ॥
ध्यानागमाध्ययनभूरिपरिश्रमेण निद्रां मनाग्गतवतः स्थपुटोर्वरायां ॥
कुंथ्वादिमर्द्दनभियाऽचलितांगयष्टेः शय्यापरीषहजयो यमिनोऽवगम्यः ॥ ११४ ॥
मिथ्यात्वेन सदावलिप्तमनसां क्रोधाग्निसंदीपकं ॥
निंद्यासत्यतमादिवाक्यविरसं संशृण्वतोऽप्यस्रवं ॥

जंतु आहेत किंवा नाहींत हें नेत्रांनीं चांगलें पाहून त्या गुहादिक ठिकाणीं वीरासन वगैरे आसनें घालून जो बसतो व सर्व उपसर्ग सहन करितो अशा पापरूपी शत्रूचा नाश करणाऱ्या त्या मुनिराजाचा तो निषद्या परीषह विजय होय. ११४ ध्यान व शास्त्रपठन करून झालेल्या पुष्कळ परिश्रमानें उंच सखल अशा जमिनीवर जो थोडीशी झोंप घेतो. व झोपींत कृमिकीटकांना पीडा होईल त्यांचें मर्दन होईल या भीतीनें एकच बाजूनें जो झोप घेतो व आपलें अंग थोडेसे देखिल हालवित नाही अशा त्या मुनिराजाचा शय्यापरीषह जय जाणावा ११५ मिथ्यात्वकर्माच्या उदयानें ज्यांचें मन नेहमीं गर्वोद्धत बनलें असल्यामुळें, ज्यांच्या मुखांतून निंद्य व अतिशय असत्य, कठोर अशीं भाषणें बाहेर पडतात अशा मिथ्यात्वी लोकांचीं कटुवाक्यें क्रोधरूपी अग्नीला प्रज्वलित करणारी असतात तथापि तीं वारंवार ऐकूनही तिकडे लक्ष न देतां जो उत्कृष्ट क्षमा धारण करितो उत्तम बुद्धिधारक अशा त्या मुनीश्वराचा तो आक्रोश परिषह विजय होय. ११६ नानाप्रकारच्या शस्त्राचे

तद्व्यासंगविवर्जितेन मनसा क्षांतिं परां बिभ्रतः ॥
तस्याक्रोशपरीषहप्रसहनं ज्ञेयं यतेः सन्मतेः ॥ ११५ ॥
नानाविधास्त्रहातियंत्रनिपीलनाद्यैर्व्याहन्यमानतनुरप्यरिभिः
प्रसह्यम् ॥
ध्यानात्परादचलतः सहते विमोहो मोक्षोद्यतो वधपरीषहमप्यस-
ह्यम् ॥ ११६ ॥
नानारोगैर्बाधितोऽपि प्रकामं स्वप्नेप्यन्यान्याचते नौषधादीन् ॥
यः शांतात्मा ध्याननिर्धूतमोहो याञ्चा तेन ज्ञायते निर्जितेति ११७
महोपवासेन कृशीकृतोऽपि लाभादलाभं परमं तपो मे ॥
भैक्ष्यस्य योगीत्यपि मन्यते यो जयत्यलाभं स विनीतचेताः ११८
ग्रस्ताश्चिरं युगपदुत्थितचित्ररोगैर्जल्लौपधादिविविधर्द्धियुतोऽप्यु
पेक्षां ॥
काये परां प्रकुरुते खलु निःस्पृहत्वाद्यः सर्वदा गदपरीषहजित्स
योगी ॥ ११९ ॥

आघात, यंत्रांत पिळणें, एकेक अवयव तोडणें वगैरे प्रकारांनीं शत्रूच्या द्वारें जबर-दस्तीनें शरीराचा नाश केला जात असतांही मोहरहित व मोक्षप्राप्त करून घेण्या-साठीं उद्युक्त झालेला जो मुनीश्वर हें सर्व सहन करितो व उत्कृष्ट अशा आत्मध्या-नापासून भ्रष्ट होत नाहीं त्याचा हा असह्य वध परीषह जय जाणावा. ११७ जो नानारोगांनीं अतिशय पीडित होऊन देखिल स्वप्नांत देखिल औषधाची याचना करीत नाहीं, ज्यानें ध्यानाच्या द्वारें मोहाचा नाश केला आहे -अशा त्या शांत मुनीश्वराचा तो याचना परिषह विजय समजावा. ११८ पक्षोपवासादिक उपवा सांनीं कृश होऊन देखिल आहारलाभा पेक्षांही त्याचा लाभ न होणें हेंच माझें-उत्तम तप आहे असें जो समजतो शास्त्रांनीं संस्कृत झालें आहे मन ज्याचें असा तो योगीश्वर अलाभपरीषह विजयी जाणावा. ११९ ज्याला एकदम अनेक तऱ्हे-च्या रोगांनीं पीडित केलें आहे व ज्याला नाना रोगविनाशक जल्लौ [illegible] ऋद्धि प्राप्त झाल्या असतांही निस्पृहपणामुळे जो शरीराची बिलकुल परवा [illegible]ळगाति

यस्तीक्ष्णवर्त्मतृणकंटकशर्कराद्यैरादारितांघ्रियुगलोऽपिहतप्रयादम् ॥
चर्यादिषु प्रयतते विधिना क्रियासु तस्य प्रतीहि तृणतोदजयं
मुनीशः ॥ १२० ॥

अंभःकायिकसत्त्वहिंसनभिया स्नान क्रियामामृतेः
प्रत्याख्यातवतोऽपि दुःसहतरां कंडूतिमुद्धाटनं ॥
आरोहन्मलसंपदा प्रतिदिनं वल्मीकभूतं वपु—
र्बिभ्राणस्य परीषहो मलकृतो निर्श्रीयते योगिनः ॥ १२१ ॥

ज्ञाने तपस्यप्यकृताभिमाने निंदाप्रशंसादिषु यः समानः ॥
पूजापुरस्कारपरीषहस्य जेता स धीरो मुनिरप्रमादः ॥ १२२ ॥

नाहीं तो योगीश्वर रोगपरीषह विजयीं होय. १२० खराब रस्त्यांतील तीक्ष्ण काटे, वाळु, खूर दगड इत्यादिकानी ज्याचे दोनही पाय फाटून गेले असतांही बिलकुल आळस न करितां जाणें वगैरे क्रिया योग्य विधीनें करीत असतो अशा त्या मुनीश्वराचा तृण स्पर्श परीषह विजय जाणावा. १२१ जलकायिक जीवांची हिंसा होईल या भीतीनें आमरण ज्यानें स्नानत्याग केला आहे, वरचेवर ज्यांच्या अंगावर मळ चढत असल्यामुळें जो प्रतिदिवशीं वारूळासारखे ज्यांचें शरीर झाळे आहे असा भासू लागतो व पुष्कळ खाज सुटली असतांही जो ती व्यथा सहन कारतो अशा त्या साधूचा तो मलपरीषह विजय होय असे हें राजन तू समज. १२२ जो मुनिवर्य ज्ञान व तपश्चरणामध्यें बिलकूल अभिमान धारण करीत नाही. अर्थात् स्वतः अतिशय ज्ञानी व महातपस्वी असतांही जो बिलकुल निगर्वी आहे, निंदा प्रशंसा वगैरेमध्यें समानता धारण करिता तो सन्मुनि पूजा परीषह विजयी समजावा अर्थात अशा महामुनीचा कोणी आदरसत्कार नाही केला तरी मनांत त्याविषयी खेद मानीत नाहीत १२२ मी संपूर्ण द्वादशांग श्रुतज्ञानरूपी समुद्रातून तरून त्याच्या दुसऱ्या किनाऱ्यासजाऊन पोंचलो आहे. माझ्यापुढें हे अल्पज्ञ लोक पशुसारखे असल्यामुळे शोभत नाहींत अशा रीतीचा ज्ञानगर्व जो बिलकुल त्यागितो मोही स्वभाव ज्यानें नष्ट केला आहे अशा त्या साधूवर्याचा तो प्रज्ञा

तीर्णाखिलश्रुतमहांबुनिधेः पुरस्तादन्ये ममाल्पमतयःपशवो न भांति
इत्यादिकं मतिमदं जहतोऽवसेयः प्रज्ञापरीषहजयो हतमोहवृत्तेः॥१२३
किंचिन्न वेत्ति पशुरेष विषाणहीनो लोकैरिति प्रतिपदं खलु
निंदितोऽपि ॥
क्षांतिं न मुंचति मनागपि यः क्षमावानज्ञानजं विषहते स परीषहार्तिं
॥ १२४ ॥

वैराग्यातिशयेन शुद्धमनसस्तीर्णागमांभोनिधेः ॥
सन्मार्गेण तपस्यतोऽपि सुचिरं लब्धिर्न मे काचन ॥
संजातेत्यविनिंदितप्रवचनं संक्लेशमुक्तात्मनः ॥
तस्यादर्शनपीडनैकविजयो विज्ञायते श्रेयसे ॥ १२५ ॥
चारित्रमाद्यं कथितं जिनेंद्रैः सामायिकं तद्विविधं प्रतीहि ॥
कालेन युक्तं नियमेन चैकं तथा परं चानियतेन राजन् ॥ १२६ ॥

परीषह जय होय! १२४ हा कांहीं जाणत नाहीं. शिंगें नसलेला हा पशु आहे असें लोकांनीं प्रत्येक पावलीं जरी निंदा केली तरीही जो थोडादेखील क्षमेचा त्याग करीत नाहीं तो क्षमावान् मुनि अज्ञान परीषहाचा विजयी समजावा. १२५ तीव्र वैराग्यानें अंतःकरण निर्मळ बनून मी संपूर्ण द्वादशांगश्रुतज्ञानरूपी समुद्र तरून गेलो आहे. रत्नत्राय मार्गाला अनुसरून फार दिवसापासून तीव्र तपश्चरण करीत असतांही मला अद्यापि एकही लब्धि-ऋद्धि प्राप्त झाली नाहीं यास्तव तपस्व्यांना अनेक ऋद्धि प्राप्त होत असतात असें शास्त्रांत लिहिलेलें वचन खोटें आहे असें मानून जो शास्त्राची बिलकुल निंदा करीत नाहीं व अंतःकरणांतून संक्लेश परिणामाला जो दूर सारतो अशा त्या मुनिरायाचा अदर्शन परीषहविजय मोक्षाला कारण मानला जातो. १२६ श्री जिनेंद्रांनीं पहिल्या सामायिक चारित्राचे दोन भेद सांगितले आहेत. पहिल्या भेदाचा काल ठराविक असतो व दुसऱ्या भेदाचा तसा नसतो. स्वाध्याय, प्रतिक्रमण, वंदना वगैरे कर्तव्यें नियमितकालीं करावयाचीं असतात म्हणून ह्यास नियतकालिक सामायिक म्हणतात. व ईर्यापथ वगैरे कांहीं क्रियांचा काल ठरवितां येत नाहीं. देववंदना, आहार, शौच वगैरे क्रिया करावयाच्या वेळीं ईर्यापथ करावें लागतें यास्तव याचा काल ठरवितां येत नाहीं. सामायिक म्हणजे अन्तर्मुहूर्त वगैरे कालप्रमाण करून पंच पातकांचा सर्वत्र त्याग करणें. स्वाध्याय वगैरे

छेदोपस्थापनाख्यं निरुपमसुखदं मुक्तिसोपानभूतं ॥
चारित्रं तद्द्वितीयं दुरितविजयिनां जैत्रमस्त्रं मुनीनां ॥

प्रत्याख्यातप्रमादस्खलननियमनं स्वागमानुक्रमेण ॥
छेदोपस्थापनेति प्रकथनमथवा या निवृत्तिर्विकल्पात् ॥ १२७ ॥
परिहारविशुद्धिनामधेयं नृप ! चारित्रमवेहि तत्तृतीयं ॥
परिहारविशुद्धिरित्युदीर्णा सकलप्राणिवधात्परा निवृत्तिः ॥१२८॥
उपलक्षय सूक्ष्मसांपरायं नृप ! चारित्रमनुत्तरं तुरीयम् ॥
अतिसूक्ष्मकषायतस्तत्प्रवदंतीह यथार्थनाम संतः ॥ १२९ ॥

क्रियेंत ही यांचा त्याग होतोच ह्मणून या क्रियांनाही सामायिक ह्मणण्यास हरकत नाहीं. १२७ छेदोपस्थापना नांवाचे दुसरे चारित्र उत्कृष्ट सुख देणारें व मोक्ष प्राप्तीस पायरीप्रमाणे आहे. हें मुनीश्वराच्या पातकांचा नाश करून देणारे विजयी शस्त्र आहे व्रतें व नियम यांच्या आचरणांत प्रमादानें दोष लागल्यावर आगमांत सांगितलेल्या प्रायश्चित्तविधीनें त्या दोषापासून आपलें रक्षण करणे यास किंवा विकल्पांचा—अहिंसा, सत्य वगैरे विकल्पांचा त्याग करून अभेदरूपानें पाळणें यास छेदोपस्थापना ह्मणतात.

१२८ हे राजन्, परिहार विशुद्धि नांवाचें तिसरें चारित्र आहे. संपूर्ण प्राणिवधापासून पूर्ण निवृत्ति होणें यास परिहारविशुद्धि नांवाचें चारित्र ह्मणतात असे तूं समज. या चारित्राचा धारक मुनिराज षट्काय जीवांनीं पूर्ण भरलेल्या प्रदेशांतून जरी विहार करूं लागला तरी ही कमळ पाण्यांत असूनही तें जसें त्यापासून अलिप्त असतें त्याप्रमाणें यालाही पापापासून अलिप्त राहतां येतें, अर्थात् या मुनीच्या ठिकाणी अशी एक विलक्षणता उत्पन्न होते कीं त्या प्राण्यांना तिळमातही त्रास पोहोंचत नाहीं. यास्तव या चारित्राचे परिहारविशुद्धि हे नांव योग्य आहे. १२९ हे राजेश्वरा ! सूक्ष्मकषाय नांवाचें चौथें उत्कृष्ट चारित्र आहे. हें चारित्र क्रोध मान माया या कषायांचा उपशम अथवा क्षय झाला असतां आणि लोभ अत्यंत क्षीण झाला असता मुनिवर्यास प्राप्त होतें असें समज. या चारित्राचें सूक्ष्म कषाय हें नांव अगदीं अन्वर्थक आहे. १३० चारित्र मोहनीय कर्माचा पूर्ण क्षय अथवा उपशम झाला असतां यथाख्यात नांवाचें प्रसिद्ध असें पाचवें चारित्र आत्म्याला प्राप्त होतें. हे नरेश्वरा ! या चारित्रामुळें जीवाला आपले खरें

जिनैर्यथाख्यातमिति प्रतीतं चारित्रमुक्तं खलु पंचमं तत् ॥
चारित्रमोहोपशमात्क्षयाच्च याथात्म्यमात्मा समुपैति येन ॥१३०॥
अथावगच्छ द्विविधं तपस्त्वं बाह्यं सदाभ्यंतरमित्यपीष्टं ॥
प्रत्येकमेकं खलु षड्विधं तद्वक्ष्ये समासेन तयोः प्रभेदान् ॥ १३१ ॥
रागस्य प्रशमाय कर्मसमितेर्नाशाय दृष्टे फले ॥
दृष्टे चाप्यनपेक्षणाय विधिवद्ध्यानागमावाप्तये ॥
सिद्ध्यै संयमसंपदोऽप्यनशनं धीरः करोत्यादरात् ॥
तेनैकेन हि नीयते मतिमतां दुष्टं मनो वश्यतां ॥ १३२ ॥
प्रजागरायोद्धतदोषशान्त्यै संवाहनार्थं च सुसंयमस्य ॥
स्वाध्यायसंतोषनिमित्तमुक्तं सदावमोदर्यमुदारबोधैः ॥ १३३ ॥

स्वरूप पूर्ण प्राप्त होतें. १३१ हे राजन्! तपाचें बाह्य तप व अभ्यंतर तप असे दोन भेद आहेत व हे दोन भेद आत्म्याचें कल्याण करणारे आहेत. या प्रत्येक भेदाचे सहा सहा प्रकार आहेत. यांचें मी संक्षेपानें स्वरूप सांगतो. १३२ राग विकार शांत व्हावा, कर्मांचा नाश व्हावा ह्मणून आदरसत्कार, कीर्ति वगैरे ऐहिक सुंदर फलांची इच्छा न ठेवितां हें दोन प्रकारचें तप करावें लागतें. शास्त्रोक्त पद्धतीनें ध्यानाची प्राप्ति व्हावी व संयम संपत्ति लाभावी ह्मणून धीर मुनि अनशन नांवाचें पहिलें बाह्य तप आदरानें करीत असतात. याच एका तपानें बुद्धिमान लोकांना आपलें दुष्ट मन स्वाधीन ठेवतां येते. अनशन ह्मणजे अन्न, पिण्याचे पदार्थ, खाद्य–बर्फी, लाडू, चिवडा वगैरे, व चाटण्याचे पदार्थ या चार आहारांचा त्याग करणें. याचें षष्ठ, अष्टम, पक्ष, मास वगैरे पुष्कळ भेद आहेत. १३३ जागरूकपणा, वातापित्तादिकांचें उपशमन, संयम चांगला पाळता येणें, स्वाध्याय व संतोष या गोष्टींच्या सिद्ध्यर्थ हें अवमोदर्य तप करावें असें केवलज्ञानी जिनेश्वर भव्यांना सांगतात. कमी आहार घेणें यास अवमोदर्य किंवा ऊनोदर ह्मणतात. एक हजार तांदळांचा घास या प्रमाणास धरून पुरुषाचा आहार बत्तीस घास प्रमाण मानलेला आहे, एकेक घास कमी करीत करीत एक घासापर्यंत आहार घेणें हें सर्व ऊनोदराचे भेद होतात. १३४ एक घर, गल्ली, दाता, अन्न, वगैरेविषयीं कांहीं संकल्प करणें यास वृत्तिपरिसंख्यान ह्मणतात. अशा संकल्पाने मन ताब्यांत

संकल्प एकभवनादिक गोचरो यश्चित्तावरोधनमवेहि तपस्तृतीयं
तृष्णारजःशमनवारि निरत्ययाया लक्ष्म्यास्तदेव हि वशीकरणैक-
मंत्रं ॥ १३४ ॥
दुष्टेन्द्रियाश्वगणदर्पविनिग्रहार्थं निद्राप्रमादविजयाय तपश्चतुर्थं ॥
स्वाध्याययोगसुखसिद्धिनिमित्तमुक्तं त्यागो घृतप्रमुखवृक्षरसस्य
यस्तत् ॥ १३५ ॥
यथागमं शून्यगृहादिकेषु विविक्तशय्यासनमामनंति ॥
स्वाध्यायदेवव्रतयोगसिद्ध्यै मुनेस्तपः पंचममर्चितं तत् ॥ १३६ ॥
ग्रीष्मातपस्थितिघनागमवृक्षमूलवासाभ्रवासविविधप्रतिमादिकं तत्
षष्ठं तपः परमवेहि नरेंद्र! कायक्लेशाभिधानमिदमेव तपः सुमुख्यं १३७

राहतें. हें तप लोभरूपी धूळ धुऊन टाकण्यास पाण्यासारखें आहे व निर्बाध अशा मोक्षलक्ष्मीला वश करण्यास हें वशीकरण मंत्रासारखें आहे. अमुक दात्यानें आहार दिला तर घेईन, अमुक पात्रांतून आहार दिला तर घेईन इत्यादि संकल्पास वृत्तिपरिसंख्यान तप ह्मणावें. १३५ दुष्ट इंद्रियरूपी घोड्यांची मस्ती नाहींशी व्हावी ह्मणून व निद्रा व आळस यांना जिंकण्यासाठीं, स्वाध्याय व ध्यान यांची सुखानें प्राप्ती व्हावी ह्मणून, तूप साखर वगैरे रसाचा त्याग करणें यास रसपरित्याग तप ह्मणावें १३६ शास्त्राला अनुसरून पडकें घर, सोडून दिलेलें घर, पर्वताची गुहा वगैरे ठिकाणीं स्वाध्यायतपासाठीं व ब्रह्मचर्यव्रत चांगलें पाळावें ह्मणून मुनि निजतात व बसतात त्यांचें हें विविक्त शय्यासन नांवाचें हें पांचवें पूज्य तप होय.

१३७ उन्हाळ्यांत उन्हामध्यें तपश्चरण करणें, पावसाळ्यांत झाडाच्या खालीं तप करणें, इतर वेळीं अर्थात्–हिवाळ्यांत उघड्या मैदानांत तपश्चरण करणें तसेंच रात्रीं स्मशान वगैरे ठिकाणीं ध्यान धरणें, सूर्यासंमुख मुख करून ध्यान धरणें वगैरे प्रकारानें तप करणें यास हे राजन्! कायक्लेश नांवाचें तप म्हणतात असें समज. हेंच तप सर्व तपामध्यें मुख्य आहे. १३८ सर्वज्ञ जिनेश्वराच्या आज्ञेला अनुसरून प्रमादापासून जे दोष आपल्या हातून घडून येतात त्यांचें नियमन करणें अर्थात् ज्या उपायांनीं ते दोष दूर होतात असें आगमामध्यें सांगितलें आहे ते उपाय अमलांत आणणें यास प्रायश्चित्त तप म्हणतात. या तपाचे दहा

अथ दशविधं प्रायश्चित्तं प्रमादभवागसां
प्रतिनियमितं सर्वज्ञाज्ञाप्रणीतविधानतः ॥
प्रवयसि जने प्रव्रज्याद्यैः स यः परमादरो ॥
भवति विनयो मूलं मुक्तेः सुखस्य चतुर्विधः ॥ १३८ ॥
निजतनुवचःसाधुद्रव्यांतरैर्यदुपासनं ॥
ननु दशविधं वैयावृत्त्यं यथागममीरितं ॥
अविरतमथ ज्ञानाभ्यासो मनःस्थितिशुद्धये ॥
शमसुखमयः स्वाध्यायोऽसौ दशार्धविधो मतः ॥ १३९ ॥

भेद सांगितले आहेत. दीक्षा, ज्ञान, तप वगैरेनीं अधिक अशा वयोधिक मुनि आचार्य वगैरे विषयीं जो उत्कृष्ट आदर करणें तें विनय नांवाचें तप होय. याचे दर्शनविनय, ज्ञानविनय, चारित्रविनय व उपचारविनय असें चार भेद आहेत. शंकादि दोषरहित असें तत्वावर श्रद्धा ठेवणें हा दर्शन-विनय. मोठ्या आदरानें ज्ञानाचा अभ्यास करणें, मनन करणें यास ज्ञानविनय म्हणतात. चारित्रांत पूर्ण स्थिरता असणें हा चारित्रविनय व प्रत्यक्ष आचार्य आले असतां उठून उभा राहणें, हात जोडणें वगैरे उपचारविनय होय. हा विनय मुक्तिसुखाचें मूळ आहे. १३९ स्वतःचें शरीर, वचन, व निर्दोष असे औषधादि-पदार्थ यांच्या साहाय्यानें मुनीश्वरांची आगमाला अनुसरून उपासना करणें-सेवा सुश्रुषा करणें यास वैयावृत्य म्हणतात. याचे आगमांत दहा भेद सांगितले आहेत. मनाची विशुद्धता चांगली राहावी म्हणून नेहमीं ज्ञानाभ्यास करणें यास स्वाध्याय ह्मणतात. हा स्वाध्याय शांति व सुख यांनीं भरलेला आहे अर्थात् यापासून याची प्राप्ति होत असते. या स्वाध्याय तपाचे पांच भेद आहेत. निर्दोष ग्रंथ शिकविणें यास वाचना ह्मणतात. संशय नाहींसा होण्याकरितां अथवा आपणास असलेल्या माहितींत बळकटी यावी ह्मणून प्रश्न करणें यास पृच्छना ह्मणावें. शुद्ध पाठ ह्मणणें तो आम्नाय व जाणलेल्या तत्वाचें वारंवार मनानें चिंतन करणें यास अनुप्रेक्षा, धर्मकथा सांगणें, उपदेश देणें यास धर्मोपदेश ह्मणतात. १४० मी या पदार्थाचा स्वामी आहे व ही वस्तु माझी आहे अशा प्रकारच्या आपल्या संकल्प बुद्धीचा उत्तम रीतीनें त्याग करणें यास जिनेश्वरांनीं व्युत्सर्ग तप असें नांव दिलें आहे. याचे बाह्योपाधि त्याग-घर, धनधान्य यांचा त्याग करणें व

आत्मात्मीयायाः स्वसंकल्पबुद्धेः सम्यक्त्यागो यः प्रणीतो जिनेंद्रैः ॥
स व्युत्सर्गो द्विप्रकारः प्रतीतो ध्यानं चातः सप्रभेदं प्रवक्ष्ये ॥१४०॥
अवेहि सत्संहननस्य सूक्तमेकाग्रचिंतासुनिरोध एकः ॥
ध्यानं जिनेंद्रैः सकलावबोधैरंतर्मुहूर्तादथ तच्चतुर्धा ॥ १४१ ॥
आर्तं च रौद्रं नरनाथ! धर्म्यं शुक्लं च तद्भेद इति प्रणीतः ॥
संसारहेतू प्रथमे प्रदिष्टे स्वर्मोक्षहेतू भवतः परे द्वे ॥ १४२ ॥
आर्तं विद्धि चतुर्विधं स्मृतिसमन्वाहार इष्टेतरा–
वासेस्तद्विरहाय चेष्टविरहे तत्संगमायेति यः ॥
अप्यत्युद्धतवेदनाभिहतये घोरं निदानाय तत्–
प्रादुर्भूतिरुदाहृता खलु गुणस्थानेषु षट्स्वादितः ॥ १४३ ॥

अभ्यंतरोपाधि-क्रोधादि विकाराचा त्याग करणें असे दोन भेद आहेत. आतां ध्यानाचे भेदसहित मी वर्णन करितों. १४१ एकाच विषयाकडे विचाराला रोकून ठेवणें यास ध्यान म्हणतात. हें ध्यान वज्रवृषभनाराच, वज्रनाराच व नाराच या तीन संहननधारकांना अंतर्मुहूर्तपर्यंत होऊं शकतें असें सर्वज्ञ जिनांनीं सांगितलें आहे असें हे राजन्! तूं समज. १४२ या ध्यानाचे आर्तध्यान, रौद्रध्यान, धर्म्यध्यान आणि शुक्लध्यान असे चार भेद आहेत. हे राजाधिराज, पहिलीं दोन ध्यानें संसाराला व शेवटचीं दोन ध्यानें मोक्षाला कारण आहेत. १४३ आर्तध्यान चार तऱ्हेचे आहे. अनिष्ट पदार्थांचा संयोग झाला असतां तो दूर व्हावा असा नेहमीं विचार करणें, यास अनिष्ट संयोगज आर्तध्यान म्हणतात. आवडत्या पदार्थाचा वियोग झाला असतां त्यांच्या प्राप्तीविषयीं नेहमीं विचार करणें यास इष्टवियोगज आर्तध्यान म्हणतात. रोगापासून वेदना उत्पन्न होऊं लागली असतां ती दूर व्हावी असा नेहमीं विचार करणें व पुढें मला उत्तम भोग्य पदार्थ मिळावेत अशी इच्छा असणें हें निदान आर्तध्यान होय. पहिलीं तीन ध्यानें पहिल्या गुणस्थानापासून साहव्या गुणस्थानापर्यंत होतात; सहाव्या गुणस्थानांत निदान आर्तध्यान होत नाहीं.

१४४ हिंसा, असत्य भाषण, चोरी व परिग्रहाचें रक्षण करणें या कार्यांत आनंद मानून जाणें व त्यामुळें परिणामामध्यें अतिशय क्रूरता उत्पन्न होणें यास

हिंसानृतस्तेयपरिग्रहैकसंरक्षणेभ्यः खलु रौद्रमुक्तं ॥
तस्य प्रयोक्ता विरतो निकामं स्यात्संयतासंयतलक्षणश्च ॥ १४४ ॥
आज्ञापायविपाकसंस्थितिभवं धर्म्यं चतुर्धा मतं
यः सम्यग्विचयाय तत्स्मृतिसमन्वाहार आपादितः ॥
भावानामतिसौक्ष्म्यतो जडतया कर्मोदयादात्मनः ॥
तत्राज्ञाविचयो यथागमगतं द्रव्यादिसंचिंतनम् ॥ १४५ ॥
मिथ्यात्वेन सदा विमूढमनसो जात्यंधवत्प्राणिनः ॥
सर्वज्ञोक्तमताच्चिराय विमुखा मोक्षार्थिनो ज्ञानिनः ॥
सन्मार्गादवबोधनादभिमताद्दूरं प्रयांतीति यत् ॥
मार्गोपायविचिंतनं तदुदितं धर्म्यं द्वितीयं बुधैः ॥ १४६ ॥
अपायविचयोऽथवा निगदितो जिनैः कर्मणां
अपायविधिचिंतनं नियतमात्मनः संततम् ॥
अपेयुरहितादिमे कथमनादिमिथ्यात्वतः
शरीरिण इतीरिता स्मरणसंततिश्चापरा ॥ १४७ ॥

रौद्रध्यान म्हणतात. या ध्यानाचा स्वामी अविरत जीव व संयतासंयत अर्थात् श्रावक हे होत. श्रावकाला परिग्रहांचें संरक्षणामुळें हें ध्यान होऊं शकतें परंतु तें त्याला नरकगतीला कारण असूं शकत नाहीं. मुनींना जर हें रौद्रध्यान होऊं लागलें तर ते आपल्या संयमापासून भ्रष्ट होतात. १४५ रत्नत्रयधर्मापासून जें वेगळें नाहीं त्यास धर्म्यध्यान म्हणतात. याचें आज्ञाविचय, अपायविचय, विपाकविचय व संस्थानविचय असे चार भेद आहेत. आज्ञा वगैरेचा उत्तम रीतीनें वारंवार विचार करणें, स्मरण करणें, यास धर्म्यध्यान म्हणतात. जीवादिपदार्थांचें सूक्ष्म स्वरूप स्वतःला कर्मोदयामुळें बुद्धीला मांद्य आल्यानें शास्त्रांत जसें सांगितलें असेल तसें प्रमाण मानून त्याचें वारंवार चिंतन करणें यास आज्ञाविचय धर्म्यध्यान म्हणतात. १४६ जन्मांधाला कांहीं दिसत नसल्यामुळें तो खाच खळग्यांत जसा पडतो तसें मिथ्यात्वानें या जीवांचें मन नेहमीं मूढ बनलें आहे यामुळें हे सर्वज्ञ जिनेश्वरांनीं दाखविलेल्या सन्मार्गापासून भ्रष्ट होत आहेत. जिनेश्वराच्या

यज्ज्ञानावरणादिकर्मसमितेर्द्रव्यादिकं प्रत्ययः ।
प्रोद्यच्चित्रफलोच्चयानुभवनं प्रत्येकसंचिंतनम् ॥
सम्यक्तान्नितरां विपाकविचयो लोकस्य संस्थाविधेः ॥
यत्संस्थाविचयो निरूपणमिति स्यादप्रमत्ताच्च तत् ॥ १४८ ॥
चतुर्विकल्पं निगदंति शुक्लध्यानं जिना ध्यानविभिन्नमोहाः ॥
आद्ये सदापूर्वविदो भवेतां परे परं केवलिनः प्रणीते ॥ १४९ ॥
प्रोक्तस्त्रिवर्गस्य जिनैः पृथक्त्ववितर्क आद्यः स इति प्रणीतं ॥
द्वितीयमेकत्ववितर्क एकयोगस्य च ध्यानमनूनबोधैः ॥ १५० ॥

कल्याणकारक उपदेशापासून हे अज्ञ प्राणी फार दूर जात आहेत यामुळें संसार भ्रमरूपी अपाय यांना झाला आहे असें चिंतन करणें व यापासून यांच्या उद्धाराच्या उपायाचा विचार करणें यास उपाय विचय धर्म्यध्यान म्हणतात. १४७ कर्मापासून जीवाचें नेहमीं अकल्याण होतें असें जिनांनीं सांगितले आहे. सर्व कर्मापैकीं मिथ्यात्व कर्म हेंच जीवाचा फार अपाय करिते अशा मिथ्यात्वापासून हे प्राणी कसें बरे दूर होतील ? असें नेहमीं स्मरणरूप चिंतन करणें यास अपाय विचय असेंही ह्मणतात. १४८ ज्ञानावरणादिक आठ कर्मे द्रव्य, क्षेत्र, काल, भाव इत्यादि कारणसामग्री मिळाली असतां उदयाला येऊन नानाप्रकारची फळें–सुखदुःखादिक फळें जीवास भोगावीं लागतात. त्या प्रत्येक कर्माच्या फलाचें उत्तम रीतीनें चिंतन करणें यास विपाकविचय असें ह्मणतात. लोकाच्या आकाराचा व त्यामध्यें होत असलेल्या दुःखादिकांचा व लोकांच्या अनेक भेदाचा–स्वर्ग, नरक, द्वीप, समुद्र, मोक्ष इत्यादिकांचा विचार करणें यास संस्थानविचय असें ह्मणतात. हें धर्मध्यान अविरत सम्यग्दृष्टि, संयतासंयत, प्रमत्तविरत व अप्रमत्तविरत या चार गुणस्थानातील जीवांना होते. १४९ शुक्लध्यान चार प्रकारचें आहे असें ध्यानाच्या द्वारें मोहनीय कर्म ज्यांनीं नष्ट केलें आहे अशा श्री जिनेश्वरानीं सांगितलें आहे. पहिलीं दोन ध्यानें चौदा पूर्वांचें ज्ञान ज्यांना आहे अशा मुनीश्वरास होतें व पुढचीं दोन ध्यानें सयोग केवली व अयोग केवली या उभयतांना होत असतात. जसें अतिशय स्वच्छ केलेलें वस्त्र पूर्ण पांढरें होतें तसें या ध्यानामध्यें आत्म्याचे परिणाम अगदीं निर्मळ होतात म्हणून या ध्यानास शुक्लध्यान हें नाव आहे.

सूक्ष्मक्रियासु प्रतिपादितेन सूक्ष्मक्रियादिप्रतिपातिनामा ॥
तत्काययोगस्य वदंति शुक्लं तृतीयमालोकितविश्वलोकाः ॥१५१॥
अथो विपूर्वोपरतक्रियादिका निवृत्तिकाख्या परमस्य कीर्तिता ॥
नरेन्द्र शुक्लस्य समस्तदर्शिभिर्भवत्ययोगस्य तदन्यदुर्लभम् ॥१५२॥
एकाश्रये विद्धि कुशाग्रबुद्धे वितर्कवीचारगते निकामं
पूर्वे द्वितीयं त्रिजगत्प्रदीपैर्जिनैरवीचारमिति प्रणीतम् ॥ १५३ ॥
बुधा वितर्कं श्रुतमित्युशन्ति वीचार इत्याचरणप्रधानाः ॥
अर्थस्य च व्यंजनयोगयोश्च संक्रान्तिमाक्रान्तशमैकसौख्याः॥१५४॥

१५० पृथक्त्व वितर्क हें पहिलें शुक्ल ध्यान मन वचन व काययोग या तीनही योगांनीं उत्पन्न होतें अर्थात् तीन योगाचे धारक असे पूर्व श्रुतज्ञान्याला हें पहिलें शुक्लध्यान होतें. दुसरें एकत्ववितर्क नांवाचें शुक्लध्यान तीन योगापैकीं कोणत्याही एक योगाला धारण करणाऱ्या मुनीराजास होतें असें पूर्ण ज्ञान धारण करणारे जिनेश्वर सांगतात. १५१ ज्यावेळीं सयोग केवली जिनेश्वर योगनिरोध करितात त्यावेळीं काय योगाला अतिशय सूक्ष्म करितात. या योगाला सूक्ष्म करतांना त्यांना सूक्ष्म क्रिया प्रतिपाति हें ध्यान होतें. यावेळीं इतर योग आधींच नष्ट झालेले असतात. असें सर्व तत्वांना पाहिलेले अरहंत भगवान सांगतात. या ध्यानाचें द्वारें भगवान् अयोग केवली बनतात. १५२ यानंतर व्युपरत क्रिया निवृत्ति नांवाचें चौथें शुक्लध्यान होतें. हें ध्यान सर्वोत्कृष्ट आहे. हें अयोग केवलींना होतें. इतरांना याची प्राप्ति होत नाहीं. असें सर्वदर्शी जिनेश्वरानीं सांगितलें आहे. या अयोग केवलीच्या अवस्थेंत योगाचा पूर्ण निरोध होतो. व त्यामुळें या ध्यानाचें व्युपरतक्रिया निवृत्ति असें नांव आहे १५३ पृथक्त्ववितर्क व एकत्ववितर्क हीं दोन शुक्लध्यानें हे निपुण राजन् एकाच आधारांत असतात अर्थात् चौदा पूर्वांचे ज्यांना ज्ञान आहे अशा मुनीश्वरांना हीं दोन ध्यानें होत असतात. पहिल्या शुक्ल ध्यानांत वितर्क व वीचार असतो म्हणून त्यानें पृथक्त्ववितर्क वीचार असें नांव आहे. दुसऱ्या ध्यानांत वीचार नसतो म्हणून त्यास त्रैलोक्याला दिपासारखे प्रकाशित करणाऱ्या जिनेश्वरांनीं एकत्व वीतर्क अवीचार असे नांव दिलें आहे. १५४ आचरणाला—चारित्राला प्रधानमुख्य समजणारे मुनीश्वर श्रुतज्ञानाला वितर्क असें नांव देतात. व ज्यांनीं समतारूप अद्वितीय सुखाची प्राप्ति करून घेतली आहे अशा जिनेश्वरांनीं अर्थ व्यंजन व योग यांच्या संक्रमणाला वीचार असें नाव दिलें आहे.

ध्येयं द्रव्यमथार्थमित्यभिमतं तत्पर्ययो वापरो
राजव्यंजनमित्यवेहि वचनं योगांगवाक्चेतसां ॥
प्रस्पंदः परिवर्तनं यदुदितं संक्रान्तिरित्यंजसा ॥
स्वालम्ब्यैकतमं क्रमेण विधिना कृत्स्नेषु चार्थादिषु ॥ १५५ ॥
द्रव्याणुं सुवशीकृताक्षतुरगो भावाणुमप्यादतो
ध्यायन्प्राप्तवितर्कशक्तिरनघः सम्यक्पृथक्त्वेन यः ॥
अर्थादीन्मनसा क्रमाच्च शमयन् संसर्पतोन्मूलयन् ॥
मोहस्य प्रकृतीरसौ वितनुते ध्यानं सदाद्यं मुनिः ॥ १५६ ॥
प्राप्यानंतगुणैकशुद्धिसहितं योगं विशेषक्रमात्।
छिंदन्मोहतरुं समूलमचिराज्ज्ञानावृतेः संततं ॥

१५५ ज्याचें चिंतन करावयाचें त्याला ध्येय ह्मणतात. द्रव्य, गुण व पर्याय यांचा जो समुदाय त्यास अर्थ ह्मणतात व हा अर्थच ध्येय आहे व्यंजन ह्मणजे शब्द अर्थात् शास्त्रांतील 'एको ह शाश्वतः आत्मा ज्ञानदर्शनलक्षणः' इत्यादि वाक्यांना व्यंजन असें ह्मणतात. शरीर, वचन व मनाची जी प्रवृत्ति चलन वलन होते यास संक्रांति ह्मणतात. ही संक्रांति तीन प्रकारची आहे. अर्थ संक्रांति, व्यंजन संक्रांति व योगसंक्रांति. द्रव्यरूप ध्येयाला सोडून पर्याय किंवा गुणरूपी ध्येयाकडे प्रवृत्ति होणें ही अर्थ संक्रांति होय. एका श्रुत शब्दाचा किंवा वाक्याचा आश्रय घेऊन ध्यान करीत असतां तें सोडून दुसऱ्या श्रुतवचनाचा आश्रय घेणें तें सोडून तिसऱ्याचा घेणें या सर्वाला व्यंजन संक्रांति म्हणतात. काययोगाच्या आश्रयानें आधीं ध्यान करून नंतर मनोयोगानें ध्यान करणें तोही सोडून नंतर वचन किंवा मनोयोगानें ध्यान करणें इत्यादिकांना योग संक्रान्ति ह्मणतात. पहिल्या ध्यानांत दृढता नसतें म्हणून असें परिवर्तन होतें परंतु दुसऱ्या ध्यानांत हा प्रकार नाहीं. १५६ इंद्रियरूपी घोड्यांना ज्यानें उत्तम वश केलें आहे असा मुनिराज श्रुत ज्ञानाची शक्ति प्राप्त करून घेऊन द्रव्यगुण पर्याय वगैरेचें वेगळें वेगळें चिंतन करितो. आपल्या मनोवेगानें द्रव्याणु म्हणजे द्रव्याचा सूक्ष्मपणा व भावाणु म्हणजे भावाचा स्वसंवेदन परिणामाचा सूक्ष्मपणा याचें मुनिराज चिंतन करितो. आपल्या परिणामाच्या निर्मलतेनें मोहनीय कर्माच्या प्रकृतींना शमविणें किंवा त्यांचा क्षय करणें हीं कार्यें या पहिल्या ध्यानांत होतात.

रुंधन्बंधमपि स्थितेश्च जनयन् ऱ्हासक्षयौ निश्चलः ॥
स्यादेकत्ववितर्कभागिति यतिः कर्माणि हंतुं सहः ॥ १५७ ॥
अर्थव्यंजनयोगसंक्रमणतः सद्यो निवृत्तश्रुतः ॥
साधुः साधुकृतोपयोगसहितो ध्यानक्षमाकारभृत् ॥
ध्यायन्क्षीणकषाय इत्यचलितस्वांतः पुनर्ध्यानतः ॥
निर्लेपो न निवर्तते मणिरिव स्वच्छाकृतिः स्फाटिकः ॥ १५८ ॥
निःशेषमेकत्ववितर्कशुक्लध्यानाग्निदग्धाखिलघातिदारुः ॥
ज्ञानं परं तीर्थकरः परो वा स केवली केवलमभ्युपैति ॥ १५९ ॥
चूडारत्नांशुजालैः किशलयितकरैर्वंद्यमानः सुरेंद्रैः ॥
स्वज्ञानान्तर्निमग्नत्रिजगदनुपमस्तीर्णसंसारसिंधुः ॥
उत्कर्षेणायुषोऽसौ विहरति भगवान्भव्यवृंदैः परीतो ॥
देशोनां पूर्वकोटीं शशिविशदयशोराशिभिः श्वेतिताशः ॥ १६० ॥

१५७ अनतपर्टीनीं ज्यांत विशुद्धि झाली आहे अशा कोणत्यातरी एका योगाचा आश्रय करून विशेषरीतीनें क्रमानें मोहनीय कर्माचा नाश करण्यास मुनिराज सुरवात कारितात. व त्यावेळीं मोह सर्व मूळसहित नष्ट करून टाकितात. याच प्रमाणें ज्ञानावरणीय कर्माचा बंध रोकून व त्याची स्थिति कमी करून टाकितात. अशा रीतीनें मुनिराज ज्यांचा योग निश्चल आहे असे बनले ह्मणजे ते कर्मनाश करण्यास समर्थ होतात. असले यति एकत्ववितर्कशुक्लध्यानी होत. १५८ जेव्हां या ध्यानास मुनिराज सुरवात कारितात त्यावेळीं त्यांचें श्रुतज्ञान निश्चल होतें व त्यावेळीं अर्थ व्यंजन व योग यांच्या सक्रांति ह्मणजे परिवर्तनें नाहींशीं होतात. व योगाची पूर्ण एकाग्रता प्राप्त होते. ध्यानाला योग्य अशा आकाराचे धारक असे ते मुनिराज या एकत्व वितर्क ध्यानापासून जेव्हां परावृत्त होत नाहींत तेव्हां त्याचें क्षीण कषाय हें गुणस्थान प्राप्त होतें. त्यावेळीं यांचा आत्मा स्वच्छ आकाराच्या स्फटिक मण्याप्रमाणें निर्लेप बनतो अर्थात् मोहनीय कर्माचा पुनः त्यांना बंध होत नाहीं. १५९ एकत्ववितर्क शुक्लध्यानरूपी अग्नीने जाळून टाकिले आहेत ज्ञानावरण, दर्शनावरण मोहनीय व अंतराय कर्म संपूर्ण ज्यांनीं असे ते तीर्थंकर किंवा सामान्य मुनि केवलज्ञानाला प्राप्त होतात. १६० तेव्हां

अन्तर्मुहूर्तस्थितिकं यदायुस्तत्तुल्यवेद्यान्वितनामगोत्रः ॥
विहायवाङ्मानसयोगमन्यं स्वकाययोगं खलु बादरं च ॥ १६१ ॥
आलंब्य सूक्ष्मीकृतकाययोगमयोगतां ध्यानबलेन यास्यन् ॥
सूक्ष्मक्रियादिप्रतिपातिनाम ध्यायत्यसौ ध्यानमनन्यकृत्त्वः ॥१६२॥
आयुःस्थितेरप्यपरं निकामं कर्मत्रयं यद्यधिकं स्थितं स्यात् ॥
तदा समुद्घातमुपैति योगी तत्तुल्यतां तत्त्रितयं च नेतुं ॥१६३॥
दंडं कपाटमनघं प्रतरं च कृत्वा स्वं लोकपूरणमसौ समयैश्चतुर्भिः ॥
तावद्भिरेव समयैरुपसंहृतात्मा ध्यानं तृतीयमथ पूर्वविदभ्युपैति
॥ १६४ ॥

चूडामणिरत्नाच्या किरण समूहांनीं ज्यांचे हात पालवी फुटल्याप्रमाणें शोभतात अशा देवेन्द्राकडून जे वंदिले जातात. ज्यांच्या ज्ञानामध्यें त्रैलोक्य निमग्न झालें आहे जे अनुपम असून संसारसमुद्रांतून तरून गेले आहेत असे ते मुनिराज भव्यसमूहांनीं वेष्टित बनून पूर्वकोटि वर्षांना काहीं कमी अशा उत्कृष्ट आयुष्यानें विहार करितात व आपल्या चंद्राप्रमाणें निर्मल अशा स्वतःच्या यशसमूहांनीं सर्व दिशा पांढऱ्या करितात. १६१--६२ जेव्हां अंतर्मुहूर्त आयुष्य राहतें व नाम, वेदनीय आणि गोत्र ही कर्में ही अंतर्मुहूर्त स्थितीचीं असतात त्यावेळीं वचनयोग व मनोयोग यांचा त्याग करून व बादर काययोगाचा आश्रय घेतात. काययोगाला सूक्ष्म करून ध्यानबलानें ते अयोगावस्थेला प्राप्त होतात. इतर कोणतेंही कृत्य नसल्यामुळें सूक्ष्मक्रियाप्रतिपाति नांवाच्या ध्यानाला ते प्रारंभितात. १६३ आयुकर्मापेक्षां नाम गोत्र, व वेदनीय ही तीन कर्में ज्यांची अधिक स्थितीची उरली असतील तर त्या कर्मांची स्थिति आयुकर्मा एवढी करण्याकरितां ते योगी समुद्घात करितात यांच्या या समुद्घाता लोकपूरणसमुद्घात असें नांव आहे. या समुद्घातामध्यें योग्याचे आत्मप्रदेश सर्वलोकभर पसरून ते पुनः संकुचित होऊन देहस्थ होतात. १६४ पहिल्या चार समयांत या योग्याचे आत्मप्रदेश दंडाकार बनून देहाचा आश्रय न सोडतां देहापासून बाहेर पडतात नंतर कवाड व पडद्याच्या आकाराचे बनून चवथ्या समयांत सर्व लोकभर पसरतात व तसेंच चार समयांनी आत्मप्रदेश संकुचित होतात यानंतर तिसऱ्या ध्या-

ततः समुच्छिन्नपदादिकक्रियानिवृत्तिना ध्यानवरेण कर्मणां ॥
निरस्य शक्तिं सकलामयोगतां प्रपद्य निर्वाणमुपैति केवली ॥१६५॥
स्वपूर्वकृतकर्मणां च्युतिरुदीरिता निर्जरा
द्विभेदमुपयात्यसाविति विपाकजा पाकजा ॥
पचंति भुवि कालतः परमुपायतो योग्यतो
वनस्पतिफलानि मनुजनाथ कर्माण्यपि ॥ १६६ ॥
सम्यग्दृष्टिरुपासकश्च विरतः संयोजनोद्वेष्टको
मोहस्य क्षपकस्तथोपशमको दृष्टेश्चरित्रस्य च ॥
शांताशेषकषायकः क्षयकरः प्रक्षीणमोहो जिनो
नासंख्येयगुणक्रमान्ननु भवत्येषां परा निर्जरा ॥ १६७ ॥
इति संवरनिर्जरानिमित्तं द्विविधं सत्परिकीर्तितं तपस्त्वं ॥
शृणु संश्रयणीयमेकबुद्ध्या क्रमतो मोक्षमतस्तवाभिधास्ये ॥१६८॥

नाला ते सुरवात करितात. १६५ यानंतर समुच्छिन्न क्रिया प्रतिपाती नांवाच्या उत्कृष्ट चौथ्या ध्यानानें अद्यापि कर्मांची सर्व शक्ति नष्ट करूच मुनिराज योगरहित बनून निर्वाणपदाला प्राप्त होतात.

१६६ पूर्वी संचित केलेल्या कर्मांची आत्म्यापासून थोडी थोडी सुटका होणें यास निर्जरा म्हणतात. या निर्जरेचे सविपाका व अविपाका असें दोन भेद आहेत. यथाकालीं कर्म उदयाला येऊन आपलें फळ आत्म्याला देऊन तें नष्ट होणें यास सविपाक निर्जरा म्हणतात व जसें झाडाचीं फळें उपायांनीं पक्वावस्थेला नेता येतात त्याप्रमाणें हे राजन् हीं ज्ञानावरणादि कर्मे देखिल पक्वावस्थेप्रत नेऊन त्यांना आत्म्यापासून काढून टाकिता येतें. या निर्जरेला अविपाका निर्जरा म्हणतात. १६७ सम्यग्दृष्टि, व्रतीश्रावक, महाव्रती मुनि, (साहव्या व सातव्या गुणस्थानांतले) अनंतानुबंधी कषायांचे विसंयोजन करणारे-त्यांना अप्रत्याख्यान कषायाच्या स्वभावाचे बनविणारे, दर्शनमोहाचा क्षय करणारे, चारित्रमोहाचा उपशम करणारे ज्यांचें चारित्र मोहकर्म पूर्ण उपशम पावलें आहे असे, चारित्रमोहाचा क्षय करीत असलेले व त्याचा पूर्ण क्षय केलेले व सयोगि जिन या सर्वांची उत्तरोत्तर कर्मांची असंख्यातपटीनें अधिक अधिक निर्जरा होत असते. १६८ याप्रमाणें संवर व

वंधस्य हेतोर्नितरामभावात्सुसंनिधानादपि निर्जरायाः ॥
समस्तकर्मस्थितिविप्रमोक्षो मोक्षो जिनेंद्रैरिति संप्रणीतः॥१६९॥
प्रागेव मोहं सकलं निरस्य गत्वाथ च क्षीणकपायसंज्ञां ॥
त्रिवोधदृष्ट्यावरणांतरायान्हत्वा ततः केवलमभ्युपैति ॥ १७० ॥
चतुर्ष्वथासंयतपूर्वसम्यग्दृष्ट्यादिषु भाक् सुविशुद्धियुक्तः ॥
स्थानेषु कस्मिंश्चिदपि क्षिणोति मोहस्य सप्त प्रकृतीरशेषाः॥१७१॥
निद्रानिद्रा प्रचलास्त्वपूर्वा गृद्धिस्तथा स्त्यानपदादिपूर्वा ॥
श्वभ्रा गतिस्तत्सदृशानुपूर्वी तिर्यग्गतिस्तत्प्रकृतानुपूर्वी ॥ १७२ ॥
एकेंद्रियादिश्चतुरिंद्रियांता चतुर्विधा जातिरथातपश्च ॥
उद्योतकस्थावरसूक्ष्मसंज्ञा साधारणाख्या प्रकृतिश्च राजन् ॥१७३॥

निर्जरा या उभयतांना कारण असलेलें दोन प्रकारचें ( अंतरंग व बहिरंग ) तप हें राजन् मीं वर्णिलें आहे. आतां ऐकण्याला योग्य अशा मोक्षाचें क्रमानें मी तुला स्वरूप सांगतो. तूं एकाग्रबुद्धिने तें ऐक. १६९ वंधाच्या कारणांचा ( मिथ्यात्व, अविरति, प्रमाद, कषाय व योग ) पूर्ण अभाव झाला असतां व निर्जरा कर्मवंधानें रहित अशी होऊं लागली असतां संपूर्ण कर्म सत्तेतून पूर्ण नष्ट होतें यास जिनेश्वरांनीं मोक्ष म्हणावें असें सांगितलें आहे. १७०प्रथमतः संपूर्ण मोहनीय कर्म नष्ट करून व क्षीण कषाय नांवाच्या गुणस्थानांत प्रवेश झाला असतां तेथें ज्ञानावरण, दर्शनावरण, अंतराय या तीन कर्मांचा आत्मा नाश करितो व केवली बनतो. १७१ चौथ्या गुणस्थानापासून सातव्या गुणस्थानापर्यंत कोणत्या ही एका गुणस्थानांत परिणामांच्या निर्मळतेनें युक्त होऊन दर्शन मोहनीय कर्मा-च्या-सातप्रकृतींचा आत्मा नाश करितोः अर्थात् मिथ्यात्व, सम्यङ् मिथ्यात्व.सम्य-क्त्व, अनंतानुवंधिक्रोध, मान, माया व लोभ यांचा नाश करितो. १७२-७३-७४ तदनंतर निद्रानिद्रा प्रचलाप्रचला, स्त्यानगृद्धि, नरकगति, नरकगत्यानुपूर्वी, तिर्य-ग्गति, तिर्यग्गत्यानुपूर्वी, एकेंद्रिय. द्वीन्द्रिय, त्रीन्द्रिय, चतुरिंद्रिय जातिनामकर्मे, आतप, उद्योत, स्थावर, सूक्ष्म, साधारण या सोळा कर्म प्रकृतींचा अनि-वृत्तिवादरसांपराय गुणस्थानांत हे राजन् नाश होतो तदनंतर याच गुणस्था-नांत अप्रत्याख्यान क्रोध, मान, माया लोभ प्रत्याख्यानावरणीय क्रोध, मान, माया, लोभ अशा आठकषायांचा नाश मुनीश्वर करीत असतात.

क्षिणोति शुद्ध्या सहितोऽनिवृत्तिस्थाने स्थितः सन्निति षोडशैताः॥
ततः कषायाष्टकमेकवारं तत्रैव नष्टं क्रियते यतीशा ॥ १७४ ॥
नपुंसकं वेदमथ क्षिणोति स्त्रीवेदमप्याहितशुद्धवृत्तः ॥
ततः परं तत्र च नोकषायषट्कं च धीरो युगपत्समस्तं ॥ १७५ ॥
तत्रैव पुंवेदमथो विहन्ति पृथक्पृथक्संज्वलनत्रयं च ॥
लोभोऽपि सूक्ष्मादिकसांपरायस्यांते क्षयं संज्वलनः प्रयाति ॥१७६॥
ततः क्रमात्क्षीणकषायवीतरागोपदेशं समधिष्ठितस्य ॥
उपान्तिमे द्राक्समये निकामं निद्रा विनाशं प्रचला च याति ॥ १७७॥
अथ द्वयोरन्यतरश्च वेद्यो दैवी गतिस्तत्प्रकृतानुपूर्वी ॥
औदारिकं वैक्रियिकं शरीरमाहारकं तैजसकार्मणे च ॥ १७८ ॥
स्पर्शाष्टकं पंच रसाः शरीरसंघातकाः पंच च पंच वर्णाः ॥
लघुश्च पूर्वो निहिताशुरुश्च तथोपघातः परघातकश्च ॥ १७९ ॥
परा विहायोगतिरप्रशस्ता तथा प्रशस्ता च शुभाशुभौ च ॥
स्थिरास्थिरौ सुस्वरदुःस्वरौ च पर्याप्तकोच्छ्वासकदुर्भगाश्च ॥१८०॥
प्रत्येककायोऽप्ययशःपदादिकीर्तिस्त्वनादेयसमाह्वया च ॥
निर्माणकर्मप्रकृतिश्च नीचैर्गोत्रं च पंचापि शरीरबंधाः ॥ १८१ ॥

१७५-१७६ यानंतर याच गुणस्थांनात आणखी आत्माचें चारित्र विशुद्ध वनलें म्हणजे नपुंसक वेद, व स्त्री वेदाचाही नाश होतो. यानंतर धीर असे हे मुनिराज याच गुणस्थानांत एकदम हास्य, रति, अरति, शोक, भय, जुगुप्सा या सहा नोकषायांचा नाश करितात. याच गुणस्थानांत पुंवेदाचा नाश करून नंतर संज्वलन क्रोध, मान, माया यांचा नाश होतो. यानंतर दहावें गुणस्थान प्राप्त होतें तेथें संज्वलन लोभाचा पूर्ण नाश होतो. १७७ यानंतर बाराव्या गुणस्थानांत-क्षीण कषाय गुणस्थानांत जीव जेव्हां प्रवेश करितो तेव्हां याच्या उपान्त्य समयीं निद्रा व प्रचला यांचा नाश होतो व शेवटच्या समयांत पांच ज्ञानावरणीय कर्में, चार दर्शनावरणीय कर्में, पांच अंतराय कर्में यांचा क्षय होतो. १७८-१८१ यानंतर अन्यतर वेदनीय कर्म, देवगति, देवगत्यानुपूर्वी, औदारिक, वैक्रियिक, आहारक,

संस्थानषट्कं त्रिशरीरकांगोपांगं च षट्संहननं द्विगंधं ॥
हन्तीत्युपान्ते समये नृपैता द्वासप्ततिंच प्रकृतीरयोगः ॥ १८२ ॥
वेद्यद्वयोरन्यतरं नराणामायुर्गतिश्चापि तदानुपूर्वी ॥
जातिश्च पंचेंद्रियशब्दपूर्वा पर्याप्तकाख्यत्रसबादरौ च ॥ १८३ ॥
सुतीर्थकत्त्वं सुभगो यशः स्यात्कीर्तिस्तदादेयसमुच्चगोत्रे ॥
त्रयोदशैताः प्रकृतीः समं च हिनस्ति सान्त्ये समये जिनेंद्रः ।१८४।
व्यपेतलेशः प्रतिपद्य भाति शैलेशिभावं नितरामयोगः ॥
विराजते वारिदरोधमुक्तो निशासु खे किं न शशी समग्रः ।१८५।
भावानां खलु मुक्तिरौपशमिकादीनामभावात्परं ॥
भव्यत्वस्य च भव्यसत्वसमितेरुत्कंठमातन्वती ॥
सम्यक्त्वादथ केवलावगमनाद् दृष्टेश्च सिद्धत्वतः ॥
स्यादत्यंतनिरंजनं निरुपमं सौख्यं परं बिभ्रती ॥ १८६ ॥

तैजस व कार्मण हीं पांच शरीरें, शीत, उष्णादिक आठ स्पर्श, कडू आंबट वगैरे पांच रस, औदारिक संघातादि पांच संघात, पांढरा, काळा वगैरे पांच रंग, अगुरु लघु, उपघात, परघात विहायोगति, (प्रशस्त व अप्रशस्त) शुभ, अशुभ, स्थिर, अस्थिर, सुस्वर, दुःस्वर, पर्याप्त, उच्छ्वास, दुर्भग, प्रत्येक शरीर, अयशस्कीर्ति, अनादेय, निर्माण, नीच गोत्र, औदारिक बंधन वगैरे पांच बंधन कर्मे, समचतुरस्रादिक सहा संस्थानें, औदारिक वैक्रियिक आहारक अंगोपांग अशीं तीन अंगोपांगें, वज्रर्षभ-नाराचादिक सहा संहननें, सुगंध दुर्गंध अशा बहात्तर प्रकृति अयोग गुणस्थानाच्या उपान्त्य समयांत नष्ट होतात. १८३–१८४ अन्यतर वेदनीय, मनुष्यायु, मनुष्य गति, मनुष्यगत्यानुपूर्वी, पंचेंद्रियजाति, अपर्याप्त, त्रस, बादर, तीर्थंकरत्व. सुभग, यशः कीर्ति, आदेय, उच्चगोत्र, या तेरा प्रकृतींचा चौदाव्या गुणस्थानाच्या शेव-टच्या समयांत जिनेश्वर नाश करितात. १८५ यावेळीं चौदाव्या गुणस्थानांत असलेल्या या जिनेश्वरांना लेश्या कोणतीही राहात नाही. अठरा हजार शीलांची प्राप्ति होते. यावेळीं हे जिनराज फार शोभतात. बरोबर आहे कीं, मेघांच्या प्रति-बंधांतून मुक्त झालेला संपूर्ण चंद्र रात्रीच्या प्रहरीं शोभत नाही काय ? या गुण-

५ एकदां प्रभु अतिमुक्तक नांवाच्या स्मशानांत रात्रीं प्रतिमायोग धारण करून ध्यानांत लीन झाले असतां नानाप्रकारच्या विद्यांच्या सामर्थ्यानें उपसर्ग करणारा भव नांवाचा अकरावा रुद्र संसाररहित वीर प्रभूला जिंकण्यास असमर्थ झाला. तेव्हां त्यानें पुष्कळ वेळ नमस्कार करून हर्षानें प्रभूचें महाति महावीर असें नांव ठेविलें. पृष्ठ ३६१.

आविष्टपांतादथ याति सौम्यकर्मक्षयानंतरमूर्ध्वमेव ॥
एकेन मुक्तः समयेन मुक्तिश्रियाप्यमूर्तः परिरभ्यमाणः ॥ १८६ ॥
पूर्वप्रयोगान्नियमप्रकृष्टादसंगकत्वाच्च विबंधलेपात् ॥
गतिस्वभावस्य तथाविधत्वान्मुक्तात्मनामूर्ध्वगतेः प्रसिद्धिः ॥१८७॥
सौम्याविद्धकुलालचक्रवदथो निर्लेपकालाबुवत् ॥
वातारिक्षुपबीजवच्छिखिशिखावच्चेति तत्वैषिभिः ॥
सद्दृष्टान्तचतुष्टयं निगदितं पूर्वोदितानां क्रमात् ॥
हेतूनां परिनिश्चयाय च गतेः सद्भिश्चतुर्णामपि ॥ १८८ ॥
धर्मास्तिकायस्य न यांत्यभावात्ततः परं सिद्धिसुखोत्कासिद्धाः ॥
धर्मास्तिकायादिविवर्जितत्वादलोकमाहुः परमिद्धबोधाः ॥१८९॥

स्थानाच्या नंतर जीवाला मोक्ष प्राप्त होतो. औपशमिक, क्षायोपशमिक, औदयिक व पारिणामिक भावांपैकीं भव्यत्व यांचा, मुक्तीच्या वेळीं नाश होतो. ही मुक्ति भव्यजीवाच्या अंतःकरणांत उत्कंठा उत्पन्न करीत असते. या मुक्तिमध्यें जीवाच्या ठिकाणीं सम्यग्दर्शन, केवलज्ञान, केवलदर्शन, सिद्धत्व, हे गुण राहतात. उपमारहित आणि कर्मरहित असें उत्कृष्ट सुख येथें प्राप्त होतें.

१८६ कर्मांचा क्षय झाल्याबरोबर हा आत्मा एका समयांत लोकाच्या अंतापर्यंत वरच जातो. व तेथें त्याला मुक्तिलक्ष्मी गाढ आलिंगन देते. १८७ जीवाचा वर जाण्याचा नेहमीं पूर्वीपासून प्रयत्न चाललेला असणें, कर्मापासून वेगळा होणें, सर्व कर्मांच्या बंधाचा छेद होणें, व वर गमन करण्याचा स्वभाव असणें या कारणांनीं मुक्त जीवांचें ऊर्ध्वगमन सिद्ध होतें. १८८ हे सौम्य राजा, वर उर्द्धगमनाचे जे चार हेतु सांगितलें होते त्यांची माहिती चांगली व्हावी म्हणून क्रमानें चार दृष्टांत तत्वज्ञानीं सत्पुरुषांनीं सांगितलेले आहेत. ते याप्रमाणें कुंभारानें एकदा चाक जोरानें फिरविलें म्हणजे तें संस्कार क्षय होईपर्यंत फिरतें त्याप्रमाणें जीवाला वर जाण्याच्या संस्कारानें वर जाता आलें. ज्याचा लेप निघून गेला आहे असा भोपळा पाण्यावर उसळून येतो त्याप्रमाणें जीवाचें कर्माचें लिंपण कमी नष्ट झाल्यामुळें जीव वर गमन करितो. एरंडाचें बी जसें बीज कोशाचीं बंधनें ढिलीं झालीं असतां वर उडून जातें तसें कर्माचें

आवरण तुटून गेलें असतां जीव वर जातो. अग्नीची ज्योत स्वाभाविकपणें वर जाते तसें हा आत्मा कर्माभाव झाल्यावर स्वाभाविक वर जातो. १८९ मुक्ति सुखाविषयीं उत्कंठित झालेले सिद्धजीव धर्मद्रव्याचा अभाव असल्यामुळें अलोकाकाशांत जात नाहींत. लोकाकाशाच्या पुढें धर्मास्तिकाय वगैरे द्रव्यें नसल्यामुळें बाकी राहिलेल्या आकाशाला उत्कृष्ट ज्ञानी जिनेश्वर अलोकाकाश असें म्हणतात. १९० क्षेत्र, काल, चारित्र, लिंग, गति, तीर्थ, अवगाहना, प्रत्येकबुद्ध, बोधितबुद्ध, ज्ञान, अंतर, संख्या, अल्पबहुत्व, या प्रकारांनीं व दोन नयांच्या आश्रयानें फक्त भेद मानलेला आहे. वास्तविक त्यांच्यांत भेद नाहींत. क्षेत्रसिद्ध-प्रत्युत्पन्न नयाच्या अपेक्षेनें आत्मप्रदेशांत अथवा सिद्धिक्षेत्रांतच मोक्ष प्राप्त होतो. परंतु भूतानुग्राही नयानें पाहिलें असतां पंधरा कर्मभूमिमध्यें जीवाला मोक्ष प्राप्त होतो. कालसिद्ध--प्रत्युत्पन्ननयापेक्षेनें एका समयांत सिद्धि होते. परतु भूतानुग्राही नयानें उत्सर्पिणी व अवसर्पिणी कालांत मोक्षलाभ होतो. विशेष रीतीनें पाहिलें असतां अवसर्पिणीच्या सुषम दुःषमाच्या अंतभागीं व दुःषम सुषमकालांत जन्मलेला सिद्ध होतो. दुःषमकालांत उत्पन्न झालेला सिद्ध होत नाहीं. चारित्रसिद्ध-यथाख्यात चारित्रानें सिद्धि होते अथवा चार व पांच चारित्रांनींही मोक्षप्राप्ति होते. लिंगसिद्ध-मोक्षप्राप्तीच्या वेळीं स्त्री, पुरुष, नपुंसक असें कोणतेंही लिंग नसते म्हणून अलिंगत्वानें सिद्धि होते. अथवा भावलिंगाच्या दृष्टीनें पाहिलें असतां तीन्हीं लिंगांनीं सिद्धि होते. द्रव्यलिंगानें फक्त पुल्लिंगानेंच सिद्धि होते. गतिसिद्ध-मनुष्यगतीनें मोक्ष प्राप्त होतो. मागच्या गतीनें विचार केला असतां चारी गतींनीं मोक्ष प्राप्त होतो. तीर्थसिद्ध-तीर्थंकर होऊन सिद्ध होणें व सामान्य मुनि होऊन सिद्ध होणें. अवगाहनसिद्ध-उत्कृष्टावगाहना ५२५ धनुष्यें, जघन्यावगाहना साडे तीन हात अवगाहनांचे मध्य विकल्प असख्यात आहेत. या अवगाहनांनीं सिद्धि होते. प्रत्येकबुद्ध-परोपदेशाशिवाय ज्ञानप्राप्ति करून घेऊन सिद्ध होणें. बोधितबुद्ध-परोपदेशानें ज्ञानलाभ करून मोक्ष प्राप्त करून घेणें. ज्ञानसिद्ध-केवलज्ञानानेंच मोक्ष प्राप्त होतो. परंतु भूतपूर्व नयानें पाहिलें असतां मति व श्रुत या दोन ज्ञानांनीं अथवा मतिश्रुतावधि या तीन ज्ञानांनीं, किंवा मति श्रुत मनःपर्यय या तीन ज्ञानांनीं, किंवा मति श्रुत अवधि मनःपर्यय या चार ज्ञानांनीं मोक्ष मिळतो. अंतरसिद्ध-एक समय अंतर पडून जघन्य रीतीनें मोक्ष प्राप्त होतो व उत्कृष्ट रीतीनें एक जीव मोक्षास गेल्यानंतर दुसरा सहा महिन्यांनीं मुक्त होतो. संख्यासिद्ध जघन्य रीतीनें एका समयांत एक जीव सिद्ध होतो व उत्कृष्ट

क्षेत्रं कालचरित्रलिंगगतयस्तीर्थावगाहौ मतौ ॥
प्रत्येकप्रतिबुद्धबोधितविधी ज्ञानं तथैवान्तरम् ॥
संख्या चाल्पबहुत्वमित्यभिहितो भेदस्त्वमीभिः परं ॥
सिद्धानां सुनयैर्नयद्वयबलात्संप्रत्यतीतस्पृशः ॥ १९० ॥
विधिवदिति जिनेंद्रश्चक्रनाथाय तस्मै
सदसि नवपदार्थान्व्यक्तमुक्त्वा व्यरंसीत् ॥
अपि सुविहितबोधस्तस्य गोभिः समंतात्
अभिनव इव पद्मः पद्मबंधोर्विरेजे ॥ १९१ ॥
विज्ञाय मोक्षपथमित्यथ चक्रवर्ती चक्रश्रियं तृणमिव प्रजहौ दुरंताम्॥
जानन्प्रसन्नपयसः सरसः प्रदेशं पातुं मृगोऽपि यतते मृगतृष्णिकां किं ॥ १९२ ॥
स्वं ज्यायसे सकलराज्यमरिंजयाय प्रीत्या प्रदाय तनयाय बभार दीक्षां ॥
क्षेमंकरं जिनपतिं समुपेत्य भक्त्या क्षेमाय षोडशसहस्रनृपैः स सार्द्धं ॥ १९३ ॥

रीतीनें एका समयांत १०८ जीव सिद्ध होतात. अल्पबहुत्वासिद्धि—अनेक प्रकारची आहे. गतीच्या दृष्टीनें जसे तिर्यंच गतींतून येऊन थोडे जीव मुक्त होतात. यापेक्षां मनुष्यगतींतून येऊन मोक्षाला जाणारे जीव ज्यास्ती आहेत. अशाच रीतीनें अल्पबहुत्व क्षेत्र, काल वगैरेमध्यें देखील जाणावा. १९१ याप्रमाणें शास्त्रोक्त पद्धतीला अनुसरून जिनेंद्रांनीं चक्रवर्तीला समवसरणांत नऊ पदार्थांचा उपदेश केला व नंतर ते थांबले. जसें सूर्याच्या किरणापासून कमलामध्यें विकास उत्पन्न होतो तसे भगवंताच्या वाणीपासून चक्रवर्तीला उत्तम बोध झाला. १९२ मोक्षमार्गाचें स्वरूप याप्रमाणें जाणून चक्रवर्तीनें दुःखदायक अशा चक्रवर्तीच्या वैभवाचा गवताप्रमाणें तुच्छ मानून त्याग केला. बरोबरच आहे कीं, प्रसन्न पाण्यानें भरलेल्या सरोवराच्या प्रदेशाची ज्याला चांगली माहिती झाली आहे असा हरिण मृगजलाचें पान करण्याची खटपट करील काय ? १९३ चक्रवर्तीनें आपलें सर्व राज्य अरिंजय

मनसि प्रशमं निधाय शुद्धं विधिना साधु तपश्चचार घोरं ॥
भुवि भव्यजनस्य वत्सलत्वात्प्रियमित्रः प्रियमित्रतां प्रयातः ॥१९४॥
अथायुरंते तपसा तनुत्वं तनुं स यातां विधिना विहाय ॥
कल्पं सहस्रारमनल्पपुण्यैः स्वैरर्जितं वर्जितमाप खेदैः ॥ १९५ ॥
तत्राष्टादशसागरायुरमरस्त्रीणां मनोवल्लभो
हंसांके रुचकाव्हये प्रमुदितस्तिष्ठन्विमाने परे ॥
बालार्कात्मतनूरुचा रुचिरया सूर्यप्रभां न्हेपयन् ॥
दिव्यामष्टगुणां बभार सुचिरं सूर्यप्रभः संपदम् ॥ १९६ ॥

❀ इत्यसगकृते वर्द्धमानचरिते सूर्यप्रभसंभवो नाम
पंचदशः सर्गः समाप्तः ❀ ॥

नांवाच्या मोठ्या मुलाला प्रीतीनें देऊन टाकिलें व क्षेमंकर जिनेश्वराकडे भक्तीनें येऊन सोळा हजार राजांसह आपलें कल्याण व्हावें ह्मणून दीक्षा घेतली. १९४ भव्यलोकांवर प्रेम करीत असल्यामुळें हा प्रियमित्र चक्रवर्ती प्रियमित्र या अन्वर्थक नांवाला प्राप्त झालेला होता. यानें मनामध्यें निर्दोष प्रशम धारण करून योग्य विधीनें निर्दोष व घोर असें तपश्चरण केलें. १९५ नंतर जेव्हां आयुष्य संपलें त्यावेळीं या चक्रीनें तपश्चरणानें कृश झालेल्या शरीराचा सल्लेखना करून त्याग केला व जेथें बिलकूल दुःख नाहीं अशा सहस्रार स्वर्गाची विपुल पुण्यानें प्राप्ति करून घेतली. १९६ त्या स्वर्गांत याचें आठरा सागर वर्षांचें आयुष्य होतें. देवांगना याला पाहून फार आनंदित होत असत. हंसाच्या चिन्हाने युक्त असलेल्या रुचक नांवाच्या स्वतःच्या विमानांत हा आनंदित होऊन राहत असे. स्वतःच्या सुंदर शरीरकांतीनें सूर्याच्या बाल कांतीला याने लज्जित केलें होतें. यामुळें याचें सूर्यप्रभ हें नांव सार्थक होतें. ह्या सूर्यप्रभ देवानें पुष्कळ कालपर्यंत अणिमा महिमा वगैरे आठ दिव्यगुणांनीं युक्त अशा ऐश्वर्याला धारण केलें होतें.

याप्रमाणें असगकविकृत वर्द्धमानचरित्रामध्यें सूर्यप्रभदेवाच्या उत्पत्तीचें वर्णन करणारा पंधरावा सर्ग समाप्त झाला.

अथ नाकसौख्यमनुभूय बहुविधमचिन्त्यवैभवम् ॥
संगरहितमवतीर्य च स त्वमभूरिह प्रकृतिसौम्यनंदनः ॥ १ ॥
वपुरादधद्विविधमाशु विजहदपि कर्मपाकतः ॥
मेघ इव वियति वायुवशात्परिबंभ्रमीति पुरुषो भवोदधौ ॥ २ ॥
पुरुषेण दुर्लभमवेहि परममविनाशि दर्शनम् ॥
येन सहितमचिराय यतस्तमुपैति मुक्तिरपि मुक्तिवर्त्मना ॥ ३ ॥
सफलं च जन्म खलु तस्य जगति स विदां पुरःसरः ॥
गुप्तिपिहितदुरितागमनं भववीतये भवति यस्य चेष्टितम् ॥ ४ ॥

१ दुःखरहित व नाना प्रकारचें अवर्णनीय ऐश्वर्य ज्यामध्यें आहे असें स्वर्गसुख भोगून तूं या पूर्व देशांतील श्वेतातपत्रानगरीमध्यें स्वभावतः सौम्य असा नंदन नांवाचा राजा झाला आहेस. २ हे राजन् या जगामध्यें आत्मा कर्मोदयामुळें नाना प्रकारचें शरीर ग्रहण करीत असतो व सोडून देत असतो. अशा रीतीनें हा आत्मा मेघ जसा वाऱ्याच्या धक्क्यामुळें आकाशांत इकडे तिकडे भ्रमण करीत असतो तसा या संसारसागरांत वारंवार भ्रमण करीत आहे. ३ हे राजा या जगांत अविनाशी व उत्कृष्ट असें सम्यग्दर्शन आत्म्याला प्राप्त होणें फार दुर्लभ आहे असें तूं समज. हें सम्यग्दर्शन मोक्षाचा मार्ग आहे. व या सम्यग्दर्शनानें जो आत्मा युक्त बनला आहे त्याला लौकरच मोक्षाची देखील प्राप्ति होते. ४ मनोगुप्ति, वचनगुप्ति, कायगुप्ति या गुप्तींच्या द्वारें पातकाला न येऊं देणारें असें ज्याचें चारित्र संसाराचा नाश करण्यास कारण होतें त्याच आत्म्याचें जन्म घेणें सफल

घनरूढमूलमपि नाम तरुमिव महामतंगजः ॥
मोहमखिलमचिराय पुमान्स भनक्ति यः प्रशमसंपदा युतः ॥५॥
अवबोधवारिशमकारि मनसि शुचि यस्य विद्यते ॥
क्रांतजगदपि न तं दहति ह्रदमध्यमाश्रिरिव मन्मथानलः ॥ ६ ॥
अधिरूढसंयमगजस्य विमलशमहेतिशालिनः ॥
क्षांतिघनतरतनुत्रभृतो व्रतशीलमौलपरिरक्षितात्मनः ॥ ७ ॥
सुतपोरणे मुनिनृपस्य दुरितरिपुरुद्धतोऽपि सन् ॥
स्थातुमपि न सहते पुरतो नहि दुर्जयोऽस्ति सुनयावलम्बिनाम् ।८।
सुवशीकृताक्षहृदयस्य शमनिहतमोहसंपदः ॥
दैन्यरहितचरितस्य सतः किमिहैव मुक्तिरपरा न विद्यते ॥ ९ ॥

आहे व जगांत तोच विद्वानांचा खरा पुढारी आहे, असें समजावें. ५ जसें मोठा हत्ती ज्याच्या दाट मुळ्या फार खोल गेल्या आहेत अशाही झाडाला तत्काळ उपटून टाकितो तसें प्रशम संपत्तीनें युक्त असलेला आत्मा फार दिवसापासून सर्व आत्मप्रदेशांत खोल रुतून बसलेल्या अशा रागद्वेषात्मक मोहाला तेथून तत्काल नष्ट करून टाकितो. ६ ज्याच्या हृदयांत मोहाचें शमन करणारें पवित्र असें ज्ञानरूपी पाणी राहात आहे त्या आत्म्याला तळ्याच्या मध्यभागीं प्रवेश केलेल्या मनुष्याला जसें अग्नि जाळूं शकत नाहीं तसें सगळ्या जगाला ज्यानें व्यापून टाकिलें आहे असा मदनरूपी अग्नि दग्ध करूं शकत नाही. ८ जो संयमरूपी हत्तीवर आरूढ होऊन हातांत निर्मल प्रशमरूपी तरवार धारण केल्यानें शोभत आहे. ज्यानें क्षमारूपी दृढ चिलखत आंगांत धारण केलेलें असून व्रतें व अठरा हजार शीलरूपी मुख्य सैन्याच्या द्वारें ज्यानें स्वतःचें रक्षण केलें आहे असा मुनिरूपी राजा ज्यावेळीं तपरूपी रणामध्यें लढण्यासाठीं तयार होऊन उभा राहतो, त्यावेळीं पापरूपी शत्रु पुष्कळ उद्धट असला तरीही तो त्याच्यापुढें उभा देखिल राहण्यास समर्थ होत नाहीं. बरोबर आहे कीं, ज्यांनीं सन्मार्गाचा आश्रय घेतला आहे त्यांना जगांत दुर्जय असा कोणता पदार्थ आहे बरें ? ९ ज्यानें आपलीं इंद्रियें व मन पूर्णपणें स्वाधीन केलें आहे. प्रशमाच्याद्वारें ज्यानें मोहाची सर्व संपत्ति नष्ट करून टाकिली आहे, ज्याच्या आचरणांत दीन-पणाला राहाण्यास जागा मिळालेली नाहीं अशा सत्पुरुषाला इहलोकींच दुसरा

अमृतच्युता मुनिगिरा विबुधमहितया तमोनुदा ॥
पद्म इव शिशिररश्मिरुचा प्रतिबोध्यते भुवि न दूरभव्यकः ॥ १० ॥
श्रुतमिद्धमप्यफलमेव विषयनिरतस्य चेष्टिते ॥
शस्त्रमिव निशितमाजिमुखे भयविह्वलस्य समवेहि केवलं ॥ ११ ॥
मुनिवाक्यमद्भुतमचिंत्यबहुविधगुणं सुदुर्लभं ॥
रत्नमिव भजति भव्यजनःश्रवणे निधाय भुवने कृतार्थतां ॥ १२ ॥
इति नंदनाय समुदीर्य मुनिपतिरतीततद्भवान् ॥
व्यक्तमवधिनयनो व्यरमत्पुरुषार्थतत्वमपि तत्ववेदिने ॥ १३ ॥
स वमन्मुदाश्रु शुचि तस्य वचनमवधार्य नंदनः ॥
चंद्रमणिरिव रराज गलज्जलबिंदुरिंदुकरजालसंगतः ॥ १४ ॥

मोक्ष प्राप्त झाला नाहीं काय ? १० ज्यापासून अमृत पाझरते, जो देवामध्यें आदरणीय मानला जातो, जो अंधाराचा नाश करितो अशा चंद्राच्या थंडगार किरणाच्या कांतीनें सूर्यविकासि कमळ जसें प्रफुल्लित होत नाहीं, तें मिटलेलेंच राहतें त्याप्रमाणें ज्यांतून अमृतासारखा कल्याणप्रद उपदेश बाहेर पडत आहे व जें विद्वानांना व देवांनादेखील मान्य असून मिथ्यात्वाचा व अज्ञानाचा नाश करिते अशा मुनीराजाच्या भाषणानें या जगीं जे दूर भव्य आहेत तें प्रसन्न होत नाहींत अर्थात् त्याच्यावर कांहीं परिणाम होत नाहीं

११ जो पुरुष चारित्र धारण करूनही विषयामध्यें आसक्त बनतो त्याचें शास्त्रज्ञान उत्कृष्ट असूनही व्यर्थ होय. युद्धामध्यें भयानें थरथर कांपत असलेल्या माणसाच्या तीक्ष्ण शस्त्राप्रमाणें तें विफल आहे असे हे राजा तूं जाण. १२ मुनीश्वराचा उपदेश अद्भुत व अचिंतनीय फलाला देणारा, अनेक सद्गुणांनीं युक्त व. अतिशय दुर्लभ असल्यामुळें चिंतामणी रत्नाप्रमाणें आहे,जो भव्य जीव हा उपदेश आपल्या कानामध्यें धारण करितो तो त्रैलोक्यांत कृतार्थ होतो. १३ अवधिज्ञानरूपी नेत्र धारण करणाऱ्या त्या प्रोष्ठिल महामुनींनीं याप्रमाणें तत्व जाणणाऱ्या नंदन राजाच्या पूर्व भवाचे स्पष्ट वर्णन करून व धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थांचें स्वरूप सांगून विश्रांति घेतली. १४ जसा चंद्रकांत मणि चंद्रकिरणांच्या सहवासानें ज्याच्यांतून पाण्याचे थेंब गळत आहेत असा होत्साता शोभूं लागतो. तसा त्या मुनीश्वराच्या पवित्र भाषणाला हृदयांत धारण

प्रणिपत्य मौलितटनम्रमुकुलितकराग्रपल्लवः ॥
भक्तिविसरपरिनद्धतनुर्मुनिमित्यवोचत वचो महीपतिः ॥ १५ ॥
विरला भवन्ति मुनयोऽथ विनतजनताहिताय ये ॥
चित्रमणिगणवितानमुचो विरलाश्च ते जगति वारिवाहिनः ॥१६॥
विरलाः कियन्त इह सन्ति लसदवधिबोधलोचनाः ॥
रत्नकिरणपरिभिन्नजलस्थलसंपदः प्रविरला जलाशयाः ॥ १७ ॥
भवतः करिष्यति वचोद्य मम सफलमीश जीवितं ॥
अस्तु नियतमियदेव परैः किमुदीरितैर्विफलमप्रियैस्तव ॥ १८ ॥
अभिधाय धीरमिति वाचमवनिपतिरादिशत्सुतम् ॥
धर्महरमतिविनीतमिलामवितुं तमंबुनिधिवारिवाससं ॥ १९ ॥

करून तो नंदन राजा आनंदाश्रु गाळणारा असा शोभूं लागला. १५ भक्तीच्या भारानें ज्याचें शरीर नम्र झाले आहे, ज्यानें मुकुटाच्या किनाऱ्यावर आपलें नम्र हातरूपी कोमल पल्लवांना मिटविलें आहे अशा त्या नंदनराजानें नमस्कार करून मुनिश्वरांना पुढें लिहिल्याप्रमाणें बोलण्यास सुरवात केली. १६ हे मुनिराज, नम्र अशा भव्यांच्या हितासाठीं उद्युक्त होणारे मुनि आपल्यासारखे विरळाच असतात. बरोबरच आहे कीं, नानाप्रकारच्या रत्नसमूहाची वृष्टि करणारे मेघ फार विरळाच असतात. १७ शोभणाऱ्या अवधिज्ञानरूपी नेत्रानें युक्त असलेले मुनिश्वर जगांत किती असणार? ते विरळाच असतात. रत्नाच्या किरणांनीं ज्यांनीं पाणी व किनाऱ्याचा प्रदेश व्याप्त केलेला आहे—सुशोभित केला आहे अशीं सरोवरें जगांत थोडींच असणार. १८ हे मुनिराज! आपलें हें भाषण आज माझ्या जीविताला अवश्य सफल करील. एवढेंच बोलणें पुरें आहे. आपल्याला अप्रिय असलेल्या इतर भाषणांना घेऊन काय करावयाचें आहे ?

१९ याप्रमाणें गंभीर भाषण करून राज्य पालन करण्यास योग्य, अतिशय नम्र अशा आपल्या नंद नांवाच्या मुलास समुद्राचें पाणी हेंच जिचें वस्त्र आहे अशा पृथ्वीचें रक्षण करण्यास राजानें सांगितलें. २० जगांत प्रसिद्ध झालेल्या प्रोष्ठिल मुनीस नमस्कार करून राज्यलक्ष्मीचा त्याग करून दहा हजार राजांसह नंदन राजानें तपाचा स्वीकार केला. २१ अंगबाह्य व अंगप्रविष्ट

सहनंदनः श्रियमपास्य दशशतदशक्षितीश्वरैः ॥
प्रौष्ठिलमुनिं नु जगत्प्रथितं तमभिप्रणम्य समुपाददे तपः ॥ २० ॥
श्रुतवारिधिं द्व्यधिकपंक्ती विलसदमलांगवीचिकं ॥
तूर्णमतरदुरुबुद्धिभुजा बलतोऽगबाह्यविविधभ्रमाकुलं ॥ २१ ॥
मनसाश्रुतार्थमसकृत्स विषयविमुखेन भावयन् ॥
तप्तुमसुकरमुपाक्रमत क्रमतो द्विषड्विधमनुत्तमं तपः ॥ २२ ॥
जहदात्मदृष्टफललौल्यमनभिमतरागशांतये ॥
ध्यानपठनसुखसिद्धिकरं प्रयतोऽकरोदनशनं सुनिश्चितम् ॥ २३ ॥
विधिवत्प्रजागरवितर्कपरचितिसमाधिसिद्धये ॥
सत्वममलमवलम्ब्य मुनिर्मितभोजनं विमलधीश्चकार सः ॥ २४ ॥
अरुणत्क्षुधः खलु कृशोऽपि मुनिरिति तृषो विसर्पणं ॥
द्वित्रिभवनगमनोचितया विधिवत्सवृत्तिपरिसंख्यया परं ॥ २५ ॥

या दोन तटांनीं युक्त असलेला आचारांग, सूत्रकृतांग वगैरे निर्मल बारा अंगें या लाटांनीं युक्त असलेला, अंगबाह्याचे जे सामायिक, चतुर्विंशतिस्तव वगैरे जे भेद आहेत हेच भोवरे ज्यांत आहेत अशा श्रुतज्ञान रूपी समुद्राला हा नंदन मुनि आपल्या मोठ्या बुद्धिरूपी बाहूच्या सामर्थ्यानें तरून गेला.

२२ पंचेंद्रियांच्या पदार्थांपासून विरक्त झालेल्या मनाच्या द्वारें वारंवार शास्त्रांत सांगितलेल्या जीवादि पदार्थांचें चिंतन करणाऱ्या या नंदनमुनींनीं करण्यास कठिण असें बारा प्रकारचें उत्तम तप क्रमानें करण्यास सुरवात केली. २३ आदरसत्कारादि लौकिकफलाची इच्छा न ठेवितां व संयमाला अयोग्य अशा रागभावांचा उपशम व्हावा ह्मणून ध्यान व स्वाध्याय यांची सुखानें प्राप्ति करून देणारें अनशन ( चार प्रकारच्या आहारांचा त्याग करणें ) तप निश्चितरूपानें प्रयत्नशील होऊन हे मुनिराज करीत असत. २४ जागरूकपणा राहावा, तर्कशक्ति वाढावी व ध्यानसिद्धि व्हावी ह्मणून शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें आपले निर्मल परिणामांचा आश्रय घेऊन निर्मल बुद्धीचे धारक असे हे मुनिराज मितभोजन करीत असत. हे मुनिराज कृष झाले होते तरी भूक व तहानही वाढली असतांही त्यांना ताब्यांत ठेवीत असत. दोन अथवा तीन घरांतच मी आहार घेईन अशा शास्त्रोक्त पद्धतीनें हें

प्रविधाय वृक्षरसमोक्षमवर्जितनिद्राक्षचापलः ॥
क्षोभविसरजनकानि सदा मनसो रुरोध खलु कारणानि सः ॥२६॥
स पदेष्वजंतुवधकेषु विहितशयनासनस्थितिः ॥
ध्यानपरिचितिचतुर्थवरव्रतरक्षणार्थमभवत्समर्थधीः ॥ २७ ॥
स तपे तपोभिरभिसूर्यमचलधृतिरान्त दुःसहे ॥
त्यक्तनिजतनुरुचेर्महतः किमिहास्ति किंचिदपि तापकारणं ॥ २८ ॥
तरुमूलमावसदभ्रघनवलयमुक्तवारिभिः ॥
सिक्ततनुरपि नभस्यचलं शमिनामहो चरितमद्भुतास्पदं ॥ २९ ॥
शिशिरागमे बहिरशेत निशि शिशिरपातभीषणे ॥
भीतिविरहितसमाचरणः किमु दुष्करेऽपि परिमुह्यति प्रभुः ॥ ३० ॥
परमांतरं च स चकार निरुपममतंद्रितस्तपः ॥
ध्यानविनयताध्ययनप्रभृतित्रिगुप्तिधृतभूरिसंवरः ॥ ३१ ॥

वृत्तिपरिसंख्यान नांवाचें तप करीत असत. २६ गुळ, साखर वगैरे रसाचा त्याग करून ज्यांनीं झोंप व इंद्रियांची चपलता जिंकली आहे अशा या मुनीश्वरांनीं मनामध्यें रागद्वेषादि विकार उत्पन्न करणाऱ्या कारणांचा त्याग केला. २७ जेथें प्राण्यांचा वध होत नाहीं अशा निर्जंतुक ठिकाणीं हे मुनिराज बसणें, उठणें, निजणें हीं कार्यें करीत असत. व ध्यानाची वाढ करण्यास कारण असलेल्या ब्रह्मचर्य व्रताचें रक्षण करण्यासाठींच समर्थ बुद्धीचे हे मुनिराज हीं कार्यें करीत असत. निश्चल धैर्याचे धारक हे मुनीश्वर दुःसह अशा ग्रीष्मऋतूंत सूर्याकडे मुख करून व तपश्चरणाच्याद्वारें शरीरावर निस्पृह होऊन राहत असत. बरोबरच आहे कीं, स्वतःच्या शरीरावर प्रेम करणें ज्यानें सोडून दिलें आहे अशा महात्म्याला या जगांत कोणताच पदार्थ तापदायक असूं शकत नाहीं. २९ पाण्यानें भरलेल्या मेघमंडलाकडून पाण्याच्या वर्षावांनी ज्यांचे शरीर भिजून ओलें चिंब झालें आहे असे हे मुनिराज श्रावण मासांत झाडाच्याखालीं निश्चल होऊन तप करीत असत, योग्यांचें चारित्र खरोखर फार आश्चर्यपूर्ण असतें; आश्चर्याचें स्थान असतें ३० वर्फ पडण्यानें भयंकर वाटणाऱ्या हिवाळ्यांत रात्रीच्या वेळीं भयरहित चारित्र पाळणारे हे मुनीश्वर उघड्या मैदानांत बाहेर निजत असत जे मोठे

अथ कारणानि परिबोधविशदतरधीरभावयत् ॥
तीर्थंकरविपुलनाम्न इति प्रगतानि षोडशविधाः सुभावनाः ॥३२॥
समभावयत्पथि जिनेंद्र परिविरचिते विमुक्तये ॥
जातविपुलधृतिरचलितः स चिराय दर्शनविशुद्धमिद्धधीः ॥३३॥
अपवर्गकारणपदार्थपरिघटितभक्तिभूषितः ॥
नित्यमपि विनयमप्रतिमं स गुरुष्वतिष्ठिपदनिष्ठितादरं ॥३४॥
प्रथयांबभूव परिगुप्तिममलविधिना समाधिना ॥
शीलवृति परिवृतेषु सदा स परं व्रतेष्वनतिचारमाचरन् ॥ ३५ ॥
समभावयन्नवपदार्थविधिकथनवाङ्मयं सदा ॥
तत्वमखिलजगतः सकलं हतशङ्कमैक्षत पुरःस्थितं यथा ॥३६॥

असतात ते दुष्कर कार्य करतांनाही गोंधळून जात नाहींत. ३१ तीन गुप्तींच्या द्वारें धारण केलेला आहे पुष्कळ संवर ज्यांनीं असे ते मुनीराज आळसरहित होऊन ध्यान, विनय, स्वाध्याय, प्रायश्चित्त, वैयावृत्त्य, व्युत्सर्ग अशा रीतीनें सहा प्रकारचे अंतरंग उत्कृष्ट निरुपम तप ते करीत असत. ३२ आत्मानुभवानें अधिक निर्मल झाली आहे बुद्धि ज्यांची असे हे मुनीश्वर तीर्थंकर पदवीला कारण असलेल्या षोडश कारण भावनांचे चिंतन करीत असत.

३३ ज्याच्या ठिकाणीं अतिशय धैर्य प्रगट झालें आहे, ज्यांचें ज्ञान उज्ज्वल झालें आहे, जिनेश्वरांनीं निर्माण केलेल्या मोक्ष मार्गामध्यें जे दृढ आहेत असे ते मुनिराज पुष्कळ कालपर्यंत सम्यग्दर्शनाच्या निर्मलतेचें चिंतन करीत असत. ३४ मोक्षाला कारण अशा जीवादि पदार्थापासून उत्पन्न झालेल्या भक्तीनें अलंकृत झालेले हे मुनिराज गुरूंच्या ठिकाणीं नेहमीं अत्यादरयुक्त, अप्रतिम विनय करीत असत. ३५ निर्दोष विधीनें ध्यानाच्याद्वारें शीलरूपी कुंपण ज्यांना आहे अशा अहिंसादि व्रतामध्यें अतिचार बिलकुल उत्पन्न न होऊं देणारे हे मुनिवर्य त्यांचें सर्व तऱ्हेनें रक्षण करीत असत. ३६ जीवादिक नऊ पदार्थांचें ज्यांत स्वरूप व त्यांचें प्रकार वगैरे सांगितलें आहे अशा शास्त्रांचें मनन करणारे हे मुनीश्वर सर्व जगाचें सर्व स्वरूप विशदपणें पुढें उभें राहिल्याप्रमाणें शंका-रहित पाहात असत. ३७ या दुःखदायक अशा संसाररूपी जंगलांतून

स्वमितः कथं व्यपनयामि भवगहनतो दुरंततः ॥
नित्यमवकलयतोऽस्य मतिर्विमला समाधिमिति वेगमास्थिता ३७
स्वमपि स्वकीयमपलौल्यमतिरनिशमात्मना त्यजन् ॥
लोभलवमपि कथं कुरुते हृदयेऽथवा विदितमुक्तिपद्धतिः ॥३८॥
अनिगुह्य वीर्यं मसमानमकृत स तपस्तपोधनः ॥
भाविनिरुपमसुखस्पृहयायतिमान्निवस्यति यथाबलं न कः ॥३९॥
स समादधे स्वमथ भेदकृति सति च कारणे परं ॥
धैर्यमवगतपदार्थ गतिर्विजहाति कृच्छ्रपतितोऽपि नाथवा ॥४०॥
गुणिनां चकार स गदेषु निपुणतरधीः प्रतिक्रियां ॥
त्यक्तसकलममतोऽपि सदा यतते परोपकृतये हि सज्जनः ॥४१॥
स बहुश्रुतेष्वथ जिनेषु गुरुषु च परां सदागमे ॥
भावविशदहृदयेन ततो विततान शक्तिमनवद्यचेष्ठितः ॥ ४२ ॥

मी स्वतःला कसे बरें मुक्त करीन असा नेहमीं विचार करणाऱ्या या यतिवर्याची निर्मलबुद्धि अतिशय वेगानें समाधीवर दृढ राहिली. ३८ ज्यांनीं मोक्षाचा मार्ग जाणिला आहे. पदार्थावरील आसक्तीचे परिणाम ज्याच्या बुद्धीपासून वेगळे झालेले आहेत, हें माझें आहे व मी यांचा स्वामी आहे अशी भावना नेहमीं ज्यांनीं स्वतः काढून टाकिली आहे असें हे मुनिपुंगव आपल्या हृदयामध्यें थोडा-देखील लोभ धारण करतील काय ? ३९ आपली शक्ति न छपवितां हे तपस्वी उत्कृष्ट असें तपश्चरण करीत असत. बरोबरच आहे कीं, पुढें प्राप्त होणाऱ्या निरु-पमसुखाच्या इच्छेनें कोणता बुद्धिमान मनुष्य यथाशक्ति प्रयत्न करीत नाहीं बरें ? प्रयत्न करितोच. ४० रत्नत्रयापासून पृथक् करण्याचीं कारणें प्राप्त झालीं असतां पदार्थाचें स्वरूप ज्यांना चांगले माहीत झालें आहे असे ते मुनीश्वर स्वतःला स्वतः-मध्यें पुनः स्थिर करीत असत. व संकटप्राप्त झालें असतांही धैर्याचा त्याग करीत नसत. ४१ सर्वांविषयीं ममताभावाचा ज्यांनीं त्याग केला आहे असे हे अतिशय निपुण बुद्धीचे तपस्वी रत्नत्रयधारक अशा गुणी भव्यांना रोग झाला असतां त्यांचा इलाज करीत असत. बरोबरच आहे कीं, सज्जन पुरुष नेहमीं परोपकार करण्याकरिताच प्रयत्न करीत असतात. ४२ निर्दोष

अनपेतकालमथ षट्सु नियमविधिषूद्यतोऽभवत् ॥
ज्ञातविमलसकलावगमैर्न हितोद्यतैरलसतावलम्ब्यते ॥ ४३ ॥
वरवाङ्मयेन तपसा च जिनपतिसपर्यया सदा ॥
धर्ममनवरतमुज्ज्वलयन्समयस्य साधुरकरोत्प्रभावनाम् ॥ ४४ ॥
असिखड्गधारमिव शातमसुकरतरं यथागमं ॥
ज्ञाननिधिरपि चरन्सुतपः सहधर्मसु प्रकृतिवत्सलोऽभवत् ॥४५॥
कनकावलीं परिसमाप्य विधिवदपि रत्नमालिकां ॥
सिंहविलसितमुपावसदप्युरुमुक्तये तदनु मौक्तिकावलीं ॥४६॥
अथ भव्यचातकगणस्य मुदमविरतं प्रवर्द्धयन् ॥
ज्ञानजलशमितपापरजाः शुशुभे सदा मुनिनभस्यवारिदः॥ ४७ ॥

चारित्राला धारण करणारे हे मुनिश्रेष्ठ परिणामांनीं निर्मल झालेल्या अंतःकरणानें स्वमत व परमताला जाणणारे मुनिवर्य, श्रीजिनेश्वर आचार्य व शास्त्र यांच्या ठिकाणीं उत्कृष्ट भक्ति करीत असत. ४३ हे मुनिराज सामायिक प्रतिक्रमण वगैरे सहा प्रकारच्या आवश्यक क्रियांमध्यें योग्य वेळेचें उल्लंघन न करितां तत्पर राहात असत. बरोबरच आहे कीं, ज्यांनीं निर्दोष अशा सर्व शास्त्रांचें अध्ययन केलें आहे व स्वतःच्या हितासाठीं उद्युक्त झालेले असे पुरुष आळसाचा आश्रय करीत नाहींत. ४४ उत्कृष्ट धर्मोपदेशानें, उत्तम तपश्चरणानें, श्रीजिनेश्वराच्या पूजनानें नेहमीं धर्माला उज्वल करणाऱ्या या मुनिराजांनीं या जैनशासनाची उत्तम प्रभावना केली.

४५ हे मुनीराज तरवारीच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण व अतिशय कठिण असें शास्त्रोक्त तप करीत असत. हे ज्ञानाचा खजिना होते तथापि साधर्मिक इतर मुनिजनावर हे हृदयापासून प्रेम करीत असत. ४६ या मुनिराजांनीं प्रथमतः योग्य विधीस अनुसरून कनकावली तपश्चरण करून नंतर रत्नमालिका तपश्चरण केले या नंतर सिंहनिष्क्रीडित व उत्कृष्ट मुक्तिसुख प्राप्त होण्यास मौक्तिकावली हें तपश्चरण केलें. कनकावली व्रतांत चारशें चौतीस उपवास व अठ्याऐंशी पारणा असतात. हे व्रत एक वर्ष पांच महिने व बारा दिवसांत समाप्त होतें. रत्नमालिका व्रतांत तीनशें चौऱ्याऐंशी उपवास व पारणा अठ्याऐंशी होतात. सिंहनिष्क्रिडित व्रतांत चारशें शहाण्णव उपवास व एकसष्ट पारणा होतात. हे व्रत पांचशें सत्तावन दिवसांत

अपरिग्रहोऽपि स महर्द्धिरभवदमलांगभागपि ॥
क्षीणतनुरतनुधीश्च वशी विभयोऽपि गुप्तिसमितिप्रवर्तनः ॥४८॥
अमितक्षमामृतजलेन मनसि निरवापयत्परं ॥
क्रोधशिखिनमविचिंत्यमहो खलु कौशलं सकलतत्त्ववेदिनां ॥४९॥
मनसो निराकुरुत मानविषमुचितमार्दवेन सः ॥
ज्ञानफलमिति तदेव परं कृतबुद्धयो हि यमिनां प्रचक्षते ॥५०॥
अपि जातु न प्रकृतिसौम्यविशदहृदयः स मायया ॥
प्रापि विमलशिशिरांशुचयः समवाप्यते किमुत मिश्रया शशी ॥५१॥
निजविग्रहेऽपि हृदि यस्य तनुरपि न विद्यते स्पृहा ॥
तेन विजित इति लोभरिपुः किमु वात्र विस्मयपदं मनीषिणः ॥५२॥

समाप्त होते. मुक्तावली व्रतांत पचवीस उपवास व नऊ पारणा होतात हें व्रत ३४ दिवसांत समाप्त होतें. ४७ भव्यरूपी चातक समुहास नेहमीं अतिशय आनंद देणारे व ज्ञानरूपी पाण्यानें पापरूपी धूळीचा ज्यांनीं उपशम केला आहे असे हे मुनिराज श्रावण मासांतील मेघाप्रमाणें शोभूं लागले. ४८ हे मुनिराज परिग्रहरहित असूनही विपुल ऐश्वर्यानीं युक्त होते. अर्थात महाऋद्धियुक्त होते. यांना अणिमा महिमा वगैरे पुष्कळ ऋद्धि प्राप्त झाल्या होत्या. निर्मल शरीराचे धारक असूनही क्षीण शरीराचे होते. अर्थात तपः प्रभावानें यांचें शरीर तेजस्वी बनलें होतें. यांची बुद्धि विशाल होती व हे जितेंद्रिय होते. भयरहित असूनही गुप्ति व समिती यामध्यें प्रवृत्त होते. ४९ पुष्कळ क्षमारूपी अमृतासारख्या पाण्यानें मनामध्यें उत्पन्न झालेला क्रोधरूपी अग्नि यांनीं पूर्ण शांत केला. बरोबर आहे कीं, संपूर्ण तत्वें जाणणाऱ्या महापुरुषांचें चातुर्य अचिंत्य आहे. ५० उत्तम व योग्य अशा मार्दव गुणानें या मुनिवर्यांनीं आपल्या मनांतून गर्व विष काढून टाकिलें होतें. जे विद्वान असतात ते मुनीश्वराच्या ज्ञानाचें हेंच फल आहे असें सांगतात अर्थात विनय धारण करणें हें ज्ञानाचें फल आहे. ५१ स्वाभाविकपणेंच शांत व निर्मळ हृदय ज्यांचें आहे असे हे मुनिवर्य मायेनें–कपटानें कधींही युक्त झाले नाहींत. बरोबरच आहे कीं निर्मल व थंडगार किरणसमूहानीं युक्त असलेला चंद्र अंधःकारपूर्ण अशा रात्रीशीं कधीं संयोग पावेल काय ? ५२ या मुनिश्वराच्या चित्तांत

अतिनिर्मलं तमुपगम्य मुनिगुणगणास्तमोपहाः ॥
रेजुरधिकमवदाततमाः स्फटिकाद्रिमिंदुकिरणा इवोन्नतं ॥ ५३ ॥
उदपाटयन्मदमुदारमतिरिति तरां समूलतः ॥
संगविरहितसमाचरणो मरुदल्पमूलमिव जीर्णपादपं ॥ ५४ ॥
तपसा दहन्नपि स कर्ममलमखिलमात्मनि स्थितं ॥
तापमभजत मनागपि न स्वयमेतदद्भुतमहो न चापरं ॥ ५५ ॥
न तुतोष भक्तिविनतस्य नच परिचुकोप विद्विषे ॥
स्वानुगतयतिजने प्यभवन्न रतः सतां हि समतैव भाव्यते ॥५६॥
शमसंपदास्थितमुपेत्य तमपि तपसा विदिद्युते ॥
भाति जलधरपथं विमलं रविबिंबमेत्य किमु नो घनात्यये ॥ ५७ ॥

स्वतःच्या शरीराविषयीं ही थोडीशी ही इच्छा ( प्रेम ) नव्हती यावरून त्यांनीं लोभरूपी शत्रूला जिंकिलें होतें हें सिद्धच होतें. विद्वान मनुष्याला यांत आश्चर्य करण्यासारखें काय आहे ? ५३ अंधाराचा नाश करणारे, अत्यंत निर्मल असें चंद्र किरण जसें उच्च व अतिशय निर्मल अशा स्फटिकाच्या पर्वताचा संयोग प्राप्त करून अतिशय शोभतात त्याप्रमाणें अज्ञाननाशक, अतिशय स्वच्छ असे मुनीश्वरांचे गुणसमूह अति निर्मल व उन्नत अशा या नंदन मुनिराजाचा आश्रय घेऊन अतिशय शोभूं लागले. ५४ जसें वारा थोड्याशा मुळांच्या जोरावर उभा राहिलेल्या जुनाट वृक्षाला उपडून टाकितो तसें विशालबुद्धीच्या या मुनीश्वरांनीं—परिग्रहांनीं पूर्ण रहित असें आपलें चारित्र ठेऊन गर्वाला मुळापासून पूर्ण उपडून टाकिलें. ५५ स्वतःच्या आत्म्यांत सांठलेला सर्व कर्म मळ या मुनीश्वरांनीं तपांच्याद्वारें जाळून भस्म केला परंतु त्या तपाच्याद्वारें हे स्वतः थोडेसे देखिल संतप्त झाले नाहींत हेंच फार आश्चर्यकारक आहे. याशिवाय दुसरी गोष्ट आश्चर्यकारक नाहीं.

५६ जो भक्तीनें आपल्या चरणीं नम्र झाला आहे त्याच्या विषयीं यांना आनंद होत नसे व शत्रूवर रागावतही नसत. जे या मुनिराजांना नेहमीं अनुसरतात त्यांच्याविषयीं देखिल यांच्या ठिकाणीं प्रेम उत्पन्न होत नसे. बरोबरच आहे कीं, सत्पुरुष नेहमीं समतेचाच विचार करितात तीच आपल्या अंगीं आणण्याचा प्रयत्न करीत असतात. ५७ शांतिसंपत्तिनें युक्त असलेल्या या मुनिश्वरांच्या ठिकाणीं तपश्चरणानें प्रवेश करून घेतल्यामुळें ते फार शोभूं लागले. बरोबर

अतिदुःसहादपि चचाल न स निजधृतेः परीषहात् ॥
भीममरुदभिहतोऽपि तटीं समतीत्य याति किमु यादसां पतिः ५८
जनताहिताय तमिमाश्च शमनिधिमनेकलब्धयः ॥
शीतरुचिमिव शरत्समये शिशिराः सुधारसपरिच्युतो रुचः ॥५९॥
विमलाशयं तमुपगम्य विरहितधियोऽपि मानवाः ॥
धर्ममनुपममुदा जगृहुः शमयेन्मृगानपि न किं दयार्द्रधीः ॥ ६० ॥
स्वमतार्थसिद्धिमभिवीक्ष्य तमभजत भव्यसंहतिः ॥
पुष्पभरविनतचूततरुर्न परीयते किमु मुदालिमालया ॥ ६१ ॥
इति वासुपूज्य जिनतीर्थमुरुगुणगणैः प्रकाशयन् ॥
सम्यगकृत स तपः परमं चिरकालमन्ययतिभिः सुदुश्चरं ॥ ६२ ॥

आहे की, शरत्काली निर्मल अशा मेघमार्गाचा—आकाशाचा आश्रय करून सूर्यमंडल शोभत नाहीं काय ? ५८ अतिशय दुःसह परिषह होत असतांही हे मुनिपुंगव स्वतःच्या धैर्यगुणापासून चलायमान झाले नाहींत अर्थात् त्यांनीं धैर्य सोडून दिलें नाहीं. बरोबरच आहे कीं, फार मोठ्या वाऱ्यानें खवळलेला असाही समुद्र तटाला उल्लंघून वाहतो काय ? ५९ पूर्ण शांतीचा सागर असलेल्या या मुनिराजांना लोककल्याणास्तव अनेक ऋद्धींची प्राप्ति झाली. शरत्कालीं अमृतरसाची वृष्टि ज्याच्यापासून होत असे थंडगार किरण जसें चंद्राचा आश्रय करितात व त्यापासून लोकांना आनंद प्राप्त होतो त्याप्रमाणें यांना अनेक ऋद्धि प्राप्त झाल्या. ६० निर्मल विचारयुक्त अशा या मुनीश्वरांकडे येऊन अतिशय मुर्ख अशींही माणसें जिनधर्माचा अनुपम आनंदानें स्वीकार करीत असत. बरोबरच आहे की, दयेनें ओली झाली आहे बुद्धि ज्याची अर्थात् अतिशय दयाळू असा मनुष्य पशूंना देखिल शांत बनवीत नाहीं काय ? ६१ आपल्या मताची—जैनधर्माची वृद्धि या मुनीश्वरापासून होत आहे असें पाहून भव्यांचा समुदाय यांची उपासना करूं लागला. बरोबरच आहे कीं, मोहरांनीं अतिशय लकडलेला आम्रवृक्ष भुंग्यांच्या समुदायानीं आनंदानें वेढला जात नाहीं काय ? ६२ याप्रमाणें श्रीवासुपूज्य तीर्थंकरच्या तीर्थाचा आपल्या फार मोठ्या अशा गुणांनीं चोहोंकडे उत्तम रीतीनें प्रसार करणाऱ्या या महा मुनीश्वरांनीं करण्यास अतिशय कठिण असें उत्कृष्ट तपश्चरण इतर मुनींसह फार दिवसपर्यंत केलें.

अथायुरंते खलु मासमेकं प्रायोपवेशं विधिना प्रपद्य ॥
ध्यानेन धर्म्येण विहाय विन्ध्य प्राणान्मुनिः प्राणतमाप कल्पं ॥६३॥
पुष्पोत्तरे पुष्पसुगंधिदेहो बभूव देवाधिपतिर्विमाने ॥
तस्मिन्नसौ विंशतिसागरायुः नाप्नोति किं भूरितपःफलेन ॥ ६४ ॥
तं जातमिंद्रमवगम्य सुराः समस्ताः सिंहासनस्थमभिषिच्य मुदा प्रणेमुः ॥
लीलावतंसमिव पादयुगं तदीयं रक्तोत्पलद्युतिहरं मुकुटेषु कृत्वा॥६५
भावी तीर्थकरोऽयमित्यविरतं संपूज्यमानः सुरैः ॥
अक्षय्यावधिरप्सरोजनवृतो रेमे स तस्मिन्मुदा ॥

६३ यानंतर आयुष्य समाप्तीच्यावेळीं एक महिनापर्यंत शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें प्रायोपवेशविधीनें ध्यान करून दशलक्षणीक धर्माचें चिंतन करून विंध्यपर्वतावर ह्या मुनिराजानीं प्राणत्याग केला. तेव्हां त्यांचा आत्मा प्राणत स्वर्गांत उत्पन्न झाला. स्वतःच्या शरीराचा औषधादिकांनीं स्वतः उपचार न करणें व इतरांकडून कोणताही उपचार अथवा सेवा-शुश्रूषा करून न घेतां धर्मध्यानांत प्राणत्याग करणे यास प्रायोपवेश ह्मणतात. ६४ तो महामुनि फुलाप्रमाणें ज्याचा देह सुगंधयुक्त आहे, ज्याचे वीस सागर वर्षांचें आयुष्य आहे असा होत्साता त्या स्वर्गांत पुष्पोत्तर विमानांत सर्व देवांचा अधिपति अर्थात इंद्र होऊन जन्मला. बरोबरच आहे कीं, पुष्कळ तपश्चरणाच्या फलानें जगामध्यें कोणती वस्तु प्राप्त होत नाहीं बरें? सर्व उत्तम वस्तु तपाच्या प्रभावानें मिळतातच.

६५ हे नंदन महामुनी आपल्या स्वर्गाचे अधिपती अर्थात् इंद्र झाले आहेत. असें जाणून सिंहासनारूढ झालेल्या त्यांच्या सर्व देवांनीं अभिषेक केला व तांबड्या कमलाच्या कांतीला जिंकणाऱ्या त्यांच्या चरणकमलाला क्रीडाभूषणाप्रमाणें समजून मोठ्या आनंदानें त्यांनीं नमस्कार केला. ६६ हा इंद्र पुढच्या जन्मीं तीर्थंकर (महावीर जिन) होणार आहे म्हणून देवाकडून नेहमीं पूजिला जात असे. (या इंद्राच्या) गुणसंपत्तीनें जणु काय उत्कंठित झालेल्या मोक्षलक्ष्मीकडून वर्फाच्या कांतीला पराजित करणाऱ्या हारलतेच्या मिषानें आलिंगिला गेलेला व ज्याचें अवधिज्ञान क्षय न पावणारे अर्थात् पुढच्या जन्मींही बरोबर जाणारें आहे अस

औत्सुक्यं गुणसंपदा गमितयेवालिंग्यमानो गले ॥
नीहारद्युतिहारिहारलतिकाव्याजेन मुक्तिश्रिया ॥ ६६ ॥

❀इत्यसगकृते वर्द्धमानचरिते नंदनपुष्पोत्तरगमनो नाम
षोडशः सर्गः समाप्तः ❀ ॥

होतसाता त्या स्वर्गांत अप्सरांनीं वेष्टित होऊन मोठ्या आनंदानें रममाण होत असे.

* याप्रमाणें महाकवि असगकृत वर्द्धमान चरित्रांत नंदन महामुनि पुष्पोत्तर विमानामध्यें उत्पन्न झालें याचें वर्णन करणारा सोळावा सर्ग समाप्त झाला.

# सप्तदशः सर्गः ।

श्रीमानथेह भरते स्वयमस्ति धात्र्या पुंजीकृतो निज इवाखिलकांतिसारः ॥
नाम्ना विदेह इति दिग्वलये समस्ते ख्यातः परं जनपदः पदमुन्नतानाम् ॥१॥
गोमंडलेन धवलेन सदा परीता स्वेच्छानिषण्णहरिणांकितमध्यदेशा ॥
रात्रौ शिशोरपि चिराय विलोकनीया यत्रेंदुमूर्तिरिव भात्यटवी समग्रा ॥२॥
क्षेत्रेषु यत्र खलता ललनालकेषु कौटिल्यमंबुजवने मधुपप्रलापः ॥
पंकस्थितिः कमलशालिषु सर्वकालं संलक्ष्यते शिखिकुलेषु विचित्रभावः ॥३॥

१ या भरत क्षेत्रांत संपूर्ण दिङ्मंडलांत प्रसिद्ध व सत्पुरुषांची उत्कृष्ट निवासभूमि असा विदेह नांवाचा देश आहे. हा संपत्तीनें पूर्ण भरलेला आहे व पृथ्वीचा आपोआप एकत्र झालेला संपूर्ण कांतीचा जणु उत्कृष्ट समुदाय आहे असा शोभत आहे. २ या देशांतील सर्व अरण्य भाग पांढऱ्या रंगाच्या गायींनीं गजबजलेला व स्वच्छंदपणें बसलेल्या हरिणांनीं युक्त आहे मध्यभाग ज्याचा असा असल्यामुळें रात्रीं लहान मुलाकडूनही पुष्कळ वेळपर्यंत पाहण्यास योग्य अशा चंद्राच्या बिंबाप्रमाणें शोभत असे. चंद्रबिंबही धवल गोमंडलानें—अर्थात् पांढऱ्या किरण मंडलानें शोभत असतें व त्याचा मध्यभाग स्वेच्छेनें बसलेल्या हरिणानें युक्त आहे अशा चंद्रबिंबाला लहान मुलेंही रात्रीं जसें निर्भयपणें पाहूं शकतात तसें या देशा-

पूगद्रुमैः स्वगतनागलतादलाभस्यामीकृतांबरतलैर्निगमाः परीता ॥
भास्वन्महामरकतोपलकल्पितोच्चशालावलीवलयिता इव यत्र भान्ति ॥४॥

तृष्णां सदाश्रितजनस्य विनाशयद्भिरंतःप्रसत्तिसहितैरनपेतपद्मैः॥
तोयाशयैरमलिनद्विजसेवनीयैः सद्भिश्च भाति भुवि यः समतीत-संख्यैः ॥५॥

यस्मिन्सदास्ति मुरजेषु कराभिघातो बंधस्थितिर्वरहयेषु च शब्द-शास्त्रे ॥
द्वंद्वोपसर्गगुणलोपविकारदोषो बिंबाधरे मृगदृशामपि विद्रुमश्रीः॥६॥

च्या जंगलांत हरिणे व गायी नेहमीं राहात असत. इतर क्रूर जंतु बिलकूल नसल्या-मुळें लहान मुलांनाही रात्रीं देखिल ते अरण्य पाहातांना भय वाटत नसे. या देशांतील शेतांतच फक्त खलता-धान्याचे खळें होतें. लोकांमध्यें खलता-दुष्टता नव्हती, कुटिलपणा फक्त स्त्रियांमध्यें होता, अर्थात कपटाचार फक्त स्त्रियां-मध्यें होता. इतर ठिकाणीं कुटिलता-वांकडेपणा नव्हता. कमलसमूहामध्येंच मधुप प्रलाप-भुंग्यांचा गुंजारव होता. लोकांमध्यें मधुप प्रलाप नव्हता अर्थात् दारु पिऊन उन्मत्त बनून वरळणें ही गोष्ट नव्हती. पंकास्थिति-चिखलांत राहणे ही गोष्ट फक्त कमळें व साळी यामध्ये आढळून येत असे. लोकांमध्यें पंकास्थिति-पाप कार्यांत राहणें ही गोष्ट आढळत नव्हती. विचित्र भाव नाना रंगाचें अस्तित्व मोरामध्यें आढळून येत होते व तेथील लोकांमध्यें कपट, द्वेष वगैरे अनेक तऱ्हेचे अयोग्य मनोविकार नव्हते. ४ स्वतःला वेढणाऱ्या नागवेलीच्या पानांच्या कांतीनें ज्यांनी आकाश भागाला हिरवेगार केलें आहे अशा सुपारीच्या झाडांनी व्याप्त झालेलीं या देशांतील गांवें चमकणाऱ्या अमूल्य पांच रत्नांनीं बनविलेल्या उंच तट पंक्तीनीं वेढल्याप्रमाणें शोभत असत.

५ तो विदेह देश आश्रित लोकांची तहान भागविणारे, तळभागीं नेहमी स्वच्छ असलेले, कमलांनीं सहित असलेले, हंस पक्षांनीं सेवनीय अशा असंख्यात नळीं व सरोवरें यांनी या भूतलावर जसा शोभत आहे तसाच आश्रित लोकांच्या आशेचा नाश करणारे अर्थात त्यांची इच्छा पूर्ण करणारे, हृदयांत नेहमीं प्रसन्नता धारण करणारे, लक्ष्मीनें-संपत्तीनें युक्त, व निर्दोष असे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य

तत्रास्त्यथो निखिलवस्त्ववगाहयुक्तं भास्वत्कलाधरबुधैः सवृषं सतारं॥
अध्यासितं वियदिव स्वसमानशोभं ख्यातं पुरं जगति कुंडपुरा-
भिधानं ॥ ७ ॥
प्राकारकोटिघटितारुणरत्नभासां छायामयैः परिगता पटलैः
समंतात् ॥
आभाति वारिपरिखा नितरामनेकां संध्याश्रियं विदधतीव
दिवापि यत्र ॥ ८ ॥
धौतेंद्रनीलमणिकल्पितकुट्टिमेषु यत्रोपहाररचितान्यसितोत्पलानि ॥
एकीकृतान्यपि सलीलतया प्रयांति व्यक्तिं पतद्भ्रमरहुंकृतिभिः
समंतात् ॥ ९ ॥

याकडून आदरणीय अशा असंख्यात सत्पुरुषांनीं चोहोंकडे शोभत आहे. ६ या विदेह देशांत कराभिघात–हातांनीं ठोकण्याची क्रिया फक्त मृदंगामध्येंच घडून येत होती. लोकामध्यें परस्परांत ही क्रिया घडून येत नव्हती. उत्तम घोड्यांच्या ठिकाणींच बंध स्थिति–बांधून घातल्यामुळें एकाच ठिकाणीं राहणें ही क्रिया होती. परतु लोकामध्यें ही गोष्ट होत नव्हती. शब्दशास्त्रामध्यें–व्याकरणांत द्वंद्व समास, प्र, पर, उप वगैरे उपसर्ग, गुण, लोप, विकार होणें वगैरे गोष्टी होत्या परंतु तेथील लोकांत द्वंद्व–तंटा, उपसर्ग,–दुःख देणें, गुणलोप–गुणांचा–सदाचाराचा नाश होणें, विकार–रोगादिक उद्भवणें हे दोष नव्हते. या देशांतील स्त्रियांच्या तोंडल्याप्रमाणें असलेल्या ओठांत विद्रुमश्री पोवळ्याप्रमाणें कांति होती. परंतु तो देश विद्रुमश्री–झाडांच्या शोभेनें रहित नव्हता. अर्थात तेथें पुष्कळ झाडें असल्यामुळें त्याला फार शोभा आली होती. ७ त्या विदेह देशांत सगळ्या वस्तूंना आश्रय देणारें, सूर्य, चंद्र, बुध, वृषभ राशि, यांनीं सहित, तारागणांनींयुक्त, अशा आकाशाप्रमाणें शोभा धारण करणारें जगांत प्रख्यात असलेलें कुंडलपूर या नांवाचें शहर आहे. हें शहरही ( निखिलवस्त्ववगाहयुक्त- सर्व वस्तूंना आश्रय देणारें ) भास्वत्कलाधर बुधैः अध्यासित, शोभणाऱ्या कलांना धारण करणाऱ्या विद्वान लोकांकडून निवास केले गेलेले, सद्वृष-धर्मानें सहित अथवा बैलांनीं सहित, सतार–चांदी, सोनें, मोतीं यांनीं युक्त असें शोभत होतें. ८ तटाच्या शिखरांना

जैत्रेषवः सुमनसो मकरध्वजस्य निस्तेजितांबुजरुचो शशलक्ष्मभासः
अप्रावृषो नवपयोधरकांतियुक्ता यस्मिन्विभान्त्यसरितः सरसा
रमण्यः ॥ १० ॥
अत्युन्नताः शशिकरप्रकरावदाता मूर्धस्थरत्नरुचिपल्लवितांतरिक्षाः
उत्संगदेशसुनिविष्टमनोज्ञरामाः पौरा विभांति भुवि यत्र
सुधालयाश्च ॥ ११ ॥

बसविलेल्या पद्मराग रत्नांच्या कांतीच्या छायामय समूहांनीं सर्व बाजूंनीं व्याप्त झालेला पाण्याचा खंदक या शहरांत दिवसा देखिल नाना प्रकारच्या विपुल संध्याकाळच्या शोभेला उत्पन्न करीत असल्याप्रमाणें शोभतो. ९ स्वच्छ अशा इंद्रनील रत्नांनीं निर्मिलेल्या जमिनीवर शोभेसाठीं ठेवलेलीं निळीं कमळें जमिनीशीं समान कांतीमुळें एकरूप झालीं होतीं परंतु त्यावर लीलेनें येऊन पडणाऱ्या भुंग्यांच्या गुंजारवांनीं हीं कमळें आहेत व ही जमीन आहे असें व्यक्त होत होतें. १० या कुंडलपूर शहरांतील स्त्रिया निर्मल अंतःकरणाच्या होत्या व मदनाच्या विजयी बाणाप्रमाणें होत्या. यांचें सौंदर्य चंद्राच्या किरणाप्रमाणें मनोहर होतें व यांनीं कमलामध्यें जिचें प्रेम आहे अर्थात कमलामध्यें जी नेहमीं राहत असते अशा लक्ष्मीला तेजोविहीन बनविलें होतें, वर्षाऋतु नवपयोधर कांतियुक्त असतो अर्थात नवीन पयोधर मेघ त्यांच्या कांतीनें शोभेनें युक्त असतो परंतु या स्त्रिया वर्षाऋतु स्वरूपी नसतांही नवपयोधर–नवीन स्तनांच्या कांतीनें युक्त होत्या. तसेंच या स्त्रिया नदीच्या स्वरूपाच्या नसतांही सरसा अर्थात सरसांनीं शृंगारादि रसांनीं सहित होत्या. नद्याही सरसा अर्थात रसानें–पाण्यानें सहित असतात.

११ या कुंडलपुरशहरांतील श्रीमंत लोकांचे वाडे आतिशय उंच, चंद्राच्या किरणसमूहाप्रमाणें निर्मळ, गच्चीच्या अग्रभागीं बसविलेल्या रत्नांच्या कांतीनें आकाशाला पल्लवयुक्त–पालवी फुटल्याप्रमाणें करणारे, ज्यांच्या मध्यभागीं सुंदरस्त्रिया बसल्या आहेत असे शोभतात. याचप्रमाणें तेथील पुरुषही आतिशय उच्च कुलांत जन्मलेले, चंद्राच्या किरणसमूहाप्रमाणें सुंदर, मस्तकावरील चूडामणि रत्नाच्या कांतीनें आकाशाला पालवीनें युक्त करणारे, व ज्यांच्या मांडीवर सुंदर स्त्रिया बसलेल्या आहेत असें शोभतात. १२ हाताच्या अग्रभागीं असलेले क्रीडेचे निळें कमळ सोडून देऊन व ज्यांतून मकरंद गळत आहे असें कानावरील कमल

लीलामहोत्पलमपास्य कराग्रसंस्थं कर्णोत्पलंच विगलन्मधु यत्र भृंगाः
निश्वाससौरभरता वदने पतंति स्त्रीणां मृदुर्मृदुकराहतिमीप्सवश्च॥१२॥
आमुक्तमौक्तिकविभूषणरश्मिजालैः श्वेतीकृताखिलदिशो विहरंति
यस्मिन् ॥
वारांगनामदसलीलमितस्ततोऽपि ज्योत्स्नां दिवापि सुभगामिव
दर्शयन्त्यः ॥ १३ ॥
यस्मिन्विमानखचितामलचित्ररत्नच्छायावितानशबलीकृत-
विश्वदिक्काः ॥
बद्धेंद्रचापरचितांशुकगात्रिकेव संलक्ष्यते प्रतिदिनं नितरां
दिनश्रीः ॥ १४ ॥

देखिल त्यागून श्वासोच्छ्वासाच्या सुगंधामध्यें आसक्त झालेले भुंगे स्त्रियांच्या अतिं शय मउ अशा हातांच्या आघातांची इच्छा करणारे असे होत्साते वारंवार त्यांच्या मुखावर पडतात. १३ या नगरांत धारण केलेल्या मोत्यांच्या डागिन्यांच्या किरण समूहांनीं ज्यांनीं सर्व दिशांना उज्ज्वल केलें आहे अशा वेश्या गर्वोद्धत होऊन लीलेनें जेव्हां इकडे तिकडे फिरतात त्यावेळीं त्या दिवसा देखिल सुंदर असें रात्रींचें चांदणें जणु लोकांना दाखवित आहेत असें वाटत असे. १४ या नगरांत सात ताळांच्या माडीला लावलेल्या स्फटिक वगैरे नानाप्रकारच्या रत्नांच्या कांतिमंडपानें चित्र विचित्र केल्या आहेत दिशा जिनें अशी दिवसलक्ष्मी इंद्रधनुष्याच्या वस्त्रानें जणु जिचें शरीर गुरफटलें आहे अशी होऊन दररोज फार शोभिवंत दिसत असे या शहरांतील लोक अहि–इन–वपु सर्पांचा मालक जो शेष त्याचे सारखें शरीर धारण करीत असूनही अभुजंगशील होते अर्थात् सर्पाच्या स्वभावाचे नव्हते. या विरोधाचा परिहार याप्रमाणें अ–हीन–वपु–उत्तम शरीराचे धारक असे तेथील लोक अभुजंगशील होते. भुजंग जार पुरुष त्याच्या स्वभावाचे नव्हते. तसेंच ते लोक मित्रानुरागसहित–सूर्याव- रील प्रेमानें युक्त असून कलाधरेच्छ–चंद्राची इच्छा करणारे होते. या विरोधाचा परिहार मित्रानुरागसहिता—मित्रावरील प्रेमानें सहित होते व नाना कलाधारक आपण बनावे अशी इच्छा करणारे होते. याचप्रमाणें तेथील जनता प्रसिद्ध असे

यस्मिन्नहीनवपुरप्यभुजंगशीला मित्रानुरागसहिताऽपि कलाधरेच्छा ।
भाति प्रतीतसुवयःस्थितिरप्यपक्षपाता निवासिजनता सरसाप्य-
रोगा ॥ १५ ॥

सूर्यांशवो निपातिता भवनोदरेषु वातायनस्थितहरिन्मणिरश्मि-
लिप्ताः ॥

तिर्यङ्निवेशितनवायतवंशशंकामभ्यागतस्य जनयंति जनस्य यत्र
॥ १६ ॥

रामाविभूषणमणिप्रकरांशुजालविध्वंसितांधतमसेषु गृहोदरेषु ॥
व्यर्थीभवन्ति निशि यत्र परं प्रदीपा यद्यंजनं खलु वमंति न
नेत्रपथ्यं ॥ १७ ॥

दोषः स यत्र निशि सौधचयाग्रलग्नस्फीतेंदुकांतमणिकल्पितदुर्दि-
नेन ॥

तिम्यंति यद्युवतयोर्द्धपथे स्मरार्ताश्चंद्रोदये प्रियनिवासगृहं
प्रयान्त्यः ॥ १८ ॥

जे चांगले पक्षी त्याच्या अवस्थेनें युक्त होते ( प्रतीतसुवयः स्थितिः ) असें असूनही अपक्षपाता पंखांच्या पडण्यानें रहित होती अर्थात् प्रसिद्ध व उत्तम असे जे वय अर्थात तरुणपणा त्यानें युक्त होती व पक्षपातानें रहित होती. याचप्रमाणें ती जनता सरसा श्रृंगारादि रसानें सहित व रोगरहित होती. १६ खिडकीला बसविलेल्या पांच रत्नांच्या किरणांनीं लिप्त झालेले सूर्याचें किरण जेव्हां घरांत प्रवेश करीत असत तेव्हां घरामध्यें आलेल्या लोकांस येथें नवीन लांब वेळू तिरपे रचून ठेविले असावेत अशी शंका उत्पन्न करीत असत. पांच रत्नाच्या हिरव्या कांतीनीं संलग्न झालेले व खिडकींतून तिरपें येऊन आंत शिरणारे सूर्य किरण उपयुक्त कल्पनेप्रमाणें भासत असत. १७ या नगरांत स्त्रियांच्या डागिन्यांत जड- विलेल्या रत्नांच्या किरणसमूहांनीं जेथील दाट अंधार नाहींसा केला आहे अशा घराच्या मध्यभागीं लावलेले दिव्यांना जर नेत्राला हितकर असें अंजन त्यांनीं दिलें नसतें तर व्यर्थपणा आला असता. १८ या नगरांत रात्रीं चंद्रोदय झाला असतां

स्वच्छे कपोलफलके निशि कामिनीनां संलक्ष्यते शशधरः प्रतिमा-
च्छलेन ॥
आदातुमागत इवाननभूरिशोभां यस्मिन्स्वकांत्यविमलत्वतिरस्क्रि-
यायै ॥ १९ ॥
आनम्रराजकशिखारुणरत्नरश्मिबालातपप्रसरचुंबितपादपद्मः ॥
राजा तदात्ममतिविक्रमसाधितार्थः सिद्धार्थ इत्यभिहितः पुरमध्यु-
वास ॥ २० ॥
यो ज्ञातिवंशममलेन्दुकरावदातः श्रीमान्सदा ध्वज इवायतिमानुदग्रः।
निर्व्याजमुत्सवपरंपरया प्रकाशमुत्थापितोद्धरितभूमिरलंचकार ।२१।
यं प्राप्य रेजुरमला नरनाथविद्याः संयोजयंतमखिलं च फलेन लोकं॥
सर्वा दिशो जलधरात्ययमेत्य कालं कांतिं प्रसादसहितां किमु नोद्ध-
हंति ॥ २२ ॥

प्रिय पतीच्या घरीं जाण्यासाठीं स्त्रिया कामाकुल होऊन निघाल्या असतां अर्ध्या रस्त्यांत मोठ्या वाड्यांना जडविलेल्या निर्मल चंद्रकांत मण्यापासून गळत असलेल्या जलधारांनीं त्या भिजून ओल्या होत असत. एवढाच काय तो दोष त्या शहरांत आढळून येत असे. १९ या नगरांत रात्रौ स्वतःच्या कांतिमध्यें असलेला मलिनपणा काढून टाकण्यासाठीं व स्त्रियांच्या मुखांची पुष्कळ शोभा घेण्यासाठीं जणु चंद्र त्यांच्या स्वच्छ अशा गोल गालामध्यें प्रतिबिंबाच्या मिषानें प्रवेश करीत आहे असें दिसत असे. २० नम्र झालेल्या राजसमूहाच्या मस्तकावरील पद्मराग रत्नाच्या किरणांच्या कोमल प्रकाशाच्या प्रसारानें ज्याचें चरणकमल स्पर्शिलें गेले आहेत व ज्यानें स्वतःच्या निर्दोष बुद्धि व पराक्रमाच्या द्वारें विपुल संपत्ति मिळविली आहे असा सिद्धार्थ या नांवाचा राजा या शहरांत राहात होता. २१ जसा ध्वज निर्मल चंद्राच्या किरणाप्रमाणें शुभ्र, शोभायुक्त-सुंदर, लांब व उंच असतो व अनेक उत्सवाच्यावेळीं तो उचलून जमीनींत रोवून स्थापन करितात व हा ध्वज त्याला जोडलेल्या वेळूला स्वाभाविक स्पष्टपणें भूषित करीत असे; त्याप्रमाणें चंद्र किरणा प्रमाणें सुंदर, लक्ष्मी संपन्न, भाग्यशाली असा हा सिद्धार्थ राजा पराक्रमी होता. यानें पृथ्वीची उन्नति करून तिचा उद्धार केला होता, नेहमीं उत्सवांच्या परंपरेनें

दोषो बभूव गुणिनोऽप्ययमेक एव यस्य प्रतापमतुलं दधतो धरायां॥
वक्षःस्थिता प्रियतमापि बलात्पुरस्ताद्यद् भुज्यते सततमिष्टजनेन
लक्ष्मीः ॥ २३ ॥
तस्य प्रिया नरपतेः प्रियकारिणीति नाम्ना बभूव महिषी भुवनैकरत्नं।
यां वीक्ष्य लोचनसहस्रमिदं कृतार्थमद्येत्यमन्यत वृषापि विवाहकाले २४
किं कौमुदी तनुमती नहि सान्हि रम्या दिव्यांगनेयमुत सा न विलो-
लनेत्रा ॥
वीक्ष्येति विस्मयवशादपि मन्यमानो यामर्थनिश्चयमपूर्वजनो न लेभे
॥ २५ ॥

स्वाभाविकपणें प्रसिद्ध अशा आपल्या ज्ञातिकुलाला यानें ध्वजाप्रमाणें भूषित केलें होतें. २२ सर्व प्रजाजनाला इच्छित फलांनीं संयुक्त करणाऱ्या या राजाला प्राप्त करून घेऊन सर्व निर्मल अशा राजविद्या फार शोभूं लागल्या. बरोबरच आहे कीं, शरदृतूच्या समयाला प्राप्त होऊन सर्व दिशा प्रसन्नतेनें सहित, अशा शोभेला धारण करीत नाहींत काय? २३ या पृथ्वी तलावर अनुपम पराक्रम धारण करणाऱ्या या गुणी राजाच्या ठिकाणीं एकच दोष होता. तो असा कीं, अतिशय आवडती व राजाच्या वक्षःस्थलावर राहणारी अशीही लक्ष्मी याच्या देखत इष्ट मित्रांदिकाकडून बलात्कारानें भोगिली जात असे. २४ त्रैलोक्यांतील अद्वितीय रत्न अशी प्रियकारिणी नांवाची पत्नी या सिद्धार्थ राजाची पट्टराणी होती. या राजाराणींच्या विवाहकालीं या प्रिय[illegible]न इंद्रानें देखील आज माझे हजार डोळे असणें कृतार्थ झालें अ[illegible] २५ अपूर्व लोक अर्थात् या राणीला ज्यांनीं पूर्वी पाहिले [illegible] लोक या राणीला पाहून अगदीं आश्चर्य चकित होऊन जात असत, यामुळें विचार करणाऱ्या अशाही त्यांना वास्तविक वस्तुस्थितीचा निश्चय होत नसे. त्यांना या प्रमाणें संशय उत्पन्न होत असे:—काय ही मूर्तिमंत कौमुदी—चंद्राचें चांदणें—आहे? छेछे ही जर कौमुदी असती तर दिवसा रमणीय कशी दिसली असती? कारण कौमुदी दिवसा रम्य दिसत नाहीं. ही देवांगना असेल असे मानलें तर तेंही योग्य दिसत नाहीं कारण देवांगनेचे डोळे चंचल नसतात. ही तर चंचलनयना दिसते. याप्रमाणें त्यांना कांहीं निर्णय करता येत नसे. २६ हा सिद्धार्थराजा स्वाभाविक

रेजे परं सहजरम्यतयान्वितोऽपि तां प्राप्य भूपतिरनन्यसमानकांतिं।
शोभांतरं व्रजति न प्रतिपद्य हृद्यः किं शारदीं शशधरो भुवि पौर्ण-
मासीं ॥ २६ ॥

साप्यात्मनः सदृशमेत्य पतिं मनोज्ञं तं दिद्युते रतिरिव प्रकटं मनोजं॥
लोके तथाहि नितरामनुरूपयोगः केषां न दीपयति कांतिमनन्य-
साम्यः ॥ २७ ॥

एकोयमेव समभूदभिरामकीर्त्योर्दोषस्तयोर्भुवि वधूवरयोरनूनः ॥
कृत्वा पदं सुमनसामुपरि प्रकाशं यद्भिभ्यतुः प्रतिदिनं कुसुमायु-
धात्तौ ॥ २८ ॥

धर्मार्थयोः सततमित्यविरोधि कामं सार्धं तया मृगदृशानुभवन्नरेंद्रः॥
संरक्षणात्प्रमदयन्सकलां धरित्रीं कालं निनाय स यशोधवलीकृ-
ताशः ॥ २९ ॥

सौंदर्यानें युक्त असून जिच्या समान कोणाचीही कांति नाहीं अशा त्या प्रियका-
रिणीला प्राप्त करून घेऊन अर्थात तिच्यासह संयोगानें फारच शोभूं लागला-
बरोबरच आहे कीं या जगांत शरत्कालच्या पौर्णिमा तिथीच्या संयोगानें मूळचाच
सुंदर असलेला चंद्र अनिर्वचनीय अशा शोभेला प्राप्त होत नाहीं काय ? प्राप्त
होतोच. राजा तर सुंदर होताच पण राणीच्या अनुपम सौंदर्यानें त्याला फारच
शोभा आली होती.

२७ सुंदर अशा मदनाच्या प्राप्तीनें रति देवी जशी शोभत होती तशी ही
प्रियकारिणी राणी देखिल स्वतःला योग्य अशा सुंदर सिद्धार्थ राजाच्या संयोगानें
स्पष्टपणें फार शोभूं लागली. बरोबरच आहे कीं ज्याची बरोबरी कोणी करूं शकत
नाहीं असा अनुरूप संबंध या जगांत कोणाच्या शोभेला वाढविणारा होत नाहीं
बरें ? २८ सुंदर कीर्तीला धारण करणाऱ्या या पतिपत्नींच्या ठिकाणीं एकच
मोठा दोष होता. तो हा कीं, उघडपणें हें जोडपें विद्वान व देव यांच्यावर आपलें
पाऊल ठेवीत असत व दररोज मदनापासून भय पावत असत अर्थात् विद्वान व
देव यांच्या चरणांना नमस्कार करीत असत आणि हे काम पुरुषार्थाचा विरोध
न येईल अशा रीतीनें अनुभव घेत असत. २९ आपल्या कीर्तीनें सर्व दिशा ज्यानें

भक्त्या प्रणेमुरथ तं मनसा सुरेंद्रं षण्मासशेषसुरजीवितमेत्य देवाः ।
तस्मादनंतरभवे वितानिष्यमाणं तीर्थं भवोदधिसमुत्तरणैकतीर्थं
॥ ३० ॥

इंद्रस्तदा विकसितावधिचक्षुरष्टौ दिक्कन्यका विततकुंडलशैलवासाः
यूयं जिनस्य जननीं त्रिशलामुपाध्वं प्राग्भाविनीमिति यथोचित-
मादिदेश ॥ ३१ ॥

चूडामणिद्युतिविराजितपुष्पचूला चूलावती जगति मालिनिका
च कांता ॥
पर्याप्तपुष्पविनता वनमालिकेव दृश्या सदा तनुमतां नवमालिका च
॥ ३२ ॥

पीनोन्नतस्तनघटद्वयभूरिभारताम्यत्तनुत्रिवलिका त्रिशिराभिधाना।
लीलावतंसितसुरद्रुमचारुपुष्पा पुष्पप्रहाससुभगापि च पुष्पचूला
॥ ३३ ॥

निर्मल केल्या आहेत असा तो सिद्धार्थ राजा त्या हरिणनेत्रा प्रियकारिणी राणी-सह धर्म व अर्थ या पुरुषार्थांना बाधा न येईल अशा रीतीनें कामसुखाचा अनुभव घेत व संरक्षण कार्यानें सर्व पृथ्वीला आनंदवीत आपला काल व्यतीत करूं लागला. ३० इकडे ज्याचें देवगतींतलें आयुष्य सहा महिने उरलें आहे व जो पुढच्याच जन्मीं संसार समुद्र तरून जाण्यासाठीं अद्वितीय अशा घाटासारख्या तीर्थाचा प्रसार करणार आहे अशा प्राणतेंद्राकडे येऊन देव त्याला मनानें—मनःपूर्वक भक्तीनें नमस्कार करूं लागले. ३१ त्यावेळीं ज्याचा अवधिज्ञानरूपी डोळा विकसित झाला आहे अशा सौधर्म इंद्रानें भावी जिनमाता जी त्रिशला राणी तिची तुम्ही उपासना करा अशी, विरतीर्ण कुंडल पर्वतावर ज्यांचा निवास आहे अशा आठ दिक्कुमारींना आज्ञा केली. ३२ चूडामणि रत्नाच्या कांतीनें जिचा फुलांचा मुकुट शोभत आहे अशी चूलावती, जगामध्यें अतिशय सुंदर अशी मालनिका, पुष्कळशा पुष्पांनीं नम्र झालेल्या वनमालेप्रमाणें सर्व प्राण्यांना पाहण्यास योग्य अर्थात सुंदर अशी नवमालिका, मोटे व उंच अशा स्तनरूपी दोन कुंभाच्या ओझ्यानें जिचा देह व त्रिवली खिन्न झालेले आहेत अशी त्रिशिरा नांवाची दिक्कन्या, कल्पवृक्षाच्या

चित्रांगदा कनकचित्रसमाह्वया च तेजोऽभिभूतकनका कनकादिदेवी ॥
द्राग्वारुणी च सुभगा प्रियकारिणीं तामासेदुरानतशिरोनिहिताग्रहस्ताः ॥ ३४ ॥
ताभिः स्वभावरुचिराकृतिभिः परीता सात्यंतकांतिसहिता नितरां विरेजे ॥
एकापि लोकनयनोत्सवमातनोति तारावली वलयिता किमु चंद्रलेखा ॥ ३५ ॥
तिर्यग्विजृंभकसुराश्च निधिं दधानास्तत्राज्ञया प्रतिदिशं मुमुचुर्धनेशः ॥
सार्धं त्रिकोटिपरितः प्रमदाय रत्नं लोकस्य पंचदश विस्फुरितांशु मासान् ॥ ३६ ॥

पुष्पांचे जिनें अलंकार धारण केले आहेत व फुलाप्रमाणें मृदु व स्वच्छ हंसण्यानें सुंदर दिसणारी पुष्पचूला, चित्रविचित्र बाहुभूषणांनीं युक्त अशी कनकचित्रा, स्वतःच्या तेजानें सोन्याच्या कांतीचा पराभव करणारी कनकादेवी व सुंदर अशी वारुणी देवी अशा या आठ दिक्कन्यका नम्र झालेल्या आपल्या मस्तकावर हातांचा अग्र स्थापन करून अर्थात् हात जोडून व ते नम्र झालेल्या मस्तकावर ठेऊन प्रियकारिणी राणीकडे आल्या. ३५ स्वाभाविक सुंदर आकृतीच्या अशा या आठ दिक्कन्यकांनीं वेष्टिलेली अत्यंत सौंदर्ययुक्त ती प्रिय कारिणी जिनमाता फारच शोभूं लागली. बरोबरच आहे कीं, चंद्राची कोर एकटीच असली तरीही लोकांच्या नेत्रांना आनंद देणारी होते, मग तारांच्या समुदायांनीं ती वेष्टित झाल्यावर काय विचारावयाचें आहे? अर्थात् ती त्यावेळीं अतिशय आनंददायक होते. त्याप्रमाणें या अष्ट दिक्कन्यांनीं जिनमाता फारच शोभूं लागली.

३६ निधींना धारण करणारे तिर्यग्विजृंभक नांवाचे देव कुबेराचे आज्ञेनें त्या कुंडपुर शहरांत प्रत्येक दिशेमध्यें लोकांना आनंद व्हावा म्हणून पंधरा महिनेपर्यंत ज्यांचे किरण चोहींकडे पसरले आहेत अशा साडेतीन कोटि रत्नांची वृष्टि करूं लागले. ३७ अमृताप्रमाणें पांढऱ्या रंगाच्या महालांत कोमल हंसाप्रमाणें

सौधे सुधाधवलिते मृदुहंसतूले रात्रौ सुखेन शयिता प्रियकारिणी सा।
स्वप्नानिमानथ जिनाधिपतिप्रसूतिप्रख्यापकानुषसि भव्यनुतान्यप-
श्यत् ॥ ३७ ॥

ऐन्द्रं गजं मदजलार्द्रकपोलमूलं प्रोत्तुंगमिंदुधवलं वृषभं नदन्तं ॥
पिंगाक्षमुज्ज्वलसटं मृगराजमुग्रं लक्ष्मीं मुदा वनगजैरभिषिच्यमानां ३८
दामद्वयं भ्रमदलिप्रकरं नभःस्थं विध्वंसितांधतमसं सकलं मृगांकं ॥
बालं रविं सरसिजानि विबोधयन्तं क्रीडन्मदेन विमलांभसि
मत्स्ययुग्मं ॥ ३९ ॥

कुंभौ सरोरुहवृतौ फलसंवृतास्यौ रम्यं सरः सरसिजैः स्फटिकाच्छवारि
वारां निधिं पिहितदिग्वलयं तरंगैः सिंहासनं मणिमयूखविभूषितांगं
॥ ४० ॥

चंचद्ध्वजं सुरविमानमनूनमानं नागालयं समदनागवधूनिवासं ॥
विस्तारितं सुनिवहं दिवि रत्नराशिं वन्हिं च धूमरहितं कपिली-
कृताशम् ॥ ४१ ॥

उत्तम कापुस ज्यांत आहे अशा बिछान्यावर रात्रीं सुखानें निजलेल्या प्रियका-
रिणी राणीनें जिनेश्वराच्या जन्माची सूचना करणारीं भव्यांकडून प्रशंसिली जा-
णारीं अशीं पुढें लिहिलेलीं स्वप्नें प्रातःकाळीं पाहिलीं. ३८ मदाच्या पाण्यानें
ज्याच्या गंडस्थळाचा मूळ भाग ओला झाला आहे असा उंच ऐरावत हत्ती, चंद्रा-
प्रमाणें पांढरा व गर्जना करणारा बैल पिंगट डोळ्याचा, चमकणाऱ्या आयाळांचा,
व उग्र असा सिंह, आनंदानें रानटी हत्ती जिला स्नान घालीत आहेत अशी
लक्ष्मी. आकाशांत लोंबणाऱ्या व ज्याच्या सभोंवतीं भुंग्यांचा समुदाय फिरत
आहे अशा दोन पुष्पमाळा, ज्यानें दाट अंधार नष्ट केला आहे
असा पूर्णचंद्र. कमळांना विकसित करणारा बाल सूर्य; गर्वानें स्वच्छ पाण्यांत क्रीडा
करणारें माशाचें जोडपें, फळांनीं ज्यांचीं तोंडें झांकलीं आहेत असे कमळांनीं
वेष्टिलेले दोन कलश, कमळांनीं मनोहर दिसणारें व स्फटिकाप्रमाणें निर्मळ पाण्यानें
भरलेलें सरोवर. आपल्या तरंगांनीं सर्व दिशांना व्यापून टाकणारा समुद्र. रत्नांच्या

स्वप्नान्सदस्यवनिपाय जगाद देवी तानात्मजाननविलोकनकौतुकाय
सोऽपि प्रमोदभरविव्हलितांतराक्षस्तस्यै क्रमादभिदधाविति
तत्फलानि ॥४२॥

दृष्टेन ते त्रिभुवनाधिपतिर्गजेन पुत्रो भविष्यति वृषेण वृषस्य कर्ता॥
सिंहेन सिंह इव विक्रमवान्मृगाक्षि ! लक्ष्म्या सुरैः सुरगिरौ स
मुदाभिषेच्यः ॥४३॥

दामद्वयेन भविता यशसो निधानं चंद्रेण चंद्रमुखि! मोहतमोविभेदी।
हंसेन भव्यकमलप्रतिबोधकारी सोऽनंतमाप्स्यति सुखं शफरद्वयेन
॥४४॥

धास्यत्यलं धटयुगेन सलक्षणांगं तृष्णां हनिष्यति सदा सरसा
जनानां ॥

किरणांनीं ज्याचें सर्व अवयव सुशोभित झाले आहेत असें सिंहासन, ज्याच्यावरील ध्वज हालत आहेत असें फार मोठें देव विमान, यौवनोन्मत्त नागस्त्रिया ज्यांत आहेत असें नागभवन, आकाशांत पसरलेल्या रत्नांचा पुंज, ज्यानें सर्व दिशा पिंगट केल्या आहेत असा धुरानें रहित अग्नि, अशीं सोळा स्वप्नें राणीनें पाहिलीं. ४२ राणीनें सभेंत पुत्राचें मुख पाहण्याविषयीं कौतुकयुक्त सिद्धार्थ राजाला हीं स्वप्नें सांगितलीं. आनंदभरानें ज्याचें मन व इंद्रियें विव्हळ झालीं आहेत अशा त्या राजानें तिला क्रमानें त्यांचीं फळें सांगितलीं. तीं येणेंप्रमाणें:-हे हरिणनेत्रे, हत्ती पाहिलास त्यामुळें तुला त्रैलोक्याचा अधिपति असा मुलगा होईल व बैल पाहिलास त्यामुळें धर्माचा कर्ता अर्थात् त्याचा प्रसार करणारा असा पुत्र होईल. सिंह दर्शनानें सिंहाप्रमाणें पराक्रमी, लक्ष्मीदर्शनानें मेरूपर्वतावर-देवांकडून अभिषेक होण्यास योग्य, दोन पुष्पमालांच्या दर्शनानें यशांचा सांठा, हे चंद्रवदने, चंद्र दर्शनानें मोहरूपी अंधाराचा नाश करणारा, सूर्य दर्शनानें भव्य लोकरूपी कमलांना विकसित करणारा, दोन मत्स्यांच्या दर्शनानें अनंत सुखाला प्राप्त होणारा, दोन कलशांच्या दर्शनानें १००८ लक्षणांनीं युक्त अशा शरीराचा धारक, सरोवर दर्शनानें नेहमीं लोकांची तृष्णा दूर करणारा, समुद्रदर्शनानें संपूर्ण ज्ञानाला प्राप्त करून घेणारा, व सिंहासनदर्शनानें अन्तीं उत्कृष्टपदाला अर्थात् मोक्ष प्राप्त करून घेणारा,

अंभोधिना सकलबोधमुपैष्यतीह सोऽन्ते पदं परमवाप्स्यति विम्रेण ॥४५॥
देवालयादवतरिष्यति देवधाम्ना तीर्थं करिष्यति फणींद्रगृहेण मुख्यं॥
यास्यत्यनंतगुणतां मणिसंचयेन कर्मक्षयं स वितनिष्यति पावकेन ॥ ४६ ॥
स्वप्नावलीफलमिति प्रियतो निशम्य सा पिप्रिये जिनपतेरवतारशंसि।
मेने स्वजन्म सफलं वसुधाधिपोऽपि त्रैलोक्यनाथगुरुताथ मुदे न केषां ॥ ४७ ॥
पुष्पोत्तरात्समवतीर्य सुराधिपोऽथ स्वप्ने विवेश धवलद्विपरूपधारी ॥
देव्या मुखं निशि शुचौ सितपक्षषष्ट्यां चंद्रे प्रवृद्धिमति चोत्तर फाल्गुनिस्थे ॥ ४८ ॥
तस्मिन्क्षणे स्वहरिविष्टरकंपनेन ज्ञात्वा सुराधिपतयोऽथ चतुर्विकल्पाः ॥
तामेत्य दिव्यमणिभूषणगंधमाल्यवस्त्रादिभिः समभिपूज्य ययुः स्वधाम ॥ ४९ ॥

४६ देव विमानाच्या दर्शनानें तो स्वर्गापासून अवतरेल, व नागविमानाच्या दर्शनानें मुख्य तीर्थाचा कर्ता होईल. रत्नराशीच्या अवलोकनानें तो अनंत गुणांचा धारक होईल व अग्नि पाहण्यानें कर्मक्षय करणारा होईल. ४७ या प्रमाणें जिनेश्वराच्या अवताराचे सूचक अशा स्वप्नाचें फल आपल्या पतिराजापासून प्रियकारिणी राणीला ऐकून फार आनंद झाला. व आपण जन्म धारण करणें हें सफल झालें असें ती मानूं लागली. याचप्रमाणें सिद्धार्थ राजाही आपल्या जन्माचें आज साफल्य झालें असें समजूं लागला. बरोबरच आहे कीं, त्रैलोक्यनाथ अशा जिनेश्वराचे आई बाप होण्याचा प्रसंग कोणाला बरें आनंदाला कारण होणार नाहीं?

४८ यानंतर तो प्राणतेंद्र पुष्पोत्तर विमानापासून उतरून स्वप्नामध्यें ज्यानें पांढऱ्या हत्तीचें रूप धारण केलें आहे असा होत्साता रात्रीं आषाढ शुक्ल षष्ठीच्या दिवशीं उत्तराफाल्गुनि नक्षत्रावर चंद्र उन्नतावस्थेला प्राप्त झाला असतां देवीच्या

श्रीर्‍हीर्धृति श्च लवणा च बला च कीर्तिर्लक्ष्मीश्च वाक्च विकसत्प्रमदेन देव्यः ॥
एता निजद्युतिविदीपितवायुमार्गास्तामाज्ञया सुरपतेः सहसोपतस्थुः ॥ ५० ॥
लक्ष्मीर्मुखे हृदि धृतिर्लवणां च धाम्नि कीर्तिर्गुणेषु च बले च बला महत्वे ॥
श्रीर्वाचि वाक्च नयनद्वितयेच लज्जा तस्या मुदा सह यथोचितमध्युवास ॥ ५१ ॥
गर्भस्थितोऽपि स जहे जगदेकचक्षुर्ज्ञानत्रयेण विमलेन न जातु मातुः॥
धाम्ना न भानुरुदयाद्रितटीविशालकुक्षिस्थितोऽपि रुचिरेण परीयते किं ॥ ५२ ॥
न प्राप किंचिदपि गर्भनिवासदुःखं कामं मलैरनुपसंप्लुतकोमलांगः॥
पंकानुलेपरहितस्य सरिज्जलान्तर्मग्नस्य पद्ममुकुलस्य किमस्ति खेदः ॥ ५३ ॥

मुखामध्यें प्रविष्ट झाला. ४९ त्याच क्षणीं आपल्या सिंहासनांच्या कंपनीनें चार प्रकारच्या इंद्रांनीं जिनेश्वराचे गर्भांत अवतरण झालें असें जाणून जिनेश्वराच्या मातेकडे प्रयाण केलें व तिचा दिव्य रत्नालंकार, गंध, पुष्पमाला अमूल्य वस्त्रें वगैरेनीं त्यांनीं आदर केला व स्वतःच्या स्थानीं पुनः प्रयाण केलें. ५० स्वतःच्या देहकांतीनें आकाशाला प्रकाशित करणाऱ्या श्री, र्‍ही, धृत्ति, लवणा, बला, कीर्ति, लक्ष्मी व वाक या आठ देवता वृद्धिंगत होणाऱ्या आनंदासह इंद्राच्या आज्ञेनें मातेजवळ तत्काळ येऊन हजर झाल्या. ५१ मुखामध्यें लक्ष्मी, हृदयांत धृति, शरीरांत लवणा, गुणामध्यें कीर्ति, बलामध्यें बला, महत्वामध्यें श्री, भाषणांत वाक, दोन नेत्रामध्यें लज्जा या रीतीनें देवतांनीं मातेच्या यथोचित स्थानीं मोठ्या आनंदानें वास केला. ५२ जगाला अद्वितीय नेत्राप्रमाणें असलेले प्रभु मातेच्या गर्भामध्यें विराजमान झाले होते. तथापि ते निर्मल अशा तीन ज्ञानांकडून कधींहि सोडले गेले नाहींत. बरोबरच आहे कीं, उदय पर्वताच्या तटीरूपी विशाल उदरामध्यें सूर्य राहून देखिल आपल्या सुंदर अशा तेजानें वेढलेला असत नाहीं काय? असतोच. ५३ रक्त वगैरे मळापासून पूर्ण अलिप्त झालें आहे; कोमल अंग ज्याचें असा

गर्भस्थितस्य विमलावगमप्रणुन्नं मोहांधकारमिव चित्तगतं वमन्तौ ॥
तस्याः स्तनौ सपदि नीलमुखावभूतां पीनोन्नतौ कनककुंभनिभौ मृगाक्ष्याः ॥ ५४ ॥
आपांडुतां तनुरियाय तदा नतांग्या निर्यत्तदीययशसा धवलीकृतेव॥
पूर्वं तथा न विरराज वलित्रयेण तस्या यथोदरमनुल्बणमेधनेन ॥५५॥
तस्यास्त्रिसंध्यमकृतैत्य मनुष्यधर्मा सेवां स्वयं पटलिका निहितानि बिभ्रत् ॥
क्षौमांगरागसुमनोमणिभूषणानि प्रख्यापयन्निव जिने निहितां स्वभक्तिं ॥ ५६ ॥
तृष्णाविहीनमथ गर्भगतं दधाना तं दौहृदेन न कदाचिदसौ बबाधे
एष क्रमोऽयमिति पुंसवनं नरेंद्रस्तस्याश्चकार विबुधैरपि पूजितायाः ॥ ५७ ॥

त्या जिनेश्वराला गर्भामध्ये निवास करण्यापासून थोडेसेंही दुःख झालें नाहीं. बरोबरच आहे कीं, चिखलाच्या लेपापासून रहित असून नदीच्या पाण्यांत बुडालेल्या कमळाच्या कळीला कांहीं तरी खेद वाटतो काय ? ५४ प्रभु गर्भांत आले त्या वेळीं मृगनेत्रा अशा त्या राणीचे मोठे व उंच आणि सुवर्ण कुंभाप्रमाणें असलेले दोन स्तन तत्काल ज्यांचीं बोंडें निळी झालीं आहेत असें झालें. गर्भामध्यें येऊन राहिलेल्या प्रभूच्या निर्मळ ज्ञानानें हाकालून दिलेला मनांतील मोहरूपी अंधारच जणु ते दोन स्तन बाहेर ओकून टाकीत आहेत कीं काय असे शोभूं लागले. ५५ जिचें शरीर नम्र झालेले आहे अशा त्या मातेचें शरीर पांढरें झालें जणू ते प्रभूच्या बाहेर निघणाऱ्या यशानेंच धवल झालें. मातेचे वाढणारें पोट जसें शोभूं लागलें तसें पूर्वीं अप्रगट व तीन वळकट्यांनी युक्त असलेलें शोभत नव्हतें.

५६ श्री जिनेश्वरामध्यें असलेल्या आपल्या भक्तीला जणु व्यक्तच करीत आहे असा कुबेर सकाळीं, दोनप्रहरीं व संध्याकाळीं पिटाऱ्यामध्यें बारीक सुंदर वस्त्रें, अंगाला उटी लावण्याचे पदार्थ, पुष्पमाळा, रत्नालंकार वगैरे ठेऊन मातेकडे येत असे व तिची स्वतः सेवा करीत असे. ५७ मातेनें तृष्णेनें रहित अर्थात् निस्पृह अशा जिनभगवंताला गर्भांत धारण केलें होतें म्हणून तिला डोहाळे उत्पन्न होऊन

दृष्टे ग्रहैरथ निजोच्चगतैः समग्रैर्लग्ने यथा पतितकालमसूत राज्ञी ॥
चैत्रे जिनं सिततृतीयजया निशान्ते सोमान्हि चंद्रमसि चोत्तर-
फाल्गुनिस्थे ॥ ५८ ॥
आशाः प्रसेदुरथ देहभृतां मनोभिः सर्वाः समं वियदधौतमियाय
शुद्धिम् ॥
पेते मदालिचितया सुरपुष्पवृष्ट्या नेदुस्तदा नभसि दुंदुभयश्च मंद्रम् ५९
जाते तदा प्रथिततीर्थकरानुभावे तस्मिन्भवच्छिदि जगत्रितयै-
कनाथे ॥
सिंहासनानि युगपत्त्रिदशेश्वराणां कंपं ययुःसहमनोभिरकंपनानि ६०
उन्मीलितावधिदशा सहसा विदित्वा तज्जन्मभक्तिभरतः प्रण-
तोत्तमांगाः ॥
घंटानिनादसमवेतनिकायमुख्या दिष्ट्या ययुस्तदिति कुंडपुरं
सुरेंद्राः ॥ ६१ ॥

कधींही त्रास झाला नाहीं. ही वंशाची पद्धति आहे असें समजून देवांनींही पूज्य असलेल्या प्रियकारिणीचा पुंसवन संस्कार राजा सिद्धार्थानें केला. ५८ यानंतर कांहीं दिवसांनीं सर्व ग्रह आपल्या उच्चस्थानीं येऊन त्यांनी लग्न पाहिलें असतां, योग्य काल आला असतां, चैत्र शुद्ध त्रयोदशीच्या दिवशीं सोमवारीं पहाटे चंद्र उत्तरा फाल्गुनि नक्षत्रावर आला असतां त्रिशला मातेनें श्री जिनेश्वराला जन्म दिला. ५९ भगवंताच्या जन्मानें सर्व प्राण्यांच्या अंतःकरणासह सर्व दिशा प्रसन्न झाल्या. धुतल्यावाचूनच आकाश शुद्ध -स्वच्छ झालें. उन्मत्त भुंग्यांनीं व्याप्त झालेली पुष्पवृष्टि देव करूं लागले. आकाशांत देव नगारे गंभीर शब्द करूं लागले. ६० त्रैलोक्याचे अद्वितीय स्वामी, संसाराचा नाश करणारे, ज्यांच्या ठिकाणीं तीर्थकराचे वैभव प्रगट झाले आहे असे जिनेश्वर उत्पन्न झाले असतां, सर्व इंद्रांचीं कंप न पावणारीं आसनें त्यांच्या मनासह एकदम कंप पावलीं. ६१ विकसित झालेल्या अवधिज्ञान-रूपी डोळ्यानें अकस्मात् जिन जन्म झाला आहे असें जाणून व भक्तिभारानें ज्यांचीं मस्तकें वाकलीं आहेत, घंटाच्या ध्वनीनें एकत्र झालेल्या चार प्रकारच्या देवाचे मुख्य असे सर्व इंद्र मोठ्या हर्षानें त्यावेळीं कुंडपुराकडे निघाले.

आज्ञाप्रतीक्षणपरेऽप्यनुरागभावात्कश्चित्सुरः परिजने स्वयमेव दध्रे॥
हस्तद्वयेन कुसुमस्रजमर्चितुं तं कस्याथवा भवति पूज्यतमे न
भक्तिः ॥ ६२ ॥
तस्याभिषेकसमये यदिहास्ति कृत्यं कृत्स्नं तदाशु विदधाम्यहमेव
युक्तं ॥
कर्तुं दिशामि न परेभ्य इतीव भक्त्या चक्रे सुरः प्रमुदितः स्वम-
नेकमेकः ॥ ६३ ॥
कृत्वापरः करसहस्रमनेकमुच्चैर्बिभ्रद्विनिद्रकमलानि जिनानुरागात्
तेने वियत्यपि सरोजवनस्य लक्ष्मीं शक्तिं न कारयति किं किमि-
वातिभक्तिः ॥ ६४ ॥
केचित्स्वमौलिशिखरस्थितपद्मरागबालातपारुणमरीचिचयच्छलेन ।
अंतर्भरात्सपदि निष्पतितं जिनेंद्रे रेजु शिरोभिरनुरागमिवोद्व-
हन्तः ॥ ६५ ॥

६२ आपापला परिवार देवांचा समुदाय आज्ञेची वाट पाहण्यांत तत्पर असतांही कोणी एक देवानें तीर्थंकराच्या भक्तीमध्यें लीन होऊन स्वतःच आपल्या दोन हातांनीं जिनेश्वराची पूजा करण्याकरितां पुष्पमाला धारण केली. बरोबरच आहे कीं, अत्यंत पूज्य अशा व्यक्तीवर कोणाची भक्ति नसते बरें? ६३ जिनाच्या अभिषेकाच्या वेळीं जें काम करावयाचें असतें तें सर्व मीच करीन मलाच—करणें योग्य आहे इतरांना करण्यासाठीं मी आज्ञा करणार नाहीं असा जणु मनांत विचार करुन भक्तीनें आनंदयुक्त होऊन कोण्या एका देवानें स्वतःला अनेक रूपाचे केलें. ६४ कोण्या एका देवानें हजारों हात उत्पन्न केलें व जिनेश्वराच्या भक्तींत लीन होऊन त्यामध्ये त्यानें विकसित कमलें धारण केलीं व त्यानें आकाशांतही कमल समूहाची शोभा उत्पन्न केली. बरोबरच आहे कीं, अतिशय मोठी भक्ति कोणते शक्तीचें काम करवीत नाहीं बरें? ६५ कित्येक देव आपल्या किरीटाच्या अग्रभागीं असलेल्या पद्मराग मण्यांच्या कोवळ्या प्रकाशांच्या लाल किरण समूहाच्या मिषानें अंतरंगांतून एकदम समूहरूपानें बाहेर पडले त्या जिनाविषयींच्या प्रेमाला आपल्या मस्तकांनीं जणू धारण केलें कीं काय असे शोभूं लागले.

एकावली तरलनीलकरप्ररोहश्रेणीकरालितमनोज्ञभुजांतरालाः
सद्यः प्रसन्नजिनभक्त्यपनीयमानचित्तस्थमोहतिमिरा इव केचि-
दासन् ॥ ६६ ॥
आयातवेगपवनेन विकृष्यमाणां दूरांतराज्जलधरा विबुधान्सम-
न्तात् ॥
यानस्थरत्नरचितामरचापलक्ष्मीमादित्सयेव नभसि द्रुतमन्वयुस्तान्
॥ ६७ ॥
देवैर्विचित्रमणिभूषणवेषयानैस्तैरापतद्भिरुपरुद्धसमस्तदिक्का ॥
केनापि निर्मितमभित्ति सजीवचित्रं द्यौर्बिभ्रतीव समवैक्षि जनैः
सचित्रं ॥ ६८ ॥
ज्योतिःसुरा हरिरिवानुगतात्मसैन्याश्चंद्रादयः सपदि पंचविधास्तदेयुः
शंखस्वनेनभवनोदरवासिनस्ते भृत्यैः सहाशु मिलितश्चमरादथश्च६९

६६ एक पदरी हाराच्या मध्यभागीं असलेल्या मोठ्या इंद्रनील मण्याच्या किरणां-कुरांच्या पंक्तींनीं व्याप्त झालेला आहे दोन बाहूंच्या मधील शरीराचा भाग ज्यांचा असे कित्येक देव तत्काल निर्मल अशा भगवंताच्या भक्तीच्या द्वारें ज्यांच्या चित्तांतील मोहरूपी अंधार नष्ट होत आहे असे जणू शोभूं लागले. तात्पर्य हें कीं, कित्येक देवांनीं आपल्या गळ्यांत हार घातले होते. त्यांच्या मध्यभागीं असलेल्या इंद्रनील मण्याच्या किरणांनीं त्यांचे वक्षस्थल व्याप्त होऊन गेल्यामुळें हृदयांत उत्पन्न झालेल्या निर्मल जिनभक्तीनें तेथें असलेला मोहरूपी अंधार सगळा जणु बाहेर आल्याप्रमाणें वाटूं लागलें. ६७ दूर अंतरापासून आलेल्या वेगाच्या वाऱ्यानें सर्व बाजूंकडून आकर्षिले गेलेल्या मेघांनीं विमानांत असलेल्या रत्नापासून बनलेल्या इंद्रधनुष्याच्या शोभेला जणु ग्रहण करण्यासाठीं आकाशांत देवांचें जलदीनें अनुसरण केलें. तात्पर्य विमानाच्या वेगानें मेघ ओढले जात असत. परंतु ते विमानांत जड-विलेल्या रत्नांच्या शोभेला हिरावून घेण्यासाठीं जणु त्यांच्या मागें धावत आहेत अशी कल्पना केली आहे. ६८ नानाप्रकारचे रत्नालंकार, उत्तमवेष व सुंदर विमानें यासह येऊन देवांनीं आकाशांत सर्व दिशा घेरून टाकिल्या. त्यावेळीं सर्व लोक आश्चर्यचकित होऊन वर पाहात असतां त्यांना आकाशानें भिंतीवांचूनच कोणी काढलेलीं सजीव चित्रें जणु

तद्व्यंतराधिपतयः पटहस्वनेन व्याहूतसेवकनिरुद्धदिगंतरालाः ॥
प्रापुः पुरं स्वसमाधिष्ठितवाहवेगव्यालोलकुंडलमणिद्युतिलिप्तगंडाः ॥७०॥

आसाद्य राजकुलमाकुलमुत्सवेन प्रत्युत्थितेन विदिता वसुधाधिपेन॥
मातुः पुरः स्थितमनन्यसमजिनेंद्रमिंद्रास्तदा ददृशुरानतमौलयस्तम् ॥ ७१ ॥

मायार्भकं प्रथमकल्पपतिर्विधाय मातुः पुरोऽथजननाभिषवक्रियायै॥
बालं जहार जिनमात्मरुचा स्फुरंतं कार्यांतरान्ननु बुधोऽपि करोत्यकार्यं ॥ ७२ ॥

शच्या धृतं करयुगेन तमब्जभासा नित्ये सुरैरनुगतो नभसा सुरेंद्रः
स्कंधे निधाय शरदभ्रसमानमूर्तेरैरावतस्य मदगंधहतालिपंक्तेः॥७३॥

धारण केलीं आहेत असें वाटूं लागलें. ६९ सिंह गर्जनेला अनुसरून अर्थात् ज्योतिर्लोकांत जेव्हां सिंहनाद झाला तेव्हां चंद्रादिक पांच प्रकारचे ज्योतिर्देव आपल्या सैन्यासह शीघ्र सौधर्मेंद्राला जाऊन मिळाले. याचप्रमाणें भवनावासांत शंखध्वनि झाला तेव्हां चमर वैरोचन वगैरे भवनवासी देवांचें इंद्र आपल्या परिवार देवासह सौधर्मेंद्राला येऊन मिळाले. ७० नगाऱ्याच्या ध्वनीनें बोलाविलेल्या नोकरांच्याद्वारें ज्यांनीं सर्व दिशांचा मध्यभाग व्यापून टाकिला आहे व स्वतः आरोहण केलेल्या वाहनांच्या वेगानें हालत असलेल्या कुंडलांच्या रत्नकांतीनीं ज्यांचे गाल व्याप्त झाले आहेत अर्थात कुंडलांच्या रत्नांची कांति ज्यांच्या गालावर पडली आहे असे व्यंतरदेवाचे इंद्र कुंडलपुराला येऊन दाखल झाले. ७१ अनेक उत्सवांनीं व्याप्त झालेल्या राजवाड्यास प्राप्त होऊन उठून उभा राहिलेल्या राजाकडून ज्यांचा स्वीकार केला आहे अर्थात् आदर केला आहे व ज्यांचे किरीट नम्र झाले आहेत अशा त्या इंद्रांनीं मातेच्या पुढें असलेल्या ज्यांच्यासारखा जगांत दुसरा सुंदर कोणी नाहीं अशा त्या जिनबालकास पाहिलें. ७२ यानंतर सौधर्मेंद्रानें मातेच्या पुढें एक मायामयी बालक स्थापून स्वतःच्या कांतीनें चमकणाऱ्या जिनबालकाला जन्माभिषेक करण्यासाठीं हरण केलें. बरोबरच आहे कीं, विद्वान देखील कार्यवश होऊन अकार्य करीत असतो. ७३ कमलाप्रमाणें कांतियुक्त असलेल्या आपल्या दोन हातांनीं इन्द्राणीनें उचलून घेतलेल्या जिनबालकाला

रुन्धन्दिशो दश नवांबुदनादमंद्रस्तूर्यध्वनिः श्रुतिसुखः परमुच्चचार॥
तद्वर्णशंसि कलमप्रतिकिन्नरेंद्रैर्गानं नभस्यनुजगेऽनुगतत्रिमार्गम्
॥ ७४ ॥
चंद्राकृतिद्युतिहरं धवलीकृताशं मूर्तं यशो दिवि तदीयमिवोज्जिहानं।
ईशानकल्पपतिरुच्छ्रितमातपत्रं तस्य त्रिविष्टपपतेर्बिभरांबभूव।७५
पार्श्वस्थसामजनिविष्टसनत्कुमारमाहेन्द्रहस्तधृतचामररुद्धदिक्का ॥
द्यौराबभौ स्वयमनुद्रुवताभिषेक्तुं दुग्धाब्धिना परिवृतेव जिनेश्वरं तं७६
उत्क्षेपकस्फटिकदर्पणतालवृंतभृंगारतुंगकलशादिकमंगलानि ॥
तस्याग्रतः पटलिकागतकल्पवृक्षपुष्पस्रजश्च दधिरे सुरराजवध्वः७७
वेगेन मंदरगवापुरमामनोभिश्चैत्यालयैरकृतकैः कृतभूरिशोभम् ॥
अध्वश्रमं श्लथयता त्रिगुणान्वितेन तत्सानुजेन मरुता मरुतोपगूढाः
॥ ७८ ॥

देवांनीं अनुसरलेल्या सौधर्मेंद्रानें शरत्कालच्या मेघाप्रमाणें ज्याचें शरीर शुभ्र आहे व स्वतःच्या मदगंधानें भुंग्याच्या पंक्तीचें आकर्षण करणारा अशा ऐरावत हत्तीच्या खांद्यावर स्थापन करून आकाश मार्गानें नेलें. ७४ नवीन मेघांच्या गर्जनेप्रमाणें गंभीर, कानाला गोड लागणारा व दहा दिशांना रोकणारा असा वाद्यांचा ध्वनि त्यावेळीं होऊं लागला. तेव्हां जिनाच्या यशाचें वर्णन करणारे मधुर व अनुपम, द्रुत मध्य व विलंबित असें तीन प्रकार ज्यांत आहेत असें गाणें आकाशामध्यें किन्नरेंद्र गाऊं लागले.

७५ चंद्राची आकृति व कांति हरण करणारें आपल्या कांतीनें सर्व दिशांना पांढरें करणारें, जणू प्रभूचें जिनबालकाचें मूर्तिमंत यशच वर आकाशांत जात आहे असें भासणारें उंच छत्र इशानेंद्रानें त्रैलोक्यपति अशा जिनाच्यावर धारण केलें होतें. ७६ दोन्ही बाजूला उभे असलेल्या हत्तीवर बसलेल्या सानत्कुमारेंद्र व माहेंद्र यांनीं आपल्या हातांत धारण केलेल्या चवऱ्यांनीं दिशा व्यापून गेल्या असतां, स्वतः त्या जिनेश्वराला अभिषेक घालण्यासाठीं अनुसरणाऱ्या क्षीर समुद्रानें जणु वेढ- ल्याप्रमाणें आकाश शोभूं लागलें. ७७ चामर, स्फटिकमण्याचें दर्पण, पंखा, भृंगार, उंच कलश, वगैरे अष्टमंगल द्रव्यें व करंड्यामध्यें स्थापन केलेल्या पुष्प वृक्षाच्या माळा हे पदार्थ इंद्राण्यांनीं जिनबालकाच्यापुढें धारण केलें होतें. ७८ मार्गामध्यें

आसाद्य पांडुकवनं विबुधैर्नगस्य तस्यापि पंचशतयोजनमात्रदीर्घा
दीर्घार्द्धविस्तृतिरथो युगयोजनोच्चा तैः पांडुकंबलशिला शरदिन्दु-
पांडुः ॥ ७९ ॥

तस्यां सुरा रजनिनाथकलाकृतौ तं सिंहासने महति पंचधनुः
शतार्द्धम् ॥
व्यासोच्छ्रिती दधति तद्द्विगुणायतिं च जन्माभिषेकमहिमां विनि-
वेश्य चक्रुः ॥ ८० ॥

क्षीरोदधेरतिमुदा तरसोपनीतैर्भास्वन्महामणिघटाष्टसहस्रतोयैः ॥
मांगल्यशंखपटहस्वननादिताशं शक्रादयस्तममरां सममभ्यषिंचन्
॥ ८१ ॥

तस्मिंस्तदा क्षुवति कंपितशैलराजे घोणाप्रविष्टसलिलात्पृथुकेप्यजस्रं॥
इंद्रादयस्तृणमिवैकपदे निपेतुर्वीर्यं निसर्गजमनंतमहो जिनानाम् ८२

झालेला श्रम शिथिल करणारा, सुगंध, शीतल व मंद अशा तीन गुणांनी युक्त व मेरुपर्वताच्या शिखरापासून उत्पन्न होणारा अशा वाऱ्यानें आलिंगिलेले देव अकृत्रिमचैत्यालयांनीं ज्याला फार शोभा आली आहे अशा मेरुपर्वताकडे आपल्या मनाएव्ह वेगानें जाऊन पोहोचलें अर्थात् मेरुपर्वताकडे जावें असा मनांत विचार येतो तोंच शरीराच्या वेगानें ते तेथें जाऊन पोहोचले. ७९ या मेरुपर्वताच्या पांडुक वनाला प्राप्त होऊन तेथें महायोजनांच्या प्रमाणांनीं शंभर योजनें लांब व पन्नास योजनें रुंद आणि आठ योजनें उंच अशा शरत्कालच्या चंद्राप्रमाणें शुभ्रवर्णाच्या पांडुकवल शिलेवर देव प्राप्त झाले. ८० चंद्राच्या कलेची आकृति धारण करणाऱ्या त्या पांडुकंबलाशिलेवर पांचशें धनुष्य व्यासाचे व अडिचशें धनुष्य उंचीचे व याहून दुप्पट लांबीचे अशा सिंहासनावर जिनवालकास स्थापन करून देवांनीं जन्माभिषेकाचा महिमा करण्यास प्रारंभ केला. ८१ अतिशय आनंदानें व शीघ्र आणिलेल्या चमकणाऱ्या महारत्नांनीं निर्माण केलेल्या एक हजार घागरीं भरलेल्या क्षीरसमुद्राच्या पाण्यांनीं इंद्रादि देवांनीं मंगल शंख, नगारा वगैरेंच्या शब्दांनीं सगळ्या दिशा शब्दमय करून जिनवालकाचा अभिषेक केला. ८२ त्यावेळीं नाकांत पाणी शिरल्यामुळें वालरूप जिनेश्वरांना शिंक आली तेव्हां तो

कृत्वाथ वीर इति नाम नतः सुरेंद्रस्तस्याग्रतः सुललितं सममप्सरोभिः
अक्ष्णोर्युगं सफलयन्नमरासुराणां साक्षात्प्रकाशितसमस्तरसं ननर्त
॥ ८३ ॥
अत्यद्भुतं विविधलक्षणलक्षितांगं ज्ञानत्रयेण विमलेन विराजमानं ॥
बाल्योचितैर्मणिमयाभरणैर्विभूष्य भक्त्यामरास्तमिति तुष्टुवुरिष्टि-
सिद्ध्यै ॥ ८४ ॥
श्रीवीर यद्यथ वचो रुचिरं न ते स्याद्भव्यात्मनां खलु कुतो भुवि
तत्त्वबोधः ॥
तेजो विना दिनकरस्य विभातकाले पद्मा विकासमुपयांति
किमात्मनैव ॥ ८५ ॥
अस्नेहसंयुतदशो जगदेकदीपश्चिंतामणिः कठिनतारहितान्तरात्मा
अव्यालवृत्तिसहितो हरिचंदनागस्तेजोनिधिस्त्वमसि नाथ निरा-
कृतोष्मा ॥ ८६ ॥

मेरु पर्वत दोखिल शिंकेच्या आवाजानें हलला व इंद्र जुने झालेल्या गवताप्रमाणें एकदम पडले जिनेश्वराचें स्वाभाविक अनंतबल असतें हें आश्चर्य आहे. ८३ या जिनेश्वराच्या कृत्यानें नम्र झालेल्या इंद्रानें जिनेश्वराचें वीर असें नांव ठेविलें. व सर्व देव आणि दैत्य यांच्या नेत्रयुगाला सफल करणारा तो इंद्र संपूर्ण रस ज्यांत प्रकट झाले आहेत असें सुंदर नृत्य अप्सरासह प्रभूच्यापुढें करूं लागला. ८४ अतिशय अद्भुत व नानाप्रकारच्या लक्षणांनीं ज्यांचें अंग युक्त आहे. निर्मल अशा तीन ज्ञानांनीं जो शोभत आहे. अशा त्या जिनेश्वराला बालपणाला योग्य अशा रत्नमय अलंकारांनीं सुशोभित करून सर्व देव मोठ्या भक्तीनें आवडत्या पदार्थांची-मोक्षाची प्राप्ति व्हावी म्हणून त्याची स्तुति करूं लागले. हे वीरनाथा! जर तुझें सुंदर वचन नसतें तर भव्य जवांना या भूतलावर वस्तूचें खरें स्वरूप कसें समजलें असतें. बरोबरच आहे कीं, सूर्याच्या प्रकाशावाचूनच प्रातःकाळीं कमलें आपोआपच विकास पावतात काय?

८६ हे जिनेशा! आपण तेल व वात यांस रहित असा जगांतील अद्वितीय दीप आहात. कठिनपणानें रहित आहे अंतरात्मा ज्याचा असें आपण चिंतामणी रत्न आहात. व भुजंगानें वेष्टन ज्याला नाहीं असा चंदनवृक्ष आपण आहात.

क्षीरोदफेनपटलावलिजालगौरं स्थित्वा नभस्यमृतरश्मिपदेन हृद्यं ॥
व्याप्तं मया कियदनाप्तमिदं क्षणेन निध्यायतीव जगदीश जगद्यतस्ते
॥ ८७ ॥
स्तुत्वा तमित्यथ सुराः पुनराशु निन्युर्मेरोस्ततः कुसुमभूषितसन्नमेरोः
सौधाग्रबद्धकदलीध्वजरुद्ध्यमानं यानावतारसमयान्नगरं तदिद्धं ८८
पित्रोः सुतापगमजा भवतोरथार्तिर्मा भूदिति प्रतिकृतिं तनयस्य
कृत्वा ॥
नीत्वामराद्रिमभिषिच्य भवस्तुतोऽयमानीत इत्यभिनिवेद्य ददुः
सुरास्तं ॥ ८९ ॥
दिव्यांबराभरणमाल्यविलेपनाद्यैः संपूज्य मानवपतिं प्रियकारिणींच।
आवेद्य तद्भगवतोऽस्य बलं च नाम भीता ययुः स्वनिलयं त्रिदशाः
प्रनृत्य ॥ ९० ॥

उष्णतेनें रहित व तेजांचा साठा असें आपण सूर्य आहात. ८७ हे जगदीशा क्षीरसमुद्राच्या फेनसमूहाच्या पंक्तीप्रमाणें गौरवर्णाचें व रमणीय असें आपलें यश आकाशांत अमृताप्रमाणें ज्याचे किरण आहेत अशा चंद्राच्या मिषानें राहून मी हें जग किती व्यापिलें आहे व केवढें व्यापावयाचें राहिलें आहे. असा क्षणपर्यंत जणु विचार करीत आहे. ८८ याप्रमाणें प्रभूची स्तुति करून नंतर फुलांनीं अलंकृत झाले आहेत. उत्तम नमेरु वृक्ष जेथें आहे अशा त्या मेरु पर्वतापासून मोठमोठ्या वाड्याच्या पुढें उभारलेल्या ध्वजांनीं विमानाचें खालीं उतरणें रोकलें गेलें आहे अशा समृद्ध नगरांत देवांनीं प्रभूला पुनः लौकर नेलें. ८९ आपणाला मुलाच्या नेण्यानें पीडा होईल म्हणून मुलाची दुसरी प्रतिकृति मायेनें निर्माण करून व आपल्या मुलाचा मेरुपर्वतावर अभिषेक करून हा आपला मुलगा आह्मी आणिला आहे. असें भगवंताच्या मातापित्याला सांगून देवांनीं त्यांना प्रभू परत दिला. ९० दिव्य वस्त्रें, अलंकार, पुष्पहार, उटीचे पदार्थ वगैरेंनीं सिद्धार्थ राजाची व प्रियकारिणीची पूजा करून आदर करून आणि त्या भगवंताचें सामर्थ्य व नांव सांगून व नृत्य करून संतुष्ट झालेले देव आपल्या स्थानीं निघून गेले. ९१ भगवंताच्या गर्भापासून स्वतःच्या कुळाची लक्ष्मी प्रत्येक दिवशीं

तद्गर्भतः प्रतिदिनं स्वकुलस्य लक्ष्मीं दृष्ट्वा मुदा विधुकलामिव वर्द्धमानां॥

सार्द्धं सुरैर्भगवतो दशमेन्हि तस्य श्रीवर्द्धमान इति नाम चकार राजा ॥ ९१ ॥

तस्यापरेद्युरथ चारणलब्धियुक्तौ भर्तुर्यती विजयसंजयनामधेयौ तद्वीक्षणात्सपदि निःसृतसंशयार्थौ आतेनतुर्जगति सन्मतिरित्यभिख्यां ॥ ९२ ॥

शक्राज्ञया प्रतिदिनं धनदोऽनुरूपैरानर्च रश्मिजटिलैर्मणिभूषणैस्तं। नाथे। व्यवर्द्धत यथेन्दुरकृष्णपक्षे भव्यात्मनामतनुना प्रमदेनसार्द्धं९३

संप्राप्स्यते न पुनरेव वपुःसुरूपं बाल्यं मया क्षपितसंसृतिकारणत्वात् तस्मादिमां सफलयामि दशामितीव मत्वार्भकैः सह जिनः पृथुकैः स रेमे ॥९४॥

वटवृक्षमथैकदा महान्तं सह डिंभैरधिरुह्य वर्द्धमानं ॥
रममाणमुदीक्ष्य संगमाख्यो विबुधस्त्रासयितुं समाससाद ॥९५॥

चंद्राच्या कलेप्रमाणें वाढत आहे हें पाहून दहाव्या दिवशीं राजानें देवासह प्रभूचें श्रीवर्द्धमान असें नांव ठेविलें. ९२ तदनंतर कोणे एके दिवशीं चारण ऋद्धीनें युक्त अशा विजय व संजय या नांवाच्या दोन मुनींनीं भगंवताचें दर्शन घेतल्याबरोबर ते तत्वांतील संशयानें रहित झाले तेव्हां त्यांनीं प्रभूचें ' सन्मति ' असें नांव-ठेविलें. ९३ जसा शुक्लपक्षांतील चद्र दररोज वाढत जातो तसे प्रभु भव्यजीवांच्या अतिशय आनंदासह वाढूं लागले. इंद्राच्या आज्ञेनें कुबेर किरणांनीं व्याप्त अशा रत्नालंकारांनीं प्रभूचा दररोज आदर करीत असे. ९४ मी संसाराचीं सगळीं कारणें नष्ट केलीं असल्यामुळें पुनः मला असलें सुंदर शरीर व असला सुंदर बालपणा प्राप्त व्हावयाचा नाहीं म्हणून मी ही अवस्था सफल करितो असा विचार करून जणु काय प्रभु इतर लहान मुलांसह क्रीडा करीत असत. ९५ एके दिवशीं एका मोठ्या वडाच्या वृक्षावर इतर लहान मुलांसह चढून प्रभू खेळत आहे असें पाहून संगम नांवाचा देव त्यांना भिवविण्यासाठीं त्यांच्याजवळ आला.

स विकृत्य फणासहस्रभीमं फणिरूपं तरसा वटस्य मूलं ॥
विटपैः सह वेष्टतेस्म बालास्तमथालोक्य यथायथं निपेतुः ॥९६॥
चरणौ विनिवेश्य लीलयासौ भगवान्मूर्धनि तस्य भोगिभर्तुः ॥
तरुतोऽवततार वीतशंको भुवि वीरस्य हि नास्ति भीतिहेतुः ९७
अभयात्मतया प्रहृष्टचेता विबुधस्तस्य निजं प्रकाश्य रूपं ॥
अभिषिच्य सुवर्णकुंभतोयैः स महावीर इति व्यधत्त नाम ॥९८॥
अथ लंघितशैशवः क्रमेण प्रतिपेदे नवयौवनं श्रिया सः ॥
भगवान्निजचापलं विहन्तुं स्वयमभ्युद्यत एव वर्द्धमानः ॥ ९९ ॥
सहजैर्दशभिर्गुणैरुपेतं वपुरस्वेदपुरःसरैस्तदीयं ॥
अभवद्भुवि सप्तहस्तमात्रंरुचिकीर्णं नवकर्णिकारवर्णं ॥ १०० ॥
भगवानमरोपनीतभोगान्स निनायानुभवन्भवस्य हंता ॥
त्रिगुणान्दशवत्सरान्नवाब्जसुकुमारांघ्रियुगः कुमार एव ॥ १०१ ॥
अथ सन्मतिरेकदाऽनिमित्तं विषयेभ्यो भगवानभूद्विरक्तः ॥
प्रशमाय सदा न बाह्यहेतुं विदितार्थस्थितिरीक्षते मुमुक्षुः॥१०२॥

९६ त्या संगम नांवाच्या देवानें हजार फणांनीं भयंकर दिसणारें असें सर्पाचें रूप विक्रियेनें धारण करून शीघ्र वडाचें मूळ अर्थात् बुंधा त्याच्या सर्व फांद्यांसह वेढून टाकिला त्यावेळीं त्या भयंकर सर्पाला पाहून सर्व लहान मुलें पटापट खालीं पडूं लागलीं. ९७ तेव्हां प्रभू लीलेनें त्या सर्पराजाच्या मस्तकावर आपले दोन पाय ठेऊन निर्भयपणें जमीनीवर झाडावरून उतरले. बरोबरच आहे कीं, वीर पुरुषाला जगांत भय उत्पन्न करणारें कांहीं कारण असत नाहीं. ९८ प्रभूचा निर्भयपणा पाहून देवाचें अंतःकरण आनंदित झालें. त्यानें आपलें रूप प्रगट करून व सुवर्ण कलशांच्या पाण्यानें प्रभूचा अभिषेक करून त्यांचें महावीर असें नांव ठेविलें. ९९ वाढत चाललेल्या प्रभूंनीं स्वतःचा चंचलपणा सोडून दिला व क्रमानें बालपणाचें उल्लंघन केले तेव्हां नवीन तारुण्यरूपी लक्ष्मीनें त्याचा स्वीकार केला. १०० घाम न येणें, सुगंध शरीर असणें, रक्त दुधासारखें पांढरें असणें वगैरे जन्मत उत्पन्न झालेल्या स्वाभाविक दहा गुणांनीं युक्त असलेले त्यांचें शरीर कांतीनें पूर्ण भरलेलें व नवीन कांचनारवृक्षाच्या वर्णाचें आणि सात हात उंचीचें असें होतें. १०१ नवीन कमलाप्रमाणें कोमल आहेत, दोन पाय ज्यांचे संसारनाशक अशा भगवंतानीं देवांनीं आणिलेल्या भोगांचा

विमलावधिना निरूप्य नाथः क्रमतोऽतीतभवानचिंतयत्स्वान् ॥
प्रकटीकृतवृत्तमुद्धतानामवितृप्तिं विषयेषु चेंद्रियाणां ॥ १०३ ॥
प्रतिबोधयितुं मुदा तदायादथ लौकांतिकसंहतिस्तमीशं ॥
मुकुटांशुभिरिंद्रचापलक्ष्मीमपयोदां दिवि कुर्वती विचित्रैः ॥ १०४ ॥
मुकुलीकृतहस्तपल्लवासौ विनयेन प्रतिपात्य तं मुमुक्षुं ॥
सुरसंहतिरित्युवाच वाचं मुदिता तत्समभावदृष्टिपातैः ॥१०५॥
परिनिष्क्रमणस्य नाथ योग्या सविधं कालकलेयमागता ॥
स्वयमुत्कतया समागमाय प्रियदूती प्रहिता तपःश्रिया वा ॥१०६॥
सहजेन समन्वितस्य भर्तुस्तव वेदात्रितयेन निर्मलेन ॥
अपरैः परिबुद्धतावलेशैरुपदेशैः क्रियते कथं विमुक्तेः ॥१०७॥

उपभोग घेत कौमारावस्थेंत तीस वर्षें व्यतीत केलीं. १०२ एकेवेळीं भगवान सन्मति जिनेश्वर कारणावाचून विषयापासून विरक्त झाले. बरोबरच आहे की, ज्याला जीवादि पदार्थांचें स्वरूप समजलें आहे असा मोक्षेच्छु भव्य जीव वैराग्य प्राप्त व्हावें म्हणून बाह्यकारण पाहात बसत नाहीं. १०३ भगवंतांनीं निर्मल अवधिज्ञानानें मागच्या स्वतःच्या भवांना वळून पाहिलें व त्यांचा विचार केला. तसेंच त्या भवांमध्यें कोणत्या गोष्टी प्रगट झाल्या व विषयामध्यें उद्धत इंद्रियांची प्रवृत्ति कशी असते या गोष्टीचाही त्यांनी विचार केला. १०४ नानाप्रकारच्या मुगटांच्या किरणांनीं मेघ नसतांही आकाशांत इंद्रधनुष्याचीं शोभा उत्पन्न करणारा लौकांतिक देवांचा समुदाय त्यावेळीं प्रभूंना उपदेश देण्यासाठीं आनंदानें आला. १०५ हातरूपी कोमल पानें ज्यानें मिटविलीं आहेत अर्थात् ज्याने हात जोडले आहेत असा तो देव समूह विनयानें त्या मोक्षेच्छु सन्मति जिनेश्वरास विनयानें नमस्कार करून प्रभूंच्या समताभावास दाखविणाऱ्या कटाक्षपातांनीं आनंदित होऊन पुढें लिहिल्याप्रमाणें बोलूं लागला. १०६ हे प्रभो, दीक्षा घेण्यास योग्य रीतीची ही वेळ जवळ आली आहे. अथवा स्वतः अतिशय उत्कंठित होऊन आपला समागम व्हावा म्हणून तपोलक्ष्मी पाठविलेल्या दूतीप्रमाणें ही वेळ सध्यां आम्हास वाटत आहे.

१०७ जन्मतःच उत्पन्न झालेल्या अशा निर्मल तीन ज्ञानांनीं हे प्रभो, आपण युक्त आहांत ज्यांना तत्वाचें फार थोडें स्वरूप समजलें आहे अशा इतर लोकांकडून आपणास मोक्षाचा उपदेश कसा वरें केला जाईल ? अर्थात् हे प्रभो आमचा या

तपसा सुनिरस्य घातिकर्मप्रकृतीः केवलमाप्य भव्यसत्वान् ॥
प्रतिबोधय मुक्त्युपायमुक्त्वा भववासव्यसनाद्विभीतचित्तान् ॥१०८॥
अभिधाय गिरं प्रपन्नकालामिति लौकांतिकसंहतिर्व्यरंसीत् ॥
भगवानपि निश्चिकाय मुक्तिं वचनं स्वावसरे हि याति सिद्धिं॥१०९॥
अथ देवगणाश्चतुर्विकल्पास्तरसा कुंडपुरे तदा त्वपश्यन् ॥
प्रतिलोकनकौतुकानिमेषाः पुरनारीः स्ववधूविशंकयेव ॥ ११० ॥
स सुरैर्भगवान्कृतोरुपूजो विधिना पृष्टसमस्तबंधुवर्गः ॥
अभिवाह्य वनं ययौ मुमुक्षुश्चरणाभ्यां भवनात्पदानि सप्त ॥१११॥
वररत्नमयीं विधुप्रभाख्यां ध्रियमाणां नभसि स्वयं सुरेंद्रैः ॥
शिबिकामधिरुह्य वीरनाथो निरगाद्भव्यजनैः पुरात्परीतः ॥११२॥
भगवान्वनमेत्य नागखंडं त्रिदशेन्द्रैरवतारितः स यानात् ॥
अभिदृश्य इव स्वकीयपुण्ये स्फटिकाश्मन्यतिनिर्मले न्यषीदत् ॥११३॥
हृतकर्ममलानुदङ्मुखेन प्रणिपत्यैकधियाथ तेन सिद्धान् ॥

प्रसंगीं येऊन चार गोष्टी बोलणें हा नियोगच आहे म्हणून आम्ही या वैराग्याच्या गोष्टी सांगत आहोत. आपणास उपदेश करण्याची आमच्यामध्यें पात्रता नाहीं. १०८ हे भगवंता, तपश्चरणाच्याद्वारे घाति कर्माच्या प्रकृतींचा नाश करुन व केवलज्ञानाची प्राप्ति करुन घेऊन, संसारवासाच्या संकटापासून भ्यालेले आहे चित्त ज्यांचें अशा भव्य जीवांना मोक्षाचा उपाय दाखऊन उपदेश करा. १०९ या प्रमाणें योग्य कालास अनुसरुन लौकांतिक देवसमूह भाषण करुन थांबला. भगवंतांनींही मोक्ष प्राप्त करुन घेण्याचा निश्चय केला बरोबरच आहे कीं योग्य कालीं योग्य भाषण केलें असतां ते फलद्रूप होतेंच. ११० यानंतर चतुर्णिकाय देवांचे समुदाय शीघ्र कुंडलपुरास आले व पाहण्याच्या कौतुकानें ज्यांनीं आपल्या पापण्या लववित्या नाहीत अशा नगरांतील स्त्रियांना त्यांनी ह्या आपल्या देवांगनाच आहेत काय अशा संशयानें पाहिलें. १११ देवाकडून योग्य विधीनें ज्यांची मोटी पूजा केली आहे व ज्यांनीं आपल्या सर्व बंधुवर्गास विचारिलें आहे असे ते मुमुक्षु प्रभु वनाकडे जाण्याच्या उद्देशानें घरांतून सात पावलें चालून बाहेर आले. ११२ देवेंद्रांनीं आकाशांत स्वतः धारण केलेल्या उत्कृष्ट रत्नांनीं निर्माण केलेल्या अशा चंद्रप्रभा नांवाच्या पालखीमध्यें भगवंतांनीं आरोहण केलें व भव्य-जनांनीं वेष्टिलेले होऊन नगरांतून बाहेर आले. ११३ नाग खंडवनांत प्रभु आले तेव्हां ते पालखीतून देवेन्द्राकडुन अवतारित झाले. अर्थात् इंद्रांनीं प्रभु पालखीतून

ज्वलदाभरणोत्करः कराभ्यां प्रकटो राग इव स्वतो निरासे ।११४।
भुवि मार्गशिरस्य कृष्णपक्षे स दशम्यां प्रथितः श्रियाऽपराण्हे ॥
परमार्यमणि स्थिते शशांके कृतषष्ठो भगवांस्तपः प्रपेदे ॥११५॥
निबिडीकृतपंचमुष्टिलुप्तानलिनीलान्मणिभाजने निधाय ॥
स्वयमेव शिरोरुहांस्तदीयान्निदधौ क्षीरपयोनिधौ महेंद्रः ॥११६॥
अभिवंद्य तपःश्रिया समेतं विबुधास्ते प्रतिजग्मुरात्मधाम ॥
जनताभिरयं स इत्युदक्षं क्षणमात्रं नभसीक्षितो विचिंत्य ॥११७॥
अचिरादुपलब्धसप्तलब्धिः स मनःपर्ययबोधमभ्युपेत्य ॥
रुरुचे वितमाः परं रजन्यामनवाप्तैककलो यथा मृगांकः॥११८॥
अपरेद्युरनूनसत्वयुक्तो नभसो मध्यमधिष्ठिते पतंगे ॥
उरुहर्म्यचयेन पारणार्थे निचितं कूलपुरं विवेश वीरः ॥११९॥

उतरत असतां त्यांना आपल्या हाताचा आश्रय दिला. तदनतर स्वत:चें पुण्य जणु दृश्य अवस्थेला पोहोंचलें आहे. अशा अतिशय निर्मळ स्फटिकमण्याच्या शिलेवर प्रभु विराजमान झाले. ११४ यानंतर उत्तरेकडे तोंड करून ज्यांनीं सर्व कर्ममळ नष्ट केला आहे अशा सिद्ध परमेष्ठींना प्रभूनीं एकाग्र मनानें नमस्कार करून जणु हा प्रगट झालेला राग भावच आहे अशा प्रकाशमान अलंकार समूहाचा स्वतःपासून त्याग केला ११५ मार्गशिर्ष कृष्णपक्षाच्या दशमी दिवशीं. चंद्र परमार्यमणावर असतां दोनप्रहरीं उपवासाची प्रतिज्ञा ज्यांनीं केली आहे अशा लक्ष्मीसंपन्न प्रभूंनीं या भूतलावर तपाचा स्वीकार केला अर्थात् दीक्षा धारण केली ११६ घट्ट धरलेल्या पांच मुठींनीं उपडलेले भुंग्याप्रमाणें काळे असे भगवंताचे केश इंद्रानें स्वतः रत्नपात्रांत ठेऊन क्षीरसमुद्रांत टाकिले. ११७ हा सौधर्मेंद्र हा ईशानेंद्र हा सानत्कुमारेंद्र आहे असें तोंड वर आकाशांत थोडा वेळ विचार करून पाहिलेले ते देव तपोलक्ष्मीनें सहित झालेल्या प्रभूला नमस्कार करून स्वस्थानीं निघून गेले.

११८ दीक्षा घेतल्यानंतर लौकरच प्रभु बुद्धि, विक्रिया, तप, बल, औषध, रस व क्षेत्र अशा सातऋद्धिंनी युक्त झाले व मन. पर्ययज्ञान प्राप्त करून घेऊन ज्याला एक कला प्राप्त झाली नाहीं असा चंद्र जसा तमरहित होऊन रात्री शोभतो त्याप्रमाणें अज्ञानरहित होऊन व केवलज्ञानरूपीकला अद्यापि ज्यांना प्राप्त झाली नाहीं असे होतसाते अतिशय शोभूं लागले. ११९ दुसरे दिवशीं आकाशाच्या मध्यावर सूर्य आरूढ झाला असतां अतिशय धैर्यशाली वीर जिनेश्वरांनीं पारणे-

भुवि कूल इति प्रसिद्धनामा नृपतिस्तन्नगराधिपः स्वगेहम् ॥
प्रविशंतमणुव्रती निदध्यौ भगवंतं प्रतिपालितातिथिस्तं ॥१२०॥
नवपुण्यचिकीर्षया धरायां नवपुण्यक्रमवेदिनां वरीयान् ॥
क्षितिपस्तमभोजयत्तदीयान्निरयासीद्भवनाज्जिनोऽपि भुक्त्वा ॥१२१॥
अथ तस्य गृहाजिरे नभस्तो वसुधारा निपपात पुष्पवृष्ट्या ॥
सह दुंदुभयोऽपि मंद्रमंद्रं दिवि नेदुस्त्रिदशैः प्रताड्यमानाः ॥१२२॥
विकिरन्नवपारिजातगंधं सुववौ गंधवहः सुगंधिताशं ॥
अतिविस्मितचेतसां सुराणां खमहो दानवचोभिरापुपूरे ॥ १२३ ॥
इति दानफलेन स क्षितीशः समवापाद्भुतपंचकं सुरेभ्यः ॥
यशसः सुखसंपदांच हेतुर्गृहधर्माभिजुषां हि पात्रदानं ॥ १२४ ॥
अतिमुक्तकनामनि श्मशाने प्रतिमास्थं निशि नाक्षमिष्ट जेतुं ॥
विविधैरुपसर्गमात्मविद्याविभवैस्तं विभवं भवो वितन्वन् ॥१२५॥

साठीं मोठमोठ्या महालांच्या समुदायानें युक्त असलेल्या कुल्यपूर नांवाच्या शहरांत प्रवेश केला. १२० या पृथ्वीतलावर कूल या नांवानें प्रसिद्ध असलेला एक राजा त्या कुल्यपूर नगराचा स्वामी होता. तो अतिथीची वाट पाहात होता. आपल्या घरीं प्रवेश करणाऱ्या भगवंतास त्या अणुव्रती राजानें पाहिलें. १२१ पात्राचा आदरानें स्वीकार करणें, त्याला उच्चासनावर बसविणें, पाय धुणें, पूजन करणें, नमस्कार करणें, मनवचन आणि शरीर शुद्ध ठेवणे व आहाराची शुद्धि ठेवणें या नऊ प्रकारच्या पुण्यक्रमाचें स्वरूप जाणणाऱ्यामध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या राजानें प्रभूला आहार दिला व प्रभु देखिल त्याच्या घरीं आहार घेऊन तेथून निघून गेले. १२२ यानंतर राजाच्या घराच्या आंगणांत आकाशांतून पुष्पवृष्टिसह रत्नवृष्टि झाली. आकाशांत देवाकडून ताडले जाणारें नगारे गंभीर शब्द करूं लागले, ज्यांनें सर्व दिशा सुगंधित केल्या आहेत अशा नवीन पारिजात कल्पवृक्षाच्या गंधाला धारण करून वारा वाहूं लागला. अतिशय आश्चर्यचकित झालें आहे मन ज्यांचें अशा देवांच्या दान प्रशंसात्मक शब्दांनीं आकाश भरून गेलें. १२४ याप्रमाणें त्या कूल राजानें वीर प्रभूला आहार दिला. त्याच्या फलानें त्याला देवापासून पंचाश्चर्याची प्राप्ति झाली. बरोबरच आहे कीं, पात्रदान हें गृहस्थांना कीर्ति, सुख व संपत्ति यांची प्राप्ति करून देण्यास कारण आहे. १२५ एकदा प्रभु अतिमुक्तक

प्रणिपत्य ततो भवाभिधानो जिननाथस्य चिराय काशिकायां ॥
स महातिमहादिरेष वीरः प्रमदादित्यभिधां व्यधत्त तस्य ॥ १२६ ॥
परिहारविशुद्धिसंयमेन प्रकटं द्वादश वत्सरांस्तपस्यन् ॥
स निनाय जगत्रयैकबंधुर्भगवान् ज्ञातिकुलामलांबरेंदुः ॥ १२७ ॥
अथर्जुकूलोच्छ्रितकूलभाजं श्रीजृंभकग्राममुपेत्य सम्यक् ॥
षष्ठोपवासेन युतोऽपराण्हे सालस्य मूलाश्मनि सन्निविश्य ॥१२८॥
वैशाखमासस्य विशुद्धपक्षे तिथौ दशम्यामुडुपेऽर्यमस्थे ॥
स घातिकर्माणि जिनः प्रहत्य ध्यानासिना केवलमाप बोधम् ॥१२९॥
अथ दशविधैरच्छायाद्यैर्गुणैः सहितं तदा
त्रिदशपतयो भक्त्या नेमुः समेत्य जिनेश्वरम् ॥
विगतकरणं निध्यार्यतं यथास्थिति सर्वदा ॥
युगपदखिलं लोकालोकं स्वकेवलसंपदा ॥ १३०॥

नांवाच्या श्मशानांत रात्रीं प्रतिमायोग धारण करून ध्यानांत लीन झाले असतां नानाप्रकारच्या विद्यांच्या सामर्थ्यांनीं उपसर्ग करणारा भव नांवाचा अकरावा रुद्र संसाररहित वीर प्रभूला जिंकण्यास समर्थ झाला नाहीं. १२६ तेव्हां त्या भव नांवाच्या रुद्रानें पुष्कळ वेळपर्यंत नमस्कार करून काशी नगरांत मोठ्या हर्षानें वीर प्रभूंचें महाति महावीर असें नांव ठेविलें. १२७ त्रैलोक्यबंधु, ज्ञातिवंशरूपी आकाशाला शोभा आणण्यास चंद्राप्रमाणें असलेले भगवान वीरनाथ परिहारविशुद्धि नांवाचें संयम धारण करून तप करूं लागले. या प्रमाणे त्यांची प्रगट रीतीनें बारा वर्षे व्यतीत झालीं. १२८-१२९ यानंतर ऋजुकूला नदीच्या उंच किनाऱ्यावर वसलेल्या श्री जंभक नांवाच्या गांवाजवळ येऊन दोन उपवासांच्या प्रतिज्ञेनें युक्त होऊन दोनप्रहरीं साल वृक्षाच्या खालीं असलेल्या शिळेवर उत्तम रीतीनें बसून जिनेश्वरांनी वैशाख शुक्ल दशमीच्या दिवशीं अर्यमावर चंद्र आला असतां शुक्ल ध्यानरूपी तरवारीनें मोहनीय, ज्ञानावरण, दर्शनावरण व अंतराय या चार घाति कर्मांचा घात करून केवलज्ञानाची प्राप्ति करून घेतली. १३० सावली न पडणें, नखकेश न वाढणे, उपसर्ग न होणे, कवलाहार नसणें वगैरे दहा प्रकारच्या गुणांनीं

इत्यसगकृते श्रीवर्धमानचरित्रे भगवत्केवलोत्पत्तिर्नाम सप्तदशः सर्गः।

युक्त, इन्द्रियांची अपेक्षा न ठेवितां स्वतःच्या केवलज्ञान संपत्तीनें एकदम संपूर्ण लोक व अलोक यांच्या स्वरूपाला जसें आहे तशा रीतीनें नेहमीं पाहणारे व जाणणारे अशा वीर भगवंताला त्यावेळीं देवेंद्र येऊन भक्तीनें नमस्कार करूं लागले.

याप्रमाणें असगमहाकविकृत श्री वर्द्धमान चरित्रांत भगवान वीरनाथास केवलोत्पत्ति झाली याचें वर्णन करणारा सतरावा सर्ग समाप्त झाला.

# अष्टादशः सर्गः।

अथ धनपतिरिंद्रस्याज्ञया स्वस्य भक्त्या विविधवरविभूतिं तत्क्षणेनेति चक्रे ॥
समवसरणभूमिं तस्य नाथस्य रम्यामभिमतममराणां किं न साध्यं त्रिलोके ॥ १ ॥
ततो द्विषड्योजनमात्रविस्तृतं क्षोणीतलं नीलमयं रजोमयः ॥
शरन्नभोभागमिवांबुदोच्चयः शालः परीयाय हिमांशुनिर्मलः ॥ २ ॥
स सिद्धरूपैः समभावि मानस्तंभैर्महादिक्षु दिदृक्षया न्तः॥
मुक्तिप्रदेशैर्भुवमागतैर्वा ततः परैर्भासुररेणुशालात् ॥ ३ ॥

१ भगवंतांना केवलज्ञान झाल्यानंतर इन्द्राच्या आज्ञेनें व स्वत च्या भक्तीनें ही कुबेरानें तत्काल वीरप्रभूच्या रमणीय आणि नानाप्रकारच्या ऐश्वर्यांनी युक्त अशा समवसरणभूमीची रचना केली. बरोबरच आहे कीं, देवांना त्रैलोक्यामध्यें असाध्य अशी कोणती गोष्ट आहे बरें ? २ जसा मेघसमुदाय शरदृतूंतलि निळसर आकाशाच्या भागाला वेष्टण घालतो तसे चंद्राप्रमाणें निर्मल अशा धूलीसाल नांवाच्या तटानें बारा योजन विस्ताराच्या नीलरत्नांनीं निर्माण केलेल्या भूमि-लाला वेष्टण घातलें. अर्थात् नीलरत्नांनीं बारा योजन प्रमाणाची जमीन बनवून तिच्या सभोंवती कुबेरानें धूलीसाल नांवाच्या तटाची रचना केली. ३ या प्रकाशमान धूलीसालाच्या पुढें सिद्ध परमेष्ठींच्या मूर्तींनी युक्त चार महादिशामध्यें चार मानस्तंभ होते. जणु मोक्षाचे प्रदेश त्या धूलीसालाला पाहाण्याच्या इच्छेनें पृथ्वी-तलावर आले आहेत असें पाहणारांना वाटत असे. ४ यानंतर स्वच्छ पाण्यानें

ततः पराण्यच्छपयोधराणि सपद्मपत्राणि सरांस्यभूवन् ॥
आशामुखानीव घनांतकाले चत्वारि नंदाऽह्वदनामभांजि ॥ ४ ॥
ततः परा विमलजलांबुखातिका सवेदिका विकचसितांबुजाश्रिता॥
सतारका सुरपदवी सुरैःसमं व्यराजत स्वयमिव भूमिमागता॥५॥
सुमनोऽन्वितमप्यपेतबोधं बहुपत्राकुलमप्यसैन्यमासीत् ॥
विपरीतमपि प्रशंसिवल्लीवनमाभोगि ततःपरं समन्तात् ॥ ६ ॥
प्राकारः कनकमयस्ततः परोऽभूत्संयुक्तः सुरजतगोपुरैश्चतुर्भिः ॥
आयातो भुवमचिरप्रभासमूहः स्थातुं वा चतुरमलांबुदैरुपेतः ॥७॥

पूर्ण भरलेलीं व कमलपत्रांनीं सहित अशीं नंदाऽह्वद नांवाचीं चार सरोवरें होतीं. हीं शरत्कालीं स्वच्छ बनलेल्या दिशांच्या मुखाप्रमाणें शोभत होतीं. ५ या सरोवरानंतर प्रफुल्लित झालेल्या पांढऱ्या कमळांनीं भरलेला, वेदिकेनें सहित व निर्मळ पाण्यानें पूर्ण असा खंदक होता. तो नक्षत्रानें सहित व देवांनीं युक्त असें आकाश जणु या भूतलावर स्वतः आलें आहे असा शोभत होता.

६ पाण्यानें भरलेल्या खंदकानंतर त्याच्या सभोंवतीं उत्कृष्ट वेलींचें वन होतें. तें सुमनोन्वित अर्थात् देवांनीं किंवा विद्वानांनीं युक्त असूनही अपेतबोध होतें अर्थात् ज्ञानशून्य होतें. या विरोधाचा परिहार याप्रमाणें, तें वेलींचें वन सुमनोन्वित–फुलांनीं युक्त होतें. व एकेंद्रिय जीवरूप असल्यामुळें अबोध होतें. बहुपत्राकुल अर्थात् पुष्कळ हत्ती, घोडे इत्यादि वाहनांनीं युक्त असूनही असैन्य होतें.—सैन्यरहित होतें. याचा विरोध परिहार असा–बहुपत्र–अर्थात् पुष्कळ पानांनीं युक्त होतें. विपरीत असूनही प्रशंसनीय होतें. या विरोधाचा परिहार असा–वि–परीत–पक्ष्यांना वेढलेलें होतें व प्रशंसनीय होतें. तसेंच आभोगि–विस्तारयुक्त होतें. सारांश हा कीं, खंदकाच्या सभोंवती फुलांनीं लकडलेलें, पानांनीं गजबजलेलें, व पक्ष्यांनीं युक्त असें विस्तीर्ण वेलींचें वन होतें. ७ यानंतर सोन्याचा तट चार उत्तम चांदीच्या गोपुरांनीं युक्त होता. चार निर्मल मेघांनीं युक्त असा विजांचा समूह जणु या भूतलावर राहण्यासाठीं आला आहे असें त्या गोपुरानें सहित अशा तटाला पाहून लोकांना वाटत असे. ८ पूर्व दिशेच्या उंच गोपुराचें विजय असें नांव होतें. दक्षिण दिशेंत रत्नांच्या तोरणांनीं युक्त असें जें गोपुर होतें त्याचें

प्राच्यां गोपुरमुच्छ्रितं विजयमित्यासीदभिख्यां दधद्-
याम्यां यद्दिशि रत्नतोरणयुतं तद्वैजयंताभिधं ॥
वारुण्यां कदलीध्वजैरविकलैः कांतं जयन्ताभिधं
कौबेर्यामपराजिताख्यमपरैराकीर्णवेदीतटम् ॥ ८ ॥
तद्गोपुरोच्छ्रितिविराजिततोरणानां नेत्रापहारिविधिनोभयभाग-
वर्ति ॥
मांगल्यजातममलांकुरचामरादि प्रत्येकमष्टशतमाविरभूद्विभूत्यै ।९।
तेषु व्यराजन्मणिदामघंटा हिरण्यजालादिकलंबनानि ॥
मुक्ताकलापांतरितानि दृष्टेः काराविधायीनि निरीक्षकाणां ॥१०॥
तद्गोपुरांतर्गतचारुवीथी द्विपार्श्वयोरुच्छ्रितनाट्यशाले ॥
द्वे द्वे मृदंगध्वनिनेव भव्यान् द्रष्टुं विभातः स्म समाह्वयन्त्यौ ॥११॥
वीथीनामुभयविभागयोस्ततःस्युश्चत्वारि त्रिदशजनोपसेवितानि॥
पिंड्यालीविषमपलाशचंपकाम्रैः कीर्णानि प्रमदवनान्यनुक्रमेण॥१२॥

वैजयंत हें नांव होतें. पश्चिम दिशेला ध्वजांनीं पूर्ण व सुंदर जयंत नांवाचें गोपुर होतें व उत्तर दिशेकडे वेदी व तट यांनीं व्याप्त व देवांनीं युक्त असें अपराजित नांवाचें गोपुर होतें. ९ या गोपुराच्या उंचीवर शोभत असलेल्या तोरणांच्या दोन्ही भागाजवळ नेत्रांचें आकर्षण करणारे मंगलाचा समूहरूप असणारीं निर्मल अग्र भागांनीं युक्त असलेलीं चामर, कलश, दर्पण, वगैरे अष्टद्रव्ये प्रत्येक गोपुरास १०८ होतीं. तीं समवसरणाची शोभा वाढवीत असत. १० त्या गोपुरामध्यें मोत्यांच्या गुच्छांनीं युक्त अशा रत्नांच्या माळा व सोन्यानें बनविलेल्या झालरी लटकत होत्या. देव व मनुष्यें जेव्हां तिकडे पाहात असत तेव्हां त्यांचे डोळे तिकडेच खिळून जात असत. ११ त्या गोपुरांच्या मध्यभागीं असलेल्या मार्गावर दोन्ही बाजूस उंच उंच अशा दोन दोन नाट्यशाला होत्या. त्या जणु मृदंगांच्या ध्वनीनें भव्यांना पाहण्यासाठीं बोलावित आहेत अशा शोभत होत्या. १२ रस्त्याच्या दोन्ही बाजूला जेथें देव विहार करित असतात अशीं अशोक, सप्तच्छद, चंपक व आम्रवृक्ष यांनीं व्याप्त अशीं क्रमानें चार प्रमदवनें होतीं. १३ हलणाऱ्या कोमल पानांनीं युक्त अशा लांबलचक फांद्यांनीं

कुर्वाणाः कर्णपूरश्रियमिव विटपैरायतैर्दिग्वधूनां ॥
चंचद्बालप्रवालैः प्रतिकृतिममलां धारयंतो जिनानाम् ॥
चत्वारो यागवृक्षाः प्रति कुसुमजुपामुज्झितांभोजखंडैः ॥
पिंड्याद्यास्तेष्वभूवन्समदमधुकृतां मंडलैर्मंड्यमानाः ॥ १३ ॥
तिस्रस्तिस्रो विमलसलिलास्तत्र वाप्यो विरेजुः ॥
वृत्तत्र्यस्रप्रकटचतुराः स्वाकृतीर्धारयन्त्यः ॥
नंदा कीर्णा कनककमलैर्नंदवत्युत्पलौघैः ॥
मेघानीलैः स्फटिककुमुदैर्नाम नंदोत्तरा च ॥ १४ ॥
प्रासादा मणिमंडपा बहुविधा धारागृहश्रेणय-
श्चक्रांदोलसभालयाः सुरुचिरा मुक्ताशिलापट्टकाः ॥
क्रीडापर्वतकाः सुरासुरचितास्तत्रैव रेजुर्वृताः
कूजन्मत्तशिखंडिमंडलवृतप्रांतैर्लतामंडपैः ॥ १५ ॥

दिशारूपी स्त्रियांना कर्णपूर लंकाराची शोभा उत्पन्न करणारे, निर्मल अशा जिनां_ च्या प्रतिमा धारण करणारे अशाक वगैरे चार यागवृक्ष होते. ज्यांनीं कमल समूहांचा त्याग केलेला आहे व जे प्रत्येक फुलांवर ( यागवृक्षांच्या ) आनंदाने बसले आहेत अशा भुंग्याच्या समुदायांनीं हे यागवृक्ष फार शोभत होते. १४ या प्रमदवनामध्यें निर्मळ पाण्यानें भरलेल्या गोल, त्रिकोणी व चतुष्कोणी अशा उत्तम आकृतीला धारण करणाऱ्या विहिरी शोभत होत्या. नंदा ही सुवर्ण कमलांनीं, नंदवती तांबड्या कमळांनीं, मेघा नील कमळांनीं व नंदोत्तरा स्फटिका- सारख्या पांढऱ्या कमळांनीं व्याप्त होती.

१५ त्या प्रमदवनामध्यें नानाप्रकारचे रत्नमंडपांनी सहित प्रासाद, धारागृहांच्या पंक्ति ( जेथून सर्व बाजूंनीं पाणी पडत असतें अशा घरांना धारागृह म्हणतात. उन्हाळ्यांत श्रीमंत लोक व राजे लोक उन्हाचा त्रास होऊ नये म्हणून यांत विश्रांति घेत असतात. ) चक्री झोपाळे, सभागृहें, सुंदर फळीच्या आकाराच्या मौक्तिक पाषाणाच्या शिळा, देव व दानव यांनी युक्त असलेले क्रीडापर्वत, हे सर्व ज्यांचे प्रांतभाग ध्वनि करणाऱ्या उन्मत्त मोरांच्या समुदायांनीं व्यापून गेले आहेत अशा मंडपांनीं शोभत असत. १६ या प्रमद वनाच्या पुढें अकाशामध्यें स्वतःच्या

वनात्परा वज्रमयी नभस्तले प्रसारिताखंडलचापमंडला ॥
बभूव वेदी निजरश्मिसंपदा युता चतुर्भिर्वररत्नतोरणैः ॥ १६ ॥
मयूरमाल्यांबरहंसकेशरिद्विपोक्षताक्ष्यांबुजचक्रलांछनाः ॥
ध्वजा दशैकैकमभूच्च साष्टकं शतं सुवीथीरभितस्ततः परे ॥१७॥
एकस्यां दिशि केतवः सुरनदीकल्लोलभंगा इव
क्रांतांभोदपथाःसहस्रमभवन्साशीति वीध्रत्विषः ॥
ते सर्वेऽपि चतुर्दिगंतरगताश्चैकत्र पिंडीकृताः ॥
विंशत्या च चतुःसहस्रमपरैर्युक्तं शतैश्च त्रिभिः ॥ १८ ॥
ततः परो हेममयः स्फुरत्प्रभो बभूव शालोम्बुजरागगोपुरैः ॥
चतुर्महासांध्यघनैः समन्वितं विडंबयन्नैखिलविद्युतां चयम् ॥ १९ ॥
तद्गोपुरेषु प्रथितान्यराजन्मांगल्यवस्तूनि घटादिकानि ॥
ततः परौ हारिमृदंगनादौ द्वौ द्वावभूतां वरनाट्यगेहौ ॥ २० ॥
तेभ्यः परावुभयतोऽपि पथामुदग्रौ द्वौ द्वौ स्थितौ सुरभिधूपज-
धूमपृक्तौ ॥
संरेजतुः कनकधूपघटौ मनोज्ञौ नीलाभ्रजालपिहिताविव हेमशैलौ२१।

किरण संपत्तीनें इंद्रधनुष्याचा प्रसार करणारी अशी वज्रनिर्मित वेदिका होती. दिव्य रत्नांची चार उत्कृष्ट तोरणें होतीं. १७ त्यानंतर मोर, माळा, वस्त्र, हंस, सिंह हत्ती, बैल, गरुड, कमल व चक्रवाक पक्षी या चिन्हांनीं युक्त अशा दहा प्रकारच्या ध्वजा एक एक मार्गांत एकशे आठ एकशें आठ होत्या. १८ गंगा नदीच्या लहरींच्या तुकड्याप्रमाणें वाटणारे मेघमंडलास जाऊन भिडलेले ज्यांची कांति पसरली आहे असे ध्वज एकेका दिशेत एक हजार ऐशीं होते. चारी दिशांची ध्वजसंख्या एकत्र केली असतां चार हजार तीनशें वीस होते. १९ यानंतर चमकत आहे कांति ज्याची असा सुवर्णमय तट पद्मराग मण्यांनीं बनविलेल्या चार गोपुरांनीं युक्त होता. संध्याकाळच्या चार मेघांनीं सहित असलेल्या सर्व विजांच्या समूहाचें जणु तो सुवर्ण तट अनुकरण करीत आहे असें लोकांना वाटत होतें. २० त्या गोपुरामध्यें घट, दर्पण, चामर वगैरे प्रसिद्ध मंगल वस्तु शोभत असत. पांच्यापुढें

तत्रैव कल्पेश्वरसेवितानि कल्पद्रुमाणामभवन्वनानि ॥
चतुर्महाशास्थितसिद्धरूपसिद्धार्थवृक्षांकितनामकानि ॥ २२ ॥
ततः परासीच्चतुरुच्चगोपुरैर्विराजमानोत्पलवज्रवेदिका ॥
अधित्यकानीय सुरैर्निवेशिता परांजनाद्रेरिव तत्र विस्तृता ॥२३॥
दश दश वररत्नतोरणानि द्युतिनिचितानि ततः पराण्यभूवन् ॥
सुरतरुकुसुमप्रवालपर्णैर्विरचितवंदनमालिकां दधाति ॥ २४ ॥
तैरेवांतरिता बभुर्नवनवस्तूपाः पदार्था इव ।
प्रादुर्भावमुपागता जिनपतिं द्रष्टुं तदा कौतुकात् ॥
सिद्धानां प्रतियातनांचिततया चंद्रातपश्रीमुषः ।
पिंडीभूय भुवि स्थिता इव पृथक्मुक्त्येकदेशा इव ॥२५॥

मृदंगाच्या मधुर शब्दांनीं युक्त अशीं दोन दोन नाट्यगृहे होतीं २१ यांच्यापुढे रस्त्याच्या दोन्ही बाजूला सुगंधी धूपापासून उत्पन्न झालेल्या धुरानें युक्त व उंच असे दोन दोन सुंदर सुवर्ण धूपघट होते, हे धूपघट नीलमेघांच्या समुदायानें आच्छादित झालेल्या सुवर्ण पर्वताप्रमाणें शोभत असत. २२ त्या मार्गामध्येंच इंद्राला विहार करण्यास योग्य अशीं कल्पवृक्षाची वने आहेत. हीं वनें चार महादिशांमध्ये असलेल्या सिद्ध प्रतिमांना धारण करणाऱ्या सिद्धार्थ वृक्षानीं अंकित आहे नांव ज्यांचें अशीं आहेत अर्थात् या चार दिशांना चार सिद्धार्थ वनें आहेत व त्या वनांत सिद्ध प्रतिमांना धारण करणारे वृक्ष पूर्वादि दिशामध्यें आहेत. २३ यांच्यापुढें चार उंच गोपुरांनीं शोभणारी उत्पल वज्रवेदिका होती. देवांनीं अंजनपर्वतावरचा भाग काढून तो जणू येथें आणून ठविला आहे काय असा तिला पाहून भास होत होता. २४ त्या वज्रवेदिकेवर कांतिपरिपूर्ण व उत्कृष्ट रत्नांनीं बनलेलीं अशीं दहा दहा तोरणें होतीं. त्या तोरणावर कल्पवृक्षाच्या फुलानीं व कोमल पल्लवानीं तयार केलेल्या माळा लाविलेल्या होत्या. २५ त्या तोरणमालांनीं अंतरित झालेले अर्थात् तोरणमाला ज्यांच्या सभोंवती आहेत असे नऊ नऊ स्तूप तेथें आहेत. जणु जिनेश्वरांना पाहण्यासाठीं जीवादिक नवपदार्थच कौतुकानें स्तूपाच्या मिषानें येथें आले आहेत. चंद्रकिरणांच्या शोभेला हरण करणारे ते नउ नउ स्तूप सिद्धांच्या प्रतिमांनीं युक्त होते म्हणून ते मुक्तीचे प्रदेश एकत्र होऊन जणु येथें येऊन राहिले आहेत असा स्तूपांना पाहून जनास भास होत होता.

त्रिविधानि समंततश्च तेषां पृथुकूटानि सभागृहाणि रेजुः ॥
ऋषिमुन्यनगारसेवितानि ध्वजमालाविरलीकृतातपानि ॥ २६ ॥
आकाशस्फटिकमयस्ततः परोऽभूत्प्राकारो हरिमणिगोपुरस्तृतीयः॥
मूर्तत्वं स्वयमुपगम्य वायुमार्गः संद्रष्टुं जिनमहिमानमिवागतः क्ष्मां २७
तद्गोपुराणां गगनाग्रभाजां द्विपार्श्वयोः संनिहिता विरेजुः ॥
मांगल्यवस्तूनि विचित्ररत्नैर्विनिर्मितान्यब्दघटादिकानि ॥२८॥
तन्मध्ये रुचिरं त्रिमेखलासहितं पीठं मनोज्ञं बभा—
वाशालात्प्रसृताः प्रदक्षिणमहापीठस्पृशो वेदिकाः ॥
आकाशस्फटिकैः परस्परपृथग्भूताः कृता भासुरै—
रासन्द्वादशभिर्गणैः सविनयैरध्यास्यमाना मुदा ॥ २९ ॥
तासामुपर्यनुपमद्युतिशातकुंभस्तंभैर्धृतो विविधरत्नमयो बभूव ॥
श्रीमंडपो मधुपमंडलमंज्यमानः प्रोत्फुल्लहेमकमलैर्विहितोपहारः ३०

२६ त्या नउ नउ स्तूपांच्या सभोंवती ऋषि, मुनि व अनगार यांनीं सेवनीय व ध्वजपंक्तींच्या द्वारें सूर्यप्रकाशाला मंद करणारीं, मोठ्या शिखरांनीं युक्त अशीं सभागृहें शोभत होतीं. २७ य नंतर पाचरत्नांनीं बनविलेल्या गोपुरांनीं युक्त असलेला आकाश स्फटिकाचा सुंदर तट होता. जिनेश्वराचा महिमा पाहण्यासाठीं अमूर्तिक आकाश जणु मूर्तिक बनून भूवर आलें आहे काय असें या तटाला पाहणाऱ्यांना वाटत होतें. २८ आकाशाला आपल्या अग्रांनीं स्पर्श करणाऱ्या त्या गोपुरांच्या दोन्ही बाजूला नाना रत्नांनीं निर्माण केलेलीं कलश, दर्पण वगैरे मंगल द्रव्यें शोभत होतीं. २९ स्फटिकनिर्मित तटापासून पसरलेले व प्रदक्षिण रूपानें महासिंहासनाला स्पर्श करणारे प्रकाशमान आकाश स्फटिकांनीं बनविलेल्या एक एक स्वतंत्र वेगळेवेगळ्या वेदिका होत्या. या वेदिकावर ऋषि, आर्यिका वगैरे द्वादश गण विनयानें व मोठ्या आनंदानें बसत होते. या सर्व वेदिकांच्या मध्यभागीं तीन कठड्यांनीं सहित, कांतियुक्त व लोकांचें मन हरणारें असें सिंहासन होतें. ३० या वेदिकांच्या वर अनुपम तेजानें तळपणाऱ्या सोन्याच्या खांबांनीं धारण केलेला ज्यांत नाना प्रकारचीं रत्नें जडविलीं आहेत असा श्री मंडप होता. भुंग्यांच्या समुदायानें ज्यांना शोभा आली आहे अशा विकसित

चतुर्महादिक्षु धृतानि यक्षैश्चत्वारि मूर्ध्ना मुकुटोज्ज्वलेन ॥
सदाद्यपीठे सह धर्मचक्राण्यासां बभूवुर्मणिमंगलौघैः ॥ ३१ ॥
हैमे द्वितीयमणिपीठतले विरेजुरष्टौ ध्वजाः प्रविमला हरिदष्टकस्थाः॥
चक्रद्विपोक्षकमलांबरहंसतार्क्ष्यमाल्यांकिता विविधरत्नपिनद्धदंडाः
॥ ३२ ॥
रराज चूडामणिवत्त्रिलोक्यास्तृतीयपीठे भगवन्निवासः ॥
मनोहरो गंधकुटीविमानः सर्वार्थसिद्धीद्धविमानलीलः ॥ ३३ ॥
तस्थौ स तस्मिंस्त्रिजगत्प्रतीक्ष्यः प्रतीक्ष्यमाणामलवाग् जिनेंद्रः ॥
विबंधनो भव्यजनैरुपेतैः सुगंधिगंधांबुभिरुक्षितांते ॥ ३४ ॥
तस्थुर्यतींद्रदिविजप्रमदार्यिकाश्च ज्योतिष्कवन्यभवनामरवामने-
त्राः ॥
तं भावना वनसुरा ग्रहकल्पजाश्च मर्त्याः प्रदक्षिणमुपेत्य मृगाः क्रमेण
॥ ३५ ॥

आलेल्या सुवर्ण कमलांनी या मंडपाला नजराणा केला होता. अर्थात् या मंडपाच्या पुढे सुवर्ण कमलांची सुंदर रचना केली होती. ३१ आद्य सिंहासनावर चार महादिशामध्ये मुकुटांनी उज्वल दिसणाऱ्या मस्तकांच्या द्वारे यक्षांनी धारण केलेली धर्मचक्रें आठ मणिखचित मंगल द्रव्यासह शोभूं लागलीं. ३२ रत्नखचित दुसऱ्या सुवर्ण सिंहासनावर आठ दिशामध्यें चक्रवाक पक्षी, हत्ती, बैल, कमल, वस्त्र, हंस, गरुड, व माळा या चिन्हांनी युक्त, व ज्यांच्या दंडाला नाना प्रकारचीं रत्नें जडविलीं आहेत असे निर्मल आठ ध्वज शोभत होते. ३३ त्रैलोक्याला चूडामणि प्रमाणें शोभा आणणारें, श्री भगवंताचा ज्यावर निवास होतो अर्थात् प्रभु ज्यावर विराजमान होतात, असें मनोहर गंधकुटी विमान तिसऱ्या सिंहासनावर होतें. हें गंधकुटी विमान सर्वार्थ सिद्धीमध्यें असलेल्या तेजःपुंज विमानाची लीला धारण करीत होतें. ३४ त्रैलोक्य ज्यांची पूजा करीत आहे, ज्यांच्या दिव्य ध्वनींची सर्व लोक वाट पाहात आहेत, कर्मबंधनरहित व भव्यजनांनीं वेष्टिलेले असे श्री वर्धमान तीर्थंकर सुंदर गंधोदकानें ज्याचा मध्यभाग सुगंधित केलेला आहे अशा गंधकुटी विमानावर विराजमान आहे. ३५ मुनीश्वर, स्वर्गनामी देवांगना,

चतुर्महादिग्वलयप्रभेदाद्विपद्विधानूनगणप्रभेदाः ॥
सोपानमाला दशषट्कभास्वत्परीतपीठांतगता बभूवुः ॥ ३६ ॥
त्रिशालवर्योन्नतरत्नगोपुरे श्रीद्वारपाला वरहैमवेत्राः ॥
आसन्य‌असंख्यमुदारवेषा वन्यामरा भावनकल्पजाश्च ॥ ३७ ॥
आद्यस्य शालस्य मनोज्ञमानस्तंभस्य संख्यानविदांवरा ये ॥
सदंतरं चित्रविभूतियुक्तं तैर्योजनस्यार्द्धमिति प्रणीतं ॥ ३८ ॥
आद्यस्य शालस्य मनोहरस्य द्वितीयशालस्य च मध्यमाहुः ॥
त्रियोजनं कल्पनगावलीभिर्विराजमानस्य जिनागमज्ञाः ॥ ३९॥
द्वितीयशालस्य विचित्ररत्नप्रभावलीसारितभानुभासः ॥
तृतीयशालस्य मुनिप्रधाना द्वियोजनं चांतरमित्युशंति ॥ ४० ॥
तृतीयशालस्य विचित्रकेतनैर्निरंतरैश्छादितवायुवर्त्मनः ॥
द्विपारिपीठस्य च कीर्तितं बुधैः स्फुरत्प्रभस्यांतरमर्धयोजनम् ॥४१॥

आर्यिका, ज्योतिष्क देवांगना, व्यंतरांगना, भवनवासि देवांगना, भवनवासि देव, व्यंतर देव, ज्योतिष्क देव, कल्पवासि देव, मनुष्ये व पशु हे वीर जिनेश्वराच्या सभोंवती प्रदक्षिणारूपानें बसले. ३६ चार महादिशांच्या वलयांच्या भेदानें पुष्कळ अशा गणाचे बारा भेद झाले होते अर्थात चार दिशांचे मिळून बारा कोटे झाले होते. व त्यांत उपर्युक्त बारा गणांचे जीव विराजमान झाले होते. व प्रकाशमान अशा सिंहासनाच्या शेवटापर्यंत पायऱ्यांच्या सोळा पंक्ति होत्या.

३७ तीन्ही तटांच्या उत्कृष्ट व उच्च रत्नगोपुरावर ज्याच्या हातांत सोन्याच्या वेताची उत्तम छडी आहे व ज्यांचा वेष फार अमूल्य आहे असे व्यंतर, भावन व कल्पवासी देव यथाक्रम द्वारपाल होते ३८ गणितज्ञामध्यें श्रेष्ठ अशा विद्वान लोकांनीं पहिल्या तटाचें व सुंदर मानस्तंभाचें उत्तम नानाविध विभूतियुक्त अंतर अर्ध्या योजनाचें आहे असे सांगितलें आहे. ३९ कल्पवृक्षांच्या पंक्तींनीं शोभणाऱ्या पहिल्या तटाचें व दुसऱ्या मनोहर तटाचे मध्यें जिनागमाला जाणणारे विद्वान लोक तीन योजनाचें अंतर आहे असें सांगतात. ४० नानाविधरत्नांच्या कांतिमंडलाने सूर्याच्या किरणांचा तिरस्कार करणाऱ्या दुसऱ्या तटाचें व तिसऱ्या तटाचें मध्य अंतर मुनिश्रेष्ठ दोन योजनांचें आहे असें म्हणतात. ४१ नानाप्रकारच्या

अनूनकांतेर्जिनसंनिधा नदेशस्य धात्रीतलभूषणस्य ॥
अभ्यंतरं रत्नविराजमानस्तंभस्य पञ्चोजनमाहुरार्याः ॥ ४२ ॥
इति धाम जिनाधिपस्य तस्योभयतो द्वादशयोजनं व्यराजत् ॥
अमरेंद्रफणींद्रभूमिपालैरपरं कीर्णमिवान्तरं त्रिलोक्याः ॥ ४३ ॥
पौष्पी वृष्टिरनुद्रुता मधुकरैः श्वेतीकृताशानना ॥
तस्याग्रे सतमोलवेव दिनजा ज्योत्स्ना पपाताम्बरात् ॥
संद्रष्टुं तमिवाव्हयन् जिनपतिं भव्यांस्त्रिलोकीगतान् ॥
त्रैलोक्योदरमानसे श्रुतिसुखः खे दुंदुभीनां ध्वनिः ॥ ४४ ॥
क्रांतांभोदपथैरनेकविटपै रुंधन्दिशामांतरं ॥
नानापुष्पनवप्रवालसुभगो मूर्तःस्वयं वा मधुः ॥
एकीभूय कुरुद्रुमोत्कर इव द्रष्टुं तमभ्यागतो ॥
रक्ताशोकतरुः सुरांचिततलोऽप्यासीत्पवित्रः परम् ॥ ४५ ॥

ध्वजांनीं ज्यांनी आकाशमार्गाला निरन्तर आच्छादून टाकिलें आहे अशा तिसऱ्या तटाचें व ज्याची कांति सर्वत्र पसरली आहे अशा सिंहासनाचें अर्धयोजन अंतर आहे असें विद्वान लोकांनीं सांगितलें आहे. ४२ विपुलकांतियुक्त, भूतलाला भूषणरूप असें जिनेश्वर जेथें बसतात त्या स्थानाचें व रत्नांनीं शोभणाऱ्या मानस्तंभांचें मध्यांतर सहा योजनाचें आहे असे आर्य-गणधरादिक विद्वान म्हणतात. ४३ दोन्ही बाजूंनीं बारा योजनें प्रमाणाचें तें श्रीजिनेश्वराचें समवसरण शोभूं लागलें. देवेंद्र, नागेंद्र व राजे यांनीं व्याप्त झालेलें तें समवसरण जणु त्रैलोक्याचें दुसरें हृदयच होतें. ४४ जिनें दिशांचीं तोंडें श्वेतवर्णाचीं केलीं आहेत अशी भुंग्यांनीं अनुसरलेली पुष्पवृष्टि त्या वीर भगवंताच्या पुढें जेव्हां आकाशांतून होऊं लागली तेव्हां थोड्याशा अंधाराने युक्त अशी दिवसाच्या प्रारंभाची ही कांति जणु आहे असें वाटत असे. त्रैलोक्यामध्यें असलेल्या सर्व भव्यांनां श्री जिनेश्वराला पाहावयास चला असें म्हणून त्यांस बोलाविणारा कानाला गोड लागणारा असा आकाशांतील दुंदुभीचा ध्वनि सर्व त्रैलोक्याच्या मध्य भागांत व्यापून गेला. ४५ मेघमार्गाला आक्रमणाऱ्या अनेक फांद्यांनीं दिशांच्या मध्य भागाला व्यापणारा, नाना प्रकारचीं पुष्पें, कोंवळीं पानें यांनीं सुंदर दिसणारा

चक्रीकृत्य सुरैरुपर्युपरि वा क्षीरांबुराशेः पयो
विन्यस्तं गगने त्रिधा परिमितं स्वस्य प्रभाख्यातये ॥
तस्येंदुद्युतिशुभ्रमप्यविरतं भव्यौघरागावहं ॥
त्रैलोक्येशसुलांछनं भगवतश्छत्रत्रयं दिद्युते ॥ ४६ ॥
धुन्वानाविव दृश्यतामुपगतौ ज्योत्स्नातरंगौ दिवा ॥
यक्षौ तं विमलप्रकीर्णकपदेनासेविषातां प्रभुं ॥
यस्मिन्पश्यति रत्नदर्पण इव स्वातीतजन्मावलीं ॥
भव्यौघस्तदभूत्तदीयवपुषो भामंडलं मंडनं ॥४७॥
नानापत्रलतान्वितं वनमिव व्याजृंभमाणाननै-॥
र्युक्तं केशरिभिः सरत्नमकरं धामेव वारां परं ॥
तुंगं हेममयं सुरासुरजनैः संसेव्यमानं सदा ॥
मेरोः शृंगमिवासनं जिनपतेस्तस्याभवद्भासुरम् ॥ ४८ ॥

अशोक वृक्ष जणूं मूर्तिमंत अशोक वृक्षाप्रमाणें वाटत होता. अथवा देवकुरु व उत्तर कुरु या भोगभूमींतील कल्पवृक्षांचा समुदाय वीर प्रभूला जणू पहावयास आला आहे काय ? असा दिसणारा रक्त अशोक वृक्ष सुरांचिततल असूनही म्हणजे दारूनें युक्त आहे तळभाग ज्याचा असा असूनही पवित्र होता. या विरोधाचा परिहार याप्रमाणें समजावा. सुर म्हणजे देव त्यांनीं अंचिततल अर्थात् पूजनीय आहे तलभाग ज्याचा असा तो रक्ताशोकवृक्ष अतिशय पवित्र होता यांत आश्चर्य कसलें?

४६ भगवंताचें छत्रत्रय भगवान त्रैलोक्याचे स्वामी आहेत असें सुचवीत होतें. हें छत्रत्रय चंद्राच्या कांतिसारखें शुभ्र होतें तरी ही भव्यसमूहाच्या ठिकाणीं आरक्तपणा-तांबडेपणा उत्पन्न करीत होतें. या विरोधाचा परिहार असा:—छत्रत्रय चंद्राच्या कांतिप्रमाणें होतें व ते भव्यांच्या ठिकाणीं रागावह होतें अर्थात् प्रेम उत्पन्न करीत होतें. स्वतःच्या प्रभेची प्रसिद्धि व्हावी म्हणून देवांनीं क्षीरसमुद्राचें पाणी आकाशांत चक्राकार करून एकावर एक अशा रीतीने जणु रचिलें आहे काय अशी छत्रत्रय पाहून कल्पना उत्पन्न होत होती. याप्रमाणें तें वीरप्रभूचें छत्रत्रय चमकत होते. ४७ निर्मळ चामरांच्या मिषानें जणु दिवसा दृश्यावस्थेला प्राप्त झालेल्या चंद्रप्रकाशाच्या दोन तरंगांना हलविणारे दोन यक्ष प्रभूची सेवा

अजायमानेऽथ पतिः सुराणां दिव्यध्वनौ तस्य जिनेश्वरस्य ॥
आनेतुमात्मावधिदर्शितो यस्तं गौतमग्रामममगाद्गणेशं ॥ ४९ ॥
तत्र स्थितं जगति गौतमगोत्रमुख्यं विप्रं धिया विमलया प्रथितं च कीर्त्या ॥
इंद्रस्ततो जिनवरांतिकमिंद्रभूतिं वादच्छलेन बटुवेषभृदानिनाय ॥५०॥
मानस्तंभविलोकनादवनतीभूतं शिरो बिभ्रता ॥
पृष्टस्तेन सुमेधसा स भगवानुद्दिश्य जीवस्थितिम् ॥
तत्संशीतिमपाकरोज्जिनपतिः संभूतदिव्यध्वनि-
र्दीक्षां पंचशतैर्द्विजातितनयैः शिष्यैः समं सोऽग्रहीत् ॥५१॥

करूं लागले. रत्नदर्पणांत मुख पाहावें त्याप्रमाणें ज्याच्यामध्यें आपल्या पूर्वभवाचें भव्य जीव अवलोकन करितात तें प्रभूच्या शरीराचें कांतिमंडल त्याच्या शरीराचें भूषण झालें. ४८ नाना प्रकारच्या पानांनीं युक्त असें हें वनच आहे काय, अथवा रत्नें व मगर वगैरे प्राण्यांचें निवासस्थान असा जलधि-समुद्रच आहे काय' किंवा सुर व असुर यांच्याकडून सदा सेविलें जाणारें हें मेरूचें शिखरच आहे काय अशा कल्पना उत्पन्न करणारें, ज्यांनीं तोंड फाकेलें आहे अशा सिंहांनीं युक्त असें वीर जिनाचें सिंहासन फार चमकत होतें. तात्पर्य हें कीं, सिंहासनावर पुष्कळ प्रकारची वेलबुट्टी काढलेली होती म्हणून तें वनाप्रमाणें भासत होतें, रत्नांनीं जडलेलें व मगर वगैरे प्राण्यांची आकृति त्यावर काढलेली असल्यामुळें तें समुद्रासारखे भासत होते व देव त्याची नेहमी सेवा करीत होते व तें फार उंच आणि चमकणारें असल्यामुळें मेरूच्या शिखराप्रमाणें भासत होतें. ४९ यानंतर भगवान वीर जिनेश्वराचा दिव्य ध्वनि होत नाहीं हे पाहून स्वतःच्या अवधिज्ञानाच्या द्वारें जो दाखविला गेला त्या गौतम गणधराला आणण्यासाठीं देवांचा स्वामी इंद्र गौतम ग्रामीं गेला ५० त्या ठिकाणीं विमल बुद्धीनें व कीर्तीनें जगांत प्रसिद्ध असलेला गौतम गोत्रांतील मुख्य अशा इंद्रभूति ब्राह्मणाला वादाच्या मिषानें बटु वेष धारण करणाऱ्या त्या इंद्रानें श्री वीर प्रभूजवळ आणिलें. ५१ इंद्रभूतीनें मानस्तंभाचें दर्शन केलें तेव्हां त्याचा गर्व नष्ट झाला व त्यानें आपलें मस्तक नम्र केलें. विद्वान अशा त्यानें जीवाच्या अस्तित्वाला उद्देशून प्रश्न केला तेव्हां ज्यांच्या ठिकाणीं दिव्यध्वनि उत्पन्न झाला आहे

पूर्वाण्हे दीक्षयामा प्रविमलमनसा लब्धयो येन लब्धाः ॥
बुद्ध्यौषध्यक्षयौजप्रथितरसतपोविक्रियाः सप्त सद्यः ॥
तस्मिन्नेवान्हि चक्रे जिनपतिवदनप्रोद्गतार्थप्रपंचां
सोपांगां द्वादशांगश्रुतपदरचनां गौतमः सोऽपराण्हे ॥५२॥
संप्राप्तसर्वातिशयं जिनेंद्रमिंद्रस्तदा तं विनयावनम्रः
प्रचक्रमे स्तोतुमिति श्रुतिज्ञः स्तुत्ये न केषां स्तवनाभिलाषः॥५३॥
अथ जिनेंद्र ! तव स्तवसद्विधौ मम फलस्पृहयापि समुद्यता ॥
स्खलति वीक्ष्य मतिर्गुणगौरवं श्रमकरोऽभिमतोऽपि महाभरः॥५४॥
जिन ! तथापि मया हृदयस्थितप्रचुरभक्तिभरादभिधास्यते ॥
तव गुणस्तुतिरप्यतिदुष्करा सदनुरागयुतस्य न हि त्रपा ॥५५॥

अशा वीर प्रभूंनीं त्याचा संशय दूर केला. तेव्हां इंद्रभूतीने पांचशे ब्राह्मण शिष्यासह वीरनाथाजवळ दीक्षा घेतली. ५२ दिवसाच्या पूर्वभागांत दीक्षा घेतल्याबरोबर इंद्रभूती गणधराला परिणामांच्या अतिशय निर्मळपणामुळें बुद्धि, औषध, अक्षय, बळ, रस, तप, विक्रिया या सात ऋद्धि प्राप्त झाल्या. तेव्हां जिनेश्वराच्या मुखापासून निघालेल्या अर्थाचा–जीवादि पदार्थांच्या वर्णनाचा विस्तार ज्यामध्यें केलेला आहे व उपांगांनीं सहित अशा द्वादशांगश्रुतज्ञानाच्या पदांची रचना इंद्रभूतिगणधरांनीं त्याच दिवशीं दिवसाच्या उत्तर भागांत केली.

५३ ज्यांना सर्व अतिशय अर्थात् अरहंताला ४६ गुण असतात ते सर्वगुण प्राप्त झालें आहेत अशा श्रीवीर जिनेंद्राची श्रुतज्ञानी व विनयानें नम्र झालेल्या इंद्रानें स्तुति करण्यास प्रारंभ केला. बरोबरच आहे की जो स्तुतीला पात्र आहे त्याची स्तुति करण्याची इच्छा कोणास बरें उत्पन्न होत नाहीं? सर्वांसच होते. ५४ हे जिनेश्वरा ! तुझी स्तुति करण्याच्या कार्यीं माझी बुद्धि फलाच्या इच्छेनें प्रवृत्त झाली आहे परंतु तुझ्या गुणांचें फार मोठें ओझें आहे हे पाहून अर्थात् तुझ्या ठिकाणीं अनंत गुण आहेत हें पाहून माझी बुद्धी स्खलन पावत आहे. बरोबरच आहे कीं, आवडतें देखिल मोठें ओझें थकवा उत्पन्न करितेंच. ५५ हे जिननाथ! तरीही माझ्या हृदयांत असलेल्या अतिशय भक्तिमुळें तुझ्या गुणाची स्तुति करणें अतिशय कठिण असतांही मी ती करावयास प्रवृत्त झालों आहे. बरोबरच आहे कीं, उत्तम पदार्थावर–आत्म कल्याण करणाऱ्या पदार्थावर प्रेमयुक्त बनलेल्या माणसाला लज्जा

विगतहानि दिवानिशमुज्ज्वलं विकचकंजचयैरभिनंदितं ॥
वहति वीर यशस्तव संततं श्रियमनूनमपूर्वकलाभृतः ॥ ५६ ॥
त्रिभुवनं ऽततं करणक्रमावरणहीनमिदं खलु वीक्ष्यते ॥
जिन ! यथास्थितमस्य परिभ्रमन्न हि विचिंत्यगुणः परमेश्वरः॥५७॥
क्षुतसुमारुतकंपितमेरुणा मनसिजो मृदुपुष्पधनुर्धरः ॥
अधरितो भवतेति किमद्भुतं बलवता विपक्षोऽप्यभिभूयते ॥५८॥
जगति यस्य सुदुर्धरमूर्जितं प्रथितधैर्यधनैरपि शासनम् ॥
प्रकटदुःसहगुप्तिनिबंधनं परमकारुणिकः स कथं भवान् ॥ ५९ ॥

नसते. ५६ हे वीरनाथा ! तुझें पूर्ण यश अपूर्व चंद्राची शोभा नेहमी धारण करीत आहे. या तुझ्या यशाला केव्हांही हानि नाहीं. तें रात्रंदिवस उज्ज्वलच राहतें व प्रफुल्ल झालेल्या कमलसमूहांनीं ( दिवसा विकास पावणाऱ्या कमलसमूहांनी. ) तें प्रशंसनीय झालें आहे. दिनविकासि कमलें चंद्राच्या प्रकाशाला पाहून विकासित न होतां मिटतात अर्थात् त्याच्या प्रकाशाचें स्वागत—अभिनंदन करीत नाहींत. पण हे जिना ! तुझ्या यशाला पाहून तीं प्रफुल्लित होतात चंद्राला कृष्ण पक्षांत हानि आहे, दिवसा तेजोहीनता ही आहे. यास्तव तुझें यश अपूर्व चंद्राच्या शोभेला धारण करीत आहे. ५७ हे वर्द्धमान जिना ! इंद्रियांच्या क्रमानें व आवरणानें रहित होऊन तुजकडून हें जग जसें आहे तसें पाहिलें जात आहे. तसें हे जग पाहण्यासाठीं—जाणण्यासाठीं तुला फिरावें लागत नाहीं. अर्थात् एकाच ठिकाणीं राहून तूं सर्व जग जाणीत आहेस. बरोबरच आहे कीं, हे विभो ! तुझे गुण विचार करतां येण्या सारखे नाहींत. ५८ शिंकेच्या वाऱ्यानें हे जिना ! त्वां मेरुपर्वत देखिल सकंप केला होता. यास्तव अतुलबल धारण करणाऱ्या तुजकडून कोमल पुष्पांचें धनुष्य धारण करणारा मदन जिंकिला गेला यांत काय आश्चर्य आहे बरें ? बरोबरच आहे कीं. बलवान प्राण्याकडून तुच्छ देखिल व्यक्ति जिंकिली जातेच. ५९ हे वीर प्रभो ! तुझे शासन प्रसिद्ध धैर्यरूपी धन धारण करणाऱ्या पुरुषांना देखिल धारण करणे कठिण आहे. तुझें हें उत्कृष्ट शासन स्पष्ट रीतीनें दुःसह अशा गुप्तींनीं युक्त आहे. अर्थात् मनोगुप्ति, वचनगुप्ति व कायगुप्ति यांनीं सहित आहे. यास्तव हे प्रभो ! आपण परम दयाळु कसे ? जसें एखादा राजा उघडपणे दुःसह अशा कारागृहांत लोकांना

अनुदिनं कुमुदं परिवर्द्धयन् परमलोकवितापि महो दधत् ॥
विरहितावरणोऽप्यचलस्थितिर्जिनपते! त्वमपूर्वतमोपहः ॥ ६० ॥
समुपलभ्य गिरं जिन! तावकीं हततृषो न भवन्ति न साधवः ॥
नभसि वृष्टिविमोरुरजोहरामभिनवांबुभृतो भुवि चातकाः ॥ ६१ ॥
सुगुणरत्ननिधिरप्यजडाशयो विमदनोऽपि निकामसुखप्रदः ॥
त्रिजगताधिपोऽप्यपरिग्रहस्तव विरुद्धमिदं जिन चेष्टितम् ॥६२॥

कोरं लागला म्हणजे त्याची आज्ञा धैर्य धारण करणाऱ्या लोकांना देखिल पाळतांना भीति वाटते तसे हे प्रभो! आपलें शासन-मत उत्कृष्ट आहे परंतु त्याचे गुप्ति, समिति वगैरे नियम पाळणें धीर मनुष्यांना देखिल कठिण वाटतें यास्तव असे कडक नियम घालून देणाऱ्या विभो! तूं दयाळु कसा बरे आहेस? या ठिकाणीं कवीनें वीर प्रभूच्या मताची निंदा केली आहे असें वाटेल परंतु ती निंदा नव्हे. पाळण्याला कठिण परंतु आत्म्याचें खरें कल्याण करून देणारें असेंच वीरप्रभूचें मत आहे यास्तव त्याच्याच ठिकाणीं पूर्ण दयाळुता संभवते. असें कवीनें आपलें मत दाखविलें आहे. ६० हे जिनेश्वरा! तूं अपूर्वचंद्र आहेस, तूं नेहमीं कुमुद—कु—पृथ्वी तिला आनंद देतोस, व तुझें तेज अतिशय लोकवितापि लोकांना त्रास्त करणारें आहे. अर्थात् सर्व लोकाला—जगाला प्रकाशित करणारें—जाणणारें आहे. तुझ्यावर कधींहि कर्मरूपी मेघाचें आवरण येत नाहीं व तूं नेहमी स्थिर राहतोस यास्तव तूं अपूर्वचंद्र आहेस. आकाशांतील चंद्र फक्त रात्रीं विकास पावणाऱ्या कमलांनांच आनंदित करितो. त्याचा प्रकाश सर्व जगभर पडत नाहीं. त्याला ढग झांकून टाकितात. व तो एके ठिकाणीं राहात नाहीं. म्हणून त्याच्या ठिकाणीं कांहींच अपूर्वता नाहीं.

६१ हे जिनेश्वरा! तुझ्या उपदेशाची प्राप्ति करून घेऊन सत्पुरुष तृषारहित होतात. अर्थात् तुझ्या उपदेशरूपी जलापासून भव्य जीवाचा मोठा पापरूपी मळ नष्ट होतो व परपदार्थ विषयींचा लोभ नष्ट होतो. जसें मोठ्या धूळीचा उपशम करणारें असें आकाशांतील नवीन मेघाचें पाणी प्राप्त करून घेऊन या पृथ्वीतलावर चातक पक्षी तृप्त होत नाहीं काय? होतात. ६२ हे जिना! तूं अनेक सद्गुणरूपी रत्नांचा साठा असूनही अर्थात् गुणरत्नसमुद्र असूनही अजलाशय—समुद्र नाहींस याचा विरोध परिहार असा. अजडाशय—मूर्खपणाच्या आशयानें रहित आहेस. अर्थात् तूं महाज्ञानी आहेस. तूं विमदन—मदनविकारानें रहित असूनहि अतिशय कामवि-

उक्त्वेति संपृष्टवते यथावत्तस्मै स जीवादिपदार्थतत्वं ॥
भव्यान्पथि स्थापयितुं विमुक्तेरित्थं जिनेंद्रो विजहार वीरः ॥८४॥
अपनीतकंटकतृणोपलादिका धरणीतले सपदि योजनांतरे ॥
सुरभीकृताखिलदिगंतराः सुखा मरुतो ववुः पथि पुरो जिनेशिनः ॥ ८५ ॥
अनभ्रवृष्टिः सुरभिर्महीरजः शमं निनायाकृतपंकविभ्रमा ॥
अधारितास्तस्य पुरःस्वयं ययुर्ध्वजाः समंताद्गगने मरुच्चलाः ॥८६॥
मणिमयाब्दतलप्रतिमा मही विविधरत्नमयी समजायत ॥
सकलसस्यचयो ववृधेऽवनौ विदितपक्षमृगैरपि तत्यजे ॥ ८७ ॥
पादन्यासे सप्त पद्माः पुरस्तात्पश्चाच्चासन्सप्त तस्यांतरिक्षे ॥
अग्रे देवैर्वाद्यमानानि भक्त्या मंद्रं मंद्रं दिव्यतूर्याणि नेदुः ॥८८॥

करीत असतां पुढें आलेल्या किरीटाला डाव्या हातानें पूर्व ठिकाणीं योग्य रीतीनें बसवून इंद्रानें पुढें लिहिल्याप्रमाणें प्रश्न केले. ८३ हे प्रभो ! हें जग कसें स्थिर राहिलें आहे व केवढें आहे ? तत्वें कोणतीं आहेत ? अनादि व अविनाशी अशा या आत्म्याला कर्मबंध कोणत्या कारणांनी होतो व कोणत्या कारणांनीं त्याला मोक्ष प्राप्त होतो ? सर्व पदार्थांचें स्वरूप कसें आहे ? हें आपण आपल्या दिव्य वाणीनें सांगावें. ८४ याप्रमाणे प्रश्न करणाऱ्या त्या इंद्राला यथार्थ रीतीने प्रभूंनी जीवादिपदर्थांचें स्वरूप सांगितलें नंतर वीरप्रभु सर्व भव्यांना मोक्षमार्गांत स्थापन करण्यासाठीं विहार करूं लागले. ८५ विहार करीत असतां मार्गामध्यें जिनेश्वराच्या पुढें एक योजनपर्यंत पृथ्वीतलावर कांटे, गवत, पाषाण वगैरे दूर करणारे, सर्व दिशांचा मध्यभाग सुगंधित करणारे असे सुखदायक वारे वाहू लागले. ८६ मेघ नसतांही सुगंध अशा गंधोदकवृष्टीनें जमीनीवर चिखल न करितां सर्व धूळ नाहींशी केली. वाऱ्यानें हालणारे ध्वज आकाशांत सर्वत्र अधर रीतीनें प्रभूच्या पुढें गमन करूं लागले. ८७ पृथ्वी रत्नमय दर्पणाप्रमाणें नानाप्रकारच्या रत्नांनीं निर्माण केलेली अशी झाली. पृथ्वीवर सर्व धान्यांची वाढ झाली. ज्यानीं आपापला पक्ष जाणला आहे अशा पशूंनीं वैर सोडून दिलें. ८८ आकाशामध्यें प्रभु विहार करीत असतां त्यांच्या पाऊल ठेवण्याच्या जागीं पुढें सात कमलें व मागे सात कमलें निर्माण

अग्रेसरं व्योमनि धर्मचक्रं तस्य स्फुरद्भाखुररश्मिचक्रं ॥
द्वितीयतिग्मद्युतिबिंबशंकां क्षणं बुधानामपि कुर्वदासीत् ॥ ८९ ॥
एकादश ख्यातमहानुभावास्तस्येंद्रभूतिप्रमुखा गणेशाः ॥
समुन्नताः पूर्वधराश्च पूज्या बभूवुरुद्घास्त्रिशतानि लोके ॥ ९० ॥
मताः सहस्राणि नवाथ शिक्षका युतान्युदारा नवभिः शतैः परैः
सहस्रमासन्नवधीक्षणान्वितास्त्रिभिः शतैरभ्याधिकं च साधवः ९१
धीरा मनःपर्ययबोधयुक्ता बुधस्तुताः पंच शतान्यभूवन् ॥
अनुत्तमाः केवलिनश्च मान्या मनीषिणां सप्तशतानि शश्वत् ॥९२॥
अनिंदिता वैक्रियिकाः शता निख्याता बभूवुर्नव शांतचित्ताः ॥
उन्मीलिताशेषकुतीर्थवृक्षा वादिद्विपेन्द्राश्च चतुःशतानि ॥ ९३ ॥
अथार्यिकाः शुद्धचारित्रभूषाः श्रीचंदनार्याप्रमुखा बभूवुः ॥
षड्भिः सहस्रैरधिकानि वंद्यास्त्रिंशत्सहस्राणि सुनीतिभाजः ॥९४॥

होत असत. प्रभूंच्या पुढें देवाकडून भक्तीनें वाजविलीं जाणारीं दिव्य वाद्यें गंभीरपणें शब्द करूं लागलीं. ८९ चमकणाऱ्या तेजस्वी किरणसमूहांनीं युक्त असें धर्मचक्र प्रभूच्या पुढें चालूं लागलें. विद्वान लोकांना देखील हें दुसरें सूर्यमंडळ आहे अशी तें शंका उत्पन्न करीत असे. ९० ज्यांचा ज्ञानप्रभाव प्रसिद्ध आहे असे श्रीवीरप्रभूचे इंद्रभूति वगैरे अकरा गणधर होते. व उन्नत अवस्थेला पोहोचलेले अर्थात् उत्तम चारित्रधारक महत्त्वशाली व पूज्य असे चौदा पूर्वांला जाणणारे तीनशे मुनिराज होते ( श्रीवीरप्रभूचे इंद्रभूति, वायुभूति, अग्निभूति, सुधर्म, मौर्य, मौंड्य, पुत्र, मैत्रेय, अकंपन, धवेल व प्रभास असे अकरा गणधर होते. )

९१ नऊ हजार नऊशें शिक्षक मुनि प्रभूच्या समवसरणांत होते, असें मानिले आहे. तसेंच ज्यांना अवधि ज्ञानरूपी डोळा आहे असे मुनि एक हजार तीनशें होते. ९२ विद्वानाकडून स्तुत्य व धीर असे मनःपर्यय ज्ञानीमुनि पांचशें होते. विद्वज्जनांना पूज्य व अतिशय उत्कृष्ट अर्थात् लोकोत्तम असे केवलज्ञानी मुनि सातशें होते. ९३ प्रशंसनीय व शांत अतःकरणाचे वैक्रियिक ऋद्धिधारक मुनि नऊशे होते. ज्यांनीं संपूर्ण कुधर्मरूपी वृक्षाला अर्थात ज्यांनीं कुमतरूपी वृक्षाला संपूर्णपणें मुळापासून उपटून टाकिलें असे

अणुगुणवरशिक्षाभेदभिन्नव्रतस्था जगति शतसहस्राण्यूर्जिताः श्रावकाः स्युः ॥
व्रतमणिगणभूषास्तत्वमार्गे प्रवीणास्त्रिगुणशतसहस्राण्युज्ज्वलाः श्राविकाश्च ॥९५॥
तस्यासंख्याता देवदेव्यः सभायां संख्यातास्तिर्यग्जातयश्चाप्यमोहाः ॥
आसन्सम्यक्त्वं निश्चलं धारयंतो ज्ञाताशेषार्थाः शांतया चित्तवृत्त्या ॥ ९६ ॥
एभिः समं त्रिभुवनाधिपतिर्विहृत्य त्रिंशत्समाः सकलसत्वहितोपदेशी ॥
पावापुरस्य कुसुमाचितपादपानां रम्यं श्रियोपवनमाप ततो जिनेंद्रः ॥९७॥
कृत्वा योगनिरोधमुज्झितसभः षष्ठेन तस्मिन्वने ॥
व्युत्सर्गेण निरस्य निर्मलरुचिः कर्माण्यशेषाणि सः ॥
स्थित्वेंदावपि कार्तिकासितचतुर्दश्यां निशांते स्थिते ॥
स्वातौ सन्मतिराससाद भगवान्सिद्धिं प्रसिद्धाश्रियं ॥९८॥

वादिरूपी गजेंद्र अर्थात् वादऋद्धीचे धारक मुनीश्वर चारशे होते. ९४ निर्दोष चरित्ररुपी अलंकार ज्यांनीं धारण केला आहे व चंदना आर्यिका ज्यामध्यें मुख्य आहे अशा सुनीतिला अर्थात् मोक्षमार्गाला अनुसरून वागणाऱ्या आर्यिका छत्तीस हजार होत्या. ९५ अणुव्रते, गुणव्रतें आणि शिक्षाव्रतें या भेदांनी भिन्न अशा व्रतांत स्थिर राहणारे श्रावक या भूतलावर एक लाख होते. व व्रतरूपी-रत्नसमूहाच्या अलंकारांनीं युक्त आणि तत्वमार्गांत निपुण निर्दोष अशा तीन लाख श्राविका होत्या. ९६ प्रभूच्या समवसरणांत असंख्यात देवी व देव होते व अमोह अर्थात् मोह रहित असे पंचेंद्रिय तिर्यंच संख्यात होते. हे सर्व तिर्यंच, देवी व देव निश्चल सम्यक्त्वाला धारण करणारे सर्व पदार्थांचें स्वरूप जाणणारे असे होते. प्रभूच्या समवसरणांत हे सर्व शांत चित्तानें बसत असत. ९७ तीन जगाचे अधिपति संपूर्ण जीवांना हिताचा उपदेश करणारे अशा वीर जिनेश्वरांनीं तीस वर्षेपर्यंत या सर्व

अव्याबाधं पदमतिशयानंतसौख्यं जिनेंद्रे
तस्मिन्याते तनुमनुपमां पूजितुं तस्य पूतां ॥
भक्त्याजग्मुर्विबुधपतयो विष्टरोत्कंपनेन ॥
ज्ञात्वा सर्वे द्रुतमनुगतास्तं प्रदेशं स्वसैन्यैः ॥९९॥
अग्नीन्द्रमौलिवररत्नविनिर्गतेऽग्नौ कर्पूरलोहहरिचंदनसारकाष्ठैः
संधुक्षिते सपदि वातकुमारनाथैरिंद्रा मुदा जिनपतेर्जुहुवुः शरीरं१००
कल्पाः कल्याणमुच्चैः सपदि जिनपतेः पंचमं तस्य कृत्वा ॥
भूयान्नोऽप्यस्य भक्त्या ध्रुवमनतिचिरात्सिद्धिसौख्यस्य सिद्धिः॥
इत्यंतश्चिंतयंतः स्तुतिमुखरमुखास्तं प्रदेशं परीत्य
प्रीत्या शक्रादयःस्वं प्रतिययुरमरा धाम संप्राज्यसंपत् ॥ १०१ ॥

संघासह विहार केला. नंतर ते पुष्पांनीं युक्त अशा वृक्षांच्या सौंदर्यानें रमणीय अशा पावापुर शहराच्या उद्यानामध्यें आले. ९८ त्या उद्यानामध्यें दोन दिवस पर्यंत योगनिरोध करून ज्यानीं सभास्थान सोडिलें आहे अर्थात् समवरणाचा त्याग केला आहे, परमावगाढ सम्यग्दर्शनधारक, अशा वीरस्वामींनीं कायोत्सर्गानें सर्व कर्मांचा नाश केला. व कार्तिक कृष्णपक्षाच्या चतुर्दशीच्या पहाटेस स्वाति नक्षत्रावर चंद्र असतां भगवान सन्मति जिनेश्वरांनीं प्रसिद्ध अशा शोभेला धारण करणाऱ्या मोक्षास प्राप्त करून घेतलें. ९८ उत्कृष्ट व अनंत सौख्य जेथें आहे अशा बाधारहित मोक्षपदाला वीर भगवान प्राप्त झाले असतां, सिंहसनांच्या हलण्यानें भगवंतांना मुक्तिप्राप्ति झाली हें जाणून आपल्या सैन्यानें अनुसरलेले असे ते सर्व इंद्र मोठ्या भक्तीनें उपमारहित अशा जिनेश्वराच्या पवित्र शरीराचें पूजन करण्यासाठीं त्या प्रदेशाला–पावा पुराच्या उद्यान प्रदेशाला–जेथें भगवताला मोक्ष प्राप्त झाला आले. १०० अग्निकुमार देवांच्या इंद्रांच्या मुकुटावरील उत्कृष्ट रत्नापासून निघालेला अग्नि कापूर, अगरु, गोशीर्ष चंदन व इतर उत्कृष्ट सुगंधि लांकडें यांनीं तत्काल वातकुमारदेवांच्या इंद्रांनीं पेटविला असतां सौधर्मेंद्र वगैरे इंद्रांनीं प्रभूच्या शरीराची आनंदानें दहन क्रिया केली. १०१ सौधर्मस्वर्ग वगैरे स्वर्गांत राहणाऱ्या देवांनीं तत्काल श्रीवीरप्रभूचे पांचवें कल्याण–मोक्ष कल्याण केलें. व या प्रभूच्या भक्तीनें आम्हास देखिल लौकरच मोक्षसुखाची कायमची प्राप्ति होवो असा त्यांनीं मनांत विचार केला. हा विचार करीत व मुखांनीं एकसारखी स्तुति करीत अति-

कृतं महावीरचरित्रमेतन्मया परस्वप्रतिबोधनार्थं ॥
सप्ताधिकत्रिंशभवप्रबंधं पुरूरवाद्यंतिमवीरनाथं ॥ १०२ ॥
वर्द्धमानचरित्रं यः प्रव्याख्याति शृणोति च ॥
तस्येहपरलोकस्य सौख्यं संजायते तरां ॥ १०३ ॥
संवत्सरे दशनवोत्तरवर्षयुक्ते भावादिकीर्तिमुनिनायकपादमूले ॥
मौद्गल्यपर्वतनिवासवनस्थसंपसच्छ्राविकाप्रजनिते सति वाममत्वे ॥
विद्या मया प्रपठितेत्यसगाव्हयेन श्रीनाथराज्यमखिलं जनतोपकारि ॥
प्राप्यैव चोडविषये विरलानगर्यां ग्रंथाष्टकं च समकारि जिनोपदिष्टं॥
❀ इत्यसगकृते वर्धमानचरिते महापुराणोपनिषदि भगवन्निर्वाणगमनो नाम अष्टादशः सर्गः ॥ ❀

❀ समाप्तोऽयं ग्रंथः ❀

शय प्रीतीनें इंद्रादिकांनीं त्या प्रभूच्या मोक्षस्थानाला प्रदक्षिणा घातल्या. यानंतर हा सर्व विधि करुन उत्कृष्ट वैभवानें युक्त असलेल्या आपल्या स्थानीं-स्वर्गादि-स्थानीं ते निघून गेले. १०२ पुरुरवाच्या भवापासून वीर जिनाच्या भवापर्यंत सदतीस भवांचें ज्यांत वर्णन केलें आहे असें हे महावीर जिनेश्वराचें चरित्र मी [ असगमहाकवीनें ] स्वतःला व इतर भव्यांना यापासून बोध मिळावा म्हणून रचिलें आहे. १०३ जो भव्य या वर्धमान चरित्राचें व्याख्यान करितो अर्थात् त्याचें स्पष्टीकरण करितो व जो भव्य हें चरित्र ऐकतो त्या भव्यांना अधिक प्रमाणानें इहलोक व परलोकाचीं सुखें प्राप्त होतात १०४-१०५ मौद्गल्य नांवाचा पर्वत जेथें आहे अशा वनामध्यें राहणाऱ्या संपत् या नांवाच्या श्रेष्ठ श्राविकेनें महावीरचरित्राविषयीं आपला आदर प्रगट केल्यामुळें मी (असग महाकवीनें) भावकीर्ति मुनिश्वरांच्या चरणासमीप नवशे दहा संवतांत हें वीर भगवंताचें चरित्र रचिलें आहे. प्रजेचें कल्याण कराणाऱ्या श्रीनाथराजाचे राज्यांत जाऊन मी असगनांवाच्या कवीनें विद्येचें अध्ययन केलें आहे. व चोल-देशांत विरला नगरीमध्यें मी [ असगकर्वीनें ] जिनेश्वरोपदिष्ट असे आठ ग्रंथ रचिले आहेत.

❀ याप्रमाणें असगकविविरचित महापुराणोपनिषद् वर्द्धमानचरित्रांतील श्रीवीरजिनाच्या मोक्षप्राप्तीचें वर्णन करणारा हा अठरावा सर्ग समाप्त झाला.

समाप्त